श्रीवासुदेवानन्दसरस्वतीग्रन्थमाला

# द्वादशं पुष्पम् ( १२ )

१ श्रीगुरुदेवचरित्र, २ वेदनिवेदनिस्तोत्र सटीक, सभाषांतर,
३ श्रीकृष्णालहरी सटीक, सविवरण, सभाषांतर, ४ पंचपाक्षिक
सटीक, सभाषांतर, ५ नवीन मिळालेलीं स्तोत्रें,
६ कीर्तनोपयुक्त आख्यानें

श्रावण कृष्ण पंचमी
शतसांवत्सरिक जयंती
गुरुवार शके १८[illegible]

मूल्यम् ७ रूपकाः

दि. १९ ऑगस्ट
सन १९५४

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः

# १ प्रकाशकाचें निवेदन

गुरो तुझी ही पदवारिधारा। धुवो सदा कायिक दोष सारा।
सदैव माझें मन वाणि शुद्ध। करो तुझें नाम पवित्र सिद्ध ॥ १ ॥

श्रीवासुदेवानन्दसरस्वतीग्रन्थमालेचें हें शेवटचें द्वादश पुष्प आज प्रकाशित होत असून, आजच्या शतसांवत्सरिक जयंतीमहोत्सवाच्या मंगलमय दिवशीं ही द्वादश सुवर्णपुष्पात्मक दक्षिणा सर्वात्मक वासुदेवाला आम्ही समर्पण करीत आहोंत. आणि आयुष्यांतील परमभाग्याचा असा समय निर्माण करणाऱ्या सर्वशक्तिसंपन्न श्रीगुरुदेवांच्या चरणांजवळ प्रणामपूर्वक निरंतरस्मृतिरूपभक्तीची याचना करून, आज चार वर्षे ग्रंथप्रकाशनात्मक अंशानें सतत चालू असणारा हा ज्ञानयज्ञ कांहीं काल थांबवीत आहोंत. आज फक्त श्रीमहाराजांचें उपलब्ध वाङ्मय एकत्र झालें. त्या वाङ्मयांतील मंतव्य आणि निदिध्यासितव्य विभाग कोणता तें पाहून, तशी त्या भागाच्या मनन-निदिध्यासनाची योग्यता निर्माण होण्याकरितां प्रत्यक्ष आचार कसा ठेवला पाहिजे, यासंबंधीं श्रीमहाराजांनीं आपल्या ग्रंथांतून काय सांगून ठेवलें आहे तें जनतेच्या पुढें येऊन त्या आदेशाप्रमाणें जनतेचें आचरण घडावें याबद्दल विशेष प्रयत्न होणें आवश्यक आहे. मनाची स्थिति नित्य संकल्पविकल्पात्मक असणार. त्यांतच चांगले संकल्प जर करतां आले तर ईश्वरकृपेनें ते फलद्रूप होण्याचा योग कधीं तरी येईलच. या दृष्टीनें हा संकल्प आम्ही जनतेपुढें मांडलेला आहे. आणि तो केवळ स्वार्थमूलक नसून सर्व जनहित-संबंधीं असल्यानें विशुद्ध आहे यांत शंका नाहीं. हा संकल्प, 'दुरितांचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो। जो जें वांछील तो तें लाहो। प्राणि-जात ॥' या श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या संकल्पास अनुसरणारा आहे. सर्व-संकल्प संन्यासी महानुभावांची, अधिकाराप्रमाणें प्रत्येकाला निश्चित सन्मार्ग दर्शविणारी दिव्य ग्रंथसंपत्ति आज आपल्या दृष्टीसमोर आहे. इतकेंच नव्हे तर ती आपल्या पूर्ण मालकीची आहे. 'धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे

युगे ' असें जगत्पालकाचें पूर्ण आश्वासनहि या कामांत आपल्याला आहे. इतकी सर्व साधनसामग्री आपल्याजवळ तयार असून आपण उदासीन किंवा निराश होणें अनुचित ठरेल असें वाटून आम्ही केलेला वरीलप्रमाणें संकल्प अप्रस्तुत ठरणार नाहीं अशी आशा आहे. असेंच अनेक गुरुभक्तांचे विशुद्ध संकल्प एकत्र झाल्यास श्रीमहाराजांच्या संप्रदायांतील अनेक साधकांना व तत्संबंधीं इतरांनाहि आपली पारमार्थिक भूमिका दृढ करतां येऊन पुढच्याही उच्च भूमिकेवर अनायासानें आरूढ होतां येईल यांत शंका नाहीं.

प्रत्येक सांप्रदायिक आपापल्या संप्रदायावर प्रायः दृढ श्रद्धा ठेवणारा असतो. मग तो संप्रदाय प्राचीन असो अथवा नवीन असो. त्यांतही आर्त, अर्थार्थी, जिज्ञासु व ज्ञानी असे चार वर्ग प्रत्येक संप्रदायांत असतातच. यांपैकीं आर्त व अर्थार्थी यांची संख्या केव्हांही अधिकच असणार; पण केवळ असल्या संख्येकडे पाहूनच त्या संप्रदायाचें बलाबल ठरवितां येणार नाही. जिज्ञासु व ज्ञानी हेच त्या त्या संप्रदायाचे खरे संवर्धक व संरक्षक असतात. आज या शाळेंत तर उद्यां त्या शाळेंत असें नुसतें बहिरंग पाहून जाणाऱ्या येणाऱ्या विद्यार्थ्यांची संख्या जास्ती झाली किंवा घटली याच्यावर त्या संस्थेचें महत्त्व अवलंबून नाहीं; तर त्या संस्थेंत खरे जिज्ञासु विद्यार्थी किती आहेत, त्या संस्थेचे सर्वमान्य असे आजीव सभासद किती आहेत, हें पाहूनच संस्थेची मान्यता ठरविणें योग्य होईल. हा सर्व विचार करूनच श्रीमहाराजांनीं, ' कलौ श्रीपादवल्लभः ' या वचनास अनुसरून श्रीदत्तसंप्रदायाचा विशेष प्रचार सर्वत्र केला. त्रिगुणात्मक श्रीदत्तप्रभूंचा संप्रदाय फार मोठा असून तो फारच जुना आहे. चारही वर्णांचे, चारही आश्रमांचे व तदितरही सद्भक्त या संप्रदायांत आहेत. तसेंच अतिवर्णाश्रमी जीवन्मुक्त पुरुषही या संप्रदायांत आहेत. कार्तवीर्य, आयु यांच्यासारखे क्षत्रिय कुलावतंसही यांत आहेत; तर परशुराम, वसिष्ठ यांच्यासारखे ब्राह्मतेजानें चमकणारे क्षत्रियान्तकही यांत आहेत. श्रीएकनाथ, श्रीजनार्दन यांच्यासारखे अकर्तात्मबोध संपादन केलेले कर्मयोगी गृहस्थही यांत आहेत, तर श्रीमहाराजांचेसारखे सर्वसंकल्प संन्यासी, योगारूढ संन्यासी पुरुषही यांत आहेत. योगैश्वर्यसंपन्न नाथपंथही याच संप्रदायाशीं संलग्न आहे. तसेंच चौसष्ट योगिनींचाही या संप्रदायाशीं

निकट संबंध आहे. 'ईशानः सर्वविद्यानां' असें ज्यांचें वर्णन केलेलें आहे ते आदिनाथ प्रभु अमरेश्वर श्रीदत्तांना अत्यंत प्रिय आहेत. तसेंच भगवती भुवनेश्वरी, भगवती रेणुकामाता यांचेंही श्रीदत्तप्रभूंवर अत्यंत प्रेम आहे. देवराजालाही भगवान् श्रीदत्तगुरूंनीं संकटांतून मुक्त केलें आहे. तर दैत्यराज प्रल्हादालाही उपदेश करून त्यांनींच कृतार्थ केलें आहे. सर्व कालांत सर्वांशीं संबद्ध असा हा संप्रदाय असल्यामुळें याचाच विशेष पुरस्कार श्रीमहाराजांनीं केलेला आहे. यामुळेंच कीं काय 'अत्रि सर्वांशीं मैत्री' ही म्हण रूढ झाली असावी. मायायुक्तावधूत व मायामुक्तावधूत अशी श्रीदत्तगुरूंची दोन स्वरूपें आहेत. आर्त व अर्थार्थी यांच्याकरितां पहिलें आणि जिज्ञासु व ज्ञानी यांच्याकरितां दुसरें. अंतरावस्था जशी ज्या वेळीं असेल तसा त्या वेळीं भक्ताला उपयोग व्हावा हाच उद्देश, विश्वस्वरूपी प्रभूचा, विविध रूपें धारण करण्याचा असावा. आर्त व अर्थार्थी हेही क्रमानें पुढील भूमिकेवर जातील. ज्ञानीही कदाचित् लोकांना उपदेश करण्याकरितां खालची भूमिका पत्करल्याचें दाखवितील. याच दृष्टीनें श्रीगंगेची प्रार्थना करीत असतांना श्रीशंकराचार्य म्हणतात कीं--'भगवति तव तीरे नीरमात्राशनोऽहं विगतविषयतृष्णः कृष्णमाराधयामि। सकलकलुषभंगे स्वर्गसोपानसंगे तरल तरतरंगे देवि गंगे प्रसीद ॥ १ ॥' हे भगवति गंगे! तुझ्या तीरावर सर्व विषयाशा टाकूनच नुसतें पाणी पिऊन मी श्रीकृष्णाची आराधना करणार आहें. करितां सर्व पातकांचा नाश करणाऱ्या आणि जिचा संग म्हणजे स्वर्गाचा सोपान मार्ग आहे, अशा चंचलतरंग असणाऱ्या गंगादेवि! तूं माझ्यावर प्रसन्न हो. श्रीमहाराजांनींही सर्व लोकांना मार्गदर्शन व्हावें म्हणून एका स्तोत्रांतून अशीच प्रार्थना केली आहे--'कामादि षड्वैरि सदैव पीडिती। दुर्वासना अंग सदैव ताडिती। त्राता तुजा कोण न भेटला मला। दत्ता कृपासाउली दे नमो तुला ॥ १ ॥' याप्रमाणें अनेक प्रकारांनीं श्रीदत्तसंप्रदायाचें वैशिष्ट्य व परिपूर्णत्व दाखवितां येण्यासारखें आहे. हें विविध प्रकारचें वैशिष्ट्य सप्रमाण, सोदाहरण असें आपल्या सर्व ग्रंथांतून श्रीमहाराजांनीं दाखविलें आहे. या सर्व ग्रंथांचा अभ्यास श्रीमहाराजांचे संप्रदायांत सर्वत्र सुरू झाला पाहिजे. ज्यांना ग्रंथार्थ समजणार नाहीं त्यांच्याकरितां तत्तत्प्रांतीय भाषांतून या ग्रंथांचें शब्दशः

भाषांतर, तात्पर्यविवरण, सिद्धान्तप्रतिपादक निबंध इत्यादि रूपानें वाङ्मय निर्माण होऊन त्याचा प्रचार सदाचारपर्यवसायी असा झाला पाहिजे. याकरितांच श्रीमहाराजांनीं यावज्जीव तसें आचरण करून हे ग्रंथ लिहून ठेवले आहेत. यांचा उपयोग वरीलप्रमाणें कृतिपर्यवसायी झाला तरच श्रीमहाराजांच्या ऋणांतून अंशतः तरी आपण मुक्त होणें शक्य आहे. म्हणून हें कार्य अविच्छिन्न चालू राहण्याकरितां, श्रीमहाराजांच्या संप्रदायांतील जीं जीं स्थानें आहेत त्या त्या स्थानांतील कार्यकारी व इतरही सांप्रदायिक योग्य सद्भक्त यांना विनंति करून त्या सर्वांचें एक स्वतंत्र मंडळ तयार व्हावें अशी आमची इच्छा आहे व त्याप्रमाणें आम्ही त्या त्या स्थानाशीं संबंध असणाऱ्या तत्तत्प्रांतीय सज्जनांना विनंति करून तसें एक सर्वप्रांतीय प्रातिनिधिक मंडळ स्थापण्याचा प्रयत्न करणार आहोंत. प्रसंगानुसार चालू ग्रंथप्रकाशनमंडळाचें विसर्जन त्या नवीन होणाऱ्या मंडळांत करावें लागलें तरी हरकत नाहीं. नवीन मंडळानेंच यापुढें विविधभाषाद्वारां प्रकाशनकार्य चालू ठेवून श्रीमहाराजांच्या संप्रदायांतील सर्व स्थानांतून कर्म, उपासना व ज्ञान या तीनही योगांची जोपासना त्या त्या साधकांचेद्वारां चालू राहावी याबद्दल प्रयत्न करणें आवश्यक आहे. श्रीमहाराजांचें विस्तृत चरित्र व त्यांच्या सर्व लहानमोठ्या ग्रंथांचें समालोचन हें कार्य फार महत्त्वाचें असें अद्यापि शिल्लक आहे. त्याकरितां माहिती मिळविण्याचे दृष्टीनें आसेतुहिमाचल प्रवास करावा लागेल. श्रीमहाराजांचा संचार सर्व प्रांतांतून झालेला आहे. ती सर्व माहिती मिळवून नंतर चरित्रविभाग सविस्तर सर्व भाषांतून प्रसिद्ध व्हावा, म्हणजे या संप्रदायाचें महत्त्व सर्वांच्याच लक्षांत येऊं शकेल. प्रत्येकानें कांहीं पैसे जमवून कांहीं ग्रंथ छापावा असा व्यक्तीच्याच स्वार्थाकरितां यापुढें प्रयत्न न होतां, नवीन स्थापन होणाऱ्या मंडळासच सर्वांनीं साहाय्य करून त्याचे द्वारांच सर्व कार्य करवून घ्यावें. सामुदायिक शक्तीनें घडून आलेलें कार्य केव्हांही सर्वोपकारक व स्थिर असें होऊं शकेल. हा आमचा संकल्प लवकरच मूर्तस्वरूपांत येण्याकरितां प्रयत्न करतां यावा म्हणूनच चालू ज्ञानयज्ञाचा प्रकाशनात्मक अंश कांहीं काल स्थगित करीत आहोत असें आम्हीं आरंभीं लिहिलें आहे. हा संकल्प पूर्ण होऊन ग्रंथप्रकाशनकार्याचें बीज झालेलें. यांचि

देहीं याचि डोळां ' आम्हांला पाहण्यास मिळावें अशी त्या सत्यसंकल्प, सर्वांन्तर्यामी, सर्वज्ञ श्रीवासुदेवाचे चरणीं आमची निरंतर प्रार्थना आहे.

या बाराव्या खंडांत श्रीमहाराजांचें अवशिष्ट राहिलेलें वाङ्मय मुद्रित केलें आहे—१ श्रीनृसिंहसरस्वतींचें वेदनिवेदनिनामक स्तोत्र सटीक व सभाषांतर, २ श्रीकृष्णालहरी सटीक, सविवरण व सभाषांतर, ३ पंचपाक्षिक सटीक, सभाषांतर, ४ कीर्तनोपयोगी कांहीं आख्यानें, ५ स्तोत्रें व पदें, ६ श्रीमहाराजांचें संक्षिप्त चरित्र इतके विषय या खंडांत आलेले आहेत. वेदनिवेदनिस्तोत्र पूर्वी स्तोत्रादि संग्रहांत मूळ व श्रीदत्तपुराणांत सटीक आलेलें आहे; पण येथें छापलेली टीका, इंदूर येथील दिगंबरशास्त्री ऊर्फ शुकदेवशास्त्री गोरे यांचे वडिलांना श्रीमहाराजांनीं स्वतंत्र करून दिली होती. शुकदेवशास्त्रींचे वडिलांचें नांव विनायकशास्त्री, हे पित्राज्ञेनें बालवयांतच गायत्रीची व श्रीबालांबेची उपासना करून काशीक्षेत्रांत अध्ययनाकरितां गेले. तेथें पं. चिंतामणिशास्त्री वैद्य यांचेजवळ न्यायवेदान्तादि शास्त्रांचा अभ्यास करून इंदूर येथें परत आले. हे कांहीं दैवी चमत्कार करून दाखवीत असत, त्यामुळें लोकांत यांची प्रसिद्धि विशेष होती. श्रीमहाराजांची स्वारी कर्मधर्मसंयोगानें त्या वेळीं इंदूर मुक्कामीं आली असतां त्यांना विनायकशास्त्रींचें वृत्त समजलें. एके दिवशीं विनायकशास्त्री वगैरे मंडळी श्रीमहाराजांचे सन्निध बसली असतां, श्रीमहाराजांनीं आपली भस्माची डबी हातांत घेतली आणि विनायकशास्त्रींना सांगितलें कीं, 'तुमचा मेस्मेरिझमचा प्रयोग करून ही डबी चालवून दाखवा पाहूं.' हें श्रीमहाराजांचें भाषण ऐकून विनायकशास्त्री अभिमानानें म्हणाले कीं, 'महाराज! हात ढिला ठेवा हं! नाहीं तर हाताला झटका बसेल' असें बोलून त्यांनीं प्रयोग करण्यास सुरवात केली. पण श्रीमहाराजांच्या पूर्णशक्तीपुढें त्यांची शक्ति फिकी पडली. पुष्कळ प्रयत्न करूनही ती श्रीमहाराजांचे हातांतील डबी थोडीसुद्धां हलली नाहीं. मग हाताला झटका तर दूरच! हा चमत्कार पाहून मात्र विनायकशास्त्रींचा अहंकार पूर्णपणें नाहींसा होऊन ते श्रीमहाराजांना शरण गेले व श्रीमहाराजांच्या पायांवर हात ठेवून त्यांनीं पुढें चमत्कार दाखविणेचें बंद करण्याची शपथ घेतली. त्यांच्या प्रार्थनेप्रमाणें वेदनिवेदनिस्तोत्रावर ही विस्तृत टीका

लिहून श्रीमहाराजांनीं त्यांना दिली. ती टीका त्यांचे चिरंजीव पं. शुकदेवशास्त्री यांनीं अमळनेर येथील तत्त्वज्ञानमंदिरांतील प्राध्यापक पं. आत्मारामशास्त्री जेरे यांचेद्वारा प्रकाशनाकरितां आमचेकडे पाठविली व आपल्या पिताजींचें वरील चरित्रही पाठविलें याबद्दल आम्ही त्यांचे आभारी आहोंत. वेदान्तादिशास्त्रांचे सिद्धान्त संक्षेपानें श्रीमहाराजांनीं या टीकेंत ग्रथित केले असल्यानें ही टीका जिज्ञासूंना अत्यंत उपयुक्त अशी आहे. संस्कृतानभिज्ञ लोकांनाही उपयोग व्हावा म्हणून आम्ही विनंति केल्याप्रमाणें इंदूर येथील संस्कृत महाविद्यालयाचे प्रमुखाध्यापक पं. विनायकशास्त्रीजी टिल्लू यांनीं या टीकेचें सुबोध असें मराठी भाषांतर करून पाठवून दिलें व त्या स्तोत्रावर महत्त्वद्योतक, प्रसादपूर्ण व गुरुप्रेमभरित अशी पद्यमय भूमिकाही गुरुसेवाबुद्धीनें पाठवून अत्यंत आत्मीयता व्यक्त केली याबद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहोंत. इंदूरलाच श्रीमहाराजांनीं ही टीका लिहून विनायकशास्त्रींना दिली आणि या टीकेचें भाषांतरादि रूपानें संस्करणही इंदूरलाच आणि तेंही पं. विनायकशास्त्रींचे कडूनच झालें. हा कांहीं तरी विलक्षण योग ईशेच्छेनें घडून आलेला दिसत आहे. त्या विनायकशास्त्रींचेवर श्रीमहाराजांनीं मोठेपणीं कृपा केली आणि या विनायकशास्त्रींचेवर प्रल्हादाप्रमाणें बालवयांतच कृपा करून नंतर यांना शास्त्रतत्त्वज्ञ व निरहंकार बनविलें इतका भेद दिसतो. असो. पं. विनायकशास्त्री टिल्लू यांचे ज्येष्ठ बंधु पं. रामचंद्रशास्त्री यांची मंडळावर पहिल्यापासूनच प्रेरणापूर्ण दृष्टि आहे. यांनीं मंडळास अनेक ग्राहक मिळवून देऊन विविध रूपाचें साहाय्य केलें आहे. याबद्दल त्यांचेही आम्ही आभारी आहोंत. श्रीकृष्णालहरी पूर्वी स्तोत्रादिसंग्रहांत मूलमात्र छापली आहे. ती या ठिकाणीं सटीक दिलेली आहे. धर्मशास्त्रीय आणि आध्यात्मिक अशा अनेक विषयांचें प्रतिपादन श्रीमहाराजांनीं या ग्रंथांत केलेलें आहे. याचें भाषांतर नरसोबावाडी येथील शास्त्रव्युत्पन्न पंडित गुरुभक्त बापूशास्त्री कोडणीकर यांनीं करून दिलें. पूर्वी एकदां श्रीदत्तचंपूच्या तृतीय स्तबकाचें भाषांतर यांनीं केलेलें आहे. पण या भाषांतराची योजना अन्यत्र केली असूनही ती सफल होऊं शकली नाहीं. म्हणून ऐनवेळीं पुनः बापूशास्त्रींना या कामीं त्रास द्यावा लागला. आणि तो त्यांनीं गुरुसेवाबुद्धीनें स्वेच्छेनें सह्य मानून अल्प अवधींतच

हें सुरस भाषांतर व प्रस्तावना लिहून पाठविली याबद्दल मंडळ त्यांचें अत्यंत आभारी आहे. श्रीकृष्णालहरींतील कांहीं स्थळांचे शास्त्रदृष्ट्या विवरण करण्याची विनंति नरसोबावाडी येथील प्रसिद्ध धर्मशास्त्रज्ञ आहिताग्नि पं. तात्याशास्त्री उपाध्ये यांना केली होती. त्याप्रमाणें त्यांचे आज्ञेनें त्यांचे सत्पुत्र पं. वामनशास्त्री उपाध्ये यांनीं अत्यंत उत्साहानें कांहीं श्लोकांचें सप्रमाण विवरण लिहून पाठविलें याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे. श्रीमहाराजांनीं फलज्योतिषावर पंचपाक्षिक नांवाचा लहानसा सटीक ग्रंथ लिहिलेला आहे. हा ग्रंथ प्रश्ननिर्णयाचे दृष्टीनें सर्वोपकारक असा आहे. याचें भाषांतर अहमदाबाद येथील प्राध्यापक न्यायरत्न नारायणशास्त्री वाडीकर व प्रोफेसर हणमंतराव भिडे या ज्योतिःशास्त्रज्ञ श्रेष्ठ विद्वान् पुरुषांनीं करून दिलें व विस्तृत भूमिकाहि परिशिष्टांतील कोष्टकांसह लिहून दिली याबद्दल या दोघांचेही आम्ही अत्यंत आभारी आहोंत. सारंगपूर येथें राहणारे, श्रीमहाराजांचे परमभक्त श्री. केशवराव देवी डॉक्टर, यांना आलेली श्रीमहाराजांची पत्रें व श्रीमहाराजांचे हस्ताक्षरांतील नर्मदास्तोत्रादि विभाग त्यांचे चिरंजीव पुणें येथील श्री. श्रीपादपंत भट यांनीं प्रतिकृति करून घेण्याकरितां मंडळाकडे दिला, तंजावर संध्यामठांतील श्री. नागराज यांनीं कांहीं स्तोत्रें, पदें, पाळणा, अभंग, कीर्तनाख्यान ( विष्णुदत्ताचें ) असें श्रीमहाराजांचें वाङ्मय प्रकाशित करण्याकरितां पाठविलें; तपस्वी हरीभाऊ करमळकर यांनीं एक मोठी श्री महाराजांची निर्गुण भूपाळी करवीरपीठस्थ श्रीशंकराचार्यांचेकडून मिळवून ती छापण्याकरितां दिली. याबद्दल या सर्वांचे आम्ही आभारी आहोंत. नरसी येथील पं. धुंडिराजशास्त्री माहूरकर यांनीं श्रीमहाराजांचीं वटसावित्री व चंद्रहास हीं दोन आख्यानें दिलीं. तसेंच वऱ्हाड प्रांतांतील सुप्रसिद्ध हरिदास पं. नानाबुवा जहागिरदार मु. शिंदखेड यांनीं आयु व सती यांचीं आख्यानें देऊन कीर्तनमहत्त्वप्रतिपादक प्रस्तावनाही लिहून पाठविली. या दोघांही पंडितवर्यांचे आम्ही आभारी आहोंत. मंडळांतील माननीय घटक नागपूर येथील साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास यांनीं नागपूर येथील वृत्तपत्रांतून कांहीं स्फुट लेख समालोचनात्मक असे लिहून या कार्याचें प्रसिद्धीकरणास साहाय्य केलें, याबद्दल मंडळ त्यांचे आभारी आहे. समर्थ भारत प्रेसचे

मालक श्री. सरदेसाई यांनीं वेळेवर हा ग्रंथ छापून दिला, विशेषतः या प्रेसचे मॅनेजर श्री. पाटणकर यांनीं प्रथमपासूनच अत्यंत सौजन्य व्यक्त करून हें सर्वही प्रकाशनकार्य आत्मीयतेनें व्यवस्थित पार पाडलें याबद्दल या दोघांचेही आम्ही अत्यंत आभारी आहोंत. हैद्राबाद येथील प्रसिद्ध नागरिक १ श्रीमान् धुंडिराज महाराज दीक्षित, २ श्री. गोपीनाथराव चौधरी, धामणगांवकर, ३ श्री. राजा धुंडिराजबहाद्दर, ४ श्री. श्रीपादराव नेवासेकर, ५ श्री. गणपतराव कौलासकर, ६ श्री. कांतराव अंबडकर, ७ श्री. शंकरराव आजेगांवकर, ८ श्री. हणमंतराव (बापूसाहेब) मोहरीकर, ९ श्री. दत्तोपंत टाकळकर इत्यादि धर्मनिष्ठ सज्जनांनीं एक उत्सवमंडळ स्थापून त्या मंडळातर्फे हा श्रीमहाराजांचा शतसांवत्सरिक जयंतीमहोत्सव घरांतील मंगलकार्याप्रमाणें उत्तम रीतीनें पार पाडल्याचें श्रेय संपादन केलें आणि या कार्याचे रूपानें, संपूर्ण हैद्राबाद प्रांताची, प्रसिद्ध असलेली धर्मकार्याभिरुचि विशेष स्वरूपांत अभिव्यक्त करून, पुणें येथें चार वर्षे चालू असलेल्या सर्व ग्रंथप्रकाशनकार्याचें खरोखरच चीज केलें व अवभृथस्नानाप्रमाणें तेंही श्रेय मिळविलें, याबद्दल वरील उत्सवमंडळास धन्यवाद किती व कोणत्या शब्दांनीं द्यावेत हें लिहिण्यास आम्ही असमर्थ आहोंत.

श्रीमहाराजांचें विस्तृत चरित्र पुढें व्हावयाचेंच आहे. सावंतवाडी येथील श्रीमहाराजांचे परमभक्त कै. गणेशपंत सातवळेकर यांनीं बरेच परिश्रम घेऊन श्रीमहाराजांचे चरित्राची रूपरेषा उत्तम तयार करून ठेवली आहे. त्यावरून चांगलें चरित्र सविस्तर लिहवून त्यावर लेखक म्हणून आपल्या पिताजींचें नांव घालावें अशी इच्छा कै. सातवळेकर यांचे चिरंजीवांनीं पत्रद्वारा मंडळास कांहीं दिवसांपूर्वी कळविली होती. ती श्रीगुरुमहाराजांचे कृपेनें लवकरच पूर्ण होईल यांत शंका नाहीं. प्रस्तुत संपूर्ण ग्रंथांच्या प्रकाशनकार्याबरोबरच शतसांवत्सरिक जयंतीमहोत्सवाचे समयीं श्रीमहाराजांचें संक्षिप्त तरी चरित्र असणें उचित आहे असें वाटल्यावरून, प्रामुख्यानें कै. सातवळेकर यांची रूपरेषा पाहून पं. दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर यांनीं संकलित करून दिलेलें श्रीमहाराजांचें संक्षिप्त चरित्रही या विभागासोबत जोडलें आहे. कै. सातवळेकरांच्या परिश्रमाचें चीज आज या रूपानें मंडळास करतां आलें याबद्दल

त्यांचे चिरंजीव धन्यवादास पात्र आहेत. या शतसांवत्सरिक जयंतीमहोत्सवानिमित्त १०० शंभर स्तोत्रादि संग्रहाचीं पुस्तकें श्रीगरुडेश्वर संस्थेस देणगी म्हणून मंडळाकडून दिलीं गेलीं आहेत व या पुस्तकविक्रीचे येणारे ५०० पांचशें रुपये त्या संस्थेकडे जमा करण्यास त्या संस्थेचे एक लोकप्रिय श्रीमान् विश्वस्त डॉ. रणजितराय भट मु. सुरत यांना कळविलें आहे. याचप्रमाणें श्रीमहाराजांची जन्मभूमि माणगांव येथील स्थानाचा जीर्णोद्धार होण्याकरितांही मंडळाकडून खात्रीनें साहाय्य होईल. आरंभीं लिहिल्याप्रमाणें प्रातिनिधिक मंडळांत कै. सातवळेकर यांचे चिरंजीव श्री. नरहर गणेश सातवळेकर यांनीं समाविष्ट होऊन सर्वच गुरुस्थानांच्या उत्कर्षाकरितां प्रयत्न करण्यास बद्धपरिकर व्हावें अशी त्यांना लवकरच विनंति करावयाची आहे. आपल्या संकल्पाचा विघात झाला असें त्यांना वाटूं नये या उद्देशानें वरील थोडासा खुलासा केला आहे.

मंडळांतील एक घटक सोलापूर येथील धर्मशील गृहस्थ श्री. बापूसाहेब कुबडे यांनीं सोलापूर प्रांतांत या ग्रंथप्रचाराचे कामीं बरेच परिश्रम घेऊन ग्राहक मिळवून दिले. श्री. नारायणराव मोघे यांनीं आपली पुणें येथील बिऱ्हाडाची सर्व जागा मंडळाचे कार्यालयाकरितां वापरण्यास दिली. श्री. भुजंगराव भालेराव व विशेषतः त्यांचे दोघेही सत्पुत्र चि. भालचंद्र व चि. नारायण यांनीं प्रथमपासून निरलसपणानें या महत्कार्याच्या पूर्ततेकरितां विशेष मेहनत घेऊन ही सेवा पार पाडली. तसेंच आयुष्मान् दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर यांनींही या गुरुसेवेंतील आपला योग्य तो वांटा उचलून स्वतःची भाग्यसंपत्ति व्यक्त केली. या सर्वांचेकडून उत्तरोत्तर श्रीगुरूंची सेवा अशीच विशुद्ध भावनेनें निरंतर घडावी व त्यांच्या जन्माचें सार्थक व्हावें इतकीच श्रीमहाराजांचे चरणांजवळ प्रार्थना आहे.

सर्वांच्या अंतःकरणांत धर्मवासना उदित व्हावी, व सर्वांनीं श्रीगुरुदेवांच्या कृपाप्रसादानें ईश्वरप्रवण होऊन सुखी व्हावें हीच शेवटीं प्रार्थना आहे.

सर्वेऽपि सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥ १ ॥

श्रावण कृष्ण ५, गुरुवार,
शके १८७६ श्रीमहाराजांची
शतसांवत्सरिक जयंती
दि. १९-८-५४

श्रीगुरुकृपाभिलाषी
**वामन दत्तात्रेय गुळवणी**
अध्यक्ष, श्रीवासुदेवानंदसरस्वती-
ग्रंथप्रकाशनमंडळ,
२० नारायण पेठ, पुणें २

# श्रीवेदनिवेदनिस्तोत्रस्य भूमिका

ॐ नमो ब्रह्मविद्यासंप्रदायप्रवर्तकाचार्येभ्यो वंशर्षिभ्यो
नमः श्रीगुरुभ्यः ।

जयति श्रौतसद्धर्मरक्षको भक्तवत्सलः ।
दत्तात्रेयावतारोऽयं वासुदेवयतीश्वरः ॥ १ ॥

वासुदेवमनुध्यायन् प्राप्तः श्रीवासुदेवताम् ।
सोऽयं श्रीकेशवानन्दयतीन्द्रो दययाऽवतु ॥ २ ॥

आनन्दवनविद्योतिनित्यानन्दपदाम्बुजम् ।
वन्दे चिन्मकरन्दाय मिलिन्द इव सन्ततम् ॥ ३ ॥

मान्यैः कवीश्वरप्रख्यैर्दत्तात्रेयमहोदयैः ।
आज्ञप्तः साहसेऽप्यस्मिन् प्रवृत्तोऽस्मि कथञ्चन ॥ ४ ॥

विद्यमानेषु मान्येषु पूज्यकोटिगतेष्विह ।
अकिञ्चनस्य यत्नोऽहं भूमिकालेखने कियान् ॥ ५ ॥

तथाप्याज्ञा प्रतीक्ष्याणामविचार्येति जानता ।
भगवत्पूज्यपादानां गुणैः पावयितुं गिरम् ॥ ६ ॥

यदत्र साहसं किञ्चित् क्रियते बालबुद्धिना ।
प्रतीक्ष्यैरेव तन्मृष्यं रक्ष्योऽयं स्खलितेषु च ॥ ७ ॥

द्वितीयाद्वै भयमिति श्रुतियुक्त्यनुभूतिगम् ।
तन्निवृत्त्यै भेदमानहानमेवोपयुज्यते ॥ ८ ॥

तच्च प्रतीयमानेषु भेदेषु बहुलेष्वपि ।
येनाभेदानुभूतिः स्यात् तेन शास्त्रेण सिद्ध्यति ॥ ९ ॥

नैकाकी रमते यद्यप्यस्त्येवं श्रुतिदर्शनम् ।
द्वितीयसत्ता तत्रापि स्वकृता न तु वास्तवी ॥ १० ॥

तच्च शास्त्रं सर्वशास्त्रमौलिमण्डलमण्डनम् ।
अद्वैतवेदान्तशास्त्रं जागर्ति जगतीतले ॥ ११ ॥

जडाः केचन जल्पन्ति तद्रहस्याऽविदो जनाः ।
' अद्वैतदर्शनेनैतज्जगज्जाड्यमवापितम् ॥ १२ ॥
जगन्मिथ्यात्ववादेन मायावादप्रभावतः ।
अखिलं भारतं राष्ट्रं पारवश्यमुपागमत् ॥ १३ ॥
जल्पन्तु नाम ये मूढा उपेक्ष्यास्ते परीक्षकैः ।
न जगद्बौद्धवच्छून्यं मन्यते किंतु तत्त्वतः ॥ १४ ॥
कार्यकारणयोरैक्यात्तदीशाभिन्नमुच्यते ।
नातः परं जगत्सत्यत्वसिद्ध्यै साधकं क्वचित् ॥ १५ ॥
सर्वं विष्णुमयं विश्वमित्यहो शास्त्रडिण्डिमः ।
कार्यकारणभावादिकल्पनायैव कल्पिताम् ॥ १६ ॥
मायामादायापि भीतिर्नाद्वैतात्मनि कल्पते ।
अशक्तं जडमात्मानं मन्यते योऽभिमानतः ॥ १७ ॥
न वेत्ति निजमज्ञानं मूढोहमिति रोदिति ।
मम मातास्ति वन्ध्येति विरुद्धं बहु भाषते ॥ १८ ॥
जगत्सत्यं जगत्सत्यमिति केवलमालपन् ।
जगतो वास्तवं तत्त्वमज्ञात्वा स्थूलदर्श्यसौ ॥ १९ ॥
अचेतनं मृतं क्रोडे कृत्वा हाहेति रोदिति ।
तस्य वास्तविकं रूपं तं प्रत्याययितुं श्रुतिः ॥ २० ॥
मातेव तनुते बोधं तत्त्वमस्यादिवाक्यतः ।
उपक्रमोपसंहारादितात्पर्यज्ञानसाधकैः ॥ २१ ॥
तद्रहस्यं ज्ञापयितुं शास्त्रमेतत् प्रवर्तते ।
वेदसारवचोमूलं ब्रह्मसूत्रालवालगम् ॥ २२ ॥
गीताजलार्द्रं चित्तेमं वेदान्तं कल्पपादपम् ।
सर्वथाखर्वगर्वाढ्यैर्जडतापर्यवासिभिः ॥ २३ ॥
वादैरुत्थापितोऽशान्तिदैत्यस्तेन शमं व्रजेत् ।
शब्दव्युत्पत्तियुक्त्यानामपि कर्मदशामिह ॥ २४ ॥

न देशिकदयालेशमृते तत्र प्रवेशनम् ।
प्रायो वेदान्ततत्त्वज्ञा विविधोपाधिधारिणः ॥ २५ ॥
एषणाभारसंभुग्नाः बहवः शब्दपण्डिताः ।
अनुभूतिं विना नैषां सामर्थ्यं शिष्यबोधने ॥ २६ ॥
ये स्वयं पङ्गवस्तेऽन्यान् नयेयुः कथमीप्सितम् ।
शाब्दे परे च निष्णाता ये त्वकामहता इह ॥ २७ ॥
भक्त्या वशीकृतेशानाः अकारणदयार्णवाः ।
ईशावताररूपा ये देशिकेन्द्रा जितेन्द्रियाः ॥ २८ ॥
जगदुद्धारकार्यार्थमवतीर्णा निजेच्छया ।
शरणीकरणीयास्ते परं कल्याणमीप्सुभिः ॥ २९ ॥
ब्रह्मानन्दोऽपि यन्मोदमात्रामाने क्षमो न हि ।
लौकिकानां हि विदुषां परोक्षज्ञानदायिता ॥ ३० ॥
अपरोक्षानुभूतिस्तु ब्रह्मनिष्ठादृते न हि ।
मन्ये सौभाग्यतोऽस्माकं श्रीदत्तो योगिराट् स्वयम् ॥ ३१ ॥
वासुदेवात्मना भूमौ निजलीलामदर्शयत् ।
दीनास्तिकजनोद्धारव्रतायेह यती भवन् ॥ ३२ ॥
स्वधर्मपालनफलं प्रत्यक्षमन्वभावयत् ।
भक्तानामधिकारानुसारेण विविधान् पथः ॥ ३३ ॥
श्रुतिस्मृतिपुराणोक्तानुपादिशदनारतम् ।
महर्षिस्त्रिगुणातीतोऽत्रिः पिता यस्य विश्रुतः ॥ ३४ ॥
अनसूया च जननी श्रीदत्तो ज्ञानविग्रहः ।
तदुपास्तिं भयहरामुपादिशदसौ नृणाम् ॥ ३५ ॥
करालतरकालेयकलुषाकुलचेतसाम् ।
आर्तानामार्तिविच्छित्त्या रोगिणां रोगनाशनात् ॥ ३६ ॥
प्रसाददानैर्बालानां सतां मंत्रोपदेशनैः ।
हृद्गतं तिमिरं दूरीकुर्वन् दयार्द्रमन्दसुस्मितैः ॥ ३७ ॥

अहो निजाभिर्लीलाभिरलालयदसौ जनान् ।
सद्गुरोर्वासुदेवस्य दत्तात्रेयस्वरूपिणः ॥ ३८ ॥

अकल्पमहसः कोऽहं माहात्म्यमिह वर्णितुम् ।
लोकानामधिकारानुसारेण विविधैः स्तवैः ॥ ३९ ॥

आर्तानामार्तिनाशायार्थार्थिनामर्थसिद्धये ।
जिज्ञासूनां विबोधाय ज्ञानिनामात्मतृप्तये ॥ ४० ॥

श्रौताद्वैतसुसिद्धान्तसुधयाऽऽप्याययज्जगत् ।
संस्कृतैः प्राकृतैर्गीतैर्भजनैर्विविधैरिह ॥ ४१ ॥

प्ररोचनां विरचयन्नद्वैतरसमाशयत् ।
कस्यचिद् भक्तवर्यस्याभ्यर्थनावशगो भवन् ॥ ४२ ॥

श्लोकाष्टकमयं रम्यं स्तोत्रमेतद् व्यरीरचत् ।
श्लोकाष्टकेन क्रमशः ज्ञानान्मुक्तिं विवेचयन् ॥ ४३ ॥

सत्त्वशुद्धेस्तदुदयं तस्या भक्त्येकसौलभम् ।
भगवद्भक्तकृपया भक्तिलाभमपि ब्रुवन् ॥ ४४ ॥

निष्कामनिजकर्मानुष्ठानाधीनां च तत्कृपाम् ।
लक्षयँल्लक्षणयुगयोगेनालक्ष्यमीश्वरम् ॥ ४५ ॥

इत्थं साधकभक्तानामात्मसाक्षात्कृतिं पराम् ।
श्लोकैरष्टभिरश्लोकशोकघ्नैरन्ववर्णयत् ॥ ४६ ॥

नेयं गिरा लाभपूजाप्रतिष्ठाप्राप्तिहेतुकी ।
दत्तावतारस्य गुरोः करुणातटिनी त्वियम् ॥ ४७ ॥

अपौरुषेयी पुरुषेतरा हि जनताऽवने ।
जनार्दनस्य पीयूषलहरी सुविभाव्यताम् ॥ ४८ ॥

शैशवे तातपादानामपारकृपयाऽमुया ।
अनेकजन्मार्जितसत्पुण्यपुञ्जैः फलोन्मुखैः ॥ ४९ ॥

कृष्णातीरे ततो रेवातीरे श्रीगरुडेश्वरे ।
अवर्णनीयतत्पादसङ्गसौभाग्यमर्जितम् ॥ ५० ॥

इदानीं लब्धसच्छास्त्रव्युत्पत्तेरपि नास्ति मे ।
सामर्थ्यं सद्गुरोर्गातुं गरिमाणममानवम् ॥ ५१ ॥

केवलं तत्पादलग्नधूलिलोठनलालसः ।
तस्यैव कृपया नित्यानन्दपादाम्बुजं श्रयन् ॥ ५२ ॥

तेनैव केशवानन्दहृदन्तरविहारिणा ।
नीयमानो जनन्येव शिशुरस्मि स्खलन्नपि ॥ ५३ ॥

मयि कापि कृपापूर्णप्रीतिः पुण्यपुरीजुषाम् ।
प्रेरयन्मामिहाल्पज्ञं श्रीदत्तात्रेयशास्त्रिणाम् ॥ ५४ ॥

आषाढ वद्य पञ्चम्यां भौमे
श. १८७६

श्रीमत्सद्गुरुकरुणाकणकामुकः
टिल्लूइत्युपनामकसखारामशास्त्रितनूजन्मा
**विनायकशर्मा** ( इन्दूर )

---

श्रीमद्दत्तात्रेयो जेजेतितराम्।

# २ श्रीकृष्णालहरीप्रस्तावना

अयि प्रियमहाभागाः! सुविदितमेवात्रभवतां—भवताम्। यत्खलु नवनवाः कलाः नवनवानि वैभवानि नवनवा च वेषभाषादिचातुरी विस्मयस्तिमिन्येवारचयन्ति द्रष्टृणां चेतांसि। अनया च वैदेशिकवैदुष्या विवशीकृतांतरङ्गास्तदेव च पारमार्थिकं श्रेय इत्याकलयन्तो गलहस्तयन्त्यस्मदीयानाचारान् विशुद्धतमां संस्कृतिं च। **कोऽयं धर्मो नाम** प्रच्छाद्य धर्मकञ्चुकमतिसन्धीयते सर्वो लोकः इति निरर्गलन्निर्गच्छति वदनकुहरात्प्रलापः। ईदृगहंमन्यास्त्यक्ताचारसुविचार परिहीनास्तेजोविहीनाः भगवत्प्रणयहीनाः पापकर्माणो दरीदृश्यन्ते धर्मध्वजाः। तदानीमिन्दिराजानिः प्रादुर्भवतीति नैव परोक्षम्प्रेक्षावताम्। अतिकरालतमेऽस्मिन्काले

**“ यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत।**
**अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥**

इति स्ववचोऽवितथङ्कर्तुकामः संसारसागरोत्तारतरणिकर्णधारः श्रीवल्लभः आविश्चकारात्मानं सामंतवाटिकासमीपवर्तिनि **मानग्रामे**। ग्रामोऽयं कोंकणाभिधप्रदेशमलङ्कुर्वाणो वरीवर्ति। तत्र च पातिव्रत्यपरायणपारीण धुरीणया **रमादेव्या** युगलञ्चकार **टेम्बेकुलं** श्रीदत्तचरणकमलमिलिन्दायमानो **भट्टोत्तरगणेशशर्मा**। स्वान्ववायकुमुदसुधासूतिरसावमलभक्तिपरवशो वशीचकार कमलासननयनोत्थतनुजनुषमात्रेयम्। यदात्मार्पणस्वरूपो **यतिसार्वभौमः श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती विजयते**।

अथैकदा नानाविधतीर्थक्षेत्राटनप्रणयशीलोऽयं कृतालर्कार्जुनप्रसादश्रीदत्तात्रेयचरणारविन्ददिदृक्षुः **श्रीदत्तराजधानीं श्रीमन्नृसिंहवाटिकामवाप**। यत्र हि समुल्लसति **श्रीदत्तमनोहरपादुकारूपं** हरिहरस्वरूपायाः श्रीकृष्णायाः **सरससदयहृदयम्**। एतादृक् कृत्स्नाघहारिदत्तात्रेयप्रपदपरिपूतं बिन्दुसरोभ्दूतशीतलहिमकणिकाभिः सम्मिश्रं जम्बुद्वीपगतपवित्रतमगङ्गादितीर्थापेक्षयाऽतिपूततमं **श्रीकृष्णातटमवलोकयामास**। ततो “**दृष्ट्वा**

जन्मशतं पापं स्पृष्ट्वा जन्मशतत्रयम्। स्नात्वा जन्मसहस्राणि हन्ति कृष्णा कलौ युगे" इति बारंवारं विस्पष्टं वदन् भक्तकामकल्पद्रुमं समस्तपापतापापहारिणं पादुकारूपदत्तात्रेयं सानुरागं सानुनयं सादरं सप्रणामम्वदृग्गोचरीचकार। अथ प्रेमाप्लुतान्तःकरणः समारुरोह मोदगिरेरधित्यकां मस्करीन्द्रः। तदानीमेवावततारास्य मनसि श्रीकृष्णालहरी। तस्यां हि स्वकीयसकलमपि सुहार्दमाविश्चकार। यामवलोक्य कस्य मानसोत्कलिका न हि विकसति?। समुन्मील्य चक्षुषी समवलोक्यताम्। कानिचित्तत्रस्थपद्यानि।

न च प्राज्यं राज्यं न च विबुधपूज्यं सुरपदम्।
पदं पूष्णो जिष्णोरपि मम न विष्णोरभिमतम्॥
मतं दत्तात्रेयप्रपदपरिपूतं तव तटम्।
नमः श्रीकृष्णे ते जय शमिततृष्णे गुरुमते॥

अयं सामान्योऽस्तीत्यपि मनसि मा स्थापय यतः।
समस्ताघौघास्ते जननि मयि तिष्ठन्ति सुचिरम्॥
अतो बध्वोत्तिष्ठेश्वरि परिकरं त्वं दृढतरम्।
नमः श्रीकृष्णे ते जय शमिततृष्णे गुरुमते॥

अतः प्रादुर्भूत्वा परमनिजरूपेण सहसा।
ममाघाद्रीन् भित्वा सकलमलहन्त्रीह सहसा॥
कृपाक्षीरन्धृत्वाङ्क उशति च मे देहि सहसा।
नमः श्रीकृष्णे ते जय शमिततृष्णे गुरुमते॥

त्वदीयात्मस्पृष्टः स्पृशतु गतिदे स्पर्शन उत।
त्वदीयं पानीयं पततु वदनाब्जे मम बत॥
उताहो त्वन्नीरे तुहिनशिशिरेऽङ्गं पततु मे।
नमः श्रीकृष्णे ते जय शमिततृष्णे गुरुमते॥

इत्येतान्यतिरमणीयपद्यान्युपलसहस्रान्यपि चेतांस्यार्द्रीकुर्वन्तीत्यत्र न हि सन्देहलेशोऽपि।

"**कृपाक्षीरन्धृत्वाङ्क उशति च मे देह्यत्र** टीकायां" **अङ्कमुपरि** नायम्पाठः समीचीनः किन्तु "**अङ्क उशति**" इत्ययम्पाठः साधीयान्। इति विलिखट्टीकाकृदवधानता **परमेशतादूप्यमेव** प्रकटीकरोति। साहित्यशास्त्रदृष्ट्यैष **महद्गुणप्रकर्षस्वरूपः रसाविर्भाव एव**। नैतत्परोक्षं रसविदाम्। **पण्डितप्रवरजगन्नाथराजं** स्मारयतीदं **पद्यमयं सामान्योऽस्तीति**। "**गतः क्रूरो जारो**", "**त्वदीयात्मस्पृष्ट**", इत्यादीनि सुपद्यानि भक्ताघहरकौशल्यमाविष्कुर्वन्ति **श्रीकृष्णायाः**। अपि च **श्रीमच्छङ्कराचार्यपद्यमपि** चित्तसरणिमधिरोहति। तथाहि.

**कृष्णे त्वत्पुलिनाङ्गणे स्थितिजुषः पृथ्वीरुहाः कोटरे।**
**संविष्टा विहगाश्च कीटनिचयाः श्रेष्ठा न भूभृज्जनाः॥**
**त्वन्नीराश्रितमन्दमारुतरयःस्पर्शाकुलप्राणिनाम्।**
**रम्भायाः कुचकुम्भरम्भणपरीरम्भाः कथन्दुर्लभाः॥**

**(भगवत्पूज्यपादकृतश्रीकृष्णापञ्चकस्तोत्रम्।)**

इत्येतादृशानि **हृदयस्पर्शरमणीयानि कृष्णालहरीपद्यानि** बहूनि विलसन्तितराम्। तत्र च **प्रसादसमतामाधुर्यादयः काव्यगुणाः उपमोत्प्रेक्षाद्यर्थालङ्काराः, अनुप्रासादिशब्दालङ्काराश्च** रसपरिपोषकुर्वाणा दरीदृश्यन्ते। "**देवेऽद्वये वेदवेद्ये, कृष्णां यो वृणुते भक्तः**" इत्यादिषु **हारबन्धगोमुत्रिकाबन्धादयः शाब्दलङ्काराः** परिदृश्यन्ते। किम्बहुनोक्तेन पल्लवितेन। प्रत्यक्षमेवातिथीकुर्वन्त्विति गुरुजनान्सम्प्रार्थ्य विरमतीति शम्।

**रिप्वब्धिवसुभूमिते शाके १८७६**
**श्रावणसुदि पञ्चम्याम्।**
**श्रीमन्नृसिंहवाटिका**

विदुषामनुचरः
**लक्ष्मीतनुजनुर्बापूशर्मा**
**कोडणीकराभिजनः**

---

श्रीगुरुभ्यो नमः । श्रीगणेशाय नमः । श्रीदत्तात्रेयाय नमः ।।

# ३ पंचपाक्षिकाची प्रस्तावना

## ज्योतिषशास्त्र आणि अध्यात्मशास्त्र

श्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामिमहाराज हे अनन्य दत्तोपासक संन्यासी होते. वेदप्रणीत धर्ममार्गावर त्यांची अपार श्रद्धा होती व सर्वांनीं आपआपले आश्रमधर्म एकनिष्ठेनें व कडकपणें पाळावेत असें त्यांचें अत्यंत आग्रहपूर्वक सांगणें असे. त्यांनीं चतुर्थाश्रम स्वीकारला होता आणि त्या आश्रमाच्या धर्माप्रमाणें आचरण करण्यांत त्यांनीं यत्किंचित् शिथिलता येऊं दिली नव्हती. 'करावें आणि मग सांगावें ' असा त्यांचा दंडक होता. सध्यां जिकडे तिकडे उलटी परिस्थिति झाली आहे. स्वतः मनाला वाटेल तसें वागावें आणि 'परोपदेशे पांडित्य ' करावें असें हल्लीं दिसून येत आहे. असो.

वेदोक्त मार्गावर ज्यांची संपूर्ण निष्ठा आहे त्यांनीं ' वेदबाह्य ' फलज्योतिषावर पुस्तक लिहावें हें जरा विलक्षण दिसतें असें लोकांना सामान्यतः वाटेल. ' पंचात्माऽत्रिसुतेरितेन० ' या पंचपाक्षिकांतल्या २ ऱ्या श्लोकावरच्या टीकेंत स्वामिमहाराज म्हणतात—' ननु ज्योतिःशास्त्रे विद्यमाने सौकर्यार्थं वेदबाह्यमिदं कथमादरणीयमिति चेदुच्यते ' यांत स्वामींनीं या विशिष्ट प्रकारच्या फलज्योतिषशास्त्राला ' वेदबाह्य ' म्हटलें आहे. वेदबाह्य असलें तरी आदरणीय कसें तें स्वामींनीं पुढें सांगितलेंच आहे. त्याशिवाय या शास्त्राच्या आदरणीयत्वाबद्दलचीं दुसरीं कांहीं कारणें मी पुढें सांगणार आहें. ज्यांनीं स्वामींचे ग्रंथ-विशेषतः श्रीदत्तमाहात्म्य हा ग्रंथ वाचला असेल त्यांना या शंकेचें समाधान होण्यासारखा खुलासा श्रीदत्तमाहात्म्यांत केलेला आहे.

श्रीदत्तमाहात्म्याच्या ८ व्या अध्यायांत गुरुवेदधर्मा शिष्य दीपकाला कार्तवीर्यसहस्रार्जुनाची कथा सांगत आहेत. त्या कथेंत श्रीदत्तांनीं अर्जुनाला उपदेश केल्याचा प्रसंग आहे. श्रीदत्तभगवान् म्हणतात–या देहीं या डोळां मुक्तिसुख पाहून आत्मस्वरूप जाणावयाचें असेल तर आपल्या अधिकारानुसार

कोणतें तरी शास्त्र प्रमाण मानून त्याप्रमाणें वागलें पाहिजे. सर्व शास्त्रांचें तत्त्व द्वैतरहित एक आहे असा सुविचार ठेवला पाहिजे. 'आतां सत्वर पाहें। याच डोळां मुक्तिसुख ।। ३ ।। आत्मस्वरूप जाणणें। तरी शास्त्रप्रमाण घेणें। शास्त्रांचें एकतत्त्व जाणणें। सुविचारें ।। ४ ।। शास्त्रांचें तात्पर्य एक। असें सांगती तें ऐक।' श्रीदत्तांनीं अर्जुनाला एक कथा सांगितली आहे—एकदां इंद्र आपल्या गुरूंच्या दर्शनाकरितां गेला. तेव्हां देवगुरु बृहस्पति वेगवेगळ्या शिष्यांना वेगवेगळीं शास्त्रें पढवीत बसले होते. 'कोणी लोकायत शास्त्र। कोणी पढती कामशास्त्र। कोणी शिल्प सौगत शास्त्र। न्यायशास्त्र कोणी पढती ।। ८ ।।' तें पाहून इंद्राला आश्चर्य वाटलें आणि त्यानें गुरूंना विचारलें, 'गुरो! आपण हें काय करीत आहांत? जीं शास्त्रें माणसाला बंधनांत टाकतात तीं कां शिकवितां? अनेक जन्मांच्या संस्कारांमुळें विषयांच्या वासना मनुष्यांच्या मनांत जन्मापासूनच घर करून राहिलेल्या असतात. आणखी त्याच्यावर आतां कामशास्त्र वगैरेंचा अभ्यास. म्हणजे, मग, मनुष्याला नरकांत जाण्याचा रस्ता सुलभ करून देत आहांत. म्हणजे, आधींच उल्हास आणि त्यांत फाल्गुनमास. गुरो! विषयासक्तीनें अंध झालेल्याला कूपांत लोटून देण्यासारखें हें होत आहे. वासनासक्तांची वासना तीव्रतर करणें चांगलें का?' अशा प्रकारचें इंद्राचें बोलणें ऐकून गुरु म्हणाले—' इंद्रा! ऐक. मी जें करीत आहें तें पाहून आश्चर्य वाटून घेऊं नकोस. शास्त्र कोणतेंही असो, सर्व शास्त्रांचें तात्पर्य एक असतें' असें म्हणून गुरूंनीं इंद्राला सात कथा सांगितल्या आहेत. पहिली कथा एका शिल्पशास्त्रज्ञाची आहे. कांपिल्य नगरांत एक विधिज्ञ नांवाचा शिल्पशास्त्रज्ञ होता. तो वास्तुशास्त्रांतही निष्णात होता. आय, व्यय, क्षेत्रशुद्धि वगैरे तंत्रें त्याला पूर्णपणें अवगत होतीं. शास्त्रोक्तविधानाप्रमाणें घरें बांधून वास्तुशांति वगैरे नियमसर करवीत असे. म्हणून त्यानें तयार केलेल्या घरांत राहणारे लोक सुखी होत. त्यांना भूतादिकांची पीडा व अपमृत्यु वगैरे होत नसत. द्रव्यलोभ व असत्य भाषण हीं त्यानें कधीं केलीं नाहींत. अशा प्रकारच्या शुद्धाचरणामुळें दुसरे जन्मीं तो राजा झाला, व तिसऱ्या जन्मांत तो ब्राह्मण कुळांत जन्मला. त्या जन्मांत शास्त्रोक्त, ब्राह्मणाचें सर्व कर्तव्यकर्म ईश्वरार्पण बुद्धीनें केल्यामुळें त्याची चित्तशुद्धि झाली. पुढें श्रवण, मनन व निदिध्यासन

हीं घडून वैराग्य उपन्न झालें. आणि मग शास्त्रोक्त मार्गानें जाऊन त्यानें ज्ञान-प्राप्ति करून घेतली आणि अशा प्रकारें शेवटीं तो मुक्त झाला. सारांश, शास्त्र म्हणजे जें शासन करतें तें. प्रत्येक शासक शास्त्र ईश्वरप्रणीत आहे. आपण क्षुद्र समजतों अशा शास्त्रालाही हाच न्याय लागू आहे. म्हणून शास्त्रावर विश्वास ठेवून त्याप्रमाणें आचरण ठेवल्यास उत्तम गति प्राप्त होते व मोक्षही हातीं लागतो. ही शिल्पशास्त्रज्ञाची गोष्ट झाली. दुसरी कथा कामशास्त्रज्ञाची आहे. माहिष्मती नगरीमध्यें एक ब्राह्मण, गायनवादनामध्यें रत व कामशास्त्र पूर्णपणें जाणणारा असा राहत असे. तो सामुद्रिकशास्त्रही जाणत होता. उत्तम अशा सर्व लक्षणांनीं युक्त अशी कन्या तो शोधीत होता. एका राजाला तशी कन्या होती. ब्राह्मणाच्या सुदैवानें राजानें त्याला आपला घरजांवई करून घेतला. तेथें शास्त्रोक्त पद्धतीनें सर्व सुखांचा उपभोग घेऊन, मरणांतीं तो गंधर्व झाला. तेथेंही शास्त्रोक्त गायनानें शंकर व ब्रह्मदेव यांना संतुष्ट केल्यानें त्याला ब्रह्मलोक-प्राप्ति झाली व क्रममुक्तीचा अधिकारी होऊन शेवटीं मोक्षपदवीला प्राप्त झाला. 'गुरु म्हणे इंद्रा ऐक। कामशास्त्रनिश्चायक। तो ब्राह्मण सस्त्रीक। ब्रह्मलोकवासी झाला ॥ १०६ ॥ तो क्रममुक्तीचा अधिकारी। जाहला असे यापरी। शास्त्रतत्त्व निर्धारी। क्रमें चारी मुक्ति घेतो ॥ १०७ ॥' येथें आठवा अध्याय संपतो. पुढें नवव्यांत तिसरी गाथा सुरू होते.

गोदावासी वेदशर्मा नांवाच्या एका ब्राह्मणाला सुशील नांवाचा पुत्र होता. दैवयोगानें त्याला सात भूतांनीं पछाडलें. एकदां श्रीदत्तांनीं भिक्षुक रूपानें त्याला दर्शन दिलें आणि सात मंत्र सांगितले. ब्राह्मणानें शुचिर्भूतपणानें सगळे प्रयोग केले आणि सातांहि भुतांना बांधून टाकले. 'मग तो अभ्यास करून। मुक्त झाला द्विजनंदन। असा क्षुद्रशास्त्रापासोन। उपयोग जन करितात ॥२६॥' याप्रमाणें मंत्रशास्त्रहि उपकारक होऊं शकतें, असें ही तिसरी गाथा सांगते.

चौथी गाथा एका कर्मठ मीमांसकाची आहे. मातापूर येथें विष्णुशर्मा नांवाचा एक पवित्र कर्मशूर गृहस्थ राहत असे. त्याच्या द्वारीं असलेल्या अश्वत्थावर एका भुताचा निवास होता. विष्णुशर्मा नित्य वैश्वदेव झाल्यावर बलि देत असे आणि तो तें भूत रोज खात असे. त्या पवित्र अन्नाच्या भक्षणानें तें भूत सुबुद्ध झालें आणि प्रत्युपकार करण्याच्या बुद्धीनें त्यानें

ब्राह्मणाला श्रीदत्ताचें दर्शन करविलें. पुढें श्रीदत्तकृपेनें त्या भुताला गति मिळाली आणि तो ब्राह्मण सस्त्रीक मुक्त झाला. याप्रमाणें 'करितां मीमांसोक्त कर्म। विप्रा मिळालें अलभ्य शर्म। शास्त्रांचें जो जाणील वर्म। सर्व धर्मफल घेतो ॥ १०८ ॥' या दोन गाथा नवव्या अध्यायांत आहेत.

दहाव्या अध्यायांत '... पांचवी असे हे गाथा। कर्मविपाकाची कथा। मोक्षपथा मिळेल ॥ ९ ॥' गोदावासी हरिशर्म्याला एक पुत्र झाला. लहानपणींच त्या मुलाचे आईबाप वारले. पण घरचा श्रीमंत असल्यामुळें त्याचें लग्न झालें. पण गुल्म, जलोदर, भगंदर वगैरे भयंकर रोगांनीं तो अतिशय पीडित झाला. पुढें सुदैवानें त्याची व विष्णुशर्म्याची गांठ पडली. आणि कर्मविपाकशास्त्राच्या आधारानें विष्णुशर्म्यानें त्याला सर्व रोगांतून पूर्णतया मुक्त केलें. नंतर शास्त्रोक्त आचरणानें चित्तशुद्धि करून त्यानें ज्ञान प्राप्त करून घेतलें.

श्रीदत्त म्हणतातः—'शास्त्रबुद्धि शुद्धि करी। युक्तीनें भ्रम निवारी। एतदर्थ अवधारी। सहावी गाथा बरी असे ॥ ४१ ॥' सह्याद्रीच्या उत्तरेस एका गांवीं एक ब्राह्मण राहत असे. एकदां शेजारच्या गांवीं राहाणाऱ्या एका मित्राकडे कांहीं दिवस राहण्याकरितां म्हणून तो ब्राह्मण गेला. त्याची सुस्वरूप स्त्री एकदां नदीवर स्नानाकरितां म्हणून गेली असतां वाटेंत अश्वत्थावर एक झोटिंग राहत होता त्याचे दृष्टीस ती पडली. त्या ब्राह्मणाचें रूप घेऊन तो झोटिंग तिजकडे गेला; आणि मित्राकडे कांहीं कारणानें गेलों नाहीं असें खोटें सांगून तेथें तो एक महिना राहिला. पुढें तो खरा ब्राह्मण परत घरीं आला आणि पाहतो तो अगदीं आपल्यासारखा एक पुरुष दारांत आहे. पुढें अर्थात्च त्या स्त्रीच्या मालकीबद्दल दोघांत तक्रार सुरू झाली. गांवांतल्या लोकांना निवाडा करतां येईना. मग लोकांना श्रीदत्तभक्त विष्णुदत्ताचें स्मरण झालें आणि त्याला त्यांनीं बोलावून घेतलें. मग विष्णुदत्तानें युक्तिप्रयुक्तीनें, सर्वांची पूर्ण खातरी पटेल अशा रीतीनें निर्णय करून देऊन झोटिंगाला बद्ध करून टाकला आणि त्या अबला ब्राह्मणीला संकटांतून मुक्त केलें. ही कथा सांगून गुरु ईंद्राला म्हणतात '... शास्त्रें जाती संशय ॥ १०८ ॥ तंत्र शास्त्रें करून। होतां भ्रम निरसन। सत्य कळलें हें तसेंचि जाण। ब्रह्मज्ञान होतसे ॥ १०९ ॥'

अकराव्या अध्यायांत शेवटची सातवी गाथा आहे. प्रतिष्ठानीं एक ब्राह्मण होता. त्याला एक मुलगा होता. तो पूर्वजन्मींचा योगभ्रष्ट आत्मा होता. तो या जन्मीं लहानपणापासून अगदीं जडमूढ असल्यासारखा वागत होता. आईबापांनीं अनेक उपाय केले, पण मुलगा कांहीं सुधारला नाहीं. शेवटी त्यांनीं विष्णुदत्ताला बोलाविलें त्या मुलाला पाहतांक्षणींच विष्णुदत्तान ओळखलें कीं हा वेडा नाहीं, पण ब्रह्मनिष्ठ आहे. यज्ञशाळेंत एकान्तां विष्णुदत्त त्या मुलाला भेटला. तेव्हां विष्णुदत्ताला त्या मुलानें आपली ओळख दिली. तो खरा आत्मज्ञानी होता; वेडेंपणाचें नुसतें सोंग होतें. मग विष्णु दत्ताच्या सांगण्यावरून त्यानें वेडेचार करण्याचें सोडून दिलें. तें बघू आईबापांना फार समाधान वाटलें. ही गाथा सांगून गुरु इंद्राला म्हणतातः—
" ... शास्त्राचें तात्पर्य एक। अशा पदोपदीं भय...... ॥ ९७ ॥ ... शास्त्र लहान थोर। सर्व असती बोधपर ॥ ... १०१ ॥ ... 'श्रीदत्त म्हणे अर्जुना ठेवीं शास्त्रसारांशीं मना। शास्त्रापासोनी परोक्ष ज्ञाना। घेऊनि विज्ञान पावसी ॥ १०३ ॥ ... सर्वशास्त्रें पाहून। स्वार्थ घ्यावा शोधून। हंस जेव पाणी टाकून। दुग्ध पिवून जाई तेवीं ॥ १०९ ॥

या सात गाथांचें तात्पर्य असें कीं कोणतेंहि शास्त्र असो, तें वेदानुसा असो किंवा नसो, अध्यात्म्याच्या दृष्टीनें त्याच्याकडे अवलोकन करावें, आ आपल्या अधिकारानुसार उपकारक तत्त्वाचें त्यांतून ग्रहण करावें. व सांगितलेंच आहे कीं, देवगुरु बृहस्पति चार्वाक आणि सौगत दर्शनांचें अध्यापन करवीत होते. हीं दोन्हीं वेदनिन्दक नास्तिकांचीं दर्शनें आहेत तरीहि देवगुरु त्यांचें अध्ययन शिष्यांना करवीत असत. आपण त्यांना त्याज समजतों; पण देवगुरु तसें समजत नव्हते का? या प्रश्नाचें उत्तर आपणां दहाव्या अध्यायांत मिळतें. ' ... शास्त्रें होतां अविद्यानाश। प्रबोध ब्रह्मर देतसे ॥ ३६ ॥ ... शास्त्र नव्हे हें स्वर्गार्थ। नव्हे हें वशीकरणार्थ। नव कामभोगार्थ। शत्रुघातार्थ नव्हे हें ॥ ४२ ॥ शास्त्र बुद्धि शुद्धि करी। युक्ती भ्रम निवारी। ... ॥ ४३ ॥. म्हणजे शास्त्र कोणतेंहि घ्या, त्याचें प्रयोज म्हणजे वाचणाऱ्याच्या बुद्धीचें शुद्धीकरण. शुद्धबुद्धि ही मोक्षमार्गाची पहि पायरी आहे. त्या पायरीवर मनुष्याला चढविणें हें प्रत्येक शास्त्राचें मुख

प्रयोजन होय. शास्त्र जरी क्षुद्र असलें तरी जर तें आप्तवाक्य असेल तर परंपरया पण निःश्रेयसाकडे नेऊं शकतें. ' शास्त्र तें शासन करी। ईशवाक्य तें हो कां क्षुद्र जरी। विश्वास ठेवतां त्यावरी। ये गति बरी अनुक्रमें ॥ ' अ० ८-५१

सामान्यतः पाहतां लोकांची वृत्ति विषयाभिमुख असते. वृत्तीला विषयांपासून निवृत्त करण्याकरितां शास्त्रें प्रवृत्त झालीं आहेत. वृत्ति नाना प्रकारच्या आहेत. त्यांना विषयपराङ्मुख करण्याकरितां एकाच प्रकारचा उपाय उपयोगी पडत नाहीं. एक औषध सगळ्या रोगांवर लागू पडणार नाहीं, हें सर्व जाणतात. तसें शास्त्रांचें आहे. वेगवेगळ्या वृत्तीच्या लोकांकरितां वेगवेगळीं शास्त्रें ईश्वरी प्रेरणेनें प्रवृत्त झालीं आहेत. पण, सर्वांचें तात्पर्य एक—विषयाभिमुख वृत्तीला विषयपराङ्मुख करणें.

पण, अनेक जन्मांच्या संस्कारांनीं मनांत खोलवर रुजलेली विषयलोलुपता एकदम औषधाचा एक ' डोस् ' घेतल्याबरोबर नष्ट होत नाहीं. बरेच दिवस औषधाचें सेवन करण्याची जरूरी असते. तसेंच शास्त्राचें आहे. एकाच वाचनानें इष्ट परिणाम घडून येत नाहीं. सतत श्रवण, मनन व निदिध्यासन यांची जरूरी आहे. तसेंच, औषध घेत असतांना पथ्य पाळण्याची फार आवश्यकता असते. तीच गोष्ट शास्त्रालाहि लागू आहे. येथें शास्त्रोक्त विधीप्रमाणें अस्खलित आचरण हेंच तें पथ्य होय.

पुष्कळदां कडू औषध घ्यावयाची जरूरी पडते. पण तें घेतांना लहान मुलें रडतात, अथवा तें नको असा हट्ट धरून बसतात. अशा वेळीं त्या रोगी मुलाची आई ' हें औषध पी, मग मी तुला गोडगोड लाडू खायला देईन. ' अशी लालूच दाखवून तें औषध त्याला पाजतांना मुलाच्या हातीं लाडू देते देखील. पण, औषध प्याल्यावर, युक्तीनें हळूच त्याच्या हातून लाडू काढून घेते. कारण, मुलानें लाडू खाल्ला तर कुपथ्य होईल. अशा रीतीनें ती दयाळू आई मुलाला रोगमुक्त करते. शास्त्रांची रीतहि अशा या मायाळू आईसारखी आहे. विषयासक्तीचा रोग मनुष्य जन्मतःच घेऊन येत असतो. आणि शास्त्रोक्त आचरण करण्याचा त्याला कंटाळा येत असतो. अशा परिस्थितींत शास्त्रें, मायाळू आईप्रमाणें, भवरोग्याला लालूच दाखवितात. कोणती ?

अभ्युदयाची. इहलोकीं संतति, संपत्ति इत्यादि गोष्टी मिळतील, परलोकीं स्वर्गसुख मिळेल; इत्यादि प्रलोभनें अशा प्रकारें कर्मकाण्डाकडे प्रवृत्ति करवून, पुढें हळूहळू कर्मांचें दुःखोदर्कत्व पटवून देण्याचें काम श्रुति व शास्त्रें करितात. पण तें पटण्यापूर्वी मनुष्याला एक गोष्ट करणें आवश्यक असतें. ज्या शास्त्राचें अवलंबन तो करील त्या शास्त्राचे नियम अत्यंत कडकपणें त्यानें पाळले पाहिजेत. शास्त्रोक्त नियमांचें यथाशक्ति पालन करण्याचा मनःपूर्वक प्रयत्न करीत राहणें हें एक उत्तम प्रकारचें तप आहे. रानांत जाऊन पञ्चाग्नि साधन वगैरे प्रकारांनीं देहदण्डन करण्यापेक्षां संसारांत राहूनहि मनाला एका विशिष्ट प्रकारची शिस्त लावण्याचें काम करणें जास्ती महत्त्वाचें व उपयोगी आहे. देहदंडापेक्षां मनःसंयम हा अधिक कल्याणकारी आहे. कोणतेंही शास्त्र घ्या. त्याच्या नियमांचें यथाविधि पालन करूं लागलें असतां, मनावर ताबा ठेवण्याची संवय हळूहळू लागतेच. मनावर ताबा ठेवणें म्हणजेच मनाला विषयपराङ्मुख होण्याचें शिक्षण देणें होय. आणि हीच परमार्थाच्या मार्गाची पहिली पायरी. सारांश, कोणतेंही शास्त्र घ्या त्यानें घालून दिलेल्या नियमांचें बरोबर जर पालन केलें तर तें शेवटीं श्रेयस्कर झाल्यावांचून राहणार नाहीं. ही श्रीदत्तमाहात्म्याच्या ८-११ अध्यायांची शिकवण आहे.

याप्रमाणें जर विचार केला तर आपल्याला दिसून येईल कीं, ज्योतिष-शास्त्रदेखील परंपरया श्रेयःसाधक होऊं शकतें. श्रीदत्तमाहात्म्यांतील कथांत सांगितलेंच आहे कीं, संगीतविद्या, वास्तुशास्त्र व कामशास्त्र हीं सर्व अंतीं श्रेयःप्राप्तीला कारणीभूत झालीं. कामशास्त्र म्हणजे माणसाला विषयलोलुप करणारें शास्त्र असें सामान्यतः समजलें जातें, पण तें बरोबर नाहीं. कामशास्त्राचें प्रयोजन मोक्ष आहे असें त्या शास्त्राच्या प्रवर्तकांनीं म्हटलें आहे. असो. अशा प्रकारें सर्वथैव हेय समजल्या जाणाऱ्या शास्त्राचें उपादेयत्व जर सिद्ध आहे तर मग ज्योतिष शास्त्राविषयीं या बाबतींत सांगणें नकोच. तें एक वेदांग आहे. आणि जें वेदाचें अंग तें निःश्रेयसप्राप्तीला साधन होऊं शकेलच, यांत शंका बाळगण्याचें कारण नाहीं.

आतां येथें कांहीं शंका उत्पन्न होण्यासारख्या आहेत. स्वामींनीं या शास्त्राला वेदबाह्य म्हटलें आहे तें वर आरंभीच सांगितलें आहे. ज्योतिष-

शास्त्राला वेदबाह्य कां म्हटलें ? आणि वेदबाह्य असूनही आदरणीय कां मानलें लें ? तसेंच वेदबाह्य शास्त्रें श्रेयःप्राप्तीला कारणीभूत होऊं शकतात कां ?

प्रथम वेदबाह्य म्हणजे काय याचा विचार करूं. पदशः याचा अर्थ केला तर वेदाबाहेरील असा अर्थ होतो. 'मंत्रब्राह्मणयोर्वेदनामधेयम्' या व्याख्ये-प्रमाणें, संहिता, ब्राह्मणें व उपनिषदें यांव्यतिरिक्त ग्रंथ असा अर्थ होऊं शकतो पण इतका संकुचित अर्थ कोणी करीत नाहीं. वेदांशीं अविरोधी असे आपले सर्व ग्रंथ वेदबाह्य समजले जात नाहींत; तर वेदांना विरोध करणारीं शास्त्रें तीं वेदबाह्य असा सर्वसामान्य समज आहे. अशीं वेदबाह्य शास्त्रें भारतीयांनीं तसेंच भारताबाहेरच्यांनीं लिहिलीं आहेत. लोकायत, सौगत व आर्हत इत्यादि शास्त्रें हीं भारतीयांनीं लिहिलेलीं वेदबाह्य शास्त्रें होत. कुराण, बायबल वगैरे शास्त्रें हीं भारताबाहेरच्यांनीं लिहिलेलीं वेदबाह्य होत. थोडेसें निराळ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, वेदोक्त धर्माशीं व तत्त्वज्ञानाशीं ज्यांचा विरोध आहे त्यांचीं शास्त्रें वेदबाह्य होत.

इतकें निश्चित झाल्यावर पुढचा प्रश्न असा : वेदविरोधी शास्त्रें, परंपरया कां होईना, निःश्रेयसाला हेतु व म्हणून आदरणीय होऊं शकतात कां ? आपला धर्म याला, निःसंदिग्धपणें होकारार्थी उत्तर देत आहे. पूर्वी याचें विवेचन अन्यत्र केलें आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे असें : अत्यंत वेदबाह्य असें कुराण किंवा बायबल घ्या. त्यांतही एक गोष्ट मूलभूत आहे. ज्या ईश्वरानें तो धर्म शिकविला त्याच्यावर श्रद्धा ठेवून त्या शिकवणीप्रमाणें वागा. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे जगाचा कर्ता कोणी ईश्वर ( नांवाची एक महासत्ता) आहे आणि त्याच्या आज्ञेप्रमाणें चालणें हें आपलें कर्तव्य आहे ही जाणीव मनुष्याच्या अंतःकरणांत उत्पन्न होते. अशी जाणीव उत्पन्न होणें ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. अल्पबुद्धि मनुष्याला आपल्या मानवी बुद्धीचें अल्पत्व पटून जगन्नियंता जो ईश्वर त्याच्या इच्छेकडे वळण्याची प्रवृत्ति मनुष्यांत उत्पन्न होणें ही पहिली पायरी होय. ती पायरी चढल्यावर पुढें हळूहळू पुढील पायऱ्या चढण्याचें सामर्थ्य व बुद्धि ईश्वर देतो. 'ददामि बुद्धियोगं तम्' या गीतावचनाचा असा व्यापक अर्थ लावतां येतो. अशाच रीतीनें 'स्वधर्मे निधनं श्रेयः' हें गीतावचनही सर्वांना लागू पडेल अशा अर्थानें घेतलें पाहिजे. वर

जीं श्रीदत्तमाहात्म्यातलीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांतही हेंच तत्त्व आहे. तुम्ही कोणताही धर्म वा दर्शन घ्या, त्याच्या नियमाप्रमाणें जर तुम्हीं वागलांत तर शेवटीं तुम्हांला निःश्रेयसप्राप्ति झाल्याशिवाय राहणार नाहीं, हा आपल्या हिंदु धर्माचा ठाम सिद्धान्त आहे. ही उदारता, लोकसंग्रहवृत्ति इतर कोणत्याही धर्मांत नाहीं. असें असतां जातीयता म्हणून हिंदुत्वाविषयीं असहिष्णुता दाखविणें हा मोठाच अन्याय आहे. असो. या दृष्टीनें विचार केल्यास ज्योतिष-शास्त्र वेदबाह्य असूनही आदरणीय कसें आहे तें पाहूं.

ज्योतिःशास्त्राला वेदबाह्य म्हणणें आपाततः बरोबर दिसत नाहीं. कारण, वेदांच्या सहा अंगांपैकीं एक अंग ज्योतिष आहे; आणि अंगाला बाह्य कसें म्हणतां येईल ? तें नुसतें एक अंग नसून प्रधान अंग आहे असेंही म्हटलें आहे. 'सर्वेषु गात्रेषु शिरः प्रधानम्' याप्रमाणें ज्योतिष हें सर्व वेदांमध्यें मूर्धन्य आहे. 'यथा शिखा मयूराणां नागानां मणयो यथा। तद्वद्वेदांगशास्त्राणां ज्योतिषं मूर्धनि स्थितम्।' ज्योतिषशास्त्राला इतकें जें महत्त्व देण्यांत आलें आहे त्याला एक कारण आहे. ज्योतिःशास्त्राचें प्रयोजन काय तें समजलें म्हणजे तें लक्षांत येईल. 'वेदाहि यज्ञार्थमभिप्रवृत्ता यज्ञाश्चते कालविधानपूर्वाः। तस्मादिदं कालविधानशास्त्रं यो ज्योतिषं वेद सवेद यज्ञान्।' ज्योतिष हें कालविधानशास्त्र आहे म्हणून त्याची वेदांना प्रथम आवश्यकता आहे. कारण, वेद हे लोकांनीं यज्ञादि कर्में करावीं म्हणून प्रवृत्त झाले आहेत. आणि हीं यज्ञादिकृत्यें यथोक्त-कालींच केलीं गेलीं पाहिजेत. तेथें कालविपर्यासाचा दोष उत्पन्न होतां कामा नये, म्हणून बरोबर कालज्ञान करून घेतलें पाहिजे. हें ज्ञान करून देणारें शास्त्र तें कालविधानशास्त्र म्हणजेच ज्योतिषशास्त्र. हें कालविधानशास्त्र जो जाणतो तोच यज्ञाला बरोबर साग्र जाणूं शकतो; आणि अशा तऱ्हेनें यज्ञाला जाणतो तोच खरा वेदज्ञ. ज्योतिःशास्त्राला इतकें महत्त्व असल्यामुळें त्याला 'मूर्ध्नि स्थितम्' (पहिल्या प्रतीचें, सर्वश्रेष्ठ) म्हणणें युक्तच होय. वेदोक्त कर्में ज्या काळीं करावयाला सांगितलीं असतील त्याच समयीं बरोबर तीं झालीं पाहिजेत. जर झालीं नाहींत तर तीं कालभेददोषानें मुक्त होतात व ज्या फलांची प्राप्ति होईल असें विधान असतें त्या फलाची प्राप्ति होत नाहीं. या विषयासंबंधानें महर्षि गौतमप्रणीत न्यायसूत्रें अ. २ आ. १ सू. ५८-६१

व त्यावरील वात्स्यायनभाष्य हीं पाहण्यासारखीं आहेत. सूत्र ५८ मध्यें पूर्वपक्षी म्हणतो कीं, वेद अप्रमाण आहेत. कारण, ते अनृत, व्याघात व पुनरुक्ति या दोषांनीं व्याप्त आहेत. तेव्हां सिद्धान्ती उत्तर देतो कीं, तूं म्हणतोस तें बरोबर नाहीं. पुत्रकामेष्टि केल्यानें पुत्रप्राप्ति होते असें वेदानें सांगितलें आहे. पण व्यवहारांत कित्येकदां दिसून येतें कीं, ती इष्टि करूनही इष्ट फलप्राप्ति होत नाहीं. म्हणून पुत्र कामेष्टि विधानावर अनृतत्वाचा (खोटेपणाचा) दोष येतो असें तूं म्हणतोस पण तें योग्य नाहीं. उक्त फलप्राप्ति झाली नाहीं तर त्याला कांहीं कारणें असतात तीं तूं लक्षांत घेत नाहींस. वेदोक्त कर्म करतांना वेदोक्त विधानाचें काटेकोरपणानें पालन झालें तरच त्याचें सांगितलेलें फळ मिळतें. यत्किंचित्‌ही तफावत पडेल तर वैगुण्य उत्पन्न होतें व फलप्राप्ति होत नाहीं. मुख्यतः हें वैगुण्य तीन प्रकारचें आहे ( सू. ५९ ). कर्मविषयक, कर्तृविषयक आणि साधनविषयक. कर्म सांगितलेल्या विधीप्रमाणेंच बरोबर झालें पाहिजे. चुकल्यास दोष उत्पन्न होतो. कर्ता, योग्य अधिकारी, जाणता व पवित्र आचरणाचा पाहिजे. वर्णाश्रमधर्म पाळणारा पाहिजे. कर्म करविणारा पुरोहित विद्वान् व शुद्ध मंत्रोच्चार करणारा पाहिजे. कर्माचीं साधनें जीं वापरावयाचीं तींही चांगलीं पाहिजेत. इतकेंच नव्हे तर न्याय्य मार्गानें मिळवलेलीं पाहिजेत. नाहींतर तीं दोष उत्पन्न करतात. उदाहरणार्थ, चोरी करून, लांचलुचपत करून, अथवा काळाबाजार करून मिळालेला पैसा दूषित असतो. अशा पैशाची दक्षिणा व त्या पैशानें मिळविलेलीं साधनें हीं सर्व दूषित होत, व म्हणून अशीं साधनें वापरल्यास कर्म दूषित होतें व इष्ट फलप्राप्ति होत नाहीं. आणखी एक दोष आहे तो म्हणजे कालभेद. ज्या वेळीं जें कर्म करण्यास सांगितलें आहे त्याच वेळीं तें कर्म झालें पाहिजे, न झाल्यास त्याचें फलदातृत्व नष्ट होतें. श्राद्धाला अपराण्हकाळ उक्त आहे. पण हल्लीं दिसण्यांत येतें, ऑफिसांत अकरा वाजतां गेलें पाहिजे म्हणून नऊ वाजतांच श्राद्धविधि उरकून टाकला जातो. असो. हा कालभेदाचा दोष उत्पन्न होऊं नये म्हणून ज्योतिषाची प्रवृत्ति आहे.

असें जर आहे तर स्वामीमहाराजांनीं या शास्त्राला वेदबाह्य कां म्हटलें ? त्याची कारणमीमांसा थोडक्यांत खालीलप्रमाणें असावी असें वाटतें. आपण हल्लीं ज्याला ज्योतिषशास्त्र म्हणतों त्याचे प्राचीनःकाळीं तीन विभाग मानीत असत. १ सिद्धान्त, २ संहिता व ३ होरा. वराहमिहिरानें जीं नांवें दिलीं आहेत तीं थोडीशीं वेगळीं आहेत. पण आपल्याला सध्यां दुसऱ्या एक प्रकारचें विभागीकरण सोईचें आहे. १ ज्योतिर्गणित व २ फलज्योतिष असे दोन विभाग स्थूलपणें पाडतां येतात. सूर्य, चंद्र व इतर पंचग्रही यांचे गतिस्थितिज्ञान जें शास्त्र देतें तें ज्योतिर्गणितशास्त्र; व एखाद्या विशिष्ट वेळीं जी ग्रहस्थिति आकाशांत असते तिला आधारभूत समजून तिच्या योगानें भूत व भावी गोष्टींचें ज्ञान कसें करून घ्यावें तें शिकविणारें शास्त्र तें फलज्योतिष-शास्त्र. वराहमिहिरानें याला होराशास्त्र असें नाव दिलें आहे. प्रश्नज्योतिषाला हल्लीं होराशास्त्र म्हणण्याचा प्रघात आहे. स्वामिमहाराजांचें प्रस्तुत ‘ पंच-पाक्षिक ’ हें प्रश्नज्योतिषाचें म्हणजे हल्लींच्या होराशास्त्राचें पुस्तक आहे. या दोनही विभागांत खगोलीय ग्रहस्थितीचें ज्ञान आवश्यक आहे. ती समजण्याकरितां ते ग्रह ज्या खगोलीय वृत्तांतून फिरतात त्या वृत्ताचे भाग पाडले पाहिजेत. म्हणजे कोणता ग्रह कोणत्या विभागांत केव्हां येतो तें गणिताच्या आधारानें काढतां येतें. त्या वृत्ताला क्रांतिवृत्त म्हणतात. क्रांतिवृत्ताचे विभाग दोन प्रकारांनीं केले गेले आहेत.

या विभागीकरणाकरितां चंद्रसूर्यांच्या भ्रमणांचा आधार घेतला आहे. क्रांतिवृत्तांत एक संपूर्ण भ्रमण करण्याला चन्द्राला जवळजवळ २७ दिवस लागतात. त्याला अनुसरून क्रान्तिवृत्ताचे २७ विभाग कल्पिले आणि त्या त्या विभागांत जी एखादी विशिष्ट तारा अथवा जो तारकासमूह आहे तिचें अथवा त्याचें नांव त्या विभागाला दिलें. जसें, अश्विनी नक्षत्र म्हणजे अश्विनी नांवाचा तारकासमूह असलेला क्रान्तिवृत्ताचा सत्ताविसावा भाग; तें विभागात्मक अश्विनी नक्षत्र. ही एक नक्षत्रांवर आधारलेली विभागात्मक पद्धति दुसरी पद्धति आहे. ती राशि नांवाच्या विभागावर आधारलेली आहे. सूर्याचें जें क्रान्तिवृत्तातलें एक संपूर्ण भ्रमण त्याला अनुसरून क्रान्तिवृत्ताचे भाग कल्पिले आहेत. सूर्य बारा महिन्यांत एक पूर्ण [illegible]

करितो. त्याला जमणारे असे या वृत्ताचे बारा भाग कल्पिले आहेत; तेच बारा राशि होत. क्रान्तिवृत्ताचे याप्रमाणें जे राश्यात्मक विभाग आहेत त्यांचा सूर्याच्या भ्रमणाशीं संबंध आहे.

आपल्या सध्यांच्या भारतीय ज्योतिःशास्त्रांत हे दोन्ही प्रकार उपयोगांत आणले जातात. पण प्राचीन काळीं—वैदिक काळीं–असें नव्हतें. आतां प्रचारांत असलेल्या गोष्टींपैकीं कांहीं प्राचीनकाळापासून बुद्धाच्या कालापर्यंत म्हणजे आजपासून सुमारें २५०० वर्षांपूर्वी प्रचारांत नव्हत्या. पञ्चाङ्गांतलीं पांच अङ्गें म्हणजे तिथि, वार, नक्षत्र, योग व करण हीं होत. त्यांपैकीं वार व आपण सध्यां मानतों ते योग, पूर्वी आपल्यांत नव्हते; त्याप्रमाणेंच पूर्वी राशिहि आपल्यांत नव्हत्या. म्हणजे, आपली प्राचीन वैदिक कालांतली ज्योतिःशास्त्राची पद्धति नक्षत्रात्मक विभागावर आधारलेली होती. राश्यात्मक विभागावरची नव्हती. आपलें नाक्षत्रज्योतिष होतें; राशिज्योतिष नव्हतें. तसेंच अयनचलनाचें ज्ञान वराहमिहिरकालीं होतें; पण त्या चलनाची गति किती तें माहीत नव्हतें; म्हणजे अयनांशाची कल्पना नव्हती. हॉमेल नांवाचा एक जर्मन पंडित म्हणतो कीं, "आपलें कालविभागकल्पन मूळचें बाबिलोनी आहे. सात दिवसांचा आठवडा, वारांना दिलेलीं ग्रहांचीं नांवें व काल-विभागार्थ तासांची व महिन्यांची योजना, या सर्व गोष्टी मुळांत बाबिलोनी लोकांपासून उसन्या घेतल्या आहेत." महाराष्ट्रीय ज्ञानकोश, विभाग ५ वा, विज्ञानेतिहास, पृ. ३२५ अ. "पञ्च सिद्धान्तिका" या ग्रंथाला एक प्रस्तावना लिहिली आहे. तिच्यांत ग्रीक लोकांपासून आपण कोणकोणत्या गोष्टी घेतल्या तें बऱ्याच विस्तारानें सांगितलें आहे. हें सगळें तपशीलवार सांगण्याचें हें स्थळ नव्हे. पण सांगण्याचा सारांश इतकाच कीं, हल्लींचें आपलें ज्योतिर्गणित क्रान्तिवृत्ताच्या राश्यात्मक विभागाला अनुसरून आहे; पण तें सर्व आपण पाश्चात्यांकडून घेतलेलें आहे. वेदाङ्गज्योतिषांत तें नाहीं; त्यांतील गणित विभागात्मक नक्षत्रानुसारी आहे. या दृष्टीनें पाहिलें म्हणजे म्हणणें भाग आहे कीं आपलें हल्लींचें ज्योतिर्गणित 'वेदबाह्य', वेदांबाहेरचें, वेदांत नसलेलें असें आहे.

हें ज्योतिर्गणिताबद्दल झालें. फलज्योतिषाबाबतहि अशीच परिस्थिती आहे. वेदांमध्यें नक्षत्रांच्या शुभाशुभफलदायित्वाबद्दलचे उल्लेख आहेत. तसेंच

*

मुहूर्तांच्या शुभाशुभत्वाबद्दलचेहि उल्लेख आहेत. महाभारत-रामायणांतूनहि हें सर्व सांपडतें. म्हणजे फलज्योतिषाची कल्पना कांहीं एका विशिष्ट प्रकारची वैदिक काळापासून आपल्यांत प्रचलित आहे हें निर्विवाद.

पण आपली सध्यांची जी फलज्योतिषाची कल्पना आहे तिच्याशीं या प्राचीन कल्पनेची तुलना केली तर दोन महत्त्वाचे फरक दिसून येतात. एक तर असें कीं नुकतेंच वर सांगितल्याप्रमाणें शुभाशुभत्व नक्षत्रांच्या ठायीं मानलेलें आहे; राशींच्या बद्दलचें तें नाहीं. आपले हल्लींचे फलादेश राश्यनुसारी आहेत, नक्षत्रानुसारी नाहींत. याच्याच अनुषङ्गानें दुसरा एक फरक दिसून येतो तो हा—सध्यांच्या ज्योतिषांत ग्रहांना राश्यधिपत्व दिलेलें आहे व तदनुसारहि ग्रहांच्या शुभाशुभत्वांत थोडीफार तफावत पडत असते. वैदिक काळीं ग्रहांचें शुभाशुभत्व मानलें जात नव्हतें; पण महाभारतकाळीं तें होतें; तरी पण, तें नक्षत्रविषयक होतें; राशिविषयक नव्हतें. अर्वाचीन फलज्योतिष आणि प्राचीन फलज्योतिष यांच्यांतला हा पहिला महत्त्वाचा फरक.

दुसराहि एक महत्त्वाचा मुद्दा आहे. फलज्योतिष म्हटलें म्हणजे कुण्डलीवरून होणारें गत व आगामी गोष्टींचें ज्ञान, असें एकदम आपल्या मनांत येतें. एखादे विशिष्ट वेळीं—मग ती प्रश्नवेळा असो अगर जन्मवेळा असो, खगोलीय ग्रहस्थिति कशी आहे ती दाखविणारा आरसा म्हणजे कुण्डली. ग्रहांच्या भ्रमणमार्गाचे—क्रान्तिवृत्ताचे—बारा भाग, राशि नांवाचें कल्पिलेले आहेत असें वर सांगितलें आहेच; त्याला अनुसरून, एक विशिष्ट पद्धतीनें बारा भावांची कुण्डली मांडावयाची व तिच्यांत कोणता ग्रह त्या इष्ट वेळीं कोणत्या राशीत आहे तें दर्शवावयाचें. या कुण्डलीवरून त्या इष्ट वेळेनंतर घडून येणाऱ्या गोष्टींचें ज्ञान करून देणारें शास्त्र तें फलज्योतिष, अशी आपली सामान्य कल्पना आहे. असल्या प्रकारचें फलज्योतिष वेदकाळीं, राशी तर नव्हत्याच; पण नक्षत्रांच्या आधारें सुद्धां कुण्डली मांडून गतागतांचें ज्ञान करून घेण्याची पद्धति प्रचारांत नव्हती. फक्त नक्षत्रांच्या शुभाशुभात्वाविषयीं कांहीं कल्पना होत्या.

एवढ्यावरून दिसून येईल कीं, अर्वाचीन फलज्योतषहि 'वेदबाह्य' च होय. म्हणून, स्वामीमहाराजांनीं अर्वाचीन ज्योतिःशास्त्राला 'वेदबाह्य' म्हटलें आहे. तें अगदी बरोबर आहे, असें वाटतें.

आपलेकडे या दोन्ही प्रकारच्या ज्योतिषावर पुष्कळ साहित्य उपलब्ध आहे. त्यांत अगदीं पहिला, म्हणजे सर्वांत प्राचीन ग्रंथकर्ता वराहमिहिराचार्य होय. त्यानें या शास्त्राच्या वेदबाह्यत्वाची स्पष्ट कबूली दिली आहे. तो म्हणतो, ' म्लेच्छा हि यवनास्तेषु सम्यक् शास्त्रमिदं स्थितम् । ऋषिवत्तेऽपि पूज्यन्ते किं पुनर्दैवविद् द्विजः ॥ ( बृहत्संहिता अ. श्लो. ). श्लोकार्थ स्पष्ट आहे. ' पञ्च-सिद्धांतिकेंतल्या ' रोमक ' व ' पौलिश ' सिद्धांतांतलीं मूलतत्त्वें उघडपणें पाश्चात्य आहेत. ' बृहज्जातकांतील पुष्कळ पारिभाषिक शब्द ग्रीक व रोमन भाषांतून घेतलेले आहेत. असे शब्द जवळजवळ ३०-३५ तरी आहेत. कोणा यवनाचार्यांचा उल्लेख तो ठिकठिकाणीं करतो. इतरहि बऱ्याच बारीकसारीक गोष्टी आहेत. तो सर्व तपशील येथें देण्याचें कारण नाहीं. सारांश इतकाच कीं, हें शास्त्र आपण पाश्चात्यांपासून घेतलें आहे, असें वराहमिहिराच्या ग्रंथावरून स्पष्टतया कळून येतें.

वराहमिहिरानंतरचा ग्रंथकर्ता सारावलिकार कल्याणवर्मा; त्यानेंहि म्हटलें आहे कीं, हें शास्त्र यवनांपासून आपण घेतलें आहे. असो.

याप्रमाणें वेदबाह्य असलेलें हें शास्त्र ' आदरणीय ' कसें ? असा प्रश्न उत्पन्न करून स्वामीमहाराजांनीं त्याचें उत्तर दिलें आहे तें मूळांतच पहावें. माझ्या मतें त्याचा खुलासा दुसऱ्या एका रीतीनेंहि होऊं शकतो.

प्राचीन काळापासून आपल्यांत चालत आलेल्या शास्त्रांचा उगम कोठें असावा याविषयीं जेव्हां चर्चा चालते तेव्हां मताचीं दोन टोकें दिसून येतात. असल्या चर्चेत ऐतिहासिक दृष्टीची आवश्यकता असते. ऐतिहासिक दृष्टीनें संशोधन करण्याचें आपण पाश्चात्यांकडूनच शिकलों आहोंत, हें कबूल केलें पाहिजे. पण आपल्या शास्त्रांचा ऐतिहासिक दृष्टीनें शोध करतांना पाश्चात्यांचा असा एक पूर्वग्रह झालेला आहे कीं, भारतीय आर्य बाहेरून भारतांत आल्यास सुमारें ४००० वर्षांहून जास्ती वर्षें झालीं नाहींत. म्हणून त्यांचीं सर्व शास्त्रें इ. स. पूर्वी २०००-१५०० हून प्राचीन नाहींत. तसेंच या बहुतेक शास्त्रांचीं मूलतत्त्वें पाश्चात्यांपासून अथवा अनार्यांपासून घेऊन पुढें त्यांची वाढ आर्यांनीं केली. संस्कृत भाषा ही व्यवहारांतली व बोलण्यांतली नव्हती; तिचें मूळ अनार्यांच्या प्राकृत भाषांत असून, तिला ग्रंथस्थ करतांना प्रौढ रूप दिल्यामुळें

तिला संस्कृत ( म्ह. सुधारलेली ) असें म्हटलें; इतक्याहि पल्ल्यापर्यंत जाणारे संशोधक आहेत. असल्या आत्यन्तिक (Extreme) मताची उलट दिशेनें प्रतिक्रिया होणेंहि निसर्गप्राप्तच होतें व त्याप्रमाणें तें झालेंहि आहे. आपल्याकडील कांहीं विद्वान अगदीं याच्या उलट प्रतिपादन करतात. भारतीय आर्य हे बाहेरून आलेले नाहींत; आणि संस्कृत वाङ्मय ४००० वर्षांपेक्षां पुष्कळच प्राचीन आहे; इतकेंच नव्हे तर सर्व शास्त्रांचें मूलस्थान भारत वर्षच आहे. या वादात उतरण्याचें आपल्याला प्रयोजन नाहीं. पण ज्योतिषशास्त्रापुरतें सांगावयाचें म्हणजे, या शास्त्राच्या उगमस्थानाविषयींच्या वादांत हल्लीं हे दोन्ही अतिरेकी प्रकार दिसून येतात. पण प्राचीन काळचे आपले शास्त्रज्ञ पण्डित अधिक विवेकी व गुणग्राहक होते असें मला दाखवून द्यावयाचें आहे.

चौदा विद्या आणि चौसष्ट कला यांत आपल्या पूर्वजांनीं पुष्कळ प्रगति केली होती, हें खरेंच; पण त्याबरोबर ते हेंहि समजून होते कीं आर्येतर लोकांनींहि कांहीं कांहीं बाबतींत जास्त प्रगति केली आहे. त्या विषयांत त्यांचें ज्ञान आपल्याहून जास्ती होतें. म्हणून तितक्यापुरतें त्यांना 'अभियुक्ततर' म्हटलें आहे व त्यांच्या शब्दांना अधिक प्रमाणभूत मानलें आहे. या माझ्या म्हणण्याला एक अति प्राचीन आधार आहे तो. पूर्वमीमांसा भाष्यकार शबरस्वामींचा त्यांच्या भाष्यांतील अध्याय १, पाद ३ मधील अधिकरणें ५,६ हीं प्रस्तुत प्रकरणीं खास वाचण्यासारखीं आहेत. ती हीं:—

**तेष्व दर्शनाद्विरोधस्य समा विप्रतिपत्तिः स्यात् ॥ ८ ॥**

यवमयश्चरुः, वाराही उपानहौ, वैतसे कटे प्राजापत्यान् संचिनोतीति यववराहवेतशब्दान् समामनन्ति। तत्र कंचिद्दीर्घशूकेषु यवशब्दं प्रयुंजन्ते, केचित् प्रियङ्गुषु। वराहशब्दं केचित् शूकरे, केचित् कृष्ण शकुनौ। वेतस शब्दं केचित् वञ्जुलके, केचिज्जम्ब्वाम्। तत्रोभयथा पदार्थावगमाद्विकल्पः ॥८॥ पूर्वपक्षः ॥

**शास्त्रस्था वा तन्निमित्तत्वात् ॥ ९ ॥**

वा शब्दः पक्षं व्यावर्त्तयति। यवशब्दो यदि दीर्घशूकेषु सादृश्यात् प्रियङ्गुषु भविष्यति। यदि प्रियंगुषु, सादृश्याद् यवेषु। किं सादृश्यात्। पूर्वसस्ये क्षीणे

भवन्ति दीर्घशूकाः प्रियंगवश्चैतत् तयोः सादृश्यम्। कः पुनरत्र निश्चयः। यः शास्त्रस्थानां स शब्दार्थः। के शास्त्रस्थाः। शिष्टाः। तेषामविच्छिन्ना स्मृतिः शब्देषु वेदेषु च। तेन शिष्टा निमित्तं श्रुतिस्मृत्यवधारणे। ते ह्येवं समामनन्ति यवमयेषु करम्भपात्रेषु विहितेषु वाक्यशेषं, यत्रान्या ओषधयो म्लायन्ते अथै ते मोदमाना इवोत्तिष्ठन्तीति दीर्घशूकान् यवान् दर्शयति वेदः। वेदे दर्शनात् अविच्छिन्नपारम्पर्यो दीर्घशूकेषु यवशब्द इति गम्यते। तस्मात् प्रियङ्गुषु गौणः। तस्मात् दीर्घशूकानां पुरोडाशः कर्तव्यः। तस्माद्वराहं गावोऽनुधावन्तीति शूकरे वराहशब्दं दर्शयति, अप्सुजो वेतस इति वञ्जुले वेतसशब्दम्। शूकरं हि गावोऽनुधावन्ति। वञ्जुलोऽप्सु जायते। जम्बुवृक्षःस्थले, गिरिनदीषु वा ॥ ९ ॥

सिद्धान्तः ॥ ॥ शास्त्रप्रसिद्धपदार्थ प्रामाण्याधिकरणम् ॥ ५ ॥

**चोदितं तु प्रतीयेता विरोधात् प्रमाणेन ॥ १० ॥**

अथ यान् शब्दान् आर्या न कस्मिश्चिदर्थे आचरन्ति, म्लेच्छास्तु कस्मिंश्चित् प्रयुञ्जन्ते; यथा, पिक नेम सत तामरसादिशब्दास्तेषु सन्देहः। किं निगमनिरुक्तव्याकरणवशेन धातुतोऽर्थः कल्पयितव्यः, उत यत्र म्लेच्छा आचरन्ति स शब्दार्थ इति ॥ शिष्टाचारस्य प्रामाण्यमुक्तम्, नाशिष्टस्मृतेः। तस्मान्निगमादिवशेनार्थ कल्पना। निगमादीनां चैवमर्थवत्ता भविष्यति। अनभियोगश्च शब्दार्थेष्वशिष्टानाम्, अभियोगश्चेतरेषाम्। तस्माद्धातुतोऽर्थः कल्पयितव्य इत्येवं प्राप्ते, ब्रूमः। चोदितमशिष्टैरपि शिष्टानवगतं प्रतीयेत, यत् प्रमाणेनाविरुद्धं तदवगम्यमानं न न्याय्यं त्यक्तुम्। यत्तु शिष्टाचारः प्रमाणमिति, तत् प्रत्यक्षानवगतेऽर्थे। यत्त्वभियुक्ताः शब्दार्थेषु शिष्टा इति। तत्रोच्यते अभियुक्ततराः पक्षिणां पोषणे बन्धने च म्लेच्छाः। यत्तु, निगमनिरुक्तव्याकरणानामर्थवत्तेति। तत्रैषामर्थवत्ता भविष्यति, न यत्र म्लेच्छैरप्यवगतः शब्दार्थः। अपि च निगमाऽऽदिभिरर्थे कल्प्यमाने अव्यवस्थितः शब्दार्थो भवेत्। तत्राऽनिश्चयः स्यात्। तस्मात् पिक इति कोकिलो ग्राह्यः, नेमोऽर्द्धं, तामरसं पद्मं, सत इति दारुमयं पात्रं, परिमण्डलं शतच्छिद्रम् ॥ १० ॥ म्लेच्छप्रसिद्धार्थ प्रामाण्याधिकरणम् ॥ ६ ॥

**अ. १ पाद ३, अधिकरण ५ शास्त्रप्रसिद्धपदार्थप्रामाण्याधिकरणम् ॥**

या अधिकरणाचा सारांश असाः—आर्यांच्या भाषेंत कांहीं शब्दांना एकाहून अधिक अर्थ असल्याचें दिसून येतें. तसले शब्द जर वेदांत आले तर कोणता अर्थ घ्यावा तें वैकल्पिक असलें पाहिजे. जसें, वराहशब्द. त्याचा अर्थ कांहीं लोक, 'डुक्कर' असा करतात. तर, कांहींच्या मतें, त्याचा अर्थ "कृष्णपक्षी" असा आहे. म्हणून हा शब्द जिथें वापरला असेल तिथे हे दोन्ही अर्थ घ्यावेत. असा जर कोणी पूर्वपक्ष केला तर त्याला सिद्धान्ती उत्तर देतोः— हें म्हणणें बरोबर नाहीं. शब्दांना अनेकार्थकत्व अनेक कारणांनीं असूं शकतें. पण, त्याचा खरा अर्थ ठरविणारे कोण? शास्त्रस्थ कुणाला म्हणावें? शिष्टांना. त्यांची वेदशब्दांच्या व्यवहाराबद्दलची स्मृति अविच्छिन्न असते. म्हणून ते शब्दाचा जो सांगतील तोच अर्थ घेतला पाहिजे. वराहशब्दाचे अनेक अर्थ जरी असले तरी शिष्टांना मान्य अर्थ 'डुक्कर' असा म्हणून तो अर्थ प्रमाण मानला पाहिजे.

आर्यांच्या भाषेंत जर अनेकार्थक शब्द आले तर त्यांचा, शास्त्रस्थ अथवा शिष्ट जो अर्थ करतात तो अर्थ घेणें युक्त होय असा या अधिकरणाचा सारांश आहे. येथें एक प्रश्न उपस्थित होण्यासारखा आहे. ज्योतिःशास्त्र हा जो आपला विषय त्याशीं या अधिकरणाचा संबंध काय? त्याचें उत्तर असेंः—अर्वाचीन फलज्योतिषशास्त्रांत जे पारिभाषिक शब्द आहेत ते बहुतेक अनेकार्थक आहेत. त्यांचा शास्त्रमान्य अर्थ कोणता घ्यावा असा कोणीं जर प्रश्न केला तर त्या प्रश्नाचें उत्तर या अधिकरणानें दिलें आहे. उदाहरणार्थ, 'श्रवण' हा शब्द घेऊं. त्याचे अर्थ पुष्कळ आहेत. १ ऐकणें; २ एक प्रकारची व्यक्ति; ३ रामायणांतील एक व्यक्ति; व ४ एका नक्षत्राचें नांव. या चार अर्थांपैकीं आपल्याला सध्यां कोणता अर्थ उद्दिष्ट समजावा? याचें उत्तर या अधिकरणांत दिलें आहे. वेदाङ्गज्योतिषशास्त्रांत जो 'शिष्ट' आहे तो सांगेल तो अर्थ. अर्थात् आपल्याला सध्या येथें 'श्रवण नक्षत्र' हाच अर्थ घेतला पाहिजे.

हें झालें आर्य शब्दांविषयीं. पण आर्यांच्या वापरांत अनार्य शब्दहि होते. त्यांची मीमांसा करणें आतां न्यायतः प्राप्त झालें. ती पुढील सहाव्या अधिकरणांत केली आहे. त्या अधिकरणाचें नांव "म्लेच्छप्रसिद्धार्थप्रामाण्याधिकरणम्" आहे.

त्यांत शबरस्वामी सांगतातः—कांहीं शब्द असे आहेत कीं, ज्यांना आर्य भाषेंत कांहीं अर्थ नाहीं, पण म्लेच्छ लोक कांहीं अमुक अर्थानें त्या शब्दांचा उपयोग करतात. जसें, पिक, नेम, सत, तामरस, इत्यादि शब्द. अशा शब्दांच्या अर्थाविषयीं सन्देह उत्पन्न होतो. आपलेकडे शब्दांचा अर्थ कसा करावा याबद्दल निगम, निरुक्त व व्याकरण यांच्या साहाय्यानें आपण निर्णय घेतों; त्याप्रमाणें, या म्लेच्छ शब्दांबद्दल निरुक्त व्याकरणादिकांचा आधार घेऊन अर्थनिर्णय करावा, किंवा, म्लेच्छ लोक जेथें जो शब्द ज्या अर्थानें वापरतात तेथें तो शब्द त्याच अर्थानें वापरावा, असे दोन विकल्प संभवतात. अशा ठिकाणीं काय करावें असा प्रश्न. " मागच्या अधिकरणांत सांगितलें आहे कीं, शिष्टाचाराला प्रमाण मानलें पाहिजे. आणि शिष्टांच्या मतें निगमनिरुक्तादि-कांच्या साहाय्यानें अर्थकल्पना केली पाहिजे; तेंच म्लेच्छशब्दांबाबत केलें पाहिजे, असा निष्कर्ष काढला पाहिजे. " असें म्हणतां येईल काय ?

असें पूर्वपक्षानें म्हटल्यास त्याला सिद्धान्ती उत्तर देतो कीं, हें म्हणणें बरोबर नाहीं. शिष्टांना माहीत नसलेले असे जे शब्द, अशिष्ट वापरतात ते हेयच असतात असें नाहीं; ते उपादेय होऊं शकतात. केव्हां ? शिष्टांच्या प्रमाणशास्त्राशीं अविरुद्ध असा त्याचा अर्थ असेल तर. शिष्टाचाराचें प्रामाण्य केव्हां ? जेव्हां अर्थ प्रत्यक्ष अनवगत असतो तेव्हां. अभियोग करणारे ते शब्दार्थांच्या बाबतींत शिष्ट असे तुम्ही म्हणतां ना ? तर मग आमच्या अभि-युक्तांना या बाबतींत कां प्रमाण मानीत नाहीं ? असें कोणी म्हणेल तर त्याला उत्तर असें कीं, कांहीं विषयांत म्लेच्छ हे अधियुक्ततर आहेतः—जसे पक्ष्यांना पकडणें, त्यांचें पोषण करणें, वगैरे. एखाद्या विषयांत म्लेच्छांनाहि अवगत नसलेला शब्द आला तर त्याच्या अर्थाची निश्चिती निगमादिकांच्या आधारें करणें योग्य होईल; पण ज्या विषयांत म्लेच्छांचें प्रावीण्य आहे त्या विषयांत म्लेच्छांनीं वापरलेले शब्द, त्यांनीं ज्या अर्थांनीं वापरले आहेत, त्याच अर्थांनीं घेतले पाहिजेत. असें केलें नाहीं तर, शब्दार्थांविषयीं अनवस्था उत्पन्न व्हावयाची. मूळ अर्थ असावा एक, आणि व्युत्पत्तीनें साधलेला अर्थ असावा दुसराच; असा घोटाळा व्हावयाचा. म्हणून अशा ठिकाणीं म्लेच्छ जो अर्थ करतात तोच अर्थ प्रमाण मानला पाहिजे. जसें, म्लेच्छ, कोकिल या

अर्थी पिक शब्द वापरतात. अर्द्ध या अर्थी नेम; कमलाला ते तामरस म्हणतात. आणि, दारूमय पात्राला सत म्हणतात; त्यांचे हे शब्द आपण त्यांच्याच अर्थानें घेतले पाहिजेत.

या अधिकरणांत जें तत्त्व प्रतिपादित केलें आहें तदनुसार आपल्यापुढें ज्योतिःशास्त्राचा जो प्रश्न आहे त्याचा विचार करावा. राश्यनुरोधी ज्योतिःशास्त्र पाश्चात्यांत फार पूर्वीपासून प्रचलित आहे. त्यांत त्यांनीं संशोधन पुष्कळच केलें होतें; म्हणून, शबरस्वामींच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे, त्यांना या शास्त्रांत 'अभियुक्ततर,' 'शास्त्रस्थ शिष्ट,' समजलें पाहिजे; म्हणून या शास्त्रांतील त्यांचीच परिभाषा प्रमाण मानिली पाहिजे. उदाहरणार्थ, मेष शब्द घ्या. आपल्यांत 'मेष' शब्द आहे; पण 'राशि' या अर्थी तो आपल्या प्राचीन वाङ्मयांत कोठेंहि सांपडत नाहीं. मग 'मेष' म्हणजे, क्रान्तिवृत्ताचा ३० अंशांचा एक विशिष्ट भाग, हा अर्थ कसा आला व त्याला काय प्रामाण्य? त्याचें उत्तर उघड आहे. क्रान्तिवृत्त, त्याचे भाग व त्यांचीं नांवें हीं आपण पाश्चात्यांपासून घेतलीं आहेत; त्यांच्यांत या ३० अंशांच्या विशिष्ट भागाला ग्रीक भाषेंत Krios, लॅटिन भाषेंत Aries म्हणतात; आणि या ग्रीक व लॅटिन शब्दांचा अर्थ 'मेष' आहे. म्हणून आपणहि त्या भागाला ग्रीक शब्दार्थाचा वाचक 'मेष' शब्द वापरला. याला स्पष्ट आधार वराहमिहिराचा आहे. त्यानें 'मेष' राशिवाचक दुसरा एक शब्द दिला आहे; तो 'क्रिय' आहे (बृहज्जातक अ. १ श्लो० ८) याच श्लोकांत राशिनामांचे जे अपरपर्यायशब्द दिले आहेत, ते बहुतेक ग्रीक-लॅटिन शब्दांचीं उघड उघड रूपान्तरें आहेत. 'क्रिय' हे 'क्रिऑस्' याचें संस्कृत रूपान्तर आहे हें स्पष्ट आहे. हीच गोष्ट इतर बऱ्याच शब्दांची आहे. असो. याप्रमाणें परदेशी लोक ज्या शास्त्रांत अभियुक्ततर आहेत त्यांतले त्यांचे शब्द जर आपण घेतले तर त्यांत कांहीं दोष नाहीं. फक्त एकच विचार करावयाचा असतो. ते आपल्या शास्त्रांशीं अविरोधी असले पाहिजेत, म्हणजे त्यांचा स्वीकार करण्यास हरकत नाहीं.

प्रस्तुत ज्योतिःशास्त्र वेदबाह्य असलें तरी आदरणीय कसें आहे याचा येथवर विचार झाला. कित्येकांस या सर्व ऊहापोहाची कांहीं खास जरूर नव्हती असें वाटेल. कारण स्वामीमहाराज म्हणजे आधुनिक काळचे एक

दूषित होत; आणि अशांचीं वचनें अशास्त्रीय व अप्रमाण कधींही नसतात. 'अनर्घ राघवा'त या संबंधांत एक सुंदर उदाहरण आहे. विश्वामित्रानें रामलक्ष्मणांना आपल्या आश्रमांत नेलें. नंतर सुबाहुमारीच ताडकांनीं आक्रमण केलें तेव्हां विश्वामित्र म्हणाले, 'सुबाहुमुख्यैः सममाततायिभिर्गृहाण चापं निगृहाण ताडकाम्' ॥ (अ. ३. ५६) तेव्हां रामाला घृणा उत्पन्न झाली व स्त्री-निग्रह कसा करावा याचा तो विचार करूं लागला; तेव्हां लक्ष्मण स्वगत म्हणतो 'हा राम विचारांत कां पडला आहे? विश्वामित्रासारख्या ऋषीची वाणी शास्त्रविरोधी आदेश कधींही देणार नाहीं. "मीमांसते किमार्योऽयं कौशिकेऽप्यनुशासति ॥ वाचयेषामृषीणां हि शास्त्रमेवानुवर्तते ॥" ५८ (शास्त्रें ऋषींच्या वचनालाच अनुसरतात.) अशाच अर्थाचें 'उत्तर रामचरितां'तलें वचन प्रसिद्धच आहे—'ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति।' याप्रमाणें पाहतां स्वामीमहाराजांच्या म्हणण्याला इतर आधार देण्याची जरूर नाहीं. असें म्हणणारांना थोडक्यांत उत्तर असें:—अलीकडे ऐतिहासिक दृष्टीनें विचार करून मीमांसा करण्याची जी एक पद्धति निघाली आहे तिचाहि अवलंब करून जर आपल्या शास्त्रांचें समर्थन करतां आलें तर आपल्या शास्त्रप्रामाण्याचा पाया अधिक दृढमूल होतो असें मला वाटतें. ऐतिहासिक आधार मिळाला नाहीं तर शास्त्रप्रामाण्य बाधित होतें असें नाहीं; पण, तसा आधार जर मिळत असेल तर तो घेऊन आपल्या शास्त्रांना बळकटी आणतां येत असेल तर हरकत कोणती? उलट, तें इष्टच आहे. आधुनिक चिकित्सकांच्या दृष्टीनेंहि शास्त्रांतला उणेपणा दूर झाल्याचें सिद्ध होईल. असो.

वेदबाह्यत्व असून आदरणीयत्व कसें याचें विवेचन येथवर झालें. आतां शेवटचा एक मुद्दा राहिला आहे. त्याचें स्पष्टीकरण थोडक्यांत करून आवरतें घ्यावयाचें आहे. तो मुद्दा हा. आरंभीं सांगितलें आहे कीं, सर्व शास्त्रें, वेदानुसारी व इतर सर्व साक्षात् अथवा परंपरया ब्रह्मप्राप्तीला साधनीभूत होऊं शकतात. त्यांतहि ज्योतिषशास्त्र हें वेदाङ्ग आहे, वेद हे धर्म शिकवितात, आणि धर्म हा अभ्युदय आणि निःश्रेयस यांना हेतू आहे; म्हणून न्यायतः प्राप्त होतें कीं, ज्योतिःशास्त्रहि ब्रह्मप्राप्तीला–साक्षात् नव्हे पण, परंपरया कारणीभूत असलें पाहिजें. तें कसें तें थोडक्यात दाखविलें पाहिजे.

धर्म शिकविणाऱ्या आपल्या वेदविद्येचें एक खास वैशिष्ट्य आहे, तें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. धर्माचें साध्य अभ्युदय आणि निःश्रेयस् या साध्यांचें साधन जो धर्म त्याच्यांत तीन गोष्टींचा अंतर्भाव केला आहे. मंत्रज्ञान, ज्योतिर्ज्ञान आणि ओषधिज्ञान. प्राचीन काळापासून या तिहींच्या परस्पर निकट संबंधाचें ज्ञान आमच्या पूर्वजांना होतें. अथर्ववेदांत याला भरपूर पुरावा सांपडतो. असो. या तिहींपैकीं मंत्रज्ञान व ओषधिज्ञान या दोहोंविषयीं लिहिणें सध्यां अप्रस्तुत होय. पण, वेदविद्येशीं ज्योतिर्ज्ञान कसें संलग्न झालें आहे तें थोडक्यांत दाखविण्यासारखें आहे.

प्रथम ज्योतिर्ज्ञान हें अभ्युदयाला कसें उपकारक आहे तें पाहा.

तैत्तिरीय संहितेंत बरींच अशीं वचनें आहेत कीं ज्यांत आधान, आलंभन व दीक्षा हीं कर्में केव्हां करावींत तें सांगितलें आहे. त्यांपैकीं कांहीं वचनें येथें उद्धृत करतों.

पुनर्वस्वोरादधीत ॥
वसन्ते प्रातस्त्रीन् ललामानालभेत ॥
ग्रीष्मे मध्यन्दिने त्रीन् शितिपृष्ठान् ॥
शरदि अपराण्हे त्रीन् शितिवारान् ॥
एकाष्टकायां दीक्षेरन् ॥
साक्षादेव संवत्सरमारभ्य दीक्षन्ते। फल्गुनी पूर्णमासे दीक्षेरन् मुखं वा एतत्संवत्सरस्थ ॥ वगैरे.

दीक्षादि कृत्यें यथाविधि करण्याकरितां ज्योतिर्ज्ञानाची आवश्यकता आहे. हें या वाक्यावरून सिद्ध होतें.

हें झालें ज्योतिर्गणिताविषयीं. फलज्योतिषाचेंहि बीज वेदांत आहे. अमुक नक्षत्रावर आधान केल्यास अमुक फळ मिळतें, असे स्पष्ट निर्देश तैत्तिरीय ब्राह्मणांत आहेत. "कृत्तिकासु अग्निमादधीत। एतद्वा अग्नेर्नक्षत्रम्। यत्कृत्तिकाः। असें सांगून पुढें म्हटलें आहे की, हें अग्निदेवताक नक्षत्र असल्यामुळें या नक्षत्रावर आधान करणाराचें अग्नीनें नुकसान होतें म्हणून लगेच पुढें सांगतात, "यो रोहिण्यामग्निमाधत्ते। ऋध्नोत्येव। पुनर्वस्वोरग्निमादधीत। पुनरेवैनं वामं वसूपावर्तते।......यः कामयेत भगीस्यामिति। स उत्तरयोः फल्गुन्योरग्निमादधीत।

चित्रायामग्निमादधीत । अवकीर्यैव भ्रातृव्यान् । इ०

तैत्तिरीय ब्राह्मणांतच, यानंतर एक कथा दिली आहे. इन्द्रानें देवसेना घेऊन असुरांवर स्वारी कोणत्या नक्षत्रावर केली, कोणत्या नक्षत्रावर त्यांच्या पुराचा नाश केला, कोणत्या नक्षत्रावर संपूर्ण विजय मिळविला, इत्यादि तपशीलवार माहिती त्या आख्यायिकेंत दिली आहे. ज्येष्ठा नक्षत्रावर आपल्याहून वडील असलेल्या असुरांना इन्द्रानें मारलें, म्हणून त्या नक्षत्राला ज्येष्ठघ्नी असें नांव पडलें आहे. अथर्ववेदांत तर अशा प्रकारचे उल्लेख पुष्कळ आहेत. याप्रमाणें नक्षत्रांच्या शुभाशुभफलदातृत्वाबद्दलचे उल्लेख स्पष्ट आहेत. जी गोष्ट नक्षत्रांची तीच पक्ष, मास, ऋतु, अयन व वर्ष यांबद्दलहि समजावयाची आहे.

या सर्व गोष्टी महाभारतकाळींहि होत्या. शिवाय मुहूर्तांचेंहि शुभाशुभत्व त्या काळचे लोक मानीत असत. उदाहरणार्थ, शिष्टाई करण्याकरितां हस्तिनापुरीं जाण्यास श्रीकृष्ण मैत्रमुहूर्तीं निघाल्याचा उल्लेख उद्योगपर्वांत आहे.

सुमारें विक्रमादित्य काळापर्यंत फलज्योतिष या प्रकारचें होतें. वर सांगितलेंच आहे कीं या काळापर्यंत राशिज्योतिष नव्हतें; तसेंच आपण मानतों तीं जातक व ताजिक हींहि ज्योतिषें तेव्हां नव्हतीं. पुढें तीं आपण घेतलीं व तत्संबंधीं गणिताचा आणि फलादेशाचा अन्तर्भाव वेदांच्या अङ्गभूत ज्योतिषांत करण्यांत आला. आणि राशि, ग्रह, ग्रहयोग इत्यादिकांचें शुभाशुभत्व वैदिक कृत्यें करण्याच्या संबंधांत आपले शास्त्रज्ञ पाहूं लागले.

अभ्युदय करणारा जो आपला धर्म आहे त्याला ज्योतिःशास्त्राची मदत कोणत्या प्रकारची आहे तें अत्यन्त संक्षेपानें येथवर दाखवून देण्याचा प्रयत्न केला. आतां, तें शास्त्र निःश्रेयसाला कारणीभूत होऊं शकतें कीं काय तें पाहूं.

आरंभींच सांगितलें आहे कीं, लोकायतिक, सौगत, कामशास्त्र इत्यादि शास्त्रें, ज्यांना सामान्यतः परमार्थविरोधी असें समजण्यांत येतें तींहि परंपरया ब्रह्मप्राप्तीला साधनें होऊं शकतात; तर मग, वेदाङ्ग ज्योतिःशास्त्रहि परमार्थाचें एक साधन असलेंच पाहिजे, असें अनुमान केलें तर मुळींच चुकणार नाहीं हें उघड आहे. ज्योतिःशास्त्राच्या नियमांप्रमाणें वागून त्याचें अध्ययन

अध्यापन करणें म्हणजे ती एक प्रकारची तपश्चर्याच होय; ती एक प्रकारची सूर्योपासनाच आहे. सूर्य, ग्रह आणि नक्षत्रें यांच्या अङ्गीं विभूतिमत्व आहे. आणि म्हणून हीं सारीं ईश्वर तेजोंऽशसंभव आहेत. सूर्याला चराचर जगाचें कारण मानलेंच आहे. ग्रह हे सूर्याचे अंशभूत असून त्यांनाहि पंच-भूतावर व मानवदेहावर कांहीं विशिष्ट प्रकारें नियमन करण्याचा अधिकार आहे. या विषयावर विस्तारपूर्वक लिहिण्यासारखें आहे; पण तें सध्यां शक्य नाहीं. उक्त वराहमिहिराचा आधार उद्धृत करतों. सूर्याबद्दल तो म्हणतो, मूर्तित परिकल्पितः शशिभृतो वर्त्माऽपुनर्जन्मनामात्मे त्यात्मविदां ऋतुश्च यजतां भर्तामरज्योतिषाम् । लोकानां प्रलयोद्भवस्थिति विभुश्चानेकधायः श्रुतौ वाचं नः स ददात्वनेक किरणस्त्रैलोक्यदीपो रविः ॥ बृ. जा. अ. १, १. तसेंच, कालात्मादिनकृन्मनस्तुहिनगुः सत्वं कुजोज्ञो वचो जीवो ज्ञानसुखे सितश्च मदनो दुःखं दिनेशात्मजः ॥ ... बृ. जा. अ. २।१०. त्यांना प्रसन्न करून घेण्याचा एक मार्ग ज्योतिःशास्त्र दाखवितें, पण कोणाला ? "पाहतों नी सांगतों" म्हणणाराला, अथवा शंभर-दोनशें रुपये घेऊन जुनीं पानें वाचून दाखविणाराला नव्हे. पोटार्थी धंदा करणाऱ्या ज्योतिषाला परमार्थ दृष्टी येणार नाही व अध्यात्मज्ञानाचा मार्ग सांपडणार नाहीं. खरा ज्योतिशास्त्री कसा असावा तें वराहमिहिरानें बृहत्संहितेच्या दुसऱ्या अध्यायांत विस्तारानें सांगितलें आहे. त्याप्रमाणें पहातां, सध्यां त्या प्रकारचा ज्योतिषी एखादा तरी सांपडेल कीं नाहीं, ह्याची शंका वाटते. तें सगळें वर्णन येथें देण्याचें कारण नाहीं. थोडक्यांत विष्णुगुप्ताच्या वचनांत सांगावयाचें म्हणजे हें ज्योतिःशास्त्र म्हणजे कालपुरुषरूपी महासमुद्र आहे. जलमय समुद्राच्या पार सामान्य माणसें जाऊं शकतील, पण या कालपुरुषाख्य महार्णवाच्या पार जाण्याला ऋषितुल्यत्वच प्राप्त करून घेतलें पाहिजे. (बृ. सं. अ. २, ४). गर्ग महर्षि म्हणतात कीं, जे वनांत रहातात व जे निर्मम व निष्परिग्रह आहेत असेहि लोक आकाशस्थ ज्योतींची गति जाणणाऱ्या सांवत्सरिकाला प्रश्न विचारतात (बृ. सं. २, ८). अशा प्रकारच्या ज्योतिष्याचा सत्कार जो राजा करीत नाहीं त्याचा नाश होतो (अ. २, ७). या ज्योतिःशास्त्राचें ज्याला शब्दतः व अर्थतः संपूर्ण ज्ञान आहे तो श्राद्धाचे ठायीं पूज्य व प्रथम

भोज्य होतो व तो ज्या पङ्क्तीमध्यें भोजन करितो तिला पावन करितो ( अ. २, १४ ). या प्रकारचा दैवज्ञ ज्योतिषी नरकाप्रत जात नाहीं; पण, ब्रह्मलोकामध्यें प्रतिष्ठेला पावतो ( अ. २, १३ ). कर्णपिशाचिकी वगैरेंच्या योगानें जो दैवज्ञपणाचा आव आणतो, त्याला कांहीं विचारूं नये. तो दैवज्ञ नव्हे. पण नक्षत्रसूचक; तो पापी, पङ्क्तिदूषक समजावा ( अ. २, १६–१७ ). शेवटीं सांगितलें आहे कीं, ' दुष्टस्वप्न, दुःखदायक चिन्ता, अमंगल दर्शन आणि हातून घडलेलीं दुष्ट कर्में हीं सर्व चंद्राच्या नक्षत्राशीं झालेल्या योगाचें श्रवण केलें असतां शीघ्रनाश पावतात ( अ. २।२३ ). अशा प्रकारचें सामर्थ्य ज्या ज्योतिःशास्त्रांत आहे तें क्रमाक्रमानें खऱ्या दैवज्ञाला ब्रह्मप्राप्तीला कारणीभूत ज्ञानाचा अधिकार प्राप्त करून देण्याला समर्थ असलेंच पाहिजे यांत शंका नाहीं.

ज्योतिःशास्त्र अभ्युदय व निःश्रेयस देणारें कसें आहे तें समजून येण्याकरितां वराहमिहिराचा " बृहत्संहिता " हा ग्रंथ अवश्य वाचण्यासारखा आहे. त्यांत अभ्युदयकारक विधानें पुष्कळ सांगितलीं आहेतच. पण निःश्रेयसाला हेतुभूत अशींही कांहीं विधानें आहेत. उदाहरणार्थ—अध्याय १०५ मध्यें नक्षत्र-पुरुषव्रत सांगितलें आहे. या व्रताचें फल असें सांगितलें आहे कीं, हें व्रत करणारा पुरुष अथवा स्त्री कल्पपर्यंत तेजस्वी नक्षत्ररूप होऊन राहतो, आणि पुढील कल्पीं बुद्धिमान् सार्वभौम राजा होतो. त्यापुढें जन्म आलाच तर धनाढ्य ब्राह्मणाचा जन्म येतो. अशा पुरुषानें मासस्वामीचें यथाशास्त्र कीर्तन, पूजन वगैरे केलें तर तो जेथें पुनर्जन्माचें भय नाहीं अशा भगवत्पदाला प्राप्त होतो.

मास नाम समुपोषितोवरो द्वादशीषु विधिवत्प्रकीर्तयन् ।
केशवं समभिपूज्य तत्पदं याति यत्र नहि जन्मजं भयं ॥ १६ ॥

पञ्चसिद्धांतिकेच्या अध्याय १४ श्लो. ४१ मध्यें म्हटलें आहे कीं, गणितविषयोपलब्ध आणि छेद्यकयन्त्रांनीं प्रकाशित झालेलें कालाश्रय ज्ञान ज्ञात्यांच्या मनाला सुख देणारें असें दिव्य आहे. येथें दिव्य ' म्हणजे ' अन्तरिक्षांतल्या तेजस्वी ग्रहनक्षत्रांसंबंधींचें ' इतकाच संकुचित अर्थ न घेतां ' स्वर्गांतल्या देवतासंबंधींचें ' असाहि अर्थ घेण्यास हरकत नाहीं.

ज्योतिःशास्त्राच्या परमार्थपरतेबद्दल आणखीहि लिहिण्यासारखें आहे; पण तें सर्व लिहून विस्तार करणें सध्या अनुचित आहे असें वाटतें. स्वामीमहाराजांनीं 'श्रीदत्तमाहात्म्या'त सांगितल्याप्रमाणें वेदविरोधी व केवळ आधिभौतिक लाभासाठीं प्रवृत्त झालेलीं शास्त्रेंहि जशीं परंपरया ब्रह्मप्राप्तीला कारणीभूत होऊं शकतात, तसेंच, ज्योतिःशास्त्रहि 'भोगश्च मोक्षश्च करस्थः।' करून देण्याला समर्थ आहे, इतकेंच दाखवून देण्याचा उद्देश आहे, आणि दुसरें असें : परमार्थप्रवृत्तीला उपयोगी असें हें शास्त्र नसतें तर स्वामीमहाराजांसारख्या अवतारी विभूतींनीं तशल्या शास्त्रावर कांहीं लिहिलें नसतें. केवळ ऐहिक वा पारलौकिक अभ्युदयाचीं साधनें शिकविण्याकरितां असल्या विभूतींचा अवतार नसतो. असला अभ्युदय टिकाऊ नसतो. कित्येकदां तो दिखाऊ असून अधःपाताला कारणीभूत होत असतो. असल्या अधःपातापासून रक्षण करून परमार्थाकडे लोकांना वळवावें म्हणून असल्या विभूतींचा अवतार असतो; म्हणून असे पुरुष जें जें लिखाण करतील तें तें त्यांच्या अवताराच्या उद्दिष्टकार्याला पोषकच असतें. या दृष्टीनें पाहतांहि, स्वामीमहाराजांचें हें 'पञ्चपाक्षिक' केवळ ज्योतिषाचें एक पुस्तक असें समजलें जाऊं नये; परंतु, पारमार्थिक दृष्टि ठेवून त्याचें अध्ययन व्हावें, असा स्वामीमहाराजांचा आशय असावा असेंच आम्हांस वाटतें.

'पञ्चपाक्षिक' हें फलज्योतिषाच्या एका विभागाविषयींचें पुस्तक आहे. तो विभाग म्हणजे प्रश्नज्योतिष. वराहमिहिराच्या 'बृहत्संहितें'त याविषयींचा एक अध्याय आहे. परन्तु कुण्डली मांडून प्रश्नाचा खुलासा करण्याचा प्रकार त्यांत नाहीं. पुढें वराहमिहिराचा पुत्र व नंतर कांहीं शतकांनीं झालेला वराहमिहिराचा टीकाकार भट्टउत्पल, यांनीं प्रश्नज्योतिषावर लिहिलें आहे. पुढें पांचसहा शतकांनंतर यासंबंधींचें ज्ञान आपण अरब लोकांच्यापासून शिकलों.

पण या सर्व प्रश्नज्योतिषशास्त्रांत, प्रस्तुत 'पञ्चपाक्षिका'चा जो प्रकार आहे, त्याचा अन्तर्भाव झालेला दिसत नाहीं. पांचपक्षी, त्यांच्या अवस्था, विशिष्ट विभागांवर ह्या पक्ष्यांचें स्वामित्व वगैरे प्रकार ताजिकांत नाहींत. हा एक स्वतंत्र प्रकार दिसतो. अगस्त्यप्रोक्त 'पञ्चपाक्षिक' नांवाचें एक प्रकरण

प्रसिद्ध आहे. पण तें खरोखर किती प्राचीन आहे तें सांगतां येत नाहीं. स्वामीमहाराजहि म्हणतात कीं, हें शास्त्र स्कन्दप्रोक्त आहे. 'पञ्चपाक्षिका'विषयीं याहून जास्ती माहिती मिळत नाहीं. प्रश्नज्योतिषाचा हा प्रकार प्राचीन असो किंवा नसो; पण त्यांत एक प्रकारचें वैशिष्ट्य आहे यांत शंका नाहीं. अधिकारी माणसांनीं त्याचा अनुभव घ्यावयाचा आहे. याहून जास्ती आम्हां सांगूं शकत नाहीं.

स्वामी महाराजांच्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिणें म्हणजे एक अनुचित साहस होय. त्यांच्या शिकवणुकीबद्दल आम्हाला बोलण्याचा अधिकार नाहीं. हें समजत असूनहि येथवर जें लिहिलें तें केवळ सेवेच्या भावनेनें लिहिलें आहे. यथाशक्ति केलेली ही सेवा स्वामीमहाराजांनीं मानून घ्यावी अशी नम्र प्रार्थना करून लेखणी थांबवितों.

पुणें, आषाढ व॥ १२, शके १८७६<br>मंगळवार ता. २७-७-१९५४

नारायणशास्त्री वाडीकर<br>हनुमंत बाळाजी भिडे

॥ हरिः ॐ तत्सत् ॥

---

श्री

# श्रीहरिकीर्तन प्रस्तावना

॥ संसारसिंधुमति दुस्तर मुत्तितीर्षो ॥

॥ नान्यः प्लवो भगवतः पुरुषोत्तमस्य ॥

॥ लीला कथारसनिषेवण मंतरेण ॥

॥ पुंसोभवे द्विविध–तापदवार्दितस्य ॥

( श्रीमद्‌भागवत )

आत्मज्ञानी पुरुषांना प्रवृत्तीचें व भक्तिमार्गाचें वावडेंच असतें असें म्हणतात आणि तें खरेंहि आहे. पण परमपूज्य ब्रह्मीभूत वासुदेवानंद सरस्वति स्वामीमहाराज याला अपवाद दिसतात. कारण महाराज मोठे योगीश्वर आणि परम ब्रह्मनिष्ठ होते हें त्यांच्या शिक्षात्रयादि ग्रंथांवरूनहि ते एक साक्षात्कारी पुरुष होते हें सिद्ध होतें.

" ॥ निस्त्रैगुण्येपथि विचरतां को विधिः को निषेधः ॥ "

असें म्हणतात. पण एवढे त्रिगुणातीत होते तरी महाराजांचा आचारात्मक कर्ममार्गावर फार भर होता. सदाचारांतील यत्किंचित गडबड त्यांना खपत नसे.

त्याचप्रमाणें निर्विकल्प समाधिसुखाचा आस्वाद घेत असतांहि त्यांची दत्तभक्ति सुटली नाहीं. यावरून भगवंताच्या सगुण स्वरूपाचा त्यांना तितकाच लळा होता असें सिद्ध होतें. जवळजवळ तीनशें वर्षांत दत्त-सांप्रदयाला सर्वांगीण चालना देणारा महापुरुष म्हणजे श्रीवासुदेवानंद सरस्वतीच होत. एकूण पूज्य श्रीस्वामीमहाराज म्हणजे ज्ञान, कर्म व उपासना या तिन्ही कांडांचे एक आचारवान् आचार्य होते.

वस्तुतः आत्मतत्त्वसाक्षात्कार झाल्यानंतर प्रवृत्तीकडे लक्ष असणें म्हणजे " पीक आलेलें असोनी नांगरावें शेत का ? " या म्हणीप्रमाणें अप्रयोजकच दिसतें. पण—

" तुका म्हणे आतां । उरलों उपकारापुरता "

या दृष्टीनें संत माऊली पूर्वाभ्यासानुरूप सामान्य जनांनाहि सन्मार्गाला लावण्यासाठीं स्वत: खालीं येत असतात असें म्हणावें लागतें. सर्वसामान्य समाजापुढें शुद्ध वेदांताचें प्रवचन निरुपयोगी ठरतें व नुसता कर्ममार्गहि कंटाळवाणा होतो. अशा वेळीं त्यांच्या उद्धाराचा एकमेव मार्ग उरतो तो हाच कीं मंत्रसामर्थ्य दाखवून कर्मफलांची सत्यता पटवून देणें व परमेश्वराच्या सगुण चरित्राचें कीर्तन करून त्यांच्या अंत:करणांत परमार्थाचा ओढा निर्माण करणें. वरील श्रीमद्‍भागवतीय श्लोकांत हाच अर्थ गोविला आहे. ही जाणीव ठेवूनच महाराजांनींहि कै. रामचंद्र बापटबुवासारख्यांना हाताशीं धरलें व कीर्तनाकडे उत्तेजित केलें. त्यांनीं त्यांना पूर्वरंग बसवून देऊन आख्यानेंही सांगितलीं. इतकेंच नव्हे, त्यांसाठीं कांहीं स्वत:हि आख्यानें लिहून दिलीं. तीच त्यांची बहुतेक सर्व कीर्तनसामुग्री वासुदेव ग्रंथमालेच्या या पुष्पांत प्रकाशित होत आहे. कै. बापटबुवांनीं ह्या वह्या प्रेमानें मजजवळ दिल्या व मींही त्या प्रकाशित व्हाव्या या उद्देशानें विद्वद्रत्न दत्तामहाराज कवीश्वर यांच्या स्वाधीन केल्या. हाच माझा नि या प्रकृत पुस्तकाचा संबंध; नाहींतर कुणीकडे महाराजांची ही प्रासादिक कीर्तनपद्धती आणि कुणीकडे माझ्यासारखा एक पोटभरू हरिदास ! त्यामुळें अशा ग्रंथावर प्रस्तावना लिहिण्याचा मुळींच अधिकार नाहीं हें कळत असूनही वे. शा. सं. कवीश्वरशास्त्री यांनीं मजकडून ही सेवा घेण्याचा आग्रह धरला व नाहीं नाहीं म्हणत म्हणत " या निमित्तानें त्यांच्या कीर्तन गंगेचें दर्शन–स्पर्शन तरी होतें " हाच लाभ डोळ्यांपुढें ठेवून मींही यथामति चार शब्दांनीं हात धुऊन घेऊन स्वत:ला पावन करण्यासाठीं ( प्रस्तावना लेखनाचें ) हें साहस पत्करिलें आहे.

या कीर्तनगंगेचें वर्णन संतवर्य श्रीधर महाराजांनीं मोठ्या बहारीचें केलेलें आहे. ते म्हणतात—

पद—ती ही कीर्तनगंगा पावन करी जगा ॥ ध्रु० ॥

व्यास सुरालय तेथुनि झाली ॥ शुक मुखांत रिघाली ॥
म्हणुनिया श्रोता भगीरथ ॥ प्रार्थुनी खालीं आणिली ॥ १ ॥

श्रवणतटें अर्थजलानें ॥ शोभति दिव्य तरंगा ॥
जडमूढ तारुनि समरस झाली ॥ अद्वय सागररंगा ॥ २ ॥

अगणित वदना करुनी स्नाना । श्रवणें पातकभंगा ॥
म्हणुनि श्रोता गंगातटिं द्विज । श्रीधर मानसरंगा ॥ ३ ॥

भागवताचार्य देवर्षि नारद, भगवान् महर्षि व्यास, भगवज्जनभूप वीतराग शुकाचार्य या तीन महापुरुषांची लोकोद्धारार्थ प्रवृत्ति म्हणजे ही कीर्तनपरंपरा होय. कीर्तन हा शब्द "कृत् संशब्दने" या धातूपासून बनला असून उत्तमोत्तम शब्दांनीं वाणीला व हृदयाला पवित्र करणें हेंच यावरून कीर्तनाचें ध्येय सिद्ध होतें. ही वाणीची सम्यक्ता किंवा उत्तमता तिच्या साहित्यशास्त्रोक्त सद्‌गुणांवर व रस-परिपोषावर मुख्यतः अवलंबून असते. पण प्राचीन आचार्यांनीं केवळ साहित्यापेक्षां उच्च आदर्श दाखवून समाजाची मनोवृत्ति निःश्रेयसपर बनविण्यावर याबाबत विशेष भर दिला आहे. या योगानें समाजाची निसर्गशुद्ध प्रेमवृत्ति क्षुद्र वैषयिकतेला दूर सारून ईश्वरपरायण होते. हिलाच म्हणतात कीर्तनभक्ति.

वक्ता स्वतः या वृत्तींत रंगून मुरून तल्लीन होऊन गेला म्हणजे समाजहि तदाकार बनतो. हाच कीर्तनाचा खरा उपयोग आहे. सर्व प्रकारच्या जनसमूहाला आकर्षित करून मार्गाला लावण्यास यासारखा दुसरा उपाय नाहीं. म्हणूनच भागवतांत म्हटल्याप्रमाणें:—

॥ आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रंथा अप्युरुक्रमे ॥
॥ कुर्वंत्य हैतुकिं भक्तिं इत्थंभूत गुणोहरिः ॥

असे परमपूज्य स्वामीमहाराजही आत्मतृप्त व आत्माराम असूनहि कीर्तनक्षेत्राकडे वळतात.

दत्तमाहात्म्यांत त्यांनीं प्रसंगानुसार कीर्तनाचें जें स्वरूपनिदर्शन केलें आहे त्यावरूनहि हेंच सिद्ध होतें. महाराज म्हणतात—

अजन्म्याचें दिव्य जन्म कीर्तन । अक्रियाचें दिव्य क्रियागान ।
जन्मबीजाचें करी दहन । नुरवी गहन कर्मवार्ता ॥ २७ ॥

करितां कीर्तन भगवंताचें । उठावे सात्त्विक भाव साचे ॥
तरीच साफल्य जन्माचें । अन्यथा दंभाचें ठाणें तें ॥ २८ ॥
नोहे हृदय सद्गदित । नोहे वाचा गद्गदित ॥
न हो तनू रोमांचित । प्रेमाश्रुपात नोहे जरी ॥ २९ ॥
अंतर्भान नोहे जरी । देहभान न उडे तरी ॥
दंभ मिथ्या प्रतापापरी । जाणिजे चतुरीं कीर्तनप्रौढी ॥ ३० ॥

( दत्तमाहात्म्य अध्याय १ )

ही आहे खरी कीर्तनप्रौढी. यालाच म्हणतात दिव्य कीर्तन. अष्ट सात्त्विक भाव जागृत होऊन भक्तिरसांत वृत्ति बुडाली म्हणजे सहजच देहाचा व जगाचा विसर पडतो, लोकलज्जा हरपते व सर्व पेटी, तबला, गायन इत्यादि साधनसामग्रीहि भगवत्प्रेममय होऊन जाते. कीर्तनकाराची ही अवस्था महाराजांच्या शब्दांत सांगावयाचें तर त्यांनीं— " कथा ही अमृत संजीवनी " या समर्थवचनाचें स्पष्टीकरण करतांना स्वतःच स्वानुभवाचें तन्मयतेनें आविष्कारण केलें आहे तें पाहाः—

पदः—प्रवृत्ति लुगडें फेडोनि । नाचुं नागडें होवोनी ॥
झालों आम्ही लोकबाह्य । दिसतां अंतीं तूं सबाह्य ॥
उठती रोमोद्गम देहीं । नेत्रीं वाहे जळ तेंही ॥
उठती सात्त्विक अष्टभाव । देहीं हर्षा नच वाव ॥
कांहींच नेणें मी देवा । आतां सावरि वासुदेवा ॥

खरें कीर्तन म्हणतात तें याला. म्हणूनच अजूनही उत्तरेकडे कीर्तन हा शब्द नामसंकीर्तन अथवा भजन याच अर्थानें वापरतात. पण या यथार्थ कीर्तनश्रवणाचा अधिकारी फार विरळा! भक्तांचे मुगुटमणी तुकाराम यांना लोकांनीं एकदां उत्तम कीर्तन करा म्हणून सांगितलें. आणि त्यांनीं आपल्या प्रेममय वृत्तींत येऊन नामसंकीर्तनच सुरू केलें. त्यांना वाटलें श्रोतेही आपल्याप्रमाणेंच रंगले असतील. पण डोळे उघडून पाहतात तों समोर एकच श्रोता शिल्लक आहे. यावरून सर्वसामान्य समा-

जाची भूमिका उच्च नसते. एकदम हे विचार मानवणें कठीण, म्हणूनच कीर्तनांत दृष्टान्तादाखल कथेचीही जोड द्यावी लागते. महाराष्ट्रांत ज्याला कीर्तन म्हणतात त्याला उत्तरी लोक कथा या नांवानें ओळखतात. पण कथा कीर्तनासाठीं असते, हें विसरतां कामा नये.

यासाठीं कथा व कीर्तनें यांची जोड आवश्यक आहे.

पंत म्हणतात—" चित्त प्रसन्न होतें प्रभुचा महिमाच आदरें गातां ।। " असें कीर्तन करतां करतां वक्ता मग आपली विद्वत्ता, शब्दपांडित्य, गानमाधुरी यांनाही विसरून भक्तिरसांत समरसता पावला म्हणजे खऱ्या कीर्तनाच्या कसोटीला उतरतो. मग—

" आपुलिया सुखस्वार्थी । केलीच करावी हरिकथा ।।
हरिकथेविण सर्वथा । राहूंच नये. ।।

असा तो कीर्तनमय होतो. कविवर्य मोरोपंत म्हणतात—

देहिं गेहीं झालें चित्त उदासीन कृष्णगुण गातां ।।
झाला कृतार्थ जन्मुनि उरलें कर्तव्य काय हो आतां ।।

अशी तन्मयता हेंच मानवी जीवनाचें साफल्य आहे. अशा प्रकारचें कीर्तन कोणा सहृदयाला आवडणार नाहीं ?

भागवतकार सांगतात:—

" निवृत्त तर्षै रुपगीयमानात् । भवौषधात् श्रोत्र मनोभिरामात् ।।
क उत्तम श्लोक गुणानुवादात् । पुमान् विरज्येत् विना पशुघ्नात् ।।"

आत्मसमाधानासाठीं केलेलें हें कीर्तन संसारमहारोगावरील रामबाण औषध आहे. तें श्रोत्यांच्या मनाला रिझविणारें भगवद्गुणानुवाद-अमृत ज्याला आवडत नाहीं तो वृत्तीचा पशुघ्न म्हटला पाहिजे. पण सर्वच हरिदासांना अशी उच्च भूमिका लाभेल असें नाहीं. समाजांत पोटभरू ह. भ. प. चीच संख्या अधिक असते व ती तशी राहणें स्वाभाविक आहे. त्यांना आपल्या व्यवसायासाठीं काव्य, गायन, वादन, वक्तृत्व इत्यादिकांची गरज असते. पण अशाहि कीर्तनकाराला कृत्रिम कां होईना

हरिभक्तिपरायणता आपल्या शक्तीनें निर्माण करावीच लागते. तरच ते समाजावर प्रभाव पाडूं शकतात व यशस्वी होतात. हें भक्तीचें सोंगहि वायां जातें असें नाहीं. हरिनामाचा महिमाच असा आहे कीं—

“ प्रवृत्ति विषयीं जरी असति ज्या जनांचीं मनें ॥
निवृत्त करितो हरी सगुण नामसंकीर्तनें ॥ ”

हें भाग्य आज घडणार कीं उद्यां हें ज्याच्या त्याच्या वृत्तीवर अवलंबून राहील इतकेंच. म्हणून सोंग करावयाचें तरी हरिभक्ताचें करावें व खरी हरिभक्ति घडावी अशी तळमळ बाळगीत जीवन कंठावें म्हणजे कालक्रमानें संस्कार होत होत वृत्ति निवृत्तिपर बनल्याशिवाय राहणार नाहीं. तात्पर्य श्रोत्यांना पटवावयाचें असेल तर कीर्तनकाराची भूमिका अशी असली पाहिजे.

संत कवी अमृतराय याच भूमिकेचें मोठ्या रसाळ वाणीनें विवरण करतात.

पद—तयाचे शब्द मनीं रुतले ॥ धृ० ॥

धन सुत दारा गृहही त्यजिले । भगवंतीं रतलें ॥ १ ॥
हरिगुण गातां प्रेमजळानें । सर्वांगी धुतलें ॥ २ ॥
सुखोद्गार ते ब्रह्मरसाचे । अमृत म्हणे साचलें ॥ ३ ॥

याच अवस्थेंत येऊन आत्मसाक्षात्कारी संतमहात्मे हरिगुण गातात व गावावितात.

“ पडिलें वळण इंद्रिया सकळां । भाव तो निराळा नाहीं दूजा ॥ ”
या न्यायानीं त्यांचे दृढमूल पूर्व संस्कार त्यांना गप्प बसूंच देत नाहींत. त्यांतच अनायासें जगदुद्धार होत असतो. महाराजांच्या कीर्तन-समुच्चयाकडे याच दृष्टीनें आपण पाहिलें पाहिजे. या प्रासादिक भूमिकेला लौकिकसाहित्याच्या गुणदोषदृष्टीनें पाहणें म्हणजे पैठणीला राकट घोंगडीचें ठिगळ लावण्यासारखेंच आहे. त्यामुळें तो हास्यास्पद मार्ग स्वीकारण्याच्या भानगडींत मी जातच नाहीं.

ही झाली वक्त्याची भूमिका.

आतां श्रोत्यांची स्थिति कीर्तनानें कशी पालटते तें पाहूं—

जनमनोभूमिकेंत हरिप्रेम रुजविण्याला कीर्तनाइतका प्रभावी मार्ग दुसरा नाहीं. म्हणूनच आजच्या नास्तिक्याच्या काळांतसुद्धां समाज पुराण-प्रवचनादिकापेक्षां कीर्तनकाराकडे अधिक आकर्षिला जातो. त्यांत तो रंगतो. तथापि कीर्तन ऐकणारे सर्वच श्रोते हरिभजनीं लागतात असें नाहीं. त्यांत वक्त्याच्या तारतम्यानुसार ज्याची ज्याची पूर्वार्जित संस्काराची जागृति जशी जशी अधिकाधिक होईल तशी तशी त्या त्या श्रोत्याच्या मनांत परमार्थाची गोडी वाढूं लागते. कारण " बहुत सुकृताची जोडी । म्हणुनि विठ्ठलीं आवडी ॥ " ही गोडी वाढतां वाढतां तिचें पर्यवसान काय होतें हें भागवतकारांनीं मार्मिकतेनें विशद केलें आहे. पाहा.

" शृण्वन् सुभद्राणि रथांग पाणेः । जन्मानि कर्माणि च यानि लोके ॥
गीतानि नामानि तदर्थकानि । गायन् विलज्जो विचरेदसंगः ॥ "

प्रथमतः प्रभूचीं दिव्य चरित्रें श्रवण करूं लागला कीं श्रोता स्वतः त्याचे गुणानुवाद व नामें गाऊं लागतो. पुढें पुढें लोकलज्जा विसरूनहि तो पूर्ण निःसंग भक्त बनतो. हा क्रम वरील श्लोकावरून व्यक्त होत नाहीं काय ?

एकनाथी भागवतांत या श्लोकाचें विवेचन मोठ्या भावोद्रेकानें केलें आहे. तें असें:—

ओव्या—हरिचरित्रें अगाध । ज्ञानमुद्रा पद बंध ॥
कीर्तनें गाता विशद । परमानंद ओसंडे ॥
वानीति अजन्म्याचीं जन्में । वर्णिती अकर्म्याचीं कर्में ॥
स्मरती अनामियाचीं नामें । अति सप्रेमें डुल्लत ॥
साधावया निजकाज । सोडून लौकिक लाज ॥
कीर्तनीं गातां नाचती भोज । अति निर्लज्ज निःशंक ॥
कीर्तनें निर्दाळिले दोष । जप तप ठेले निरास ॥
यमलोक पडिला ओस । तीर्थांची आस निरास झाली ॥

कीर्तनाचा घडघडाट । आनंद कोंदला उद्भट ॥
हर्षें डोले वैकुंठपीठ । तेणें सुखें ।

याचप्रमाणें "सततं कीर्तयन्तो मां." या गीतेंतील श्लोकावर श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं फारच सुंदर विवेचन केलें आहे, तें जिज्ञासूंनीं अवश्य पाहावें. (अ. ९, ओवी १८७ ते २३८).

या विवेचनावरून वक्ता व श्रोता यांची कीर्तनीं कशी एकरूपता होते हें ध्यानीं येईल. हें तादात्म्य ज्यांना ज्यांना निग्रहानुग्रहसमर्थ महाराजांचा कृपाप्रसाद लाभेल त्यांना त्यांना या कीर्तनपुष्पाचा उपयोग झाल्याशिवाय राहणार नाहीं. याच दृष्टीनें हा कीर्तनविभाग प्रसिद्ध होत असल्यानें वे. कवीश्वरशास्त्री यांनीं आमच्यासारख्या कीर्तनकारांवर मोठेच उपकार केले यांत शंका नाहीं.

महाराजांच्या इतर ग्रंथांप्रमाणें या कीर्तन पद्धतींतही अगाध शब्दपांडित्य, गाढ विद्वत्ता, निस्सीम तत्वनिष्ठा व ज्वलज्जहाल धर्माभिमान सर्वत्र प्रगट झाल्याविना राहत नाहीं. महाराजांनीं श्रीगुरुचरित्रांतील प्रसिद्ध सतिचरित्र व दत्तपुराणांतर्गत आयुराजाचें चरित्र आणि मदालसाउपाख्यान अशीं कांहीं आख्यानें स्वतः रचलीं आहेत. त्यांत त्यांची काव्यदृष्टि व्यक्त होते. म्हणून त्यासाठीं त्यांतील २।३ उदाहरणें देतों.

सतिचरित्रांतील त्यांचा अनुप्रास कसा सहजमधुर आहे पाहाः—

पद—घेऊनि कर, येवोनि सुर, होवुनि श्रमी ।
जोडुनि कर, सोडुनि दर, अत्रि आश्रमीं ॥
घासुनि शिर, अर्पुनि कर, ते स्वराश्रमी ।
म्हणती, प्रणती, विनति, अनुसूये, सतीवर्ये,
मुनिभार्ये, सदय हृदय हो ॥

आतां आयुराजाच्या चरित्रांत प्रारंभींच जी आर्या दिली आहे तिची सरलता सहज ध्यानीं येते.

" रायें उपाय केले पुत्रप्राप्तीस वे अमीत महा ।।
दैवें निष्फळ झाले तरि धैर्यें सोशितो व्यथातम हा ।। "

संस्कृत भाषेंतीलही त्यांचें पुढील पद्य वाचून प्रत्येकाच्या अंतःकरणांतील आनंदोर्मि उसळल्याशिवाय राहणार नाहींत.

" आह शौनको हुंड घातको । नूनमर्भको लोकपालकः ॥
संजनिष्यते येन सूच्यते । भद्रमस्तुते यानि भूपते ।। "

यावरून त्यांच्या कवित्वाची व शब्दकौशल्याची कल्पना येईल. असो.

या निमित्तानें हा संग्रह प्रसिद्ध होत आहे याबद्दल मला आनंद वाटतो; आणि 'पाडून अमृत' म्हणतात त्याप्रमाणें विनयशाली विद्वद्वर्य कवीश्वर शास्त्री यांनीं या विभागाचें आलोचन, चिंतन करण्याचा व तद्‌द्वारां महाराजांची अल्पशी स्मरणसेवा करण्याचा योग घडवून आणला याबद्दल त्यांचे व वासुदेवग्रंथमालेच्या सर्व चालकांचे हार्दिक आभार मानून महाराजांच्या इतर ग्रंथांप्रमाणेंच हाही ग्रंथ जनतेच्या व त्यांतल्यात्यांत कीर्तनकारांच्या ज्ञानांत भर घालून उपयोगी पडो, अशी सदिच्छा व्यक्त करून श्रीसद्‌गुरु ब्रह्मीभूत वासुदेवानंद सरस्वति महाराज यांचे चरणीं शेवटीं हीच प्रार्थना करितों कीं—

" भवे भवे यथा भक्तिः पादयोस्तव जायते ।।
तथा कुरुष्व देवेश नाथस्त्वंनो यतः प्रभो ।। "

(श्रीमद्भागवत)

गुरुपौर्णिमा
शके १८७६

श्रीचरणाचा दासानुदास ।
नारायण लक्ष्मण ऊर्फ नानाबुवा
जहागिरदार हरिदास, सिंदखेडकर.

---

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानन्द
सरस्वती टेम्बेस्वामिमहाराज यांचें

# संक्षिप्त चरित्र

सदानन्दति विद्वत्त्वात् सर्वदाऽति विभुत्वतः ॥
मृत्युंजयति योगित्वाद्यः स मे हृदि तिष्ठतु ॥ १ ॥

नमः श्रीगुरो गेशधीशे दयाब्धे
भयार्तिघ्न ते स्वात्मदो वासुदेव ॥
यतीट्सेवितानन्दपादाब्जयुग्मं
सदा मे हृदि स्थास्नुतां यातु देव ॥ २ ॥

## पूर्वार्ध

सद्गुरु श्रीवासुदेवान्दसरस्वतीस्वामिमहाराजांचे उपलब्ध झालेले सर्व ग्रंथ नुकतेच प्रकाशित झालेले आहेत. त्याबरोबर श्रीमहाराजांचें चरित्रही, साररूपानें कां होईना, प्रकाशित झाल्यास बरें होईल असें वाटल्यावरून श्रीगुरुस्मरणपूर्वक यथामति चरित्र-लेखनास आरंभ करीत आहें. 'वीतरागविषयं वा चित्तम्' या योगसूत्रकारांच्या आदेशाप्रमाणें जीवन्मुक्तमहानुभावांच्या चरित्राचें समालोचन हें चित्तस्थैर्यसंपादक असल्यानें ही प्रवृत्ति होत आहे. हृदयस्थ परमात्माच बुद्धिदाता असून कार्यसिद्धिही त्याच्याच कृपेनें होणारी आहे. करितां त्या सर्वसाक्षी

सर्वचित्तवृत्तिसंचालक सिद्धिबुद्धिपतीचे चरणीं हें महत्कार्य निर्विघ्न पार पाडण्याबद्दल प्रथम आम्ही प्रार्थना करीत आहों.

सावंतवाडी संस्थानपैकीं माणगांव हें गांव सावंतवाडीपासून ८।९ मैल अंतरावर आहे. तेथें सावंतवाडीहून मोटारी रोज जातात. गांवची वस्ती अंदाजे ३।४ हजारांपर्यंत होईल. ब्राह्मणांचीं घरें २०।२५ आहेत. गांवापासून एकदीड मैल अंतरावर निर्मला नांवाची नदी पश्चिमाभिमुख वहात आहे. गांवांतील मुख्य देवता यक्षिणी असून तिचें स्थान गांवांतच मध्यभागीं आहे. गांवांतील ब्राह्मणांच्या निर्वाहाचें साधन म्हणजे भिक्षुकवृत्ति हेंच आहे.

सावंतवाडी संस्थानचे सरहद्दीनजीक एका गांवांत हरीभट्ट टेंबे या नांवाचे एक सच्छील ब्राह्मण सुमारें सव्वाशें वर्षांपूर्वी राहात होते. हेच श्रीमहाराजांचे आजोबा होत. हे ऋग्वेदांतर्गत शाकलशाखीय असून यांचें गोत्र अत्रि आहे. हे उत्तम वैदिक असून शिवाय याज्ञिकही उत्तम प्रकारें करीत असत. यांचें हस्ताक्षर फारच सुंदर होतें. पूर्वी मुद्रणाची सोय नसल्यानें हातानेंच ग्रंथ लिहून काढण्याची पद्धति होती. लेखकांचा स्वतंत्र असा एक तो धंदाच होता. त्यामुळें एखादी गुरुचरित्रासारखी पोथी लिहवून घेण्यास बरेंच मूल्य द्यावें लागत होतें. श्रीहरिभटजींनीं शके १७५२ सालीं स्वहस्तानें लिहिलेली श्रीगुरुचरित्राची पोथी अद्यापि उत्कृष्ट स्थितींत आहे. याप्रमाणें पर्वीच्या काळीं फार प्रयत्नानें पोथ्या लिहाव्या लागत असल्यामुळें त्यांचें महत्त्व लोकांना विशेष वाटत होतें. पोथ्या म्हणजे एक प्रकारचें स्थावर धन समजलें जात असे. आतां तर मुद्रणकलेच्या विकासामुळें पुस्तकांचा सुकाळ वाढूं लागल्यामुळें 'अतिपरिचयादवज्ञा' या न्यायानुसार जुन्या लेखी पोथ्याकडे कोणी पाहाण्यासही राजी होत नाहीं अशी स्थिति झालेली आहे.

माणगांवीं वे. सीतारामभट कोनकर यांचे घरीं प्रथम वे. हरिभट यांना आश्रय मिळाला. यांची विद्वत्ता व सदाचार पाहून गांवांत व परगांवींही यांनाच धर्मकार्याकरितां लोक बोलावूं लागले. प्रथम उपजीविकेचें साधन पाहाण्याकरितां म्हणून वे. हरीभट्ट हे एकटेच वे. कोनकरांचे घरीं येऊन राहिले. योगायोगानें दोघांचें प्रेम वाढूं लागलें. कांहीं दिवसांनीं वे. कोनकरांच्या सांगण्याप्रमाणें आपल्या गांवीं जाऊन वे. हरीभटजीनीं आपलें कुटुंब, काशी नांवाची मुलगी व गणेश नांवाचा मुलगा यांच्यासह माणगांवीं येऊन कायमचेंच वास्तव्य केलें. वे. कोनकरांना पुत्र नसून फक्त येसूबाई म्हणून एक मुलगी होती. त्यांचें प्रथम कुटुंब निवर्तल्यामुळें वे. हरीभटजीनीं त्यांना नंतर आपली मुलगी काशी ही दिली. लग्न झाल्यावर तिचें नांव अन्नपूर्णाबाई असें ठेवलें. वे. कोनकरांनींही आपली मुलगी येसूबाई ही वे. हरीभटजींचा मुलगा गणेश यांस दिली. यांचे घरीं आल्यावर तिचें नांव रमाबाई असें ठेवलें. पुढें लवकरच वे. कोनकर निवर्तल्यामुळें वे. हरिभट हेच आपल्या गतधवा मुलीचें सर्व पाहूं लागले. अन्नपूर्णाबाई कोनकर यांनीं आपली इस्टेट व पुरोहित वृत्ति आपली सावत्र मुलगी रमाबाई इलाच हक्कदार म्हणून दिली, त्यामुळें गणेशभटजी टेंबे हेच माणगांवचे स्थायिक वतनदार बनले. कारण ते अन्नपूर्णाबाईचे जामातच होते. याप्रमाणें वे. हरीभटजींचें कायमचें राहाणें माणगांवीं होण्याचा योग आला. त्यांनीं आपल्या पूर्वीच्या गांवांतील घर वगैरे विकूनही टाकलें. माणगांवांत स्थायिक झाल्यावर वे. हरीभटजींना रामकृष्ण, बाळकृष्ण व विष्णु असे तीन मुलगे आणि यमुना व भीमा अशा दोन मुली झाल्या; म्हणजे हरीभटजींना एकंदर चार मुलगे व तीन मुली अशीं अपत्यें झालीं.

हरीभटजींचे ज्येष्ठ चिरंजीव गणेश भट हेच श्रीमहाराजांचे पिताजी व रमाबाई या माता होत्या. गणेश भटजींना अपस्माराचा म्हणजे

फीट येण्याचा विकार जन्मभर होता म्हणून घरच्या मंडळींनीं त्यांना कोठेंही दूर अपरिचित स्थळीं जाऊं नका असें सांगावें. पण ते प्रारब्धवादी असल्यानें त्यांनीं सांगावें कीं–सर्वांच्या जीवनाचा व मरणाचा काल व देश ठरलेला आहे. कोणीही कितीही काळजीनें वागलें तरी तो चुकवितां येत नाहीं, किंवा निष्काळजीनें वागलें म्हणून तो अलीकडे येत नाहीं–गणेशभटजींची वृत्ति अत्यंत सात्विक व महादेवांचेप्रमाणें भोळी होती. पूर्व संस्कारानुसार श्रीदत्तप्रभूंचे चिंतनाकडे यांची विशेष प्रवृत्ति असल्यानें अर्थातच प्रपंचाकडे यांचें लक्ष कमी होतें. यांना वारंवार प्रभूंचे दृष्टांत होत त्याप्रमाणें ते गाणगापुरीं जाऊन सेवेस रहात असत आणि पुनः दृष्टांत झाला म्हणजे घरीं येत असत. एकदां गणेशभटजींचे गाणगापुरास जवळ जवळ बारा वर्षें राहाणें झालें. ‘ सगुण सुंदर पतिव्रता । अनुकूल मिळालिया कांता । जो विसंबेना भगवत्पथा । भागवत मुख्यता या नांव ’ या नाथांच्या सांगण्याप्रमाणे खरोखरच गणेशभटजी भागवतोत्तम होते. त्यांच्या सेवेनें भगवान दत्तगुरु प्रसन्न होऊन त्यांनीं त्यांना सांगितलें कीं-- ‘ मी तुमच्याव[र] प्रसन्न आहें. तुम्ही आतां घरीं जाऊन राहा. या उपर गाणगापुर[ीं] येण्याचें कारण नाहीं.’ याप्रमाणें श्रीदत्तप्रभूंचा प्रसाद झाल्यानंतरच पुढे शके १७७६ आनंद संवत्सरांत श्रावण कृष्ण पंचमी रविवारीं सूर्योदयापासून २६ घटिकांनीं श्रीमहाराजांचा जन्म झाला. या पूर्वी गणेशभटजींना दोन मुली झाल्या होत्या. मुलाचें नांव वासुदेव असें ठेवलें. श्रीमहाराजांच्या मातोश्रींचाही काल नेहमीं पुण्यकर्मांत जात असे. अनेक व्रतें करणें, निरनिराळ्या लक्षवाती लावणें, गुरुचरित्र, औदुंबर यांना लक्ष प्रदक्षिणा घालणें, येणाऱ्या अतिथींना अन्नदान करणें, ग्रामदेवत[ा] यक्षिणीची नित्य पूजा करणें इत्यादि सत्कर्मांतच माउलीचा सर्व काळ जात असे. अशा तपोनिष्ठ दंपतींच्या पोटीं ‘ शुद्ध बीजापोटीं । फळे

साळ गोमटीं ' या वचनाप्रमाणें श्रीमहाराजांचा अवतार झाला. महापुरुषांचा अवतार व्हावयाचा असल्यास त्यांच्या पूर्वजांना किती पुण्यसंचय करावा लागतो हें यावरून लक्षांत येईल. हरीभटजींचें वय बरेंच झालें होतें. पण ज्येष्ठ मुलगा गणेश नेहमीं गाणगापुरास जात असल्यानें त्यांनाच सर्व प्रपंचाचा भार वहावा लागत असे. नुसत्या भिक्षुक वृत्तीनें प्रपंच चालविणें जड जाऊं लागल्यामुळें त्यांनीं घरांत गाडी ठेवून शेतीचा जोडधंदा सुरू केला होता.

वासुदेव हे तीन वर्षांचे झाल्याबरोबर त्या वेळीं असणाऱ्या खाजगी शाळेंत शिकण्याकरितां जाऊं लागले. मातेनें घरींच शिवलेलें असें आंगडें व टोपडें घालून ही बाल वासुदेवमूर्ति शाळेंत जाऊन बसे. त्या वेळीं शिक्षणाचा कोण त्रास! स्लेट पाट्या नसल्यानें लाकडाच्या फळीवर धूळ टाकून बोटानें अथवा काडीनें अक्षरें काढावयाचीं. त्यामुळें बोटें अगदीं गळून जावयाचीं. कांहीं दिवसांनीं वासुदेवास अक्षरओळख झाली. यक्षिणीच्या देवळांतील खाजगी शाळेंतच हें मुळाक्षरांचें शिक्षण झालें. वासुदेव नेहमीं आजोबांचे सान्निध असे. त्यांचेंही या आपल्या चलाख नातवावर फार प्रेम असल्यानें त्यांनीं बाल वासुदेवास हळूहळू रूपावळी, समासचक्र, अमरकोश, नित्यस्तोत्रपाठ व शिक्षा, अष्टाध्यायी वगैरे उपग्रंथ शिकविले होते. तीव्र बुद्धीच्या वासुदेवास पाठ होण्यास फारसा विलंब लागत नसे. एवढा वाढता प्रपंच चालविण्यास हरीभटजींना फार कष्ट पडत. पण आपल्या नातवाची ती सुलक्षणी प्रसन्न मूर्ति पाहिल्याबरोबर त्यांचे सर्व क्लेश दूर होत असत. दारिद्र्यांतच पूर्वसंस्कारयुक्त माणसाला खरें तप घडतें. ' मनसश्चेन्द्रियाणांच ह्यैकाग्र्यं परमं तपः ' या वचनास अनुसरून अत्यंत शांत वृत्तीनें, ईश्वरावर भार घालून त्या कुटुंबाचा काल चालला होता. आणि लहानपणापासूनच अशा

खडतर तपाचा योग वासुदेवास येत राहिल्यानें तप्त सुवर्णाप्रमाणें तें तेज वाढतच गेलें.

वयाच्या आठव्या किंवा नवव्या वर्षी हरीभटजींनींच आपल्या लाडक्या नातवाची-वासुदेवाची-मुंज केली. उपनयन झाल्याबरोबर सायंकालीं व प्रात:कालीं संध्या वंदन करणें, नित्य श्रीगुरुचरित्र वाचणें इत्यादि नियम वासुदेवाचे सुरू झाले. उपनयनसंस्कार ज्याच्याकरितां करावयाचा तें वेदाध्ययनही जवळच भटवाडींत राहाणारे वेदमूर्ति विष्णुभट्ट तात्या उकिडवे यांचेकडे सुरू केलें. पण पुढें आपल्या आजोबांचें छत्र वासुदेवास फार दिवस लाभलें नाहीं. पुढें एक दोन वर्षांनींच वे. हरीभटजींना देवाज्ञा झाली. त्या वेळीं गणेशभटजी गाणगापुरीं असल्यानें त्यांचे बंधू बाळकृष्ण यांनींच पित्याचें दहा दिवसांतील सर्व कृत्य केलें. हरीभट वारल्यानंतर घरांत मोठें जाणतें माणूस कोणी राहिलें नाहीं. ही संधि साधून गणेशभटजींचे बंधु बाळकृष्णभटजी यांनीं घरांतील चीजवस्तु होती नव्हती ती लांबविली. शिवाय या कुटुंबावर पांचशें रुपयांचा कर्जाचा बोजा ठेवून बाळकृष्णभट निघून गेले. या वेळीं घरांत फक्त अन्नपूर्णाबाई व रमाबाई या मायलेकीच काय त्या मोठ्यापैकीं होत्या. घरांत कांहीं राहिलें नाहीं, डोक्यावर कर्जाचा बोजा ठेवला गेलेला, अशा स्थितींत कोणीतरी पुरुषमनुष्य व्यवहार पाहाण्यास पाहिजे म्हणून अन्नपूर्णाबाईनीं आपला एक नातलग नारायणभट ऊर्फ नाना कोनकर यांना घरीं आणून सर्व पाहाण्यास सांगितलें. रमाबाईची चुलत बहीण दुर्गाबाई म्हणून होती. तिला घरांतील मुलें मावशी म्हणत. हिला कांहीं बाधा असल्यामुळें ती नरसोबाचे वाडीस जाऊन राहिली होती. पण शेवटीं वयाचे ९७ वे वर्षी माणगांवांतच तिचें देहावसान झालें. याच दुर्गा मावशींचेकडून आमच्या चरित्रनायकास प्रसंगीं थोडाफार उपयोग व त्रासही झाला हें

राहून सर्व व्यवहार पाहिला व पुढें या कुटुंबावरील कर्ज फेडण्याकरितां व इतरहि झालेला स्वतःचा खर्च वसूल करण्याकरितां म्हणून अन्नपूर्णाबाईकडून त्यांची वतनी इस्टेट खरेदी म्हणून लिहून घेतली.

वेदमूर्ति तात्याभटजी उकिडवे यांचेकडे वासुदेवाचें वेदाध्ययन चालू होतें. त्याप्रमाणें वे. भास्करभटजी ओळकर हे घराजवळच राहात असल्यामुळें त्यांचेकडेही कांहीं अध्ययन झालें होतें. कोनकर यांचे घरीं नित्य भोजनास वासुदेवाचें जाणें होतें. त्यावेळीं स्वतःच सोवळ्यानें भात करून व नैवेद्य वैश्वदेव करून नंतरच भोजन करण्याचा वासुदेवाचा परिपाठ होता. 'आचारः प्रथमो धर्मः' या वचनाप्रमाणें लहानपणापासूनच कर्ममार्गाचें यथाविधि आचरण करीत राहिल्यास ब्राह्मतेज कसें वाढतें हें या उदाहरणावरून लक्षांत येईल. पूर्वसंस्कारानुरूप वासुदेवाची प्रज्ञाशक्ति अत्यंत तीव्र असल्यामुळें ८।९ संथेंतच त्यांना सर्व पाठ होत होतें. घरीं संथा म्हणण्याचे वेळीं कांहीं स्खलन झाल्यास वडिलानीं एवढेंच सांगावें कीं, 'बाळ! पोथीकडे पाहून म्हणावें.' गणेशभटजींचा स्वभाव अत्यंत सात्विक होता. घरीं ते कधीं कोणालाही बोलत नसत. जेवतांना मुकाट्यानें खालीं मान घालून जेवीत. त्यांना कांहीं कमी जास्ती हवें असेल तें वाढणाऱ्यानें ओळखून फार तर वाढावें; नाहींतर 'विधिवशात् प्राप्तेन संतुष्यताम्' हीच वृत्ति त्यांची होती. 'गृहेष्वतिथिवद्वसेत्' हें असंगत्व, निरहंकारित्व या गुणांना संपादक असणारें खडतर व्रत गणेशभटजींचें होतें. आणि तोच आदर्श बालवयांत नित्य समोर असल्यामुळें आमच्या चरित्रनायकांच्या चित्तभूमींतही तें पूर्णपणें रुजलें. वासुदेवाचें वेदाध्ययन नित्य सोवळ्यानें व स्त्रीशूद्रादिकांपासून दूर राहून होत असल्यामुळें वेदमंत्रांची शक्तिसिद्धि त्या बालवयांतच झाली. वेदविद्या ही पुस्तकी विद्या नाहीं. वेदाला श्रुति असें म्हणतात; म्हणजे गुरूजींच्या मुखांतून मंत्र नुसते श्रवण करूनच ते

शिष्यानें पाठ करावयाचे. असा अभ्यास वासुदेवाचा अत्यंत निष्ठेनें चालूं होता. पहांटे गुरुजी उठण्याच्या अगोदर उठून अंधारांतच त्यांच्या पायांजवळ जाऊन बसावयाचें. त्यांचा पाय लागल्यावर त्यांनीं विचारावें, 'कोण आहे ?' तर 'मी वासुदेव.' असें उत्तर द्यावें. गुरुजींनीं सांगावें कीं, 'वासुदेवा ! अजून रात्र आहे, नीज.' रात्रीं दिव्याची स्वतंत्र सोय नसल्यामुळें बाहेर अंगणांत तुळशीवृंदावनाजवळ बसूनच म्हणावयाचें. मध्येंच झोप आली तर तेथेंच झोपावें व पहांटे उठून पुनः म्हणावें. 'वेदाभ्यासो हि विप्रस्य तपः परमिहोच्यते' या शास्त्रवचनाप्रमाणें हें मोठें तप वासुदेवाचें चालूं होतें. वेदाध्ययन संपूर्ण होऊन याज्ञिकाचाही अभ्यास झाल्यावर माणगांवचेच वे. शा. सं. शंभूशास्त्री साधले यांचेजवळ संस्कृताभ्यास करण्यास वासुदेवानें आरंभ केला. रघुवंशाचे कांहीं थोडे श्लोक व कांहीं ज्योतिष्याचा भाग इतकाच अभ्यास साधलेशास्त्रींचेकडे झाला. एका इसमास एकदां साधले शास्त्रींनीं घर बांधण्याचा मुहूर्त सांगितला असतां त्या दिवशीं कुयोग असल्याचें वासुदेवानें दाखवून दिलें. पुढच्या वर्षी अधिक महिना कोणता येणार अशी चर्चा चालूं असतां साधले शास्त्रींचें तें गणित चुकलें आणि वासुदेवानें सांगितलेलाच अधिक महिना खरा ठरला. पण ही शिष्याची बुद्धि पाहून गुरुजींनीं त्याला सांगितलें कीं, 'यापुढें आमच्याकडे तूं शिकण्यास येऊं नकोस. आम्ही कांहीं तुला सांगणार नाहीं.' 'शिष्यादिच्छेत् पराजयम्' ही वृत्ति ठेवून बुद्धिमान् शिष्याचें कौतुक करणारे निर्मत्सर खरे गुरुजी विरळाच आहेत. असो. रोज सकाळीं व संध्याकाळीं संध्यावंदन वेळेवर करण्याचा वासुदेवाचा नियम होता. एकदां माणगांवाहून दुसरीकडे जाण्याचा प्रसंग आला. मध्येंच सूर्यास्त झाला तेव्हां रस्त्यांतील एका झऱ्यावर स्नान करून सायंसंध्या केली व मगच पुढचा रस्ता धरला. एकादशी

व्रत अत्यंत कडकपणानें वासुदेवानें पाळावें. स्मार्त व वैष्णव अशा दोन्ही एकादशींस त्यांनीं कडकडीत उपोषण करावें. रात्रीं पूर्ण जागरण करावयाचें. मध्यें झोप येऊं नये म्हणून शेंडीला दोरी बांधून ती खुंटीला बांधून ठेवावयाची. हेतु हा कीं मध्यें डुलकी आलीच तर शेंडीला हिसका बसून जाग यावी. द्वादशीस दुपारीं निजावयाचें नाहीं. असें अत्यंत व्यवस्थितपणानें व्रत केलें तरच त्याचा योग्य तो परिणाम होऊं शकतो. आजोबा निवर्तल्यानंतर गृहप्रपंच चालविण्याकरितां वासुदेवास यजमानांच्या घरीं पौरोहित्य कर्म करण्यास जावें लागे. पण त्यांचें कर्म यथासांग करून देऊन घरीं येऊन नैवेद्य वैश्वदेव करून जेवावें. परान्न कधींही घेतलें नाहीं. जेवतांना रजस्वला, अंत्यज यांचा शब्द कानावर पडतांच पात्र सोडून उठावयाचें. परान्नच घेणें नाहीं तर मग श्राद्धादिभोजनास जाणे दूरच. अशा नियमामुळें वासुदेवास प्रसंगीं दोन दोन उपवासही पडत. वादविवाद तर कोणाबरोबर केव्हांही केला नाहीं. 'सर्वथा स्वहितमाचरणीयम्' ही वृत्ति ठेवून नेहमीं सत्कर्मांत काल घालवावयाचा. धरलेला नियम प्राण गेला तरी मोडावयाचा नाहीं. 'नानृतं वदेत्' या शास्त्राज्ञेप्रमाणें असत्य कधींही बोलावयाचें नाहीं. दारिद्र्यामुळें पुरतीं वस्त्रेंसुद्धां जवळ नसत. एक नेसण्यास पंचा व एक पांघरण्यास; आणखी एखादा मिळालाच तर तो डोक्याला बांधण्यास झालें; यांवाचून दुसरें वस्त्र जवळ नाहीं. पायांत जोडा कधींही नाहीं, छत्री नाहीं. रात्रीं निजतांना एखाद्या गवताच्या चटईवर नाहीं तर पांघरण्याच्या पंचावरच निजावें. त्रिकाल स्नानाचा नियम होता. मातोश्रींच्याविषयीं वासुदेवाचे मनांत अत्यंत आदरभाव होता. 'न मातुः परदैवतम्' या शास्त्राज्ञेप्रमाणें माता कोठेंही दिसली तरी तिला अत्यंत नम्रपणानें नमस्कार केल्यावांचून पुढें पाऊल टाकलें नाहीं. याप्रमाणें अंतर्बाह्य अत्यंत नियमपूर्वक आचरण व

उत्तम मुखोद्गत तेजस्वी अध्ययन यांमुळें सर्व लोकांची श्रद्धा बाल वासुदेवावर बसली. त्यामुळें कोणत्याही निमित्तानें वासुदेवास घरीं बोलावून शक्तीप्रमाणें संभावना सर्व करीत असत. अशा रीतीनें प्रपंचास थोडीफार मदत वासुदेवाकडून होऊं लागली. या मुलाच्या मदतीनेंच गणेशभटजींनीं कांहीं मुलींचीं लग्नें व कांहीं मुलांच्या मुंजी केल्या. कनिष्ठ बंधु सीताराम ऊर्फ भलोबा याची मुंज वासुदेवानेंच केली. मागें सांगितल्याप्रमाणें साधलेशास्त्रींनीं पुढें शिकविण्यास नकार दिला तरी त्या थोड्या शिक्षणानेंच वासुदेवाचें काम झालें. पुढें शिक्षणाची जरूरीच भासली नाहीं. मध्यें कांहीं नडलेंच तर सावंतवाडीचे वे. शा. सं. विष्णुभटजी अळवणी यांचेकडे ८।९ मैल जाऊन शंकासमाधान करून घ्यावें. याप्रमाणें थोडक्याच कालांत वासुदेवाचा विद्याभ्यास पूर्ण झाला.

घरची गरीबी असल्यानें मुलगी कोण देणार? पण ईशेच्छेनें सर्व घडून येतें. नाना कोनकर यांनीं मध्यस्थी करून रांगणागड येथील हवालदार बाबाजीपंत गोडे यांची मुलगी बायो ही वासुदेवाकरितां ठरवून टाकली. ती मुलगी सुरूप नसून पायांतही अधू होती म्हणून तिचें लग्न होणें कठीणच होतें. ही आपली मुलगी वासुदेवाचे गळ्यांत बांधून आपण मोकळें व्हावें म्हणून बाबाजीपंतांनीं वासुदेवाचे गुरुजी उकिडवे व ओळकर यांना हें लग्न जमवून देण्याची गळ घातली. नाना कोनकरांनाही वासुदेवाचें येनकेन प्रकारेण जमविण्याचें असल्यानें तेही या बेतास अनुकूल झाले. त्यांनीं मुलाला सुद्धां न विचारतां मुहूर्तही ठरवून टाकला व मुलाला मुलगी पसंत असल्याबद्दल घरीं सर्वांना सांगितलें. शेवटपर्यंत वासुदेवाला कांहीं कळलें नाहीं. आईनें विचारलें असतां मला कांहींच माहिती नसल्याचें वासुदेवानें सांगितलें; तेव्हां तिला बराच विस्मय वाटला व आपल्या मलानें आपला कांहींच विचार न घेतां लग्नास संमति

दिली याबद्दल वाटणारा किंतूही तिच्या मनांतून निघून गेला. आपल्याला लग्न करावयाचें नाहीं असें वासुदेवानें ऐनवेळीं सांगितलें तेव्हां आमच्या शब्दाला मान देण्याकरितां तुला हें लग्न केलें पाहिजे असें दोघांही गुरुजींनीं सांगितल्यामुळें नाइलाज होऊन केवळ गुरूंची आज्ञा म्हणून वासुदेव या लग्नास तयार झाला व हें लग्न पार पडलें. त्या वेळीं वासुदेवाचें वय २१ वर्षांचें होतें. विवाहोत्तर लगेच स्मार्ताग्नीची उपासना चालू करून गायत्रीमंत्राचें एक पुरश्चरणही केलें.

माणगांवीं प्रपंचास पुरेशी आर्थिक मदत मिळत नसल्यामुळें ती मिळविण्याचे हेतूनें गोवा प्रांतांत वासुदेवानें जाण्याचें ठरविलें आणि त्याप्रमाणें पेडणें येथें एका गृहस्थाबरोबर येऊन तो दाखल झाला. त्या बरोबरच्या गृहस्थानें वासुदेवास एका श्रीमंतांच्या घरीं नेलें. त्या श्रीमंत गृहस्थानें वासुदेवाची थोडी परीक्षा पाहिली. त्यानें हातांत एक तिकडील नाणें घेऊन वासुदेवास विचारलें कीं, 'तुम्हाला ज्योतिष कळतें तर माझ्या हातांत काय आहे तें ओळखा पाहूं.' वासुदेवानें तात्कालिक प्रश्नलग्न मांडून लगेच उत्तर दिलें कीं तुमच्या हातांत एक नाणें आहे. ही त्याची ज्योतिःशास्त्रांतील प्रगति लहान वयांत असलेली पाहून तो श्रीमंत गृहस्थ अत्यंत खुष होऊन त्यानें त्यांची उत्तम संभावना केली व गोमांतकांतील त्या वेळचे प्रसिद्ध ज्योतिषी नीळंभट पद्ये यांचेकडे आणखी कांहीं दिवस राहून तुम्ही अध्ययन करा म्हणजे तुमची ज्योतिःशास्त्रांत यापेक्षांही अधिक प्रगति होईल असें मोठ्या कळकळीनें वासुदेवास सांगितलें. त्याप्रमाणें पद्ये यांचेकडे जाऊन वासुदेवानें ज्योतिषाचा अभ्यास सुमारें सहा महिनेच केला असेल नसेल इतक्यांतच घरीं वडील आजारी असल्याचें कळल्यावरून ताबडतोब त्यांना परतावें लागलें. निळंभट पद्ये यांचे वासुदेवावर तीव्र बुद्धि, सदाचार इत्यादि गुणांमुळें इतकें प्रेम जडलें होतें कीं वासुदेव घरीं

ेघाला असतां त्यानें पुनः परत यावें म्हणून त्याचें सर्व सामान आपल्या
रीं पद्ये यांनीं ठेवून घेतलें. पण पुढें कांहीं वासुदेवभटजींचें जाणें
ोमांतकांत झालें नाहीं. वडिलांचें आजारपण पुढें वाढत गेलें व त्यांतच
ाके १७९९ भाद्रपद कृष्ण द्वितीयेस त्यांचा अंत झाला. मरणाचे पूर्वी
ोडा वेळ माणगांवांतील एका मुख्य गृहस्थास घरीं बोलावून गणेश-
भटजींनीं सांगितलें कीं मी मेल्यावर घरीं कोणाला रडूं देऊं नकोस.
ोनें तें कबूल केलें व तो तेथेंच बसून राहिला. ऐन वेळीं कांहीं कामा-
करितां तो बाहेर गेला व इकडे गणेशभटजींचें देहावसान होऊन घरांत
ाडारड सुरू झाली. ती ऐकून तो गृहस्थ लगेच धांवतच बाहेरून
ाला. तो आल्याबरोबर गणेशभटजींनीं डोळे उघडले आणि त्याला
ांगितलें कीं 'बाबा तुला मुद्दाम मीं सांगितलें असतां ऐन वेळेवर
कसा तूं बाहेर गेलास? बरें झालें तें झालें, आतां तरी जाऊं नकोस.
ैस; मी आतां जातों.' इतकें सांगून गणेशभटजींनीं प्राण सोडला. भगव-
द्भक्तांचें मृत्यूवर सुद्धां नियंत्रण असतें. भीष्माचार्य इच्छामरणी होते ही
ोष्ट खोटी नाहीं हें या उदाहरणावरून सर्वांच्या लक्षांत येईल. मरणाचे
वेळीं गणेश भटजी ९६।९७ वर्षांचे होते. वडिलांचें सर्व और्ध्वदेहिक
कृत्य वासुदेव भटजींनीं केलें.

सदाचारपूर्वक सर्व अध्ययन झाल्यामुळें वासुदेव भटजींना वेदमंत्र
उत्तम सिद्ध झाले होते. याचीं कांहीं उदाहरणें पुढीलप्रमाणें आहेत.
माणगांवाहून जवळच एका ठिकाणीं वासुदेवभटजी एका गृहस्थाबरोबर
मंत्रपुष्पाकरितां चालले होते. संध्याकाळची वेळ होती. जातांजातां रस्त्यांत
एक साप आढळला. त्या बरोबर बरोबरच्या गृहस्थानें वासुदेवभटजींना
त्याच्यावर मंत्रप्रयोग करण्यास सांगितलें. वासुदेवभटजींनीं माती हातांत
घेऊन तिच्यावर मंत्रप्रयोग केला व ती त्या सर्पाच्या सभोंवती टाकून ते
पुढें आपल्या कामास गेले. तेथील मंत्रपुष्प आटोपून घरीं रात्रीं परत आले

यावेळीं येतांना त्या सापाची आठवण कोणासच झाली नाहीं. दुसऱ्या दिवशीं दुपारीं भोजनोत्तर ते गृहस्थ वासुदेवभटजींचे घरीं आले त्या वेळीं यांना एकाएकीं त्या सापाची आठवण होऊन दोघेही त्या सापाची स्थिति पाहाण्यास गेले. जवळ जाऊन पाहतात तों माती टाकलेल्या जागेच्या आंत फिरून फिरून साप अगदीं दमून निश्चेष्ट पडला असल्याचें त्यांना दिसून आलें. लगेच वासुदेवभटजींनीं दुसऱ्या मंत्रानें त्याचा प्रतिबंध दूर करतांच तो साप एकदम वेगानें अन्यत्र निघून गेला. ही त्या दिवशीं सापाची झालेली कष्टावस्था पाहून वासुदेवभटजींच्या मनावर परिणाम झाला व त्यांनीं पुढें सर्पावर मंत्रप्रयोग करण्याचें कायमचें सोडून दिलें. दंडकारण्यांत सीतेच्या सांगण्यावरून रामचंद्राच्या साहाय्याकरितां म्हणून, सीतेला एकटीच सोडून जाण्याचा प्रसंग जेव्हां लक्ष्मणावर आला तेव्हां सीतेला कोणाही राक्षसादिकांपासून पीडा होऊं नये म्हणून लक्ष्मणानें पर्णकुटीच्या बाहेर एक रेघ मारून ठेवली व 'आम्ही येईपर्यंत या रेघेच्या बाहेर तरी तुम्ही येऊं नका' असें सीतेला सांगून लक्ष्मण निघून गेला. त्या रेघेच्या आंत येऊन सीतेचें हरण करण्याची रावणाची सुद्धां छाती झाली नाहीं. ही कथा यथार्थ आहे असें वासुदेवभटजींच्या वरील गोष्टीवरून सर्वांचे लक्षांत येईल. असेच एकदां वासुदेवभटजी जवळच आपल्या बहिणीच्या गांवीं गेले होते. तिची गाय दंगा करणारी होती. तिनें वासुदेवास गाईवर मंत्रप्रयोग करण्यास सांगतांच यांनीं तो केला. त्याबरोबर ती गाय अगदीं गरीब झाली. याप्रमाणें दिवसेंदिवस वासुदेवभटजींची कीर्ति वाढत चालल्यामुळें त्यांच्याकडे अनेक लोक नानाप्रकारचे प्रश्न विचारण्याकरितां येऊं लागले. त्या सर्व लोकांना योग्य मार्ग दाखवून पीडेपासून वासुदेवभटजी मुक्त करीत असत. एका गांवांत

एका माणसाचा खून खाजगी द्वेषामुळें करून ते आरोपी फरारी झाले. त्यांपैकीं पुढें कांहीं सांपडले पण मुख्य आरोपी सांपडेना; तेव्हां सरकारतर्फे अधिकाऱ्यांनीं वासुदेवभटजींना याबद्दल विचारलें तेव्हां 'आरोपी आठ दिवसांत अनायासानें तुमच्या ताब्यांत येईल' असें यांनीं सांगितलें. पुढें तो आरोपी परगांवीं आपल्या मित्राकडे जाऊन राहिला होता. तेथें एका त्याच्या ओळखीच्या पोलीस अधिकाऱ्यानें त्याला पकडून गुन्हा झालेल्या हद्दींतील अधिकाऱ्यांचे स्वाधीन केलें. हा चमत्कार पाहून सर्व आश्चर्यचकित झाले. अशाच एका गांवीं नित्य चोऱ्या होत, पण चोर कांहीं हातीं लागेना. वासुदेवभटजींना प्रश्न विचारतांच त्या चोरांचें स्वरूप, त्यांची येण्याची वेळ वगैरे सर्व यांनीं सांगून दिलें; त्यामुळें हळूहळू सर्व चोरांना अधिकारी ताब्यांत घेऊं शकले. या अनुभवावरून सर्वांची विशेष श्रद्धा वासुदेवभटजींचेवर बसली. माणगांवांतच एका मराठ्याच्या स्त्रीला एका समर्थ पिशाचापासून फार त्रास होत असे; केव्हां केव्हां तर त्या पिशाचानें सोसाट्याच्या वाऱ्याच्या रूपानें येऊन त्या स्त्रीला वर आकाशांत घेऊन जावें अशी स्थिति होत असे. या त्रासानें गांजून गेलेली ती स्त्री वासुदेवभटजींना शरण आली. तेव्हां त्यांनीं भूर्जपत्रावर एक यंत्र लिहून देऊन तें तिला गळ्यांत बांधण्यास सांगितलें. तें तिनें गळ्यांत बांधतांच त्या पिशाचाला कांहीं करतां येईना. त्याच दिवशीं वासुदेवभटजींना रात्रीं त्या पिशाचानें गळा दाबून बराच त्रास दिला. त्यावेळीं मोठाच भयंकर प्रसंग वासुदेवभटजींचेवर आलेला होता. पुढें दत्तनामस्मरण करतांच तो त्रास कमी झाला. इतक्यांत कसली गडबड आहे हें पाहाण्याकरितां मातोश्री उठून आल्या. त्यांच्याकडून खूण करून थोडे तांदूळ मागवून घेतले व ते मिळाल्याबरोबर अभिमंत्रण करून सर्व दिशेला टाकले तेव्हां तो त्रास कमी झाला. आत्मसंरक्षणाचा विधि प्रथम प्रयोग करतेवेळीं केला नसल्यामुळें हा त्रास भोगावा लागला असें मागाहून त्यांचे लक्षांत आलें.

वासुदेवभटजींच्या पत्नीचें नांव अन्नपूर्णाबाई असें आजेसासूचेंच ठेवलें होतें. घरांत सासूसुनेचें खडाष्टक होतें. नित्य कांहीं तरी कारणावरून सासूबाई सुनेची हजेरी घेत असत. पण मातेविषयीं वासुदेवभटजींच्या मनांत अत्यंत आदरभाव असल्यानें त्यांनीं याबद्दल आपल्या मातेला कधींही एका अक्षरानेंसुद्धां दुखविलें नाहीं. एकदां गणपतीचे उत्सवांत पूजेकरितां वासुदेवभटजी बसले असतां पूजासाहित्य कांहींच तयार नसल्याचें पाहून ते आपल्या कुटुंबास सहज कांहीं बोलले; तेव्हां मातोश्री रमाबाई उगीचच रागावून त्यांच्या कुटुंबाला वाटेल तसें बोलूं लागली. तें पाहून वासुदेवभटजींचें मन इतकें उद्विग्न झालें कीं त्या वेळीं त्यांनीं असलेल्या साहित्यानेंच पूजा करून गणपति पोंचविला.

एकदां कांहीं कामाकरितां वासुदेवभटजींना परगांवीं जावयाचें होतें; तेव्हां त्यांनीं लवकर स्वयंपाक करण्यास आपल्या मातोश्रीस सांगून ते अनुष्टान करण्यास गेले. त्या दिवशीं अन्नपूर्णाबाईंना बराच ताप आल्यामुळें त्या निजून राहिल्या. पण तें पाहून रमाबाईंना तें सर्व सुनेचें ढोंग वाटून रागारागानें स्वयंपाक न करतां ती दुसऱ्याच कामांत गर्क झाली. अनुष्टान आटोपून वासुदेवभटजी आले. पाहतात तों स्वयंपाकाचा पत्ता नाहीं. त्याबद्दल त्यांनीं मातोश्रीस विचारलें तेव्हां ती एकदम उसळून म्हणाली कीं, 'तुझी बायको ढोंग करून निजून राहिली आहे. घरांत गुरांना चारा आणण्यांत माझा वेळ गेला. स्वयंपाक कसा होईल?' वासुदेवभटजींनीं त्या वेळीं आपल्या कुटुंबाच्या शरीरास हात लावून पाहतांच ताप पुष्कळच असल्याचें त्यांना आढळून आलें. त्या वेळीं त्यांनीं आईस सांगितलें कीं 'आई! ढोंग कसलें म्हणतेस? खरोखरच तिला ताप फार आहे. तूं वाटल्यास हात लावून पहा.' झालें; ही मुलाची वाणी ऐकल्यावर मग काय विचारावें! मातोश्रीनें मुलाची हजेरी घेण्यास सुरुवात केली; 'तूं बायकोच्या

नादीं लागला आहेस, तुला आतां आईची किंमत राहिली नाहीं, तिचा कैवार घेऊन तूं मला बोलतोस, मीच कुठें तरी दुसरीकडे जातें.' याप्रमाणें पुष्कळच त्या दिवशीं त्यांना मातोश्रीचे वाक्प्रहार सहन करावे लागले. शेवटीं मुकाट्यानें उठून न जेवतांच त्या दिवशीं ते बाहेर कामास निघून चालते झाले.

मातोश्रीस वाईट वाटूं नये म्हणून वासुदेवभटजी कुटुंबाबरोबर कधीं फारसे बोलतसुद्धां नसत. इतके भिऊन वागत असूनही त्यांना वरील-प्रमाणें मातोश्रीकडून कटु बोल ऐकून घ्यावे लागत. रागीट स्वभावा-मुळें सुनेशीं तर सासूचें कधींच पटलें नाहीं. रोज कांहीं तरी कटकट चालायची; त्यामुळें सुनेचेंही मस्तक भडकून जाऊन दोघींचेंही चांगलें कडाक्याचें भांडण होण्याचा प्रसंग केव्हां केव्हां येत असे. मार खाण्याचाही प्रसंग सुनेवर एखादे वेळीं येत असे. अन्नपूर्णाबाई बिचारी अत्यंत सात्विक! पडेल तें काम आंगचुकारपणा न करतां करणारी होती. पण या जन्मांतरांतील योगामुळें घडून येणाऱ्या कलहामुळें, तिचाही चांगुलपणा जाऊन तिची वृत्ति एखादे वेळीं बंडखोर बनत असे. आपल्या पतीनीं याबद्दल मातेला कांहीं तरी सांगून ही रोजची कटकट दूर करावी असें बिचारीला वाटे. पण मातोश्रीला वाईट वाटेल म्हणून वासुदेव-भटजींनीं एक चकारशब्दही याबद्दल आपल्या आईजवळ काढला नाहीं. याबद्दल बिचारी अन्नपूर्णाबाई अश्रू ढाळीत कसेतरी कष्टानें दिवस कंठीत असे. एकदा असाच त्रास अन्नपूर्णाबाईंना झाल्यामुळें त्या विमनस्क स्थितींत होत्या. त्या दिवशीं आग्रायणेष्टी करण्याचें ठरवून वासुदेव-भटजींनीं पत्नीस संकल्पाचे वेळीं जवळ बसण्यास बोलावलें; त्या वेळीं तिनें ताडकन उत्तर केलें कीं, 'मी तुमची कोण? कोण बायको असेल तिला हाक मारा.' असें म्हणून ती निघून गेली. ती इष्टि तशीच पत्नी-शिवाय त्यांना करावी लागली.

घरांतील अशा अंतर्गत कटकटीमुळें वासुदेवभटजींना मनस्ताप भोगावा लागे. तो असह्य झाला म्हणजे, हें घरदार सोडून नरसोबाचे वाडीस जाऊन राहावें असें त्यांना वाटे. पण याला मातोश्रीची परवानगी कशी मिळणार ? असा प्रश्न पुढें आल्याबरोबर त्यांना स्वस्थ बसावें लागे. सावंतवाडीस आळवणी म्हणून एक सदाचारसंपन्न वैद्य राहत असत. त्यांचा व वासुदेवभटजींचा स्नेह असल्यामुळें कधीं तरी त्यांचेकडे वासुदेवभटजी जात असत. सावंतवाडीसच विष्णुपंत आणावकर म्हणून एक गृहस्थ होते. त्यांचे अंगांत त्यांचाच एक पूर्वज पिशाच झालेला येत असे. तो पिशाच्च सर्व शास्त्रांत निष्णात होता. भूत-भविष्यवृत्त कोणाचेंहि तो बिनचूक सांगत असे. त्या पिशाच्चानें आपणांस या योनींत येण्याचें कारण असें सांगितलें कीं—'पूर्वजन्मांत मी उत्तम वैदिक ब्राह्मण होतों. घराच्या मागील दारीं एक दुसऱ्याची गाय आलेली आपण पाहिली. तिनें कांहीं नासधूस न करतां निघून जावें म्हणून आपण सहज एक धोंडा तिला मारला. तो तिच्या वर्मी लागून ती मेली. पण ही आपल्या हातून झालेली गोहत्या कोणालाही सांगितली नाहीं कीं त्याबद्दल प्रायश्चित्तही घेतलें नाहीं. मेल्यावर आपण यमदरबारांत गेलों तेव्हां यमानें विचारलें कीं ' तूं गोहत्त्या केली आहेस. अशा पाप्याला वाघाच्या योनींत तरी जावें लागेल किंवा पिशाच्च योनींत. तुला कोणती योनी पसंत आहे ?' तेव्हां व्याघ्र योनींत जाण्यापेक्षां पिशाच्च योनीच बरी, यांत ज्ञान तरी राहील असा विचार करून आपण पिशाच्च योनीच पसंत केली. आपण अनेक पिशाच्चांवरचे मोठे अधिकारी आहोंत. त्यामुळें आपणांस वाटेल त्या ठिकाणचें सर्व समजतें. या योनींत येऊन २९० च्या वर काल लोटला. जास्तींत जास्त पिशाच्च योनींत दहा हजार वर्षे काढावीं लागतात.' असें आणावकरांचे समंधानें स्वतःचें वृत्त वेळोवेळीं सांगितलें. या पिशाच्चाकडे अनेक आर्त लोकांनीं

नेहमीं यावें व यानेंही त्यांना शास्त्रोक्त उपाय करण्यास सांगून संकटमुक्त करावें. असा क्रम नित्य चालूं होता. एकदां घरांतील कांहीं त्रासाचा परिणाम असह्य झाल्यामुळें संन्यास घेण्याचें ठरवून वासुदेवभटजी सावंतवाडीस आळवणी वैद्यांचेकडे गेले. एकाएकीं आपली इच्छा पण त्यांनीं तेथें बोलून दाखविली नाहीं. त्या दिवशीं आळवणी त्या समंधाकडे जाण्यास निघाले. वासुदेवभटजींना विचारतां त्यांनींही येण्याचें कबूल केलें. आणावकरांचे घरीं दोघेही गेल्यावर थोड्याच वेळांत तो समंध अंगांत आला आणि वासुदेवभटजींचेकडे पाहून आळवणींना सांगूं लागला कीं—'या भटजीनीं संन्यास घेण्याचें ठरविलें आहे पण अजून संन्यासाला पुष्कळ वेळ आहे. तत्पूर्वी बरींच कार्यें यांचेकडून होणार आहेत.' हें आपल्या मनांतील ओळखल्यामुळें वासुदेवभटजींना त्या समंधाच्या ज्ञानाबद्दल आदर वाटूं लागला. अळवणींनीं विचारतांच संन्यास घेण्याचें ठरवून मी इकडे आलों होतों हें त्यांनीं कबूल केलें. संन्यास घेण्याचें त्या वेळीं साहजिकच राहिलें. पुढें प्रसंगानें वासुदेवभटजी त्या समंधाकडे जात असत.

या आणावकरांना एक मुलगा झाला. त्याचें जन्मटिप्पण करण्याकरितां वासुदेवशास्त्री एकदां गेले, त्या वेळीं पाटीवर त्या मुलाचें ग्रहमान पाहतां त्या मुलाचें आयुष्य एक महिना आहे असें वाटून वासुदेवशास्त्री गणिताची पाटी पालथी घालून स्वस्थ बसून राहिले. पण समंधानें अमुक दिनमान घेऊन गणित करून पहा असें सांगतांच शास्त्रीबुवांनीं तसें करून पाहिलें तो मृत्युयोग नसून एक महिना क्लेश आहेत असें त्यांना दिसलें. नंतर त्यांनीं कांहीं उपाय समंधाच्या म्हणण्यावरून सांगितला; त्यामुळें पूर्वी त्या मुलाला जें आईचें दूध मिळत नसे तें मिळूं लागून त्याचें कल्याण झालें.

वासुदेवशास्त्री एकदा मातोश्रीसह नाशिकला गेले. तेथील साधु देव-मामलेदार यांचे घरीं गेले असतां तुम्हीं काय शिकला असें त्यांनीं वासु-देवशास्त्रींना विचारलें. तेव्हां मी कांहीं शिकलों नाहीं असें शास्त्रीबुवांनीं सांगितलें. पण देव मामलेदारांनीं यांचे मुखाकडे एकदां पाहून सर्वांना सांगितलें कीं हे सर्व शिकलेले आहेत; यांचा अधिकार मोठा आहे. नंतर ते शास्त्रीबुवांना दाक्षिणा देत असतां यांनीं ती घेतली नाहीं.

सावंतवाडीचे सबनीस यांचा मुलगा एकदां आजारी पडला, तेव्हां त्याची पत्रिका पाहून दोषपरिहारार्थ वासुदेवशास्त्रींनीं गोप्रदान करण्यास सांगितलें. सबनीस यांनीं वासुदेवशास्त्रींना नकळत त्यांचे बंधु सीताराम यांना बोलावून त्यांना दक्षिणापूर्वक गोप्रदान केलें. त्याचा परिणाम असा झाला कीं सीतारामास घरीं आल्याबरोबर सपाटून ताप आला. चौकशीअंतीं गोप्रदानाची हकीकत कळतांच वासुदेवशास्त्रींनीं रागावून सीतारामास सांगितलें कीं मला विचारल्यावांचून तूं गोप्रदान घेतलेंस याचें हें फळ तूं भोग. शेवटीं ती गाय दुप्पट दक्षिणा देऊन दुसऱ्या ब्राह्मणास देऊन टाकल्यावर सीतारामाचा ताप कमी झाला.

माणगांवांत एका गृहस्थाच्या संततीचा नाश होत असे. त्याला पिशाचाच्या पादुका करून पूजेंत ठेवण्यास वासुदेवशास्त्रींनीं सांगितलें. नंतर संतती जगूं लागली. त्यांपैकीं एक मुलगा अत्यंत अशक्त होता. वासुदेवशास्त्रीनीं त्या मुलाच्या आजीस सांगितलें होतें कीं, हा मुलगा अशक्त असला तरी तुम्ही असेपर्यंत याला कांहीं भीति नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं तो मुलगा आजारी पडून त्याची अगदीं आसन्नमरण स्थिति झाली तेव्हां त्याच्या आजीनें वासुदेव-शास्त्रींना बोलावून आणून त्यांना त्यांच्या सांगण्याचें स्मरण करून दिलें. तेव्हां वासुदेवशास्त्रींनीं थोडें पाणी अभिमंत्रण करून त्या

मुलाच्या अंगावर प्रोक्षण केलें. त्याबरोबर तो मुलगा पूर्ववत् सावध होऊन व्यवहार करूं लागला.

वासुदेवशास्त्री एकदां परगांवीं जात असतां रात्रीच्या वेळीं रस्त्यांत एक मोठा वाघ बसल्याचें त्यांना दिसलें. तो रस्ता सोडून जाईना. तेव्हां शास्त्रीबुवांना अतिशय भीति वाटली. ते एका झाडावर चढून तेथूनच ओरडूं लागले. तो आवाज ऐकून जवळच त्या वेळीं असणारे आत्माराम जडये नांवाचे एक धाडसी ब्राह्मण तेथें आले. त्यांनीं वाघास हांकलून देऊन व शास्त्रीबुवांना झाडावरून उतरून घेऊन त्यांच्या घरीं आणून सोडलें. पण तो भीतीमुळें उत्पन्न झालेला कंप पुढें वाघरें काढल्यावर नाहींसा झाला. कांहीं दिवसांनीं देवांनीं याबद्दल वासुदेव-शास्त्रींना सांगितलें कीं तुम्ही रात्रीं अपरात्रीं रानांतून हिंडतां म्हणून आपणच वाघाचें रूप घेऊन तुम्हाला भीति दाखविली.

एकदां आपल्या बहिणीच्या घरीं वासुदेवशास्त्री गेले. तेथें रात्रीं शेजारीं रडण्याचा आवाज ऐकूं आला. वासुदेवशास्त्रींनीं चौकशी केली तेव्हां बहिणीनें सांगितलें कीं आज सहा महिने हा भूतांच्या रडण्याचा आवाज ऐकूं येतो. सर्व लोक हताश झाले आहेत. तपास करूनही कांहीं पत्ता लागत नाहीं. असें बहिणीनें सांगतांच वासुदेव-शास्त्रीनीं मंत्रसामर्थ्यानें त्या भूतांचा बंदोबस्त करून टाकला. तेव्हां-पासून पुनः तें रडणें कोणास ऐकूं आलें नाहीं.

वासुदेवशास्त्रींचें घर फार जुनें झाल्यानें मोडकळीस आलें होतें म्हणून तें उकलून नवीन बांधण्यास पोतनीस यांनीं लाकूड वगैरे देऊन शिवाय पैशाचीही मदत केली. त्या वेळीं तें घर दोन महिन्यांतच फार गडबडीनें बांधलें गेलें त्यामुळें तें ३०-४० वर्षांपेक्षां जास्ती टिकूं शकलें नाहीं. त्याच जागेवर आज गुरुभक्त महाराणीसाहेब सौ. इंदिराबाई

होळकर यांनीं उत्तम सीमेंट कांक्रीटचें घर बांधून दिलें असून तेथें दत्त-मंदिराच्या पूजाऱ्यानें नैवेद्य वैश्वदेव करून राहावें अशी व्यवस्था केली आहे. हें मूळ जन्मस्थान असल्यानें येथील कांहीं कायमची व्यवस्था उत्तम प्रकारें होण्याकरितां कांहीं निधि ठेवून त्याचा एक ट्रस्ट करण्याचा सौ. राणीसाहेबांचा विचार चालूं आहे.

नरसोबाचे वाडीस जाणेची इच्छा कधीं कधीं वासुदेवशास्त्रींना होत असे. पण आईची अनुज्ञा मिळणार नाहीं असें वाटून त्यांनीं तो नाद सोडून दिला होता. एके दिवशीं रात्रीं स्वप्नांत एक ब्राह्मण येऊन त्यानें शास्त्रीबुवांना विचारलें, कांहो शास्त्रीबुवा! तुम्ही नरसोबाचे वाडीस जावें असें म्हणतां तर कां जात नाहीं? शास्त्रीबुवा त्या ब्राह्मणास स्वप्नांतच म्हणतात, काय करावें? आईची आज्ञा नाहीं. तेव्हां तो ब्राह्मण म्हणाला, तुम्ही जाण्याचें ठरवाल तर आईची आज्ञा मिळेल आणि सोबत मिळून खर्चाची सोयही होईल. लवकर तयारी करा. हें स्वप्न पडल्यानंतर शास्त्रीबुवांना झोप आली नाहीं. दुसरे दिवशीं मातोश्रीस हें स्वप्न सांगतांच—तुझी इच्छा असेल तर वाडीस जा. माझी कांहीं आडकाठी नाहीं—असें मातोश्रीनें लगेच सांगून टाकलें. शास्त्रीबुवा वाडीस जात आहेत हें समजल्याबरोबर जवळचा एक शेजारी येऊन त्यानें आपणही तुमच्याबरोबर वाडीस येतों असें सांगितलें. नंतर दोघें मिळून वाडीस जाण्याकरितां घरून निघून सावंतवाडीस आले. तेथें राम-भाऊ सबनीसांनीं शास्त्रीबुवांना अडीच रुपये देऊन सांगितलें कीं तुम्हीं मागें पत्रिका केली होती त्याचे हे पैसे देणेचें राहिलें होतें तें घ्या. स्वप्नदृष्टांताप्रमाणें सर्व गोष्टी अनायासें जुळून आल्याचें पाहून वासुदेव-शास्त्रींना आनंद वाटला. वाटेंतही ठिकठिकाणीं सोबत मिळत गेली. बोरगांव मुक्कामीं शास्त्रीबुवांना असाच एक दृष्टांत झाला आणि सांगणें

झालें कीं, नरसोबाचे वाडीस श्रीगोविंदस्वामी म्हणून मोठे अधिकारी पुरुष आहेत त्यांचें दर्शन घ्या. याप्रमाणें हळूहळू वासुदेवशास्त्री वाडीस येऊन पोचले. फार दिवसांचा संकल्प पूर्ण झाल्यानें त्यांना अत्यंत समाधान वाटलें. येण्याबरोबर प्रथम श्रीदत्तपादुकांचें दर्शन करून वासुदेवशास्त्री श्रीगोविंदस्वामींची चौकशी करतात न करतात इतक्यांत ब्रह्मानंदांचे मठांतील माडीवरून स्वतः श्रीगोविंदस्वामीच खालीं येऊन अगदीं चिरपरिचिताप्रमाणें विचारूं लागले कीं, ‘काय वासुदेवशास्त्री ! केव्हां आला ? चला माडीवर, स्नान वगैरे करून या’ असें हें प्रथमदर्शनींच श्रीगोविंदस्वामींचें बोलणें ऐकून वासुदेवशास्त्रींना फारच आश्चर्य वाटलें.

वासुदेवशास्त्रींची नरसोबाचे वाडीस प्रथम कोणाचीच ओळख नव्हती. नेसलेला एक मळकट पंचा व एक पांघरलेला असा त्यांचा वेष पाहून हे ब्राह्मण तरी आहेत कीं नाहींत ? असा तेथील पुजाऱ्यांना संशय आल्यामुळें त्यांना पादुकावर पाणी घालूं दिलें नाहीं; तेव्हां ते नुसतें दर्शन घेऊन मुकाट्यानें वर येऊं लागले. इतक्यांत श्रीगोविंदस्वामींना प्रभूचें सांगणें झालें कीं, ‘पोथी वाचणेचें सोडून मंडपांत काय चाललें तें पहा. त्या बिचाऱ्या लांबून आलेल्या ब्राह्मणाला पुजारी पाणी घालूं देत नाहींत.’ हें सांगणें झाल्याबरोबर श्रीगोविंदस्वामी उठून खालीं आले. वासुदेवशास्त्री खिन्न चित्तानें वर येत होते. त्यांना पाहतांच श्रीगोविंदस्वामी म्हणाले, शास्त्रीबुवा ! पादुकावर पाणी घातलें कीं नाहीं ! नंतर शास्त्रीबुवांनीं घडलेली हकीकत सांगितली; तेव्हां श्रीगोविंदस्वामींनीं आपला दंड त्यांचे हातांत देऊन त्यांचेसह स्वतः श्रीगोविंदस्वामी देवाचे मंडपांत आले. नंतर शास्त्रीबुवांनीं गुरुपादुकांना पाणी घातलें; त्या वेळीं गुरुकृपेची अगाध लीला अनुभवून अत्यंत समाधान

वाटलें. पुजारी मंडळींची शंका दूर झाली. नंतर वाडींत एक महिना शास्त्रीबुवांचा मुक्काम झाला. तेथें रोज कृष्णाबाईचें स्नान करून देवास पाणी घालावें, प्रदक्षिणा घालाव्यात इत्यादि नियम होते.

वाडीस असतां शास्त्रीबुवांना देवाचा दृष्टांत झाला कीं, 'मिरजेस शंकरभटजी म्हणून एक सज्जन गृहस्थ आहेत. त्यांचेकडून गुरुचरित्राची पोथी आणून सप्ताह करा.' त्याप्रमाणें शास्त्रीबुवा मिरजेस त्या गृहस्थांचेकडे गेले, पण त्यांनीं पोथी न दिल्यामुळें परत वाडीस आले. 'पुस्तक मिळेल पुनः जाऊन या' असें पुनः सांगणें झाल्यावरून पुनः मिरजेस गेले व पोथी घेऊन येऊन सप्ताहास आरंभ केला. हें सर्व होईपर्यंत अन्नाचें ग्रहण केलें नाहीं.

नरसोबाचे वाडीस रात्रौ शेजारती झाल्यावर खालीं कोणी जावयाचें नाहीं, असा नियम आहे. तो वासुदेवशास्त्रींना ठाऊक नव्हता. एकदां शास्त्रीबुवा रात्रीं कृष्णाबाईवर हातपाय धुण्यास गेले होते. शेजारती होऊन गेली होती. देवदर्शनाकरितां म्हणून गेले असतां द्वार बंद होतें. नंतर प्रदक्षिणा करून जावें असें मनांत आणून दक्षिण दरवाजापाशीं शास्त्रीबुवा आल्याबरोबर एक भव्य तेजःपुंज संन्यासी पुरुषानें दरडावून त्यांना विचारलें कीं–शेजारती झाल्यानंतर इकडे न येण्याचा नियम तुला माहीत नाहीं काय? त्यावेळीं वासुदेवशास्त्रींनीं त्या दिव्य पुरुषाला नमस्कार करून क्षमा मागितली व आपण नवीन असल्यानें हा नियम ठाऊक नसल्याचें सांगितलें. हे संन्यासी पुरुष म्हणजे साक्षात् नृसिंहसरस्वती दत्तमहाराजच होते असें मागाहून श्रीगोविंदस्वामींचेकडून शास्त्रीबुवांना समजलें. श्रीगोविंदस्वामी हे मोठे समर्थ अधिकारी पुरुष होते. यांनाच ब्रह्मय्यास्वामी असें म्हणत असत. यांचीच भेट वाडींत आल्याबरोबर शास्त्रीबुवांना झाली व हेच शास्त्रीबुवांचे गुरुही झाले.

वासुदेवशास्त्री नित्य पंचायतनपूजा करीत असत. श्रीगोविंदस्वामीनीं दत्तपादुकांचीही पूजा करण्यास सांगितलें. पण देवाची इच्छा असेल तसें होईल असें सांगून शास्त्रीबुवा स्वस्थ राहिले. पुढें कांहीं दिवसांनीं देवानीं दृष्टांत दिल्यावरून दत्तपादुकांची पूजा ते रोज करूं लागले. एकदां पार्थिव-पूजा करण्याविषयीं देवानीं वासुदेवशास्त्रीनां सांगितलें. प्रथम त्यांनीं तिकडे कानाडोळा केला, तेव्हां पुनः तसेंच सांगणें झालें; त्यावेळीं आपल्या जवळ विधान नाहीं असें शास्त्रीबुवांनीं सांगतांच तें विधान कवीश्वरबुवांचेकडे मिळेल असें सांगणें झालें. त्याप्रमाणें तें विधान मिळवून कांहीं दिवस शास्त्रीबुवांनीं पार्थिवपूजा केली व देवानीं पुरे म्हणतांच ती सोडून दिली.

नरसोबाचे वाडीहून घरीं परत येईपर्यंत घराचें बांधकाम संपत आलें होतें. तें पूर्ण झाल्यावर सर्व सामग्री जमवून वास्तुशांतीचा मुहूर्त ठरविला. पण मुहूर्ताची वेळ टळेपर्यंत पत्नी आलीच नाहीं. त्यामुळें शास्त्रीबुवांना उद्वेग होऊन त्यांनीं आईला सांगितलें कीं या घरांत कोणी नांदणार नाहीं. येथें धर्मशाळा होईल. नंतर धाकटे बंधु हरीभट यांचेकडून वास्तु-शांति करविली. अशीं उद्वेग उत्पन्न होण्यासारखीं कारणें घडल्यामुळें शास्त्रीबुवांचें मन संसारांतून पूर्णपणें उठलें. आणि ईश्वरप्राप्तीकरतां, पापांचें क्षालन करण्याकरितां म्हणून त्यांनीं अत्यंत कठीण असें चांद्रायण व्रत करण्यास आरंभ केला. मध्येंच देहपात झाला तरी हरकत नाहीं. देह ईश्वराला समर्पण होईल आणि घरचा मनस्तापही चुकेल असें त्यांनीं ठरविलें. आरंभीं उपवास करून शुक्लप्रतिपदेपासून रोज एक एक घास जेवणाचे वेळीं वाढविणेचा असतो. याप्रमाणें करतां करतां पौर्णिमेस पंधरा घासांचें भोजन होतें. पुनः रोज एक एक घास कमी कमी असें अमावास्येपर्यंत चालवून शेवटीं उपोषण करावयाचें. दुसरा एक चांद्राय-

णाचा प्रकार शुक्ल प्रतिपदेस पंधरा घास. पुढें एक एक घास कमी करीत करीत पौर्णिमेस एक घास व पुढें अमावास्येपर्यंत एक एक घास वाढवीत वाढवीत अमावास्येस पंधरा घास असा क्रम आहे. यालाच पिपीलिकामध्यचांद्रायण अशी शास्त्रीय संज्ञा आहे. याप्रमाणें चांद्रायणव्रत चालू असतां रोज त्रिकाल स्नान करणें, एकाच वस्त्रावर नेहमीं असणें, रात्रीं जमिनीवर निजणें, मौन असणें इत्यादि नियम रोज कसोशीनें पाळले जात होते. हें व्रत चालू असतां आपण बेशुद्ध पडलों, मेलों तरी तोंडांत पेज वगैरे घालूं नये असें आपल्या मातोश्रीस वासुदेवशास्त्रींनीं बजावून ठेवलें होतें. शेवटीं हें चांद्रायणव्रत ईशकृपेनें पूर्ण झालें; पण त्यावेळीं एक पाऊल सुद्धां टाकण्याची त्यांना शक्ति राहिली नाहीं. तथापि रोजचें अनुष्ठान वेळेवर चालूच होतें. त्यांतच रक्त पडूं लागलें. ताप येऊं लागला. अशा स्थितींतच नरसोबाच्या वाडीस जाण्यास ते निघाले. त्या वेळीं सोबत म्हणून मातोश्री बरोबर होत्या. ‘ कार्यं वा साधयेयम् देहं वा पातयेयम् ’ असा दृढ मनोनिग्रह मूर्तिमंत या उदाहरणावरून डोळ्यांपुढें उभा राहतो.

श्रीदत्तजयंतीस वरीलप्रमाणें वाडीस जाणें झालें. त्या वेळीं तेथें शास्त्रीबुवांचा मुक्काम तीन चार महिने झाला. एकदां श्रीगोविंदस्वामींनीं शास्त्रीबुवांना श्रीदत्तोपासना स्वीकारण्यास सांगितलें; तेव्हां शास्त्रीबुवा म्हणाले, आपल्याला अग्नि व सूर्य ही ब्राह्मणांची नित्य उपासना आहेच. निराळी काय करावयाची ? त्याच दिवशीं साक्षात् दत्तमहाराजांचे कडून वासुदेवशास्त्रींना स्वप्नांत मंत्रोपदेश झाला. श्रीगोविंदस्वामींनीं हें सर्व जाणून आपल्या निजलेल्या जागेवरूनच विचारलें कीं, ‘शास्त्रीबुवा मंत्र मिळाला ना ? आतां याचें सर्व सांग विधान उद्यां तुम्हांला सांगूं.’ ही श्रीगोविंदस्वामींची सर्वज्ञता वासुदेवशास्त्रींना अनेकवार अनुभवास आल्या-

मुळें त्यांची त्यांच्यावर फार श्रद्धा बसली व ते त्यांना आपले गुरु समजूं लागले. दुसरे दिवशीं श्रीगोविंदस्वामीनीं एक पोथी शास्त्रीबुवांना दिली व या पोथींत तुमच्या मंत्राचें विधान आहे तें लिहून घेऊन मंत्र-जप सुरू करा व उपनिषद्भाष्य रोज वाचीत जा असें सांगितलें. वाडीस असतांना शास्त्रीबुवांना संन्यास घेण्याची इच्छा झाली; पण श्रीमौनी-स्वामींनीं सांगितलें कीं अद्यापि माणगांवला कांहीं दिवस तुमचें राहाणें होणार आहे. इतक्यांत संन्यासाची गडबड नको.

श्रीमौनीस्वामी हे मूळ सोलापूरकडील राहाणारे होते. लहान असतां-नाच घराबाहेर पडून यांनीं सर्व तीर्थयात्रा केल्या. कडू लिंबाचा पाला खाऊन, रस पिऊन बराच काळ काढला. काशीरामेश्वराची यात्रा पाया-नेंच अनेक वेळां केली. पंचविसावे वर्षी संन्यास घेतल्यावर यांचें नांव प्रद्युम्नसरस्वती असें गुरूनीं ठेवलें. बरेच दिवस मौनव्रत धारण केल्या-मुळें मौनीस्वामी असें यांना म्हणूं लागले. हे ब्रह्मनिष्ठ पुरुष नेहमीं बाल-वृत्तीनें राहात. लहान मुलांच्या मध्यें खेळणें, त्यांना खाण्याचे पदार्थ देणें हें यांना आवडत होतें. हे बोलतील तें खरें होत असे. श्रीदत्तमहा-राजसुद्धां यांच्या शब्दाला मान देत असत. यांच्याच नेतृत्वाखालीं वाडी येथील प्रसिद्ध अग्निहोत्री भारताचार्य रामभाऊ कवीश्वर यांचा महान् यज्ञ निर्विघ्न पार पडला. आमच्या चरित्रनायकावर श्रीमौनीस्वामींचें मोठें प्रेम होतें.

वाडीस असतांना वासुदेवशास्त्रींना, आपण सात वर्षे माणगांवांत राहाणार आहोंत असें देवांचें सांगणें झालें. त्यामुळें संन्यासाचा बेत रहित करून वासुदेवशास्त्री पुढील व्यवस्थेकरितां माणगांवीं येण्यास निघाले. वाटेंत कोल्हापुरांत महालक्ष्मीचें दर्शन करून एक दत्तमूर्ति घेऊन माणगांवीं जावें असें त्यांना वाटलें. पण पैशाची सोय कांहींच नसल्यानें तो विचार मनांतल्या मनांतच राहिला. येतांना कागल या

गांवांतून सहज बाजारपेठेंतून निघाले असतां एका मूर्तिकाराचे दुकानाकडे सहज यांची नजर गेली. तेव्हां तो मूर्तिकार बाहेर येऊन म्हणाला, 'तुम्हांला मूर्ति पाहिजे असल्यास ती कशी पाहिजे तेवढें मला सांगा. मी त्याप्रमाणें तुम्हाला मूर्ति बनवून देईन. पैशाची काळजी करूं नका. त्याचें पाहातां येईल.' असें त्या मूर्तिकाराचें भाषण ऐकून मूर्ति कशी असावी याबद्दल शास्त्रीबुवांनीं त्याला सर्व माहिती सांगितली व त्याच गांवीं मूर्ति घेऊन जाण्याकरितां शास्त्रीबुवांनीं आठ दिवस मुक्काम केला. त्या अवधींत मूर्तिकारानें सुंदर मूर्ति तयार करून ती अत्यंत आदरानें समर्पण केली. शास्त्रीबुवांनीं आपणांजवळ असलेला एक रुपया त्याला दिला. त्याच वेळीं तेथें जमलेल्या कांहीं कारकून मंडळींनीं आपापसांत वर्गणी करून २०।२९ रुपये लगेच त्या ओताऱ्यास देऊनही टाकले. त्या मूर्तिकारास यांना मूर्ति देणेविषयीं दृष्टांत झाल्यामुळें तो यांच्याच तपासांत होता. ती मूर्ति सात बोटें उंचीची, द्विभुज, वराभयकर, सिद्धासन घातलेली अशी पितळेचीच केली होती.

मूर्ति घेऊन शास्त्रीबुवा माणगांवीं आले. जेव्हां घराच्या पश्चिम बाजूस थोड्या अंतरावर असलेल्या जागेवर ते आले तेव्हां त्या जागेंत मूर्तीची स्थापना करावी अशी सहज त्यांच्या मनांत वृत्ति उत्पन्न झाली. पण ती जागा दुसऱ्याची असल्यामुळें तो विचार मनांतच ठेवून शास्त्रीबुवा मूर्ति घेऊन घरीं आले व घरांतच एक निराळी जागा करून तेथें ती मूर्ति ठेवली. मातोश्रींची इच्छा घरांतच त्या मूर्तीची स्थापना करावी अशी होती. पण ती शास्त्रीबुवांना मान्य झाली नाहीं. देवालाच आपल्या भक्ताचें माहात्म्य वाढविणेचें होतें त्यामुळें शास्त्रीबुवांच्या मनाप्रमाणें सर्व गोष्टी जमून येऊं लागल्या. माणगांवाजवळ एक लहानशी वाडी होती. तेथील मालक निव-

ल्यानंतर त्याची पत्नी सर्व व्यवहार पाहूं लागली. एके दिवशीं रात्रीं ब्राह्मणाला जमीन दान देण्याबद्दल स्वप्न झालें. ती दुसरे दिवशीं वासुदेवशास्त्रींचे घरीं येऊन रमाबाईंना या स्वप्नाचा अर्थ विचारूं लागली. तेव्हां त्यांनीं त्या बाईस सांगितलें कीं, 'आमच्या वासुदेवास दत्तमूर्तीची स्थापना करण्यास जागा पाहिजे तरी ती पश्चिमेकडची तुमची जमीन याकरितां द्या' असें रमाबाईनीं सांगतांच ती जमीन त्या बाईनें देवाकरितां देऊन टाकली. तेथें आसपास असलेली २।३ खंडीची जमीनही नंतर त्या बाईनें देवास दिली.

याप्रमाणें न मागतां ईशेच्छेनें देवळाकरितां जमीन मिळाल्याबरोबर देऊळ बांधण्यास आरंभ केला. कोणी लाकडें, कोणी दगड विटा, कोणी पैसे याप्रमाणें मदत मिळून काम सुरूं झालें. अवघ्या सात दिवसांत देवळाचें काम पुरें झालें. देवाच्या सांगण्याप्रमाणें देवळासमोर विहीर खोदून तीही तीन दिवसांत बांधून काढली. देवळाचें तोंड पूर्वेकडे होतें. पुढें मोकळी पडवी, मागें एक लहान खोली व मधल्या खणांत ३।४ हाताचें लांब रुंद असें देवाचें गर्भगृह शास्त्रीबुवांनीं स्वतः आपल्या हातानें विटा तयार करून बांधून काढलें. मागच्या खोलींत स्मार्ताग्नि असून स्वयंपाकगृह होतें.

याप्रमाणें देऊळ बांधून झाल्यावर त्यांत कागलहून आणलेल्या श्रीदत्तमूर्तीची स्थापना शके १८०९ वैशाख शुक्ल पंचमी या दिवशीं केली. श्रीदत्तमहाराजांनीं वाडी मुक्कामीं शास्त्रीबुवांना सांगितल्याप्रमाणें त्या दिवसापासून माणगांवीं राहाणें केलें; त्यामुळें त्या स्थानाची पुढें फारच भरभराट झाली. मूर्तिस्थापना झाल्यापासून वासुदेवशास्त्रीनीं पूर्वीपेक्षांही अधिक नियमपूर्वक अनुष्ठान नित्य चालूं ठेवलें. तेथील सर्व मंडळी त्यांना बुवा या नांवानेंच संबोधूं लागली. यापुढें बुवांनीं देवळा-

तच वास केला. दुपारीं देवास नैवेद्य समर्पण करून जेवणापुरते घरीं जात. भोजनांतील सर्व पदार्थ एकत्र करून खाण्याची त्यांची पद्धति होती. पहिला गुरुद्वादशीचा उत्सव माणगांवीं झाल्यावर बुवांनीं तेंही घरीं जाणें बंद केलें. रोज सकाळीं कोरडी भिक्षा मागून आणावी. त्याचाच पाक करून नैवेद्य वैश्वदेव करावा. गोग्रास व अतिथी यांचे-साठीं अन्नविभाग करून राहिलेल्या भागांत आपण भोजन करीत. देवळांत कोणी अतिथी येऊन उतरला असल्यास भिक्षेहून आल्यावर भिक्षेंतील धान्य त्या अतिथीस प्रथम देऊन मग राहिलेल्या भागाचा उपयोग बुवा करीत असत. रोज लागणारें जळण भिक्षेहून येतां येतां त्यांनीं स्वतःच गोळा करून आणावें. 'स्वयंदासास्तपस्विनः' ही वृत्ति त्यांनीं नित्य ठेवली होती.

प्रत्येक शनिवारीं फार मोठा समारंभ होत असे. सायंकाळीं धूप झाल्यावर पुष्कळ आरत्या म्हटल्या जात. नंतर पालखींत उत्सवमूर्ति ठेवून देवळाभोवतीं तीन प्रदक्षिणा होत असत. त्या वेळीं चार पांच हजारपर्यंत समाज जमत असे. तीन प्रदक्षिणा पूर्ण होण्यास ६।७ तास लागत असत. पालखीचे वेळीं अनेक स्तोत्रें, पदें इत्यादि म्हटलीं जात. एकंदरींत तो देखावा अत्यंत प्रेक्षणीय, चित्ताकर्षक असा दिसत असे. देवापुढें भक्तगणांनीं पेढे, बर्फी, खारका, नारळ, उदबत्ति, कापूर इत्यादि पदार्थ इतके आणून ठेवावेत कीं त्यांचा पर्वतप्राय ढीग पडावा. पालखी संपल्यावर आलेले पदार्थ प्रसाद म्हणून सर्वांना वाटण्याची पद्धति होती. कांहीं धान्य वगैरे विशेष जमल्यास त्या मानानें भंडाराही करीत असत. सावंतवाडीचे रामभाऊ सबनीसांचेकडे ही सर्व व्यवस्था करण्याचें काम होतें. पूजा-अर्चादि नित्य नियमाव्यतिरिक्त अन्य कोणत्याही व्यावहारिक बाबीकडे बुवांचें लक्ष नसे. अनासक्त रीतीनें बुवांचे [redacted] नित्य

चालूं होते. सबनीसांनीं एकदा बुवांना नेसण्याकरितां धोतरें दिलीं. पण बुवांनीं तीं धोतरें उभीं व आडवीं फाडून पंचाप्रमाणें त्यांचा उपयोग केला. ग्रामदेवता श्रीयक्षिणीची पालखी प्रथम देवळाजवळ येई आणि नंतर श्रीदत्तमहाराजांची पालखी निघे. यक्षिणीची पालखी श्रीदत्तमंदिराकडे आणण्याबद्दल प्रथम देवीच्या व्यवस्थापकांचा विरोध होता. पण बुवांनीं जाऊन देवीची प्रार्थना केली; त्यानंतर देवीचा दृष्टांत पालखी नेण्याबद्दल व्यवस्थापकांना झाल्यामुळें नियमानें पालखी येऊं लागली. पालखी-बरोबर काठी घेणारे, चवरी मोर्चल धरणारे, पदें म्हणणारे अशी नित्याची १०।१९ मंडळी असत. शिवाय इतर लोकांचा समाजही फार मोठा जमत असे.

रामभाऊ सबनीस हे सावंतवाडीस सरकारी अधिकारी होते. त्यांच्या घरची पिशाचबाधा बुवांच्या कृपेनें दूर झाल्यापासून त्यांची बुवांचेवर विशेष श्रद्धा बसली. ते स्वत: देवस्थानची व्यवस्था पाहात असल्यानें कोणतीच अडचण पडत नसे. एकदा सबनीसांच्यावर कांहीं आरोप येऊन त्यांना कामावरून काढून टाकलें. त्यांनीं येऊन बुवांना आपलें संकट सांगितल्यावर 'तुम्ही योगिनी मंत्राचा जप करा. आजपासून ८२ दिवसांनीं तुमचें काम होईल' असें बुवांनीं सांगितलें. त्याप्रमाणें सबनीसांनींही सर्व निष्ठेनें केल्याबरोबर खरोखर बुवांनीं सांगितलेल्या दिवशींच सबनीसांना परत कामावर घेण्याचा हुकूम झाला. दैवी सामर्थ्य केव्हांही अकुंठित असें आहे.

अशा रीतीनें उत्तम प्रकारें अर्चन चालू असल्यामुळें साहजिक तें स्थान अत्यंत जागृत असें प्रसिद्ध झालें. श्रीदत्तमहाराजांच्या सांगण्याप्रमाणें बुवांनीं येणाऱ्या लोकांना आश्वासन देऊन त्यांचीं कामें होण्याकरितां उपाय सांगावेत. श्रीदत्तांचा बुवांना तसा वरप्रसादच असल्यामुळें

सर्व लोकांच्या कामना पूर्ण होत असत. श्रीदत्तांनीं आपले गण तेथें संरक्षणार्थ ठेवले होते. त्यामुळें कोणीही कसलाही गुन्हा केला असला तरी तो तत्काल धरला जाई.

प्रतिवर्षी गुरुद्वादशीस व दत्तजयंतीस मोठा उत्सव होत असे. त्या वेळीं ८।१० हजारांपर्यंत अन्नसंतर्पण होत असे. श्रीयक्षिणी देवीचे धर्मशाळेंत उत्सवाचे वेळीं स्वयंपाक करीत असत. एखादे वेळीं आचारी न मिळाल्यास गांवांतील मंडळींनीं सर्वांनीं मिळून स्वयंपाक करावा व सर्वांना अन्नदान करावें. असें कार्य अगदीं प्रेमानें व्यवस्थित चाललें होतें. अशा उत्सवाचे वेळीं पालखी पूर्ण होण्यास एखादे वेळीं पहाटही होत असे. समाज इतका जमत असे कीं प्रसाद वाटण्याकरितां तीन चारशें नारळ फोडले तरी प्रसाद पुरत नसे. पालखीचे वेळीं फारच गर्दी होई. पिशाचग्रस्त स्त्रीपुरुष शें दोनशेंपर्यंत आरतीचे वेळीं येऊन आरडाओरडा करीत तेथील खांबाला चिकटून राहात. सर्वांना सारखा प्रसाद वांटण्यांत येई. वांटतांना कोणी पक्षपात केल्यास देवांनीं लगेच बुवांना इषारा देऊन ताबडतोब बंदोबस्त करावा.

देवळांत कागलहून आणलेली मूर्ति ठेवलेली होती. याशिवाय पालखींत बसविण्याकरितां एक उत्सवमूर्ति तयार केली होती. हीच सध्यां माणगांवीं आहे. देवळांतील मूर्ति बुवांनीं जातांना नेली. उत्सवमूर्ति सावंतवाडीस तयार केली. प्रथम ओतण्याचे वेळीं ती मूसच फुटली. नंतर बुवांनीं प्रभूजवळ प्रार्थना करतांच दुसऱ्या वेळीं कांहीं विघ्न न येतां मूर्ति उत्तम तयार झाली. नंतर पालखी, चवरी, मोरचल, काठया इत्यादि सर्व सामान तेथेंच तयार करवून मर्ति वाजत गाजत मोठया समारंभानें माणगांवास आणली. त्या मूर्तीची अर्चा करण्याचें ठरून सर्व वैदिक, शास्त्रीमंडळी ठरलेल्या मुहूर्तावर तेथें येऊन पोंचली. त्या वेळीं सबनीस,

आणावकर इत्यादि मंडळीही सावंतवाडीहून आली होती. सर्व तयारी झाली. आतां आचमन करावयाचें. इतक्यांत आणावकरांचे अंगांत समंध येऊन बोलूं लागला कीं, 'स्वतंत्रपणें या दुसऱ्या मूर्तीचा अर्चाविधि करण्याचें कारण नाहीं. 'अर्चकस्य तपोयोगादर्चनस्यातिशायनात्। आभिरूप्याच्चबिंबानां देवः सान्निध्यमृच्छति।' या शास्त्रवचनाप्रमाणें जेथें अर्चक उत्तम सदाचारसंपन्न असेल, अर्चन यथाशास्त्र उत्तम चालूं असेल व जेथें मूर्तीही यथोक्त सौंदर्यसंपन्न असेल तेथें देवाचा वास निश्चित असतो. करितां पूर्वस्थापित मूर्तीला या नवीन मूर्तीचा स्पर्श नुसता केला कीं पुरे. बाकी कोणताही विधि करण्याचें कारण नाहीं.' असें समंधानें सांगण्याबरोबर बुवांना तें पटलें. इतरही सर्व मंडळींची समजूत बुवांनीं घातली. नंतर तो अर्चाविधि वगैरे न करितां फक्त पूर्व मूर्तीस या मूर्तीचा स्पर्श केला व महापूजा केली. तिसरी एक प्रवासी मूर्ति अगदीं लहान अशी माणगांवांतीलच एका सोनारानें तयार करून दिली होती. देवांचें सांगणें, प्रवासाचे वेळीं पूजेकरितां एक मूर्ति करण्याबद्दल बुवांना झालें. प्रवासांत आपल्याकडून सर्व उपचारांनीं पूजा होऊं शकणार नाहीं असें बुवांनीं देवांस सांगितलें, तेव्हां देव म्हणाले कीं 'मला फक्त स्नान घालून भस्म लावलें म्हणजे पुरे. बाकीचे उपचार नसले तरी चालेल.' असें सांगितल्यावर ती प्रवासी मूर्ति तयार करवून घेतली. याप्रमाणें तीन मूर्ति माणगांवीं होत्या. शिवाय पालखीचे वेळीं डोकीवर घेण्याचा पादुकाजोड व देवळांतील पादुकाजोड असे दोन पादुकाजोडही होते. प्रतिशनवारीं व उत्सवसमयीं उत्सवमूर्तीची महापूजा होत असे. बुवा नरसोबाचेवाडीस गेले असतां त्यांचे बंधु हरीभटजी हे पूजेचें काम करीत असत.

देवाकडे येणाऱ्या उत्पन्नापैकीं विशेष ठोक उत्पन्न नरसोबावाडीचे

देवस्थानकडे रवाना करून किरकोळ उत्पन्नांतून तेथील खर्च भागविला जात असे. ग्रामस्थ मंडळींनीं आपणाला या उत्पन्नांतून भाग मिळाला पाहिजे असा वाद उपस्थित केला. एकदां दत्तजयंतीच्या पारण्या दिवशीं सर्व मंडळी पानावर जेवणास बसल्या वेळीं हट्ट धरून बसली कीं आमच्या म्हणण्याचा विचार झाल्याशिवाय आम्ही जेवणार नाहीं. बुवांनीं तर त्या वेळीं मौन धरलेलें होतें. मोठाच पेचप्रसंग निर्माण झाला होता. पण त्या वेळीं सावंतवाडी संस्थानचे कारभारी वगैरे अधिकारी मंडळी उपस्थित होती; त्यांनीं सर्व मंडळींची समजूत घातल्यामुळें तें प्रकरण तेथेंच संपलें.

श्रीदत्तमहाराजांचेकडून बुवांना त्या त्या वेळीं जसे आदेश होत त्याप्रमाणेंच तेथील कार्यक्रम चालू होते. कांहीं कार्यांत संशय आला कीं देवाजवळ प्रार्थना करावी, लगेच त्याबद्दल उत्तर मिळावयाचें. केव्हां स्वप्नांत, केव्हां जागेपणीं मोठया आकाशवाणीच्या रूपानें असे आदेश अनेक प्रकारांनीं होत व त्याप्रमाणें बुवा वागत असत. सारांश, देवालाच भक्ताची महती वाढविणेकरितां हें कार्य करवून घ्यावयाचें होतें यांत शंका नाहीं. केव्हां केव्हां अणावकरांच्या पिशाच्याकडूनही कांहीं निर्णय होत असे.

बुवांचा नित्याचा कार्यक्रम पुढीलप्रमाणें होता. पहांटे चार वाजतां उठून प्रातःस्मरणपूर्वक योगाभ्यास करावयाचा. नंतर शौचमुखमार्जन, स्नानसंध्या आटोपून श्रीदत्तप्रभूंची पूजा करावयाची. पूजेकरितां फुलें, तुळशी स्वतः तोडून आणलेलीं असत. भूमीवर पडलेलीं, झाडावरून आपोआप पडलेलीं फुलें घ्यावयाचीं नाहींत, असे सर्व निर्बंध पाळले जात होते. आरंभीं महान्यास करून रुद्रैकादशिनी रोज करण्याचा नियम होता. पुढें कामाच्या व्यापामुळें वेळ मिळेना तेव्हां देवानीं रोज एकच

रुद्रावर्तन पुरे असें सांगितलें. पुढें पुढें तर नुसत्या पुरुषसूक्तानें अभिषेक झाला तरी पुरे असें देवांनीं सांगितलें. भक्ताची काळजी देवावांचून कोणास असणार! पूजा झाल्यावर जप वगैरे रोजचें कर्म आटोपून बुवा एकाच घरीं भिक्षेस जात असत. जातांना रजस्वला, अंत्यज दृष्टीस पडल्यास त्या दिवशीं भिक्षा न करतां उपोषण करीत असत. भिक्षेहून आल्यावर स्नान करून मध्यान्हसंध्या, ब्रह्मयज्ञादि आटोपून मर्तीची पूजा करावयाची. मग नैवेद्यवैश्वदेव करून भोजन करावयाचें. मुगाची डाळ व तांदूळ एकत्र करून स्वत: शिजवून तयार करावयाचे. एकानें एक गाय दिली होती. तिचें दूध, तूप घ्यावयाचें. भोजनोत्तर भांडींसुद्धां स्वत:च घासावयाचीं किंवा बुवांचा एक भाचा त्यांच्याकडे शिकण्यास होता तो प्रसंगानें भांडीं घांसीत असे. शिक्षणाकरितां येणाऱ्या विद्यार्थ्यांना दुपारीं शिकवीत असत. देवळापाठीमागें कांहीं फुलझाडें वगैरे लावलीं होतीं. त्यांची मशागत विद्यार्थ्यांच्याकडून करवून घेत. कोणाचे प्रश्न वगैरे सांगण्याचे असल्यास त्याच वेळीं सांगत. पुराणही सांगत असत. संध्याकाळीं स्नानसंध्या झाल्यावर धूप घालून मग आरती होत असे. यावेळीं हौसेनें पुष्कळ आरत्या म्हटल्या जात. नंतर मंत्रपुष्प होऊन शेजारती केल्यावर देवांना पलंगावर निजवीत असत. यानंतर स्वस्थते-प्रमाणें कांहीं ग्रंथवाचन, योगाभ्यास व नंतर निद्रा. निद्रा देवळांतच होती. स्त्रीसंबंध मुळींच नाहीं. कुटुंबांनीं फक्त रोज सकाळीं येऊन सारवून रांगोळी घालून जावें व दुपारीं जेवणाच्या अगोदर देवदर्शन करून तीर्थप्रसाद घेऊन जावें, इतकाच नियम होता. इतर फावल्या वेळांत बुवांचें नामस्मरणही चालू होतें.

माणगांवांतील देवस्थान हें नरसोबावाडीचे देवस्थानांतर्गत आहे, तेथूनच याचा उद्गम आहे अशी बुवांची भावना होती; त्यामुळें तेथील खर्चाकरितां रुपयाच्या आंतील उत्पन्न घेऊन रुपयाच्या वरील उत्पन्न

वार्डीस पाठवीत असत. रात्रीं भजन करतांना बुवा प्रेमभरानें देवापुढें नाचत असत. पूजेंत सर्व उपचार व्यवस्थित समर्पण करावयाचे, त्यांत थोडीसुद्धां हयगय होऊं द्यावयाची नाहीं. एकदा रोज नवें जानवें तयार करून देवाला समर्पण करण्याचें ठरवून तो नियम एक वर्षपर्यंत अविच्छिन्न चालविला. देवाच्या परिवारांत २९।३० कुत्रीं व २१४ गाई होत्या. या सर्वांची व्यवस्था एक सेवेकरी करीत असे. गृहस्थाश्रमी माणसांच्या घरांतून जसे सणवार केले जातात तसे देवळांत चैत्री पाडव्यापासून सर्व सण केले जात होते. बायकांनाही त्यांच्या सणाचे वेळीं बोलावून त्यांना हळदीकुंकू देणें, ओट्या भरणें इत्यादि कार्यक्रम बुवा उत्साहानें करवून घेत असत. अत्यंत दक्षतेनें प्रत्येक कार्य पार पडलें पाहिजे अशी बुवांची कडक शिस्त होती.

एकदा गुरुद्वादशीचा उत्सव आला. मंडळी पुष्कळच आलेली होती. त्या गर्दीत देवळाजवळ कांहीं घाण वगैरे झाली त्यामुळें बुवा त्या मंडळींना कांहीं रागानें बोलले. ही गोष्ट देवांना आवडली नाहीं. त्यांनीं बुवांना सांगितलें कीं 'किती बोलतोस? इतकें बोलणें चांगलें नाहीं.' हें देवाचें सांगणें ऐकल्या दिवसापासून बुवांनीं मौन धारण केलें. एक वर्षपर्यंत तें मौन होतें. कांहीं विशेष सांगावयाचें असल्यास पाटीवर लिहून दाखवीत. दुसरे वर्षी गुरुद्वादशीचे वेळीं देवाची प्रार्थना करून मौन सोडलें. देवापुढें नारळ, केळीं वगैरे पदार्थांचे ढीगचे ढीग पडत असत, पण तिकडे कधीं बुवांनीं ढुंकूनही पाहिलें नाहीं. ती सर्व व्यवस्था सबनीस, आणावकर ही मंडळी पाहात होती. घरीं उत्पन्नाची बाब कांहीं नसतांही यत्किंचितही अभिलाषा नसणें हेंच खरें साधुत्व आहे. लोकांचे आग्रहास्तव अंत दत्तमूर्तीपुढें येणाऱ्या उत्पन्नांतून चौथा हिस्सा मात्र घरीं दिला जात असे.

नरसोबाचेवाडीस चैत्र अमावस्येस श्रीनारायणस्वामींचे उत्सवाकरितां आणि गुरुद्वादशी, दत्तजयंती अशा समयीं याप्रमाणें बुवा एक दोन वेळ जात असत. एक वेळ मातोश्रीही बुवांचे बरोबर आल्या होत्या. देवाजवळ धर्मशाळेंत बुवांचा मुक्काम असे. ती धर्मशाळा फार मोडकळीस आली होती. रात्रीं देवानें बुवांच्या मातोश्रींना स्वप्नांत सांगितलें कीं 'ही जागा दुरुस्त करणें आहे तरी तुम्ही ताबडतोब दुसरीकडे राहाण्यास जावें.' मातोश्रींनीं मुलाला तें स्वप्न सांगितलें. आपणांस देवांनीं तसें सांगितलें तर बिऱ्हाड हलवूं असें मातोश्रीस सांगून बुवा स्वस्थ राहिले. नंतर बुवांना पहांटे तसेंच सांगणें झालें. नंतर मात्र बुवांनीं दुसरे दिवशीं सकाळीं स्नानसंध्यादि अनुष्टान व भोजन आटोपल्याबरोबर त्या जागेंतील सामान बाहेर काढलें. बुवा सर्व सामान घेऊन बाहेर येतात न येतात इतक्यांतच ती जागा एकदम पडली. बुवा बाहेर आल्यावर समोर कट्ट्यावर मौनीस्वामी बसले होते त्यांनीं विचारलें 'शास्त्रीबुवा ! सर्व सामान आणलें पण देव कां आणलें नाहींत? ' हें मौनीस्वामींचें म्हणणें ऐकल्याबरोबर देवाचा संपुष्ट आणण्याकरितां बुवा सर्व मंडळींची नजर चुकवून हळूच एका बाजूनें आंत गेले. जेथें संपुष्ट ठेवला होता ती भिंतच शिल्लक राहिली होती. संपुष्ट घेऊन बुवा बाहेर येतांच तीही भिंत खालीं कोसळली.

गुरुद्वादशीसारख्या मोठ्या उत्सवाचे वेळीं माणगांवीं बराच मोठा स्वयंपाक होत असे. त्याकरितां देवळाच्या ईशान्य बाजूस एक मोठी धर्मशाळा कांहीं दिवसांनीं बांधली. त्याचा सर्व खर्च गोमांतकांतील एका गृहस्थानें दिला. उत्सवाकरितां लागणारीं सर्व भांडीं आणवून त्या जागेंत एका खोलींत ठेवलीं होतीं.

देवालयाचे समोर एक औदुंबरवृक्ष निर्माण झाला. तो मोठा झाल्यावर त्याला पार बांधला व त्यावर दत्तपादुका स्थापन

केल्या. रोज तेथेंही पूजा होत असे. याशिवाय लोकांना अभिषेक, पूजा वगैरे जें करणेचें असेल तें सर्व त्या औदुंबरावरील पादुकावर होत असे. आंतील मूर्तीशीं बुवांचे वांचून कोणाचाही संबंध येत नसे.

एक दिवस बुवा औदुंबराचे कट्टयावर पादुकांची पूजा करीतबसले होते. इतरही मंडळी जमली होती. इतक्यांत एक मोठा साप तेथें आलेला पाहून जमलेली मंडळी घाबरून पळूं लागली. त्या वेळीं बुवा म्हणाले, 'अरे पळतां कां? तोही तुमच्यासारखाच देवाचे दर्शनास आला आहे. दर्शन घेऊन जाईल.' हें ऐकून कांहीं मंडळी थांबली. नंतर बुवांनीं त्या सापाला कोणालाही त्रास न देतां सरळ रस्त्यानें निघून जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो साप हळूंहळूं निघून गेला. सर्व भूतांशीं योगी पुरुषांची मैत्री कशी असते याबद्दल हें उदाहरण पाहून लोकांची खात्री झाली.

पहिल्या गुरुद्वादशीच्या उत्सवाचे वेळीं पुरण घातलें होतें. नैवेद्य दाखविण्याचे वेळीं बुवांच्या घशांत घांस आडकल्याप्रमाणें होऊन फार त्रास झाला. सर्व मंडळी घाबरली. देवांची प्रार्थना केल्यावर तो त्रास कमी झाला. नैवेद्याचे वेळीं पुरणपोळ्याकरितां तूप ठेवलें नव्हतें. त्यामुळें हा प्रकार देवांनींच केल्याचें मागाहून लक्षांत आलें.

मराठी गुरुचरित्रावर संस्कृत ग्रंथरचना करावी अशी बुवांना देवांची आज्ञा झाली. त्याप्रमाणें बुवांनीं संस्कृत गुरुचरित्र करण्यास सुरवात केली. ग्रंथ संपल्यावर 'संहितेयं द्विसाहस्त्री' असें देवांनीं सांगितलें. बऱ्याच वेळानें त्या वाक्याचा अभिप्राय लक्षांत येऊन बुवांनीं ग्रंथाची श्लोकसंख्या मोजून पाहिली. पण तितकी दोन हजार श्लोकसंख्या कांहीं भरेना. तेव्हां सप्तशतीप्रमाणें मोजून पहावें असें वाटून तशी गणना केली. कांहीं अर्धश्लोक, उवाच मंत्र, इत्यादि घेऊन पाहिलें तेव्हां ती

संख्या बरोबर भरली. त्यांत कांहीं अशुद्ध राहिल्याचें मागाहून लक्षांत आलें. पण 'तें मला आवडलें आणि अन्य व्याकरणादि दृष्टीनें तें शुद्धच आहे' असें देवांनीं बुवांना सांगितलें. द्विसाहस्री करण्याचें काम चालू असतां नारोपंत डाकिडवे एकदां आले होते. त्यांनीं बुवांना विचारलें कीं— 'हें ग्रंथलेखनाचें काम तुम्ही कसें करूं शकता?' बुवांनीं सांगितलें कीं— 'मी लिहिण्यास बसलों कीं एका कागदावर मला जशीं अक्षरें दिसतात तशीं मी लिहून काढतों. माझा कांहीं संबंध नाहीं.' हा चमत्कार ऐकून सर्वांनाच आश्चर्य वाटलें. साधुपुरुष हे आपणाकडे कोणत्याही लहानमोठ्या कर्माचें कर्तृत्व घेत नाहींत.

एकदां मध्यान्हकालची पूजा होऊन आरती चालू झाली. त्या वेळीं एकाएकीं तात्कालिक स्फूर्तीनें 'जय मायामय कायत्रयपर यतिवर्या' ही आरती मुखांतून बाहेर पडली. दुपारीं भोजनोत्तर आरतीचें स्मरण होऊन ती हळूंहळूं स्मरण करून लिहून काढली. त्या वेळीं त्या आरतींत चारही महावाक्यांचा अर्थ समाविष्ट झालेला आहे असें दिसून आलें. या प्रकारावरून आर्ष वाणी कशी असते याची कल्पना येऊं शकेल.

योगाभ्यास नित्य चालूंच होता. एकदां त्यांत कांहीं स्खलन झाल्यानें सारखी उचकी लागली. त्या वेळीं दत्तमहाराजांनीं बुवांना सांगितलें कीं—'कापशी गांवांत एक मोजणीदार राहतात. त्यांचे घराजवळ पिंपळाचें झाड आहे. त्यांच्याकडे तुम्ही चला. ते तुम्हांला उचकीचें कारण सांगून त्यावर उपायही सांगतील.' बुवांनीं आज्ञेप्रमाणें त्या गांवीं मोजणीदारांचेकडे जाऊन याबद्दल चौकशी केली. पण त्यांनीं आपणांला योगाची कांहींच माहिती नसल्याचें दर्शविलें. देवांची आज्ञा झाल्यामुळें आपण आलों आहोंत. निर्णय झाल्यावांचून आपण परत जाणार नाहीं असें बुवांनींही त्यांना स्पष्ट सांगितलें, व बुवांनीं

त्या दिवशीं तेथेंच मुक्काम केला. रात्रीं मोजणीदारांना देवांचा दृष्टान्त झाल्यामुळें त्यांनीं आदरानें बुवांना एकान्तस्थानीं नेऊन उपाय समजावून दिला. आणि योगाचें विवरण ज्यांत लिहिलें आहे असें कबीरधर्मदाससंवादात्मक हिंदी पुस्तकही बुवांना दिलें. त्या पुस्तकाचा अडचणीचे वेळीं बुवांना उपयोग होऊं लागला. खेचरीचा अभ्यास चालू असतां जिभेचा शिराबंध तुटण्याकरितां श्रीदत्तांनींच एक वनस्पति बुवांना दाखविली. त्यामुळें ती शिर तुटून खेचरी लवकर सिद्ध झाली. साक्षात् परमेश्वरच नित्य पाठिराखा असल्यावर अशक्य काय असणार? योगाभ्यासांच्या प्रभावानें त्यांना सिद्धि वश झाल्या. कोणीही मनुष्य कामाकरितां जवळ येतांच तूं अमुक कामाकरितां आला आहेस असें बुवांनीं अगोदरच ओळखून सांगावें. तें पाहून लोकांना आश्चर्य वाटे. कांहीं कांहीं लोकांना तर बुवांनीं अलीकडे कर्णपिशाच साधन तर केलें नाहींना अशी शंका येऊं लागली. एक वर्षभर असा प्रकार चालला होता. पण पुढें देवांनीं 'हा बाजार काय मांडला आहेस? पुरे कर.' असें सांगतांच तत्काल तें सर्व बंद केलें. पुढें सिद्धीकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं.

प्रारब्धाप्रमाणें येणारीं सुखदुःखें मुकाट्यानें सहन करावयाचीं. भोगूनच प्रारब्धभोग संपवावयाचा. त्याचा प्रतिकार कांहीं करावयाचा नाहीं, अशी बुवांची प्रथमपासूनच वृत्ति होती. आजारी पडले तरी औषध घ्यावयाचें नाहीं असा त्यांचा नियम होता. एकदां त्यांना ज्वराचा उपसर्ग बरेच दिवस चालू राहिला. त्या वेळीं बुवांचे श्वशुर बाबाजीपंत गोडे यांनीं कांहीं औषध सावंतवाडीहून मुद्दाम बुवांचेकरितां आणलें व हें औषध दवाखान्यांतील नसून वैद्याकडील चांगलें शुद्ध असें आहे, तुम्ही अवश्य घ्या म्हणून औषध घेण्याचा आग्रह बुवांना केला. इच्छा नसतांही नाइलाजानें तें औषध बुवांनीं घेतलें. मात्र लगेच जोराची उलटी होऊन बुवा निश्चेष्ट होऊन पडले. सर्व मंडळी घाबरली. तेव्हां

बाबाजीपंत घाबरले व आपण खोटें सांगितल्याबद्दल त्यांनीं देवांची क्षमा मागितली. तेव्हां बुवांना बरें वाटून ते उठून बसले व स्नान करून पंचगव्य घेऊन पवमानाच्या आवृत्त्या प्रायश्चित्त म्हणून केल्या.

देवालयांत फारच पवित्रपणानें वागावें लागे. या विरुद्ध कोणीही वागल्यास त्याचें प्रायश्चित्त लगेच मिळे. एके दिवशीं पूजा झाल्यावर 'सूत सूत काढून टाक' असा आवाज झाला. बुवांच्या लक्षांत कांहीं त्याचा अर्थ त्या दिवशीं आला नाहीं. दुसरे दिवशीं सकाळीं निर्माल्य काढीत असतां एका फुलाला सूत गुंतलेलें दिसून आलें. नंतर सर्व प्रकार लक्षांत येऊन प्रासादशुद्धि केली. रत्नागिरीच्या एका ब्राह्मणाची बहीण पिशाचपीडा असल्यामुळें माणगांवीं सेवेस येऊन राहिली होती. ती एके दिवशीं देवळांत प्रदक्षिणा घालीत असतांनाच अस्पर्श झाली. त्यामुळें साप, विंचू वगैरे देवळांत सर्वत्र निघूं लागले. याप्रमाणें दोन चार दिवस त्रास झाला. पुढें स्थानशुद्धीकरितां उदकशांति केली, त्यावेळीं सर्व शांतता झाली.

देवांपुढें असलेल्या औदुंबराला कोणींही शिवूं नये असें देवांचें सांगणें होतें. फक्त ब्राह्मण मंडळी सोंवळयानें पूजा करीत असत. एकदां चुकून एक मराठयाचा मुलगा त्या वृक्षाला शिवल्याबरोबर त्याला साप चावून तो बेशुद्ध पडला. त्या वेळीं बुवा तेथें नव्हते. ते आल्यावर ही गोष्ट त्यांचे कानावर जातांच त्या मुलाच्या पालकांना देवाची क्षमा मागावयास सांगितलें, तेव्हां तो मुलगा लगेच सावध झाला.

एकदां दत्तजयंतीच्या उत्सव समयीं बुवांच्या दशाहांतील एक आप्त बाई आजारी होती. तिच्या भेटीस सीतारामभटजी गेले होते. त्या बाईला देवाज्ञा झाली. आपण अशौचांत. परत गांवीं गेल्यास दत्तजयंतीचा उत्सव बंद पडेल असें सीतारामभटजींना वाटून ते गांवीं परत न जातां

तेथेंच राहिले. ही बातमीही त्यांनीं माणगांवीं कळविली नाहीं. दुसरे दिवशीं बुवा देवपूजेकरितां देवाजवळ गेल्याबरोबर ‘ शिवाशिव ’ असा आवाज झाला. बुवांनीं बाहेर जाऊन पुनः येणें केलें. पूजेकरितां आले पण पुनः तोच शब्द ऐकूं आला. बुवांना कांहींच कल्पना येईना. देवांना स्पष्ट खुलासा त्यांनीं विचारतांच ‘ तुम्हांला अशौच आल्यामुळें पूजा बंद ’ असें देवांनीं सांगितलें. त्यामुळें तो उत्सव राहिला. पुढें तपास करतां कारण समजून आलें.

माणगांवीं पहिल्या गुरुद्वादशीची गोष्ट. ठिकठिकाणची हजारों मंडळी प्रसादाकरितां जमली आहेत, अशा ऐन वेळीं पाऊस थोडा थोडा पडूं लागला. सर्व मंडळींनीं हें पावसाचें संकट दूर करण्याबद्दल बुवांना विनंति केली. बुवांनीं सांगितलें, ‘ तुमच्याप्रमाणें तोही प्रसादाकरितांच आलेला आहे. येईना बिचारा ! बरें तर एक मोठा नैवेद्य वाढून त्याला दाखवा म्हणजे तो जाईल.’ असें सांगून पावसाला मोठा नैवेद्य दाखविला व ‘ सर्वांचे हाल होतील म्हणून पर्जन्यराजा, तूं कांहीं वेळ दूर जा ’ अशी त्याची प्रार्थना केली. त्याबरोबर त्या जागेंत पाऊस बंद झाला. आसपास पुष्कळ पाऊस पडला, पण तेथें उत्सवांतील कार्यक्रम संपेपर्यंत एक थेंबसुद्धां पावसाचा पडला नाहीं.

सावंतवाडीस एक पोलीस अधिकारी होते. त्यांचें येणें जाणें बुवांचे कडे होतें. कागलच्या श्रीदत्तमूर्तीला एखादा दागिना करावा असें त्यांना वाटलें. पण त्या वेळीं त्यांचेकडे पैसे नव्हते. त्यांनीं खर्च किती येईल वगैरे सर्व चौकशी करून ठेवली होती. पुढें कांहीं प्रसंगानें त्यांना त्यांच्या दक्षतेबद्दल बक्षीस म्हणून २९ रुपये सरकारकडून मिळाले. ते त्यांनीं आपला पूर्वीचा संकल्प पूर्ण करण्याकरितां म्हणून एका कागदाच्या पुडींत बांधून आपल्या कपाटांत ठेवून दिले. पुढें त्यांना

फिरतीवर जावें लागलें. परत येण्यासही २।३ महिने लागले. त्याच वेळीं बुवांना देवांचें सांगणें झालें कीं, सावंतवाडीचे पोलीस अधिकारी कंटक यांचेकडून २९ रुपये मिळणार आहेत त्या पैशांतून मुकुट करावा. कांहीं दिवसांनीं बुवा सावंतवाडीस गेले असतां त्यांनीं ही हकीकत सबनीसांना सांगितली. कंटक त्या वेळीं फिरतीवरून परत आले होते. त्यांना बोलावून आणून पैशाबद्दल विचारलें. तेव्हां त्या गोष्टीचें त्यांना एकाएकीं स्मरण झालें व दैवीशक्तीचें कौतुकही वाटलें. नंतर त्यांनीं ते २९ रुपये बुवांचेकडे दिले. बुवांनीं लगेच कोल्हापुराहून सोनें आणवून मुकुट तयार करवून देवास घातला.

नारोपंत उकिडवे म्हणून एक ब्राह्मण सावंतवाडीस सरकारी नोकर होते. त्यांची प्रथम देवाधर्मावर श्रद्धा नव्हती. पण आणावकर समेधानें त्यांना आस्तिक बनविलें. तेव्हांपासून ते माणगांवीं जात असत. ते प्रथम अक्कलकोटस्वामीमहाराजांच्या शिष्यांना घेऊन माणगांवीं निघाले होते. त्याचे आदले दिवशीं रात्रीचे वेळीं बुवांना देवांनीं सांगितलें होतें कीं, ‘ उद्यां येथें एक साधुपुरुष येणार आहेत त्यांना पायस द्यावें. ’ दुसरे दिवशीं ते साधु व उकिडवे दर्शनास आले. बुवांचें व त्यांचें थोडें बोलणें होतें न होतें इतक्यांत एका माणसाची गाय रानांतून चुकून देवळाजवळ आली. त्याच वेळीं तिचा मालकही गाय केव्हां सांपडेल असा प्रश्न विचारण्यास बुवांचेकडे आला. तेथेंच त्याला गाय मिळाली व त्यानें लगेच गाईचें दूध काढून बुवांचेकडे आणून दिलें. बुवांनीं तें दूध तापवून व साखर घालून त्या साधूंना दिलें व पूर्व रात्रीं झालेल्या दृष्टान्ताची हकिकतही त्यांना सांगितली. त्यामुळें उकिडवे यांची श्रद्धा वाढून ते शनिवारीं पालखीस नियमानें येऊं लागले. एकदां त्यांना कांहीं कारणामुळें पालखीस जातां आलें नाहीं. पालखीची तयारी

करून मंडळी त्यांची वाट पाहत बसली. पण बुवांनीं सांगितलें, 'आज नारोपंत येणार नाहींत त्यांची वाट पाहूं नका.' मग मंडळींनीं पालखीचें काम आटोपून घेतलें. दुसरे दिवशीं नारोपंतांनीं येऊन बुवांना सांगितलें कीं, 'काल आपणांस एका गृहस्थानें कांहीं अडचण आणल्यामुळें पालखीस येतां आलें नाहीं. म्हणून खेद वाटला.' बुवा म्हणाले, 'हल्लीं त्या वाटेंत वाघाचा त्रास रात्रीं होत असल्यामुळें देवांनींच तुम्हांला प्रतिबंध होण्याची व्यवस्था केली आहे. एकदां नारोपंत उकिडवे यांना इंदूरास कांहीं काम होतें, म्हणून ते देवाच्या आज्ञेची वाट न पाहतां बुवांनाच सांगून तिकडे रवाना झाले. पण वाटेंत बऱ्याच अडचणी उपस्थित होऊन त्यांचे ७।८ दिवस मोडले. आपण देवाची आज्ञा न घेतांच आलों त्यामुळें असा घोटाळा झाला असें वाटून नारोपंत इंदूरला न जातां अर्ध्या रस्त्यां-तूनच परत फिरले व थेट माणगांवास आले. तो दिवस शनिवारचा असल्यानें पालखीची तयारी करून मंडळी नारोपंतांची वाटच पाहत होती. इतक्यांत नारोपंत येऊन पोंचले. त्यांना आश्चर्य वाटून, आपण इंदूरला गेल्याचें तुम्हाला माहीत असतां तुम्ही माझी वाट कां पाहिली असें त्यांनीं मंडळींना विचारलें. मंडळी म्हणाली कीं, 'नारोपंतांना देवाची आज्ञा नसतांना ते इंदूरास गेले. तरी त्यांचें जाणें तिकडे न होतां ते आज पालखीस येतील. थोडी वाट पाहा' असें बुवांनीं आपणांस सांगित-ल्यावरून आपण थांबलों. हें ऐकतांच नारोपंतांना बुवांच्या सामर्थ्या-बद्दल असणारा आदर अधिक वाढला.

नारोपंतांनीं एकदा आपल्या घरच्या गाईचें दूध देवासाठीं आणलें होतें. गर्दी असल्यामुळें आंत न जातां ते बाहेरच एका बाजूस उभे राहिले. नैवेद्याची वेळ येतांच बुवांना सांगणें झालें कीं, 'आज नारो-पंतांचेकडील दूध नैवेद्यास पाहिजे.' बुवांनीं एका इसमास बाहेर चौकशी

करतां पाठविलें असतां खरोखरच त्या दिवशीं दूध घेऊन नारोपंत आले असून ते बाहेरच थांबल्याचें कळलें. नंतर तें दूध देवांना समर्पण केलें गेलें.

बुवांच्या आज्ञेप्रमाणें नारोपंतांनीं देवांना निजण्याकरितां एक लहानसा चंदनाचा पलंग उत्तम तयार करवून माणगांवीं नेला. पलंगाची रचना फारच सुंदर होती. तेथें जमलेल्या मंडळीपैकीं याला खर्च काय आला म्हणून एकानें विचारलें. तेव्हां नारोपंत म्हणाले, ‘ त्याचे पैसे द्यावयाचे नाहींत सबब हिशेब ठेवला नाहीं.’ तें ऐकून बुवांनीं सांगितलें कीं, ‘ या पलंगास तेवीस रुपये बारा आणे खर्च आला आहे. ’ मग नारोपंतांनीं स्मरणपूर्वक सर्व हिशोब करून पाहिला तेव्हां आठ आण्याची तूट येऊं लागली. पुनः विचार करतां सर्व लक्षांत आलें. पलंगावरील कापडाकरितां मुंबईच्या एका स्नेह्यास दोन रुपये दिले होते; त्यानें दीड रुपयाचेंच कापड आणलें व त्याचेकडे आठ आणे शिल्लक राहिले. म्हणजे ते आठ आणेही खर्चींत धरल्यामुळें चोवीस रुपये तीन आणे होत होते. पण आतां चूक लक्षांत आल्यामुळें बुवांनीं सांगितलेला हिशोब बिनचूक असल्याबद्दल सर्वांची खात्री झाली.

पूर्वी घरप्रपंच बुवा पाहात असतां एका व्यापाऱ्याचे एक रुपया अकरा आणे बुवांनीं देणें होतें. तें त्यावेळीं विस्मृतीनें देणेचें राहिलें. पुढें त्या व्यापाऱ्यानें तें सूट म्हणून लिहून जमाखर्च पुरा केला. कांहीं दिवसांनीं बुवा एकदा ध्यानस्थ बसले असतां त्या व्यापाऱ्याच्या चोपडींतील खातेबाकीचा एक रुपया आकरा आणेचा तो आंकडा त्यांचे मनश्चक्षूंसमोर एकाएकीं आला. त्याबरोबर त्यांनीं व्यापाऱ्याकडे चौकशी केली असतां आपण सूट देऊन तें खातें पुरें केलें आहे असें सांगितलें. लगेच आपणास सूट घेणेची इच्छा नाहीं असें बुवांनीं त्याला कळवून एकाकडून तितकी द्रव्याची भिक्षा मागून तें द्रव्य त्याला देऊन टाकलें.

असाच एकदा एक गोसावी बुवांचेकडे येऊन धाबळी तरी द्या नाहीं तर आठ आणे तरी द्या, असा बुवांना आग्रह करूं लागला. बुवांनीं आपणांजवळ दोन्हीहि नसल्याचें सांगितलें. त्या वेळीं तेथेंच प्रदक्षिणा घालणाऱ्या एका बाईनें मी पैसे देतें असें बुवांना सांगून आठ आणे त्या गोसाव्यास दिले व तो गोसावी निघून गेला. कांहीं दिवसांनीं ध्यानाचे वेळीं ‘ आठ आणे कोणाचे नांवावर मांडावयाचे ’ हे शब्द बुवांचे कानावर आले. लगेच बुवांना त्या गोष्टीचें स्मरण झालें व त्यांनीं एकाजवळ आठ आण्याची भिक्षा मागून ते पैसे त्या बाईस पोंचविले. भक्ताला कोणाच्या ऋणांत ठेवण्याची देवाची इच्छा नसते हें खरें.

बुवांच्या कुटुंबास एकदा एका गृहस्थानें घरीं नेऊन एक सौभाग्यालंकार दान दिला. तो अलंकार अंगावर घालून आपली पत्नी देवळांत आलेली पाहून बुवांनीं त्याबद्दल चौकशी केली तेव्हां सर्व समजलें. मग तो अलंकार काढून ठेवून देवळांत यावें असें पत्नीला कळविलें. तिनेंही ती पतीची आज्ञा मान्य करून तो दागिना एका फडक्यांत बांधून घरांत फेंकून दिला व नंतर पूर्वीप्रमाणें लंकेची पार्वती बनून देवदर्शनास आली, तेव्हां कोठें बुवांना समाधान झालें. भक्तश्रेष्ठ नेहमींच पूर्ण निरिच्छ असतात व त्यांच्या सत्संगतीचा इतरांवरही परिणाम झाल्यावांचून राहात नाहीं.

बुवा वारंवार नरसोबावाडीस जात. तेथें रोज सकाळीं दत्तपादुकांना पाणी घालण्याचा त्यांचा नियम कधींच चुकला नाहीं. तें पाहून पुजारी मंडळींनीं एकदां यांचा नियम मोडण्याचें ठरविलें व रोजच्यापेक्षां पहांटेची पूजा लवकर करण्याचा त्यांनीं बेत केला. पण विश्वसाक्षी परमात्म्यापुढें हें लपून कसें राहील ? त्या रात्रीं स्वप्नांत देवांनीं बुवांना सांगितलें ‘ लवकर उठून पाणी घालावें.’ बुवा लवकर उठून गडबडीनें स्नानास

गेले व स्नान करून त्या दिवशीं सर्वांचे आधीं त्यांनीं पाणी घातलें. तेव्हां पुजारी मंडळींना पश्चात्ताप होऊन त्यांनीं खरी हकीकत बुवांना सांगितली. ती ऐकून देवांनीं लवकर उठण्यास कां सांगितलें याचा उलगडा बुवांना झाला.

एकदां नरकचतुर्दशीचे दिवशीं सकाळीं श्रीगोविंदस्वामी, बुवा व शिवराम अष्टेकर म्हणून एक ब्राह्मण असे तिघेजण शौचाकरितां बाहेर पडले. रस्त्यांत पुजाऱ्यांच्या मुलांनीं त्यांना गांठून प्रसाद घेण्यास सांगितलें. स्वामी म्हणाले, 'आम्ही शौचास निघालों आहोंत. तूर्त तुमचा प्रसाद मठांत ठेवा. नंतर आम्ही घेऊं.' मुलेंही हट्टाला पेटून म्हणालीं, 'आतां घेत असाल तर प्रसाद देतों, मठांत कांहीं आम्ही ठेवणार नाहीं.' शेवटीं मुलांचा आग्रह पाहून स्वामींनीं विचार केला कीं आज या मुलांच्या रूपानें देवच आपली परीक्षा पाहात आहेत. कांहीं हरकत नाहीं. शेवटीं त्यांनीं व बुवांनीं मुलांकडून फळाचा प्रसाद मागून घेऊन तो लगेच खाऊन टाकला. अष्टेकरानें मात्र प्रसाद न घेतल्यामुळें तो तापानें भयंकर आजारी पडला. नंतर त्याच्या बायकोस दृष्टांत झाल्याप्रमाणें तिनें देवाजवळ क्षमा मागून लघुरुद्र केल्यावर तो बरा झाला. देवाच्या प्रसादाविषयीं कशी भावना असली पाहिजे याबद्दल ही कथा मार्गदर्शक ठरेल.

माणगांवीं सर्व कार्यक्रम व्यवस्थित चालू होता. त्यांत कधींही चूक होत नसे. एकदां बरेच श्रम झाले होते म्हणून बुवांनीं नित्यक्रम थोडक्यांत पुरा करून ते निजण्यास गेले. त्या वेळीं त्यांना एक विंचू चावल्यामुळें रात्रभर झोप मिळाली नाही. त्या वेळेपासून त्यांनीं आपल्या नित्यक्रमांत कधींही खंड पडूं दिला नाहीं.

नारोपंतांनीं एकदा चांगले आंबे मुंबईहून आणवून देवास दिले. त्याचा नैवेद्य दाखवीत असतांना हे आंबट आंबे आहेत असें देवांचें

सांगणें झालें. नारोपंतांना बुवांनीं तें सांगतांच नारोपंतांना प्रथम तें पटेना. पण आंबे स्वतः खाऊन पाहातांच खरोखरच ते आंबट निघाले. तें पाहून त्यांना खेद वाटला.

सावंतवाडीस एक ब्राह्मण क्षयरोगानें पीडित झाला होता. औषधोपचार बराच केला. मग एका सद्गृहस्थांच्या सांगण्यावरून त्या ब्राह्मणानें नियमानें गुरुचरित्रवाचन सुरू केलें. त्यामुळें हळूहळू त्याचीं प्रकृति चांगलीच सुधारली. पुढें तो ब्राह्मण वेदान्तविषयाचें श्रवण करूं लागला. पण अधिकार नसल्यामुळें त्या श्रवणाचा त्याच्यावर विपरीत परिणाम झाला. त्याची कर्मावर अश्रद्धा उत्पन्न होऊन त्यानें सर्व आचारधर्म टाकला, त्यामुळें त्याला पुनः पूर्ववत् क्षयरोगाचा त्रास होऊं लागला. तो यावर कांहीं उपाय विचारण्याकरितां माणगांवीं बुवांचेकडे आला असतां बुवांनीं त्याची निर्भर्त्सना करून सांगितलें कीं, 'तुम्ही ब्राह्मण जातींत जन्माला येऊन आपली स्नानसंध्यादि नित्यकर्में टाकलीं त्याचा हा परिणाम आहे. वेदान्ताचा अभ्यास केला तरी यावज्जीव ईश्वर व गुरु यांची सेवा केलीच पाहिजे. त्यांना कधींही सोडतां यावयाचें नाहीं. तुम्ही तर वेदान्ताच्या पाठीमागें लागून सर्वच टाकलें आहे. त्यामुळें तुमच्यावर देवांची अवकृपा झाली आहे. आतां तुम्ही तुम्हांला वेदान्त सांगणाऱ्या गुरूकडे जाऊन निरोगी व्हा ' असें बुवांचें भाषण ऐकून तो ब्राह्मण खिन्नपणानें निघून गेला व पुढें कांहीं दिवसांनीं मरण पावला.

नरसोबावाडी येथील एक शास्त्री माणगांवास आले व त्यांनीं बुवांचेबरोबर तुम्ही योगाभ्यास कशाला करतां ? याचा उपयोग काय ? व याला आधार काय ? इत्यादि शंका काढून वादविवादास आरंभ केला. यावर बुवांनीं 'आपला कांहीं शास्त्राभ्यास नाहीं म्हणून आपण वाद-

विवाद करूं शकत नाहीं' असें त्यांना उत्तर देऊन आपण आपल्या नित्यकर्मीत निमग्न झाले. पुढें त्या शास्त्रीबुवांना मोठा अभिमान झाला. ते तेथून निघून दुसऱ्या एका गांवीं गेले व तेथील एका धर्मशाळेंत उतरले. श्रीदत्तमहाराजांनीं ब्रह्मचारीवेष धारण केला व ते शास्त्रीबुवा जेथें उतरले होते त्या धर्मशाळेंत येऊन त्यांना त्यांनीं योगाची आवश्यकता अनेक ग्रंथांचे आधार दाखवून सयुक्तिक पटवून दिली. त्यामुळें त्यांना अत्यंत समाधान होऊन ते पुनः माणगांवीं त्या ब्रह्मचाऱ्याची चौकशी करण्याकरितां म्हणून परत आले व त्यांनीं सर्व हकिकत बुवांना सांगितली. बुवांनीं शास्त्रीबुवांना लगेच सांगितलें कीं, 'अहो! ते प्रत्यक्ष दत्तमहाराज होते. तुम्ही त्यांचे पाय धरण्याचे विसरलां.' हें ऐकून त्या वाडीकर शास्त्रीबुवांना फार वाईट वाटलें.

माणगांवास असलेल्या नदीचें नांव निर्मला असें आहे. तें नांव बुवांनींच ठेवलेलें आहे. त्याची हकीकत अशी आहे—बुवा एकदां नरसोबावाडीला गेले होते. तेथून परत येत असतां या नदीवर जेव्हां आले तेव्हां तेथें एक दिव्य स्त्री प्रगट होऊन तिनें बुवांना सांगितलें कीं, 'आतां तुम्ही माझें नामाभिधान केल्यावांचून पुढें जाऊं नका.' बुवांनीं थोडा विचार करून तिला सांगितलें, 'तुझें नांव आम्ही निर्मला असें ठेवलें आहे.' असें तिला सांगून त्यांनीं नमस्कार केला. तीही स्त्री अदृश्य झाली. इतक्यांत त्यांना आणण्याकरितां गांवची बरीच मंडळी भजन करीत सामोरी आली. बुवांनीं नदीचें नांव निर्मला असें ठेवल्याचें सर्वांना सांगून ते सर्वांबरोबर गांवांत आले.

माणगांवीं राहाणारे शंकरभटजी साधले नांवाचे एक गृहस्थ एकाएकीं घर सोडून निघून गेले. तीन चार वर्षें झालीं; पुष्कळ शोध केला तरी त्यांचा पत्ता लागला नाहीं. त्यांच्या आईनें बुवांना त्यांच्याबद्दल विचारलें, तेव्हां त्यांनीं त्यांच्या कुटुंबानें अश्वत्थाला एक लक्ष प्रदक्षिणा

घालाव्या म्हणजे तो परत येईल असें सांगितलें. शंकरभटजीच्या आईनें सुनेकडून अश्वत्थ प्रदक्षिणेचा नियम पार पाडल्याबरोबर तिचा मुलगा आपोआप घरीं परत आला.

जवळच एका गांवीं एका ब्राह्मणाचे घरीं पिशाच्चपीडा फार होऊं लागली. तो बुवांना शरण आला. तेव्हां बुवा म्हणाले, ' तुम्ही घरांत नियमानें नैवेद्य वैश्वदेव करीत चला व विष्णुसहस्रनामाच्या १२०० आवृत्ति करा. ' असें सांगून कांहीं स्वतंत्र मंत्रजपही त्यांना सांगितला. तें अनुष्ठान त्या ब्राह्मणानें सुरू करतांच ती पीडा थांबली. पण पुढें कांहीं दिवसांनीं तो नियम सुटल्याबरोबर पूर्ववत् त्रास होऊं लागला.

एका ब्राह्मणाची पहिली बायको वारली, दुसरा संबंध करण्याचें ठरलें. जी मुलगी पाहिली तिचें टिपण नसल्याचें तिच्या बापानें सांगितलें. शेवटीं लग्नाचें ठरलें. मुलाची आई बुवांचेकडे येऊन तिनें पुनः मुलाचें लग्न ठरल्याचें बुवांना सांगितलें. बुवा म्हणाले, 'त्या मुलीस मंगळ आहे. पण आतां निश्चय झाल्यामुळें आपण त्यावर उपाय सांगतों तो करा म्हणजे दोषाचा परिहार होईल. एक तांबडा बैल दान करून मंगळाचा जप करा व ब्राह्मणसुवासिनी भोजन घालून सांगता करा,' असें सांगून दानाचा व जपाचा संकल्पपूर्वक विधि लिहून दिला. त्यांनींही श्रद्धेनें तें सर्व करून नंतर लग्न केलें. त्यामुळें त्यांचा प्रपंच पुढें उत्तम प्रकारें चालला.

आत्मारामपंत साबले यांनीं माणगांवांत दुसरें एक दत्तमंदिर स्पर्धेनें बांधलें होतें. ते तेथीलच राहाणारे होते. त्यांच्या सुनेचा प्रसूतिकाळ जवळ येऊन तिला अत्यंत त्रास होऊं लागला. तेव्हां ते बुवांचेकडे येऊन त्यांनीं बुवांना आपल्या घरीं येऊन कांहींतरी उपाय करण्याबद्दल फार विनवून सांगितलें. शेवटीं बुवा आपलें अनुष्ठान आटोपून त्यांचे

घरीं जाण्यास निघाले. अर्ध्या रस्त्यांत येतांच त्यांना देवांनीं सांगितलें कीं, 'मागें फिरा, आतां पुढें जाण्याचा उपयोग होणार नाहीं.' बुवांनीं लगेच साधले यांना सांगितलें कीं, 'तुम्ही घरीं जा, आपण येऊन कार्य होण्यासारखें नसल्यानें आपण येत नाहीं,' असें सांगून बुवा परतले. साधले घरीं येऊन पोंचण्यापूर्वीच सुनेचें प्राणोत्क्रमण झालें होतें.

माणगांवचे दत्तमंदिरांत प्रसंगानें इतर गांवची वैदिक मंडळी येऊन म्हणणें करीत असत. पण सर्वांनीं मिळूनच म्हणावें, चर्चा रूपानें नको; कारण त्यामुळें मत्सर, द्वेष इत्यादि विकार होण्याचा संभव असल्याचें बुवांनीं सांगावें. याकरितां सर्वांनीं मिळूनच म्हणण्याचा प्रघात तेथें होता. अशाच एका प्रसंगीं बुवांनीं नारोपंत उकिडवे यांना पुरुषसूक्ताचा सविस्तर अर्थ सांगितला. त्यामुळें त्यांना विस्मय वाटून त्यांनीं बुवांना विचारलें, 'बुवा! या आपल्या प्रांतांत वेदार्थ सांगणारी मंडळी प्रायः दुर्मिळ! तुम्हीही कोठें बाहेर पडला नाहीं; तर तुम्हांला वेदाचा अर्थ कसा समजतो?' बुवा म्हणाले, 'आपण एकदां नरसोबावाडीहून इकडे येतांना एका गांवीं मुक्काम केला. तेथें एक स्वामीमहाराज पूजा करीत होते. शेवटीं मंत्रपुष्प झाल्यावर आपण एक संहितेचा अध्याय म्हटला. तें म्हणणें त्यांना आवडलें. नंतर स्वामींनीं आपणांस विचारलें कीं, 'तुम्हीं वेदार्थ समजण्याविषयीं कांहीं अभ्यास केला आहे काय, नसल्यास आपण ती दिशा दाखवून देऊं.' असें त्या स्वामीमहाराजांनीं सांगितलें तें कबूल करून आपण तेथें मुक्काम केला. तेव्हां स्वामीमहाराजांनीं संहितेंतील पहिल्या तीन अध्यायांचा अर्थ वैदिक पद्धतीस अनुसरून उत्तम प्रकारें सांगितला. आणि तेवढ्या दिग्दर्शनावरून वेदांतील कोणताही भाग आपणांस समजूं लागला.' ही हकीकत त्या दिवशीं बुवांनीं नारोपंत उकिडवे यांना सांगितली. निष्ठापूर्वक सदाचाररत

सद्भक्ताला ईश्वर कोणत्याही रूपानें भेटून घरबसल्या दिव्य ज्ञान देऊन कृतार्थ करतो असें या उदाहरणानें दिसतें.

एकदां देवाचे नैवेद्याकरितां मोठ्या भांड्यांत केळयाची शिकरण केली होती. बुवा नैवेद्य दाखवूं लागले असतां देव म्हणाले कीं 'यांत नरोटीचा तुकडा पडलेला आहे तो काढून नैवेद्य दाखवावा.' बुवांनीं तें पात्र बाहेर आणून तुकडा काढून टाकण्यास मंडळींना सांगितलें. मंडळींनीं पुष्कळ शोध केला आणि यांत कांहीं पडलें नाहीं असें बुवांना सांगितलें. बुवा म्हणाले 'देवाची स्पष्ट आज्ञा झाली आहे, पुनः चांगलें पाहा.' नंतर मंडळींनीं ती शिकरण दुसऱ्या पात्रांत हळूहळू ओतून पाहण्याचे वेळीं तो तुकडा मिळाला. असे चमत्कार सहज घडून येत होते.

बुवांच्या मातोश्रींनीं एकदां महाशिवरात्रीकरितां गोकर्णास जाण्याचें ठरविलें. यात्रेच्या वेळीं कोणीतरी मुलगा बरोबर पाहिजे म्हणून तिनें इतर मुलांना विचारलें, पण त्यांनीं नकार दिला. शेवटीं बुवा आपलें खात्रीनें ऐकतील अशा मोठया आशेनें बुवांना आपल्याबरोबर यात्रेस येण्यास सांगितलें. पण 'देवाची परवानगी झाल्याशिवाय आपण ही जागा सोडून कोठेंही जाऊं शकत नाहीं.' असें बुवांनीं सांगतांच ती बिचारी निराश झाली. इतकीं मुलें असून एकाही मुलाचा उपयोग आपणांस नाहीं हें पाहून तिला फार वाईट वाटलें. मातोश्रींची उद्विग्नता पाहून तिच्या समाधानाकरितां आपण बरोबर येतों, तयारी करा, असें त्यांनीं मातोश्रींना सांगितलें. तें ऐकून अत्यंत आनंद वाटून त्यांनीं निघण्याची तयारी केली. प्रथम सावंतवाडीला जाण्यास मंडळी निघाली. जातां जातां बुवांच्या पायास एकाएकीं फुरसें चावलें. संध्याकाळची वेळ होती; कांहीं समजलें नाहीं. बुवांनीं पाय झटकला व कोणासही न सांगतां ते वाट चालूं लागले. सावंतवाडीस येऊन उकिडवे यांचे दत्तमंदिरांत मुक्काम केला. देवाचें तीर्थ तसेंच पात्रांत ठेवून देण्यास बुवांनीं नारो-

ंतांना सांगितलें. पुढें लवकरच पायाला बरीच सूज आली. वेषही फार चढून कळा फार येऊं लागल्या. तेव्हां देवाचें तीर्थ या फुरसें चावलेल्या जागीं घालण्यास बुवांनीं सुरुवात केली. र्थे असलेल्या एका इसमानें हें बुवांचें कृत्य पाहून तत्काल नारो-ंतांचे घरीं जाऊन हें वर्तमान त्यांना सांगितलें. नारोपंत ताबडतोब ंदिरांत आले. चौकशीअंतीं फुरसें चावल्याचें बुवांनीं सांगितलें. बुवा तमाधि लावून बसले तरी तें विष समाधींतून उठल्याबरोबर पुनः चढूं ागलें. त्रास कांहीं केल्या थांबेना. रामभाऊ सबनीसांनीं एका मांत्रिकास ाठविलें; पण बुवा त्याच्याकडून इलाज करून घेण्यास तयार झाले ाहींत. सर्वांनीं आग्रहानें पायाला औषध लावलें. पण तें लावतांच सूज अधिक वाढून वेदनाही पूर्वींपेक्षां असह्य झाल्या. तेव्हां तो वर लावलेला लेप धुऊन टाकल्यावर किंचित् बरें वाटलें. दोन तीन दिवस तेथें मुक्काम केला. पण पायाची सूज व वेदना कमी होण्याचें चिन्ह दिसेना. बुवांच्या वेदना पाहून मातोश्रींना मात्र फार वाईट वाटलें. आपल्यामुळेंच हा प्रसंग मुलावर आला. आतां गोकर्णास तरी वेळेवर कसचें जाणें होतें, असें वाटून ती बिचारी बुवांना घेऊन परत माणगांवीं आली. याच दिवशीं रात्रीं देवांनीं स्वप्नांतच बुवांचा पाय दाबून त्यांत घुसून बसलेला दातांचा तुकडा काढून टाकला. पुढें दोन दिवसांनीं हळूहळू सूज कमी होऊन पाय उत्तम पूर्ववत् झाला. नंतर बुवा म्हणाले, 'आपण गोकर्णाला जाऊं नये म्हणून हें विघ्न देवानेंच आणलें. करितां देवाच्या आज्ञेवांचून कोठेंही जाणें चांगलें नाहीं.' मातोश्रींनीं तर त्या दिवसा-पासून बुवांना त्यांच्याविरुद्ध कांहींही करण्याचा आग्रह करावयाचा नाहीं असें ठरवून टाकलें. पण मातृप्रेमामुळें पुढें एकदां असा प्रसंग ओढवलाच. तो प्रकार असा—एकदा घरांत लाडू केले. सर्वांप्रमाणें वासुदेवानेंही लाडू खावा असें माउलीला वाटलें. तिनें बुवांना हांक

मारून लाडू खाण्याचा आग्रह केला. प्रेमळ मातेच्या आग्रहापुढें बुवांचें कांहीं चालेना. शेवटीं नाइलाजानें बुवांनीं लाडवाचा एक तुकडा तोंडांत टाकला मात्र. तोंच घशांत एकदम घांस अडकून बुवांनीं डोळे पांढरे केले. आईला पश्चात्ताप होऊन तिनें देवाची प्रार्थना केली व इतःपर आपण मुलाला कोणत्याही बाबतींत आग्रह करणार नाहीं असें देवाजवळ कबूल केल्यावर तो घांस बुवांचे घशाखालीं जाऊन बुवांना बरें वाटलें.

'अहिंसाप्रतिष्ठायां तत्सन्निधौ वैरत्यागः' या योगसूत्राप्रमाणें तें देऊळ एखाद्या महर्षींच्या आश्रमाप्रमाणें निर्वैर झालें होतें. सर्वही प्राण्यांना तेथील स्थानाबद्दल आत्मीयता वाटत होती. बुवा जेवणास बसले कीं उंदरांनीं जवळ येऊन त्यांनीं ठेवलेला भात अत्यंत शांतपणानें खावा. परका मनुष्य दिसला कीं पळून जावें. एक नाग दोन महिने देवळांतच होता. इकडे तिकडे फिरतांना सर्वांना दिसे. पण कोणालाही त्याचा त्रास झाला नाहीं. ७।८ हात लांबीची धामण देवळाच्या उंबऱ्यावर डोकें टेकून निजत असे. लोकांनीं कांहीं दिवसांनीं तिला मारण्याचें ठरविलें. पण ती शेवटीं जंगलांत निघून गेली. पण अशाही स्थितींत बुवा मात्र निश्चित मनानें देवळांतच निद्रा घेत असत. देवळाजवळ डोंगरावर एक मोठी गुहा आहे. तेथें बुवा ध्यानाकरितां जाऊन बसत. एकदां ते गुहेंत ध्यानस्थ बसतांच बाहेर एक मोठा वाघ येऊन बसला. बुवांचें ध्यान संपल्यावर ते उठून पाहतात तों समोरच एक मोठा वाघ बसलेला! त्याला पाहतांच बुवांची भीतीनें बोबडी वळली. शेवटीं गुहेंतच ते बसून राहिले. थोड्या वेळानें वाघ गुरगुरून निघून गेला व देवळांत बुवा परतले. तेव्हां देवांनीं सांगितलें कीं 'या पुढें गुहेंत बसण्यास जाऊं नये?' त्या सांगण्याप्रमाणें पुढें

ती गुहा बुवांनीं वर्ज्य केली. असाच एकदां एक मोठा नाग देवळांत आला व देवापुढें जाऊन दर्शन करून परत जाऊं लागला. रात्रींची वेळ! बुवांच्या सांगण्याप्रमाणें मंडळींनीं हातांत दिवा धरून त्याला बरेंच दूरपर्यंत पोंचविलें.

एका उत्सवाचे वेळीं नैवेद्यावर तूप न वाढतांच तो देवळांत आणून देवापुढें ठेवला. बुवा नैवेद्य दाखविणार इतक्यांत त्यांचे पाठीवर कोणाचा तरी जोराचा धक्का बसला. बुवा फार घाबरले व तूप तूप म्हणून ओरडले. नंतर तूप आणून घातल्यावर नैवेद्य समर्पण केला. देवांना यत्किंचितही न्यूनता खपत नव्हती. अन्नशुद्धीवांचून नैवेद्य कसा समर्पण होईल! अनन्य भक्तांची न्यूनता देवच पूर्ण करतो. दिपवाळीस एकदां नैवेद्यास पोहे सर्वांनीं दिले; दहीं–पोहे होते. घरांतीलही पोहे त्यांत होते. पण ते कोरडेच त्यांत मिसळले गेले. देव म्हणाले, 'आज आम्हांला कोरडे पोहे कां खाऊं घालतां?' चौकशी करतां घरांतून आलेले पोहे कोरडे असल्याचें समजलें. ते दुसरे कोणीं पाठविले होते. आईनें नव्हे. पण त्या दिवशीं आईचा गळा सुजला. देवाजवळ क्षमा मागितल्यावर आईस बरें वाटलें.

एकदां एका माणसानें देवाचे नैवेद्यास बराच मोठा सुरण आणून दिला. त्या दिवशीं भाजी करून त्याचा नैवेद्य दाखविला व नंतर तेथें जमलेल्या मुलांना तो भाजीचा प्रसाद दिला. तो खातांच मुलांच्या गळ्याला अत्यंत खाज सुटून त्रास झाला. यावरून तो सुरण खाजरा असल्याचें कळून आलें. तथापि बुवांनीं ती नैवेद्याची भाजी टाकून न देतां प्रसाद म्हणून सर्व खाऊन टाकली. गळा फार सुजला. पण तें सर्व सहन केलें. याला म्हणतात खरा भाव!

माणगांवीं बुवांचें महत्त्व वाढलेलें पाहून इतरांना त्यांचा हेवा वाटूं लागला, व कांहीं मंडळींनीं आसपास त्या त्या ठिकाणीं दत्तमंदिर

स्थापून बुवांचेप्रमाणेंच भजनपूजनाचा कार्यक्रम सुरू केला. पण 'दया क्षमा शांति तेथें देवाची वसति' याप्रमाणें स्थिति इतरत्र नसल्यानें तीं देवस्थानें फार दिवस चाललीं नाहींत. लवकरच त्या त्या मंडळींना कोणाला राजद्रोहाच्या आरोपावरून शिक्षा तर कोणाला वेड लागणें असे प्रकार घडून येऊन तीं स्थानें ओस पडलीं. साधूंचा द्रोह केला असतां तें देवाला कसें आवडेल?

इतर अधिकारी मंडळींना अशीच बुवांचे सारखी आपली प्रसिद्धि व्हावी असें वाटे. पण बुवांना मात्र या प्रसिद्धीचा कंटाळा असे. श्रीदत्तमहाराजांचें वास्तव्य माणगांवांत झाल्यापासून तेथील उत्सव फार मोठ्या प्रमाणांत होऊं लागले. दहा दहा हजार मंडळी जमत असत. अशा स्थितींत बुवांना अनुष्ठान करण्यास स्वस्थता कोठून मिळणार? शेवटीं बुवांनीं मंडळींची गर्दी कमी करण्याबद्दल देवाची प्रार्थना केली पुढें दोन वर्षें गेल्यावर 'तुमच्या इच्छेप्रमाणें हा बाजार बंद केला' असें देवांनीं बुवांना सांगितलें. नंतर मात्र मंडळींची ये-जा हळूहळू कमी झाली.

एक कुष्ठरोग झालेला मनुष्य माणगांवीं येऊन राहिला. बुवांच्या सांगण्याप्रमाणें तो देवाला लांबून प्रदक्षिणा घालण्याची सेवा करूं लागला. त्यामुळें कांहीं दिवसांनीं त्याचा तो रोग बरा झाला. तेव्हां त्यानें गुरुद्वादशीकरितां नरसोबाचेवाडीस जाणेबद्दलची आपली इच्छा बुवांचेजवळ व्यक्त केली. बुवांनीं त्याला सांगितलें कीं, 'तुला येथून जाण्याबद्दल अद्यापि देवांची आज्ञा न झाल्यानें तुला हें गांव सोडतां येणार नाहीं.' असें बुवांनीं सांगितलें तरी तो आपला हट्ट सोडीना. त्या रात्रीं उंदरांनीं त्याचें अंग बरेच ठिकाणीं कुरतडून खाल्लें. दुसरे दिवशीं बुवांनीं तीर्थ शिंपडून त्या पीडेंतून त्याला मुक्त केलें. नंतर कांहीं दिवस तेथें राहून तो मनुष्य बुवांना न विचारतांच नरसोबाचे

वाडीस निघून गेला. वाडीचे हद्दींत पाऊल टाकतांच पुनः पूर्ववत् त्याचें सर्व अंग रोगानें भरून गेलें व याला वाडींतून हाकलून द्या असा देवाचा दृष्टांत पुजाऱ्यांना झाला. त्याप्रमाणें पुजाऱ्यांनीं त्या माणसाला वाडींत राहूं दिलें नाहीं. शेवटीं नाइलाजानें तो मनुष्य परत माणगांवीं आला. पण येथेंही देवांच्या सांगण्याप्रमाणें बुवांनीं त्याला थारा न देतां हाकलून काढलें. शेवटीं तो आपल्या गांवीं परत गेला व या रोगांतच त्याचा अंत झाला.

एकदां ग्रस्तोदित चंद्रग्रहण आलें होतें. तें ग्रहण दिसणार नाहीं असें पंचांगांत दिलें असल्यामुळें मंडळी स्वस्थ होती. बुवा रोजच्याप्रमाणें सकाळीं अनुष्टान आटोपून भिक्षेस निघाले. इतक्यांत देवांनीं सांगितलें कीं ‘ आज ग्रहण दिसणार आहे. सबब भिक्षा व नैवेद्य आज नाहीं ’ हें ऐकून बुवांनीं सर्वांना तसें सांगितलें. गांवांतील कांहीं प्रतिष्ठित मंडळींनीं बुवांचा त्या वेळीं उपहास केला. पण संध्याकाळीं जेव्हां ग्रहण खरोखरच दिसलें तेव्हां सर्वांना आपली चूक कळून आली.

सावंतवाडीचे कारभारी बावडेकर म्हणून होते. हे प्रथम नास्तिक असून पिशाच वगैरे सर्व खोटें असें म्हणत. एकदा त्यांच्या मुलाचें लग्न झालें. लग्न झाल्याबरोबर ती मुलगी एकाएकीं बेशुद्ध पडली. आणावकर समंधानें तिला पिशाचबाधा झाली असल्याचें सांगून तिला माणगांवीं घेऊन जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्या मुलीला माणगांवीं नेलें असतां बुवांनीं अंगारा देऊन तो जपून ठेवावा व पुनः दत्तजयंतीचे उत्सवाचे वेळीं यावें असें सांगितलें. पण त्या मुलीला सांगितलेल्या वेळीं माणगांवीं न नेल्यामुळें ती पुनः बेशुद्ध पडली. थोड्या वेळानें सावध होऊन बडबडूं लागली. डॉक्टरला बोलावून आणलें. डॉक्टरला पाहतांच ती मुलगी एकदम त्यांचे आंगावर धांवून जाऊन म्हणाली

कीं, 'मला औषध देतोस काय? काय तुझा पराक्रम आहे तो दाखीव.' शेवटीं नाइलाजानें डॉक्टर निघून गेला. लोक बावडेकरांना म्हणूं लागले कीं, 'तुम्ही तर पिशाच मानीत नाहीं. आतां तुमच्या घरांतच तें शिरलें आहे.' बावडेकरांनीं साखर व पांच रुपये एका नोकराबरोबर माणगांवीं पाठवून मुदत देणेस बुवांना कळविलें. बुवांनीं त्या नोकराला सांगितलें कीं, 'देवापुढें लांच देऊन कांहीं उपयोग नाहीं.' असें सांगून ती साखर व रुपये परत केले. शेवटीं बावडेकर स्वतः मुलीस बरोबर घेऊन माणगांवीं आले. 'तुमचा पिशाचावर विश्वास नसतांना तुम्ही इकडे कां येतां?' असें बुवांनीं त्यांना विचारलें व 'पालखी झाल्यावर आणावकर समंध याबद्दल खुलासा करील' असें सांगितलें. त्या दिवशीं कांहींच सांगणें झालें नाहीं. दुसरे दिवशीं सकाळीं आणावकर समंधानें बावडेकरांना सांगितलें कीं, 'तुम्ही नरसोबाचे वाडीस एका अश्वत्थ वृक्षास पार बांधा व एक सहस्र ब्राह्मण भोजन घाला.' हें समंधाचें म्हणणें ऐकून इतकी आपली शक्ति नसल्याचें बावडेकरांनीं सांगितलें. तेव्हां तुम्ही शंभर ब्राह्मण घाला असा बुवांनीं निर्णय दिल्यावर त्यांनीं नरसोबाचे वाडीस जाऊन बुवांचे आज्ञेप्रमाणें ब्राह्मण समाराधना करतांच ती मुलगी पूर्णपणें बरी झाली.

एकदां नारोपंत उकिडवे यांचे गुडघ्यास एकाएकीं सूज येऊन तो पाय फार दुखूं लागला. तसेच ते माणगांवीं आले. बुवांनीं त्यांची ती स्थिति पाहून विचारलें कीं, 'श्रीदत्तमूर्तीच्या गुडघ्यास कधीं धक्का लागला होता काय?' पुढें चौकशी करितां, स्नानासाठीं मूर्ति खालीं घेण्याचे वेळीं मूर्तीच्या पायास धंगाळ लागल्याचें समजलें. बुवांनीं देवाचे सर्वांगाला तूप लावून ऊन पाण्यानें स्नान घालण्यास सांगितलें. तसें करतांच नारोपंतांचा पाय बरा झाला.

एक अत्यंत अभिमानी वैदिक ब्राह्मण गांवोगांवीं सर्व वैदिकांचेकडून जयपत्रें घेत घेत एकदां माणगांवीं आला, व तेथील वैदिक मंडळींपुढें त्यानें आपला अभिप्राय सांगितला. सर्व मंडळी रात्रीं देवळांत जमन म्हणणें झालें व दुसरे दिवशीं बुवांनीं वेदांतील कांहीं भाग घेऊन पुराण सांगितलें. तें ऐकल्याबरोबर त्या ब्राह्मणाचा अभिमान तत्काल नाहींसा होऊन त्यानें बुवांना सर्वांसमक्ष साष्टांग नमस्कार घालून त्यांची क्षमा मागितली.

वेदाध्ययन करणाऱ्यांनीं अत्यंत शुद्धतेनें राहावें असें बुवा सांगत असत. नाटकाला, जत्रेच्या ठिकाणीं विद्यार्थ्यांनीं जाऊं नये अशी त्यांची ताकीद असे. तरीसुद्धां एखादे वेळीं विद्यार्थी रात्रीं मुकाटयानें नाटकास वगैरे जात व पहांटे स्नान करून म्हणण्याकरितां येत. पण झोप थोडीच त्यांचें ऐकणार! म्हणतां म्हणतां मुलांना झोप आल्याचें बुवांना दिसतांच मुलांची चूक त्यांचे लक्षांत येई व त्याबद्दल दंड म्हणून प्रत्येकाकडून तेथल्या तेथेंच एक सहस्र गायत्रीमंत्राचा जप करवून घेतला जाई.

देवांनीं केव्हां केव्हां बुवांची परीक्षा पाहावी. एकदां बुवा ध्यान करीत असतां एक मनुष्य ध्यानांतच पालखी घेऊन आला, व 'तुमचें इहलोकचें वास्तव्य संपलें आहे. तुम्ही पालखींत बसा.' असें त्यानें बुवांना सांगितलें. त्यांच्या सांगण्याप्रमाणें निर्विकार मनानें बुवा त्या पालखींत बसले. मात्र लगेच तें दृश्य नाहींसें झालें. अशाच एकदां ध्यानाचे वेळीं तुला कुष्ठरोग होणार असें देवांचें सांगणें झालें. ध्यानांतून उठल्याबरोबर त्या सांगण्याप्रमाणें अनुभवही आला. एक हात व एक पाय निश्चेष्ट झाले. प्रारब्धभोग समजून तीन चार दिवस बुवांनीं तें सहनही केलें. ते लवकरच बरे झाल्यावर बुवांनीं याबद्दल देवाकडे विचारणा केली असतां देव म्हणाले कीं, 'तुमचा निश्चय कसा आहे तें पाहिलें'.

माणगांवच्या देवस्थानाबद्दल बुवांनीं एकदां लोकांना सांगितलें कीं, हें स्थान फार जागृत आहे. पण नरसोबावाडीप्रमाणें योगिनी वगैरे परिवार देवता येथें नाहींत. फक्त गण तेवढे आहेत. त्यामुळें येथें सर्वांचीं कामें इच्छेप्रमाणें होणार नाहींत.

देवाचे गण मांणगांवीं देवस्थानांत होते. याबद्दल एकदां अशी प्रचीति आली कीं, एका बाईनें देवळांत जाऊन देवापुढचे चार आणे चोरून नेले. लगेच देवाच्या गणानें तिच्या शरीरांत शिरून तिला त्रास देण्यास आरंभ केला. त्यामुळें भिऊन ती बाई परत देवळांत आली व आपला गुन्हा कबूल करून ते चार आणे तिनें देवापुढें ठेवले.

मानसन्मानापासून बुवा नेहमीं दूर असत. एकदां बुवा सावंतवाडीस उकिडवे यांचे दत्तमंदिरांत आल्याची वार्ता राजवाडयांत समजली. बुवांना राजवाडयांत बोलावण्याचें ठरलें. ही गोष्ट बुवांचे कानीं जातांच त्यांनीं उकिडवे यांना गांवाबाहेर अमुक ठिकाणीं भेटा असा निरोप पाठवून लगेच ते सावंतवाडींतून बाहेर पडले.

बुवांच्या घरच्या स्थितीचें वर्णन पूर्वीं आलेलेंच आहे. सासूचें व सुनेचें जमत नव्हतें. त्यांतही दारिद्यामुळें अन्नवस्त्राची चिंता. नाना कोनकर तेथील व्यवस्थापक होते. त्यांनीं घरांतील कलहाची स्थिती पाहून अन्नपूर्णाबाईना आंबोली गांवांत इचलकरंजीकरांच्या छत्रांत स्वयंपाक करण्याकरितां पाठविण्याचें ठरविलें. अन्नपूर्णाबाई बिचारी आपल्या दु:स्थितीनें अत्यंत निराश झाली होती. आपल्या पतीचें यश एवढें मोठें पसरलें आहे, पण केवळ आईच्या प्रेमामुळें ते आपणांकडे लक्ष देत नाहींत, हें पाहून तिला वाईट वाटे. यामुळें बरें झालें, चार दिवस दूर राहण्यास मिळाल्यास घरांतील नित्याची कटकट तरी मिटेल असें वाटून अन्नपूर्णाबाईनींही कोनकरांच्या म्हणण्यास

संमति दिली व कोनकरांच्या घरींच त्या राहण्यास गेल्याही. दुसरे दिवशीं तिकडे जाणेकरितां निघणेचें ठरलें. बुवांना या गोष्टीची गंधवार्ता सुद्धां नव्हती. ते देवळांतील आपल्या नित्यकर्मांत दंग होते. मातोश्रीला मात्र लोकापवादाची भीति वाटून त्यांनीं एका इसमाला ही गोष्ट बुवांचे कानावर घालण्यास सांगितलें. त्या दिवशीं शनिवार होता. रात्रीं पालखी वगैरे सर्व आटोपल्यावर बुवा स्वस्थ पडले होते. इतक्यांत त्या इसमानें येऊन मातोश्रींचा निरोप बुवांना सांगितला. बुवांनीं निर्विकार चित्तानें त्या इसमास विचारलें कीं, 'आप्पा! कुटुंबानें असें जाणें तुम्हांला बरें वाटतें काय?' आप्पा म्हणाले, 'नाहीं.' मग बुवा म्हणाले, 'देवाची प्रार्थना करा म्हणजे जाणें रहित होईल.' आप्पांनीं प्रार्थना केली व ते घरीं निघून गेले. पहांटे कोनकरांना अकस्मात् फुरसें चावलें त्यामुळें त्यांचा पाय सुजून अतिशय त्रास होऊं लागला. अर्थातच अन्नपूर्णाबाईचें जाणें रहित झालें. त्या मुकाट्यानें उठून आपल्या घरीं आल्या व घडलेली सर्व हकिकत त्यांनीं आपल्या सासूपुढें सांगितली. भक्ताच्या मानापमानाचें संरक्षण देवाकडून कसें होतें या बद्दलची ही साक्ष आहे. भक्ताला त्याची परवाही नसते.

माणगांवीं श्रीमंत, गरीब सर्वही आर्त भक्त सेवा करण्याकरितां येऊन राहात व निष्ठेनें सेवा करून कृतकार्य होऊन परत आपले गांवीं जात. सावंतवाडी संस्थानच्या राणीसाहेबांना कांहीं पिशाचबाधा झाली. राजवाड्यांतील एका स्वयंपाक्याचे पैसे त्यांच्याकडे राहिले व तो तशाच स्थितींत पैसे न घेतांच मेला. तो पिशाच होऊन त्यांना त्रास देऊं लागला. राणीसाहेब ती पीडा जाण्याकरितां माणगांवीं येऊन बुवांनीं सांगितल्याप्रमाणें प्रदक्षिणा घालणें, नित्य धूप, आरती अशा समयीं उपस्थित राहाणें अशी सेवा एखाद्या साध्या सेवेकऱ्याप्रमाणें करूं लागल्या. रात्रीं आरतीचे वेळीं त्यांचे अंगांत रोज पिशाचसंचार होऊन त्याही इतरांप्रमाणें खांबास

चिकटून राहात व अव्यवस्थित चाळे करीत. वेळोवेळीं बुवांच्या सांगण्याप्रमाणें त्यांनीं तेथें ब्राह्मणद्वारां महारुद्र, गुरुचरित्रसप्ताहवाचन इत्यादि करावें. राजेसाहेब सुद्धां वेळोवेळीं श्रीदत्तदर्शनास येत असत. कांहीं दिवसांनीं राणीसाहेबांची बाधा पूर्णपणें दूर होऊन त्या आनंदानें घरीं गेल्या.

श्रीदत्तमंदिरास पाडगांवकर यांनीं कांहीं मदत केली होती. त्यांचा नोकर सावंत याला पोटशूळाची असह्य व्यथा होती. त्याकरितां त्याच्या मालकानें त्याला माणगांवीं सेवेकरितां ठेवलें होतें. नित्य नामस्मरण करीत प्रदक्षिणा घालण्याची सेवा बुवांनीं त्याला सांगितली होती. त्याप्रमाणें तो भावभक्तीनें सेवा करीत होता. कांहीं दिवसांनीं त्याची पोटशूळाची व्यथा बरीच कमी झाली. श्रीदत्तमंदिरांत रात्रीं शेजारती झाल्यावर कोणीही राहावयाचें नाहीं असा नियम होता. एके दिवशीं मंदिरांतच सहज पडला असतां सावंताला झोंप लागली. रात्रीं त्याला स्वप्नांत एकानें येऊन सांगितलें कीं, ‘ तुझा मालक मेला. सबब तूं ताबडतोब वाडीस जा.’ दुसरे दिवशीं हें स्वप्न सावंतानें बुवांना सांगितलें. तेव्हां बुवा म्हणाले, ‘ हें कांहीं देवाचें स्वप्न नाहीं, पिशाचाचें आहे. करितां देवांची आज्ञा घेतल्यावांचून तूं हें स्थान सोडून वाडीस जाऊं नकोस.’ बुवांनीं असें स्पष्ट सांगितलें असतांही त्यांचें न ऐकतां तो सावंतवाडीस निघून गेला. तेथें गेल्यावर पाहतो तों आपला स्वामी जिवंत असल्याचें पाहून त्याला आश्चर्य वाटलें. मालकानें त्याला रागें भरून परत माणगांवीं पाठविलें. त्याप्रमाणें तो परत येण्यास निघाला. पण वाटेंत त्याला पिशाचानें गांठून पुनः त्याला पोटशूळ इतका असह्य उत्पन्न केला कीं त्यांतच त्याचा शेवटीं अंत झाला. देवाची आज्ञा कोणती व इतरांची कोणती हें निश्चित समजावून सांगण्यास महापुरुषच समर्थ असतात. म्हणून ते सांगतील त्याच्यावर विश्वास ठेवून वागण्यांतच मनु-

ष्याचें पूर्ण कल्याण आहे. तेथें स्वतःची बुद्धि बिलकूल चालवून उपयोग नाहीं हें तात्पर्य.

देवळाजवळच डोंगरांत एक झरा बुजलेला होता. ती जागा मंडळींनीं खणल्याबरोबर त्या झऱ्यांतून धो धो धो पाणी वाहूं लागलें. मंडळींनीं जिकडे तिकडे गंगा आली गंगा आली म्हणून प्रसिद्ध केलें ! झालें. लोकांना काय, हें वृत्त समजल्याबरोबर भाविक लोकांच्या झुंडीच्या झुंडी स्नानाकरितां येऊं लागल्या. ब्राह्मण मंडळी संकल्प सांगू लागली. हां हां म्हणतां ३०।४० रुपये जमले. बुवांना ही वार्ता समजतांच सर्व ब्राह्मणांना बोलावून आणून ताबडतोब ही बुवाबाजी बंद करण्यास सांगितलें, आणि तेथें आजरेकरबुवांनीं स्थापन केलेल्या मारुतीकरितां जमलेल्या पैशाचा विनियोग सर्वांकडून करविला. आजरेकरबुवा हे कनोजी ब्राह्मण शरीराने फार धिप्पाड होते. त्यांनीं उपासनाबलानें मारुतिरायांना प्रसन्न करून घेतलें होतें. त्याप्रमाणें ते बोलतील तें खरें होत असे. यांचें बुवांवर अतिशय प्रेम होतें. आवेश आला म्हणजे तेलांत शेंदूर कालवून प्यावा, दहा दहा हात उड्या माराव्यात, एका झाडावरून दुसऱ्या झाडावर वानराप्रमाणें उड्या मारून जावें अशा लीला आजरेकरबुवा करीत असत. यांना आजऱ्याचे मारुतीबुवा असें म्हणत. यांनीं माणगांवीं दत्तमंदिरानजीक द्रोणागिरी पर्वत उचललेल्या मारुतीची मूर्ति स्थापन केली होती. ते वेळोवेळीं माणगांवीं बुवांना भेटण्याकरितां म्हणून येत असत. हे शेवटीं नरसोबाचे वाडींत जाऊन राहिले होते. तेथेंच त्यांचें देहावसान झालें.

एकदां बुवा नरसोबाचे वाडीस गेले असतां एक चमत्कार घडला. पाऊस बरेच दिवस न पडल्यामुळें खालीं दत्तपादुकांवर मंडळींनीं संततधार अनुष्ठान सुरू केलें. त्याच वेळीं वरच्या बाजूस नामसप्ताह चालू

होता. सप्ताहाचे ठिकाणीं श्रीमौनीस्वामी बसले होते. त्यांच्याजवळ कांहीं मुलांनीं जाऊन आपल्या बालबुद्धीप्रमाणें त्यांना विचारलें कीं, 'स्वामीजी ! वर सप्ताहांत देव प्रत्यक्ष येऊन बसले आहेत, कारण आपण येथें आहांत. तर मग खालीं संततधार कोणावर धरावयाची ? दोन ठिकाणीं देव कसें एकदम राहतील ? ' ही मुलांची वाणी ऐकून त्यांच्या समाधानाकरितां श्रीमौनीस्वामीही आपल्या बालवृत्तीस अनुसरून मुलांना म्हणाले कीं, ' गड्यांनो ! तुमचें म्हणणें बरोबर आहे, आतांच्या आतां खालीं जाऊन संतत धार बंद करण्यास सांगा.' मुलांनीं खालीं जाऊन स्वामीमहाराजांची आज्ञा मंडळींना कळविली. पण एकदां सुरू केलेलें अनुष्ठान मंडळींनाही मध्येंच बंद करतां येईना. तें समजल्या-वर श्रीमौनीस्वामी रागावून म्हणाले कीं, 'देव इकडे वर सप्ताहांत बसले असतां त्यांना तुम्ही संततधार ठेवून त्रास देतां तर पाऊसच पडणार नाहीं जा. काय करायचें तें करा.' झालें ! स्वामीजींची वाणी म्हणजे श्री-दत्तप्रभूचीच वाणी. शेवटीं लोक हताश होऊन बुवांचेकडे गेले. बुवांनीं सांगितलें कीं, 'श्रीमौनीस्वामींनीं प्रार्थना केल्यावांचून पाऊस कधींच पडणार नाहीं. तरी तुम्ही अशी युक्ती करा कीं, आपलीं सर्व मुलें नेऊन स्वामींच्या जवळ सोडून द्या. आणि त्यांना असें सांगा कीं, स्वामीजी ! या मुलांचा सांभाळ आमच्याकडून होणें शक्य नाहीं. पाऊस नसल्यामुळें चिंता आहे. तरी हीं मुलें सांभाळा.' इतक्यांत बुवाही तेथें आले. बुवांनीं सांगितलें कीं, 'महाराज ! आपली आज्ञा होण्यापूर्वीच खालीं संततधार सुरू केली तें अनुष्ठान मध्येंच कसें सोडतां येईल ? तरी या बालगोपालांकरितां आपण पाऊस पाडण्याकरितां प्रभूला गळ घातली पाहिजे.' असें बुवांनीं सांगतांच बरें तर चला. असें म्हणून श्रीमौनीस्वामी उठले व खालीं श्रीदत्तपादुकांजवळ जाऊन म्हणाले कीं, ' देवा ! या मुलाबाळांचेकरितां पाऊस पाहिजे लवकर पाठवा ' अशी

प्रार्थना श्रीमौनीस्वामींची होण्याबरोबर थोडयाच वेळांत, कांहीं चिन्ह नसतांही आकाशांत ढग जमून उत्तम पाऊस पडला व सर्वत्र आनंदी आनंद झाला.

एकदां गुरुद्वादशीच्या उत्सवास आलेल्या मंडळींना बुवांनीं दिवाळीकरितां ४।९ दिवस ठेवून घेतलें. त्या मंडळींत सावंतवाडीचे भागवत नांवाचे एक कीर्तनकार होते. त्यांना असें वाटलें कीं, उगीच आपण दिवाळीकरितां येथें राहिलों. घरीं असतों तर चांगलें पक्वान्न खावयास मिळालें असतें. असे विचार मनांत येतांच देवांनीं बुवांना त्या दिवशीं उत्तम पक्वान्नाचा बेत करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्या दिवशीं जेवणाचा बेत घरच्यापेक्षांही उत्तम झाला. माणगांवांतील एका पुराणिक बुवांनाही बुवांनीं जेवण्यास त्या दिवशीं बोलावलें होतें. पण आपणांस परान्न घ्यावयाचें नाहीं अशी कांहींतरी सबब सांगून ते भोजनास आले नाहींत. तें उत्तम सुग्रास जेवण झाल्यावर भागवतबुवांनीं सर्वांना आपल्या मनांत सकाळीं आलेले विचार सांगितले. सर्वांनाच तें ऐकून आश्चर्य वाटलें. सर्वसाक्षी परमात्म्याची व त्याच्या भक्तांची लीला अचिंत्य आहे.

नरसोबाचेवाडीस लक्ष्मण दीक्षित यांचे चिरंजीव नारायण म्हणून होते. प्रथम त्यांचे कांहीं मराठी शिक्षण व मिरज येथें कांहीं इंग्रजी शिक्षणही झालें. नंतर वाडीचे संस्कृत शाळेचे अध्यापक कृष्णशास्त्री वष्ट यांचेजवळ त्यांनीं काव्याचा अभ्यास केला. नंतर ते वष्टांच्या आज्ञेप्रमाणें बुवांचेकडे अभ्यासाकरितां येऊं लागले. बुवांनीं त्यांना संध्येपासून सर्व आचारधर्माचें शिक्षण देऊन अनुष्ठान करीत रहा असें सांगितलें. बुवांचे आज्ञेप्रमाणें नारायण दीक्षितांचें सर्व वागणें होतें. लग्न झाल्यावर स्मार्ताग्नीची उपासना कोरान्न भिक्षा मागून यांनीं केली. शेवटीं संन्यासग्रहण केलें. देवांचे आज्ञेनें पुढें त्यांना श्रीटेंबेमहाराजांनींच

दंड देऊन नृसिंहसरस्वती असें नामाभिधान ठेवलें. यांनाच दीक्षितस्वामी असें लोक म्हणत. यांनीं आपल्या गुरुमहाराजांचे आज्ञेवरून शेबटपर्यंत वाडींतच राहून गुरूपासना केली. शेवटीं शेवटीं ४।५ वर्षें ते तीर्थयात्रे-करितां वाडींतून बाहेर पडले. त्यांनीं वाडीच्या पलीकडे अमरापूर क्षेत्रांत श्रीदत्त व अमरेश्वर यांचें मंदिर बांधून तेथेंच आपल्या गुरूंचे नांवानें श्रीवासुदेवानंद सरस्वती पीठ नांवाची संस्था निर्माण केली व ती विश्वस्तांचे ताब्यांत दिली. यांचें गुरुप्रेम व शांति, तितिक्षा इत्यादि गुण अवर्णनीय असे होते. श्रीमहाराज यांचेबद्दल लोकांना सांगत असत कीं 'मीं त्याला संध्येपासून शिकविलें आहे. मला त्याचा फार अभिमान आहे.' असे गुरु व त्यांना साजणारे असे शिष्य हे खरोखर धन्य आहेत. यांचें समाधिस्थान अयोध्यानगरीं आहे.

एका गृहस्थास संकटायोगिनीचे दशेंतून मुक्त होण्याकरितां बुवांनीं त्याला राहूचा मंत्र जपण्यास सांगितलें. त्यानें मंत्रजपास आरंभ करतांच त्याचा गळा एकाएकीं फार सुजल्यानें जप करतां येईना. बुवांना ही हकीकत कळविल्यावर बुवा त्या गृहस्थाचे गांवीं गेले व समक्ष सर्व बंदोबस्त करून त्याला जप करण्यास सांगितलें. पुढें त्या ब्राह्मणाचें तें कार्य बुवांचे कृपेनें पार पडलें. देवाचे मनांत सेवा घ्यावयाची नसली म्हणजे असें मध्येंच सेवेंत विघ्न उत्पन्न होतें. पण त्यांत बुवांच्यासारखे मध्यस्थ जर असतील तरच देवतेच्या कोपाचें उपशमन होऊन तो भक्त कृतकार्य होतो.

नारोपंत उकिडवे यांना योगाभ्यास करण्याची इच्छा होऊन त्यांनीं पुस्तकावरूनच प्राणायामाचा अभ्यास सुरू केला. तो चुकल्यामुळें पोटशूळ प्राणांतिक असा निर्माण झाला. उपचार केले पण त्याचा उपयोग झाला नाहीं. शेवटीं ते बुवांचेकडे आले असतां बुवांनीं थोडा

वेळ विचार करून उकिडवे यांना प्रश्न केला कीं, 'तुम्ही प्राणायाम करीत असता काय ?' त्यांनीं कबुली जबाब दिला. नंतर बुवांनीं पुस्तकावरून प्राणायामाचा अभ्यास न करण्याबद्दल त्यांना बजावलें व उपाय करून त्यांचा पोटशूळ बंद केला.

माणगांवीं नेहमीं अनेक सेवेकरी सेवा करण्याकरितां येऊन राहात असत. उत्सवाचे वेळीं इतरही यात्रा बऱ्याच मोठ्या प्रमाणांत जमत असे. एकदा अशीच एक बाई दर्शनार्थ आली व स्नान करण्याकरितां समोरच्या विहिरीवर गेली. स्नानाचे वेळीं तिनें आपल्या अंगावरचे सर्व दागिने कपड्याखालीं ठेवले होते. हें दुसऱ्या एका बाईच्या दृष्टीस पडलें आणि तिनें त्या बाईची नजर चुकवून ते सर्व दागिने उचलून आपल्या घरीं नेले व ते जमिनींत खळगा खणून त्यांत ठेवून दिले. दागिन्याची मालकीण स्नान करून येऊन पाहाते तों आपण ठेवलेल्या जागीं एकही दागिना नाहीं. शोध केला पण कांहींच पत्ता लागेना. शेवटीं रडत रडत ती बुवांचेकडे आली व सर्व हकीकत तिनें बुवांचे कानांवर घातली. तेव्हां बुवांनीं तिला 'तुझे दागिने संध्याकाळपर्यंत मिळतील, रडूं नकोस;' असें सांगून तिचें समाधान केलें. बुवांनीं देवांच्या गणांना चोरीचा शोध लावण्यास सांगितलें. त्या वेळीं चोरी करणाऱ्या बाईपुढें एक अक्राळ-विक्राळ स्वरूपाचा मोठा पुरुष येऊन तिला भीति दाखवूं लागला. त्याबरोबर ती भिऊन पळत पळत बुवांचे जवळ आली. जवळ येण्याबरोबर बुवांनीं तिला ओळखलें व चोरीचे दागिने मुकाट्यानें घेऊन येण्यास सांगितलें. लगेच त्या बाईनें घरीं पुरून ठेवलेले दागिने बुवांचे समोर आणून ठेवले व झालेल्या अपराधाबद्दल बुवांचे जवळ क्षमा मागितली. त्यावेळीं तिला भीति दाखविणारा तो पुरुष निघून गेला व ती बाई निर्भय झाली. नंतर त्या मालकिणीला तिचे तिला दागिने बुवांनीं दिले.

वेगुर्ले येथील एका ब्राह्मणाचा मुलगा पंधरावे वर्षी एकाएकीं बोलेनासा झाला व त्यानें खाणेंही वर्ज्य केलें. चार पांच वर्षे उपाय करून त्याचा बाप थकला. शेवटीं आपल्या मुलाला घेऊन तो माणगांवीं बुवांचेकडे आला व त्यांना मुलाची सर्व हकीकत सांगितली. बुवांनीं मुलाकडून देवास प्रदक्षिणा घालविण्यास सांगितलें. प्रथम तो मुलगा प्रदक्षिणा घालीना. मग जबरदस्तीनें त्याच्या हाताला धरून प्रदक्षिणा घालविल्या. पुढें पुढें तो स्वतःच प्रदक्षिणा घालूं लागला. मग कांहीं दिवसांनीं बुवांनीं त्या मुलाला गुरुचरित्र वाचण्यास सांगितलें. पण तो आरंभीं वाचीना. मग मनांतल्या मनांत वाचूं लागला. एक सप्ताह झाला तीर्थ घेऊं लागला. पुढें हळूहळू व थोडें थोडें बोलूंही लागला. तिसरा सप्ताह पूर्ण होतांच पूर्वीप्रमाणें उत्तम बोलणें चालणें, जेवणें वगैरे सर्व व्यवहार करूं लागला. नंतर देवाची आज्ञा झाल्यावर त्याला मंडळीनीं घरीं नेलें.

एका गांवीं एक गृहस्थ नवशिक्षित असा होता. तो भूतपिशाच मानीत नसे व हें मानणाऱ्यांची तो थट्टा करीत असे. पण पुढें चमत्कार असा झाला कीं, त्याला स्वतःलाच पिशाचबाधा होऊं लागल्यामुळें तो माणगांवीं सेवेकरितां येऊन राहिला. तेथें एकदां त्याचा मेहुणा त्याला भेटण्याकरितां म्हणून आला. तो एल्एल्. बी. झालेला होता. त्यानें सेवेस राहिलेला आपला मेहुणा सखाराम याची थट्टा करण्यास आरंभ केला. सखारामाचे शरीरांत पिशाचानें संचार केला व त्याला विचारलें कीं, 'कां रे आमची कां थट्टा करतोस?' त्या मेहुण्यानें सांगितलें कीं, 'तूं जर माझ्या शरीरांत शिरून प्रत्यक्ष मला त्रास देशील तर मग पिशाचयोनी खरी आहे असें मीं मानीन; नाहीं तर हें सर्व थोतांड आहे असें समजण्यास हरकत नाहीं.' त्या पिशाचानें सांगितलें कीं, 'ज्याच्याकडे आमचें कांहीं येणें असतें अशा संबंधी माणसालाच आम्ही त्रास

देतों, इतरांना नाहीं.' हें ऐकून तर त्या माणसानें देवाची, पिशाचाची, बुवांची सर्वांचीच थट्टा आरंभिली. तेव्हां त्या पिशाचानें त्या नास्तिक माणसाच्या संबंधी अशा पिशाचाला सांगून त्याचा चांगलाच समाचार घेणेस सांगितलें. त्याबरोबर त्या पिशाचानें सखारामाच्या मेहुण्याचे अंगांत शिरून त्याला चांगलाच चोप दिला. तेव्हां सखारामाच्या पिशाचानें सावध झाल्यावर त्याला विचारलें कीं, 'कांरे! तूं कां आतां ढोंग करूं लागलास? आतां तुझें काय शहाणपण आहे तें दाखीव कीं!' त्या नास्तिक माणसाची चांगली हजेरी घेऊन, याला त्रासांतून मुक्त करूं नका असें बुवांना त्या पिशाचानें सांगितलें व त्याची घडलेली सर्व हकीकत सांगितली. तो सखारामाचा मेहुणा त्या पीडेमुळें मरणोन्मुख झाला. त्याच्या घरच्या सर्व मंडळींनीं माणगांवीं येऊन बुवांची प्रार्थना केली, तेव्हां बुवा म्हणाले कीं, 'हा देवाचे दरबारांत अपराधी आहे; करितां यानें येथें कांहीं दिवस राहून सेवा केली पाहिजे म्हणजे बरें वाटेल.' शेवटीं त्याला नाइलाजानें माणगांवीं यावेंच लागलें; नंतर बुवांचे सांगण्याप्रमाणें त्यानें श्रद्धेनें सेवा केली. त्यामुळें तो पूर्ण दोषमुक्त होऊन घरीं गेला.

नरसोबाचे वाडीहून परत कोल्हापुरास कुलदेवी महालक्ष्मीचें दर्शन करून येण्याचा बुवांचा नियम होता. एकदां ते कोल्हापुरीं ठकारभटजींचे घरीं उतरले होते. बुवांची विद्वत्ता ठकार जाणून होते म्हणून त्यांचा परिचय करून देणेकरितां त्यांनीं गांवांतील एका शास्त्रीबुवांना आपल्या घरीं बोलावलें. ते शास्त्रीबुवा घरीं आले तेव्हां बुवा आंत अनुष्ठान करीत बसले होते. एक मळकट पंचा नेसलेली त्यांची मूर्ति पाहून त्यांनीं ठकारांना विचारलें कीं, 'हें असलें रत्न तुम्हीं कोठून आणलें? याकरितां का आम्हाला तुम्हीं बोलावलें? तेव्हां ठकारांनीं त्यांना गप्प बसण्याबद्दल हातांनीं खूण केली. कांहीं वेळानें बुवा अनुष्ठान

संपवून बाहेर आले. दोघांचें कांहीं शास्त्रीय विषयांवर बोलणें सुरू झालें. त्यावेळीं मात्र त्या शास्त्रीबुवांना बुवांची सर्व शास्त्रांत प्रगति असलेली पाहून अत्यंत आश्चर्य वाटलें व त्यांनीं सकाळच्या आपल्या बोलण्याबद्दल दिलगिरी व्यक्त केली.

नरसोबाचेवाडीस जातांना आजऱ्यास जाऊन तेथें आजरेकरबुवांना भेटून बुवा पुढें जात. आजरेकरबुवांचा बुवांचेवर फार लोभ होता. आजरेकरबुवा कनोजी ब्राह्मण होते. आपल्या हातचें बुवांना चालत नाहीं म्हणून त्यांनीं कोणाकडून तरी सांडगे, पापड, कुरडया इत्यादि पदार्थ बुवांना चालण्यासारखे करून ठेवावेत. बुवा तेथें प्रसंगानें एकदोन दिवस प्रेमामुळें राहातही असत.

वाडीस एकदा जात असतां संध्याकाळीं मुरगूडगांवीं मुक्काम करावा लागला. बुवा नदीवर निघाले तेव्हां तिकडून पुष्कळ ब्राह्मण संध्या करून बोलत बोलत येत होते. तो समुदाय जवळ आल्याबरोबर बुवांनीं तेथल्या तेथें रस्त्यांतच सर्वांना साष्टांग नमस्कार घातला. मंडळींनाही त्यामुळें संकोच वाटून त्यांनीं असें कां म्हणून विचारतांच 'विप्रौघदर्शनात् क्षिप्रं क्षीयंते पापराशय' इत्यादि श्लोक म्हणून दाखविला. दुसरे दिवशीं सकाळीं एका घरीं बुवा भिक्षेकरितां गेले असतां तेथील बाईनें सूप भरून तांदूळ भिक्षा घालण्याकरितां आणले. तें पाहून बुवा म्हणाले कीं, 'तुम्ही सर्व भिक्षेकऱ्यांना इतके तांदूळ घालीत असता काय? फक्त एक मूठभर तांदूळ घाला.' असें सांगून एक मूठच तांदूळ घेऊन बाकीचे परत नेणेस सांगितलें.

माणगांवांत पाडगांवकर म्हणून एक गृहस्थ होते. त्यांच्या घरांतील दोन तीन माणसं एकदम गेलीं म्हणून त्यांनीं बुवांना विचारलें. तेव्हां 'तुम्ही अगोदर हें राहातें घर पाडून नवें बांधा मग काय करावयाचें तें

आपण करूं' असें बुवा म्हाणाले. बुवांचे सांगण्याप्रमाणें त्यांनीं जुनें घर पाडून नवीन घर बांधलें व बुवांना कळविलें. वास्तुशांति बुवांचे आज्ञेप्रमाणें केली व बुवा येण्याची वाट पाहात ते घरमालक बसले. रात्र झाली तरी बुवा आले नाहींत. तेव्हां त्यांचा शोध घेण्यास एक माणूस पाडगांवकरांनीं पाठविला. वाटेंतच डोंगराच्या पायथ्याशीं बुवांची व त्या माणसाची भेट झाली. मला आपल्या सोबतीकरितां पाठविलें आहे असें त्याचें बोलणें ऐकून बुवांनीं त्या माणसाला एका बाजूला बोट करून सांगितलें कीं 'तो पाहा आमच्या सोबतीकरितां आला आहे. आम्हांला दुसरी सोबत काय करावयाची ?' त्या माणसानें तिकडे पाहिलें वर एक मोठा नाग तेथें असल्याचें त्याला दिसलें. नंतर बुवांनीं त्या नागाला तेथेंच राहाण्यास सांगून आपण त्या माणसाबरोबर पाडगांवकरांचे घरीं गेले व तेथें संरक्षणविधि काय करावयाचा तो करून परत निघाले. तो मनुष्यही बरोबर आला. पूर्वीच्या जागीं येतांच तो नाग यांची वाट पाहात होताच. मग त्या माणसाला परत जाण्यास सांगून आपण त्या नागाबरोबर देवळांत बुवा आले.

बुवांचा योगाभ्यास चालू होता. त्यावेळीं कांहीं कारणानें मलद्वार घट्ट होऊन शौचास सकाळीं वेळेवर होईना. नंतर पुनः शौचास जावें लागे त्यामुळें अनुष्ठानांत व्यत्यय येई. एकदां मुंबईहून एक शास्त्रीबुवा आले होते. त्यांचे जवळ हा विषय निघाला असतां त्यांनीं अभ्यासाचें तूप खावें म्हणजे शौचास साफ होईल असें सांगितलें. त्याप्रमाणें बुवांनीं एक दिवस तूप खाल्लें. देवांना हें बुवांचें पसंत न पडल्यानें अतिसाराचा उपद्रव सुरू झाला. दिवसांतून अनेक वेळां शौचास जावें लागून तितक्या वेळा स्नान करावें लागे. असा त्रास एक वर्षभर सारखा चालू होता. अशक्तपणा फार आल्यानें चालण्याची शक्ति राहिली नाहीं. त्याच वेळीं नरसोबाचेवाडीस चैत्रांत श्रीनारायणस्वामींचे उत्सवास

जाण्याबद्दल देवांचें सांगणें झालें. काय होईल तें होवो असा विचार करून वाडीस जाण्याकरितां बुवा बाहेर पडले. थोडा मार्ग चालून पुढें गेल्यावर एक मनुष्य भेटला व त्यानें कांहीं औषध देऊन तें घेतल्यावर अतिसार बंद होईल असें सांगितलें. औषध घ्यावें कीं नाहीं या विचारांत बुवा असतां 'औषध घ्यावें' असें देवाचें सांगणें झालें. बुवा म्हणाले, 'प्रारब्धकर्माचें फल भोगलेंच पाहिजे. आपल्याला औषध नको. वाडीस जाऊन येईपर्यंत विकार बंद राहिला म्हणजे झालें.' पण 'औषध घेतलेंच पाहिजे' असें पुनः सांगणें होतांच तें औषध घेतलें, त्यामुळें अतिसार थांबला. वाडीचा उत्सव संपल्यावर बुवा परत माणगांवीं आल्याबरोबर अतिसार पुनः सुरू झाला. तो बरेच दिवस पुनः चालू राहिला. 'तूप खाऊन बरें वाटलें कीं नाहीं' असें देवांनीं एकदां रागानें विचारलें. तेव्हां देवांच्या आज्ञेशिवाय आपण तूप खाल्लें त्याचें हें प्रायश्चित्त असें बुवांचे लक्षांत आलें. नंतर कांहीं दही खाण्याची आज्ञा झाली. त्याप्रमाणें दही खाल्ल्यानें अतिसाराचा विकार कमी झाला. पण मध्यें केव्हां तरी विशेष त्रास झाला म्हणजे पुनः तो उद्भवत असे. तो विकार शेवटपर्यंत कायम राहिला. बुवांचें महत्त्व सहन न झाल्यानें तेथीलच एका ब्राह्मणानें कांहीं आभिचारिक मंत्रप्रयोग करून तो बुवांचे पाठीमागें कायमचा लावला. त्यामुळें योगाभ्यास बंद पडला व देवांचें सांगणें झालें कीं 'आतां योगाभ्यास होणें शक्य नाहीं, तरी आतां गृहस्थाश्रमास आरंभ करावा.'

गृहस्थाश्रमास सुरवात करण्याबद्दल देवांची झालेली आज्ञा मातोश्रींना कळविली, तेव्हां तिच्याही मनाला समाधान वाटलें. देवांचे धर्मशाळेंतच बुवांचा गृहस्थाश्रम सुरू झाला. धर्मशाळेंतच स्मार्ताग्नीची उपासना चालू झाली. बुवांचें जेवण देवळांतच होत असे. अन्नपूर्णाबाई मात्र जेव-

ण्यास घरीं जात होत्या व रात्रीं घरांतील सर्व काम आटोपून देवळांत येत होत्या. कांहीं दिवसांनीं देवळांत बुवांनीं एकटयानींच संहिता स्वाहाकार कोणाचीही मदत न घेतां केला.

एकदां अन्नपूर्णाबाई रोजच्याप्रमाणें रात्रीं देवळांतील धर्मशाळेंत आल्या. बुवा तेथें नसल्यामुळें त्या देवळाकडे गेल्या. तेथें दार लावलें होतें. त्याला थोडा धक्का देण्याबरोबर आंतून बुवांनीं कोण आहे असें विचारलें. बाईंनीं मी आहें असें सांगून त्या बाहेरच उभ्या राहिल्या. मागें एकदां एक स्त्री पुराणाचे वेळीं देवळांतच अस्पर्श झाल्यानें देवळाचें शुद्धीकरण करावें लागलें होतें. त्या वेळेपासून मातोश्रीवांचून इतर कोणाही बायकांना देवळांत जाण्याची बंदी होती. अन्नपूर्णाबाई बाहेर येऊन उभ्या राहिल्या तरी बुवा आंत कांहीं वाचनांत गुंग झाल्यानें त्यांना त्यांचें स्मरण राहिलें नाहीं. बऱ्याच वेळानें बुवा देवळांतून बाहेर आले. तों अंन्नपूर्णाबाई बसल्या असून त्यांना समाधी लागली आहे असें बुवांना दिसलें. त्यांना बुवांनीं हालवून सावध करण्याचा प्रयत्न केला; तथापि त्या देहभानावर आल्या नाहींत. शेवटीं अन्य शास्त्रीय उपायांनीं त्यांना बुवांनीं सावध केलें तेव्हां त्या म्हणाल्या, 'पूर्ण आनंदांत मी निमग्न होतें; आपण मला उगीच सावध केलें.' योगाभ्यासाचा कांहींच संबंध नसतांही दत्तप्रभूंनीं सहज लीलेनें अन्नपूर्णाबाईंना समाधिसुखाचा अनुभव मिळवून दिला. भक्तावर अशी खरी कृपा प्रभूची असते.

अन्नपूर्णाबाईंना गर्भधारणा झाली, त्यावेळीं रमाबाईंनीं त्यांना बराच त्रास दिला. बाळंतपण ज्यांचे त्यांनीं करावें असेंही त्या बोलल्या. बुवांनाही तें सर्व पाहून खेद वाटला. देवांनींच पुढील सर्व व्यवस्था करून ठेवलीच होती. बुवांना माणगांवांत राहाण्याचा मोह उत्पन्न

होऊं नये म्हणून आईच्या द्वारानें देवांनींच तसें सांगितलें असेल. सावंतवाडीस नारोपंतांना स्वप्न पडलें कीं 'बुवांनीं माणगांव सोडून अन्यत्र जाण्याची तयारी चालविली आहे.' दुसरे दिवशीं येऊन त्यांनीं बुवांना अन्यत्र जावयाचें आहे काय, असें विचारतां बुवांनीं नाहीं म्हणून सांगितलें. नंतर आपणांस आदले रात्रीं झालेलें स्वप्न सांगून उकिडवे सावंतवाडीस परत गेले. दुसरे दिवशीं सकाळीं पूजा झाल्यावर 'आज माणगांव सोडून निघून जावयाचें आहे' असें देवांचें सांगणें बुवांना झालें. अद्यापि सात वर्षें पूर्ण झालीं नाहींत असें बुवांनीं सांगितलें असतां चांद्रमानाप्रमाणें काल पूर्ण झाला असल्याचें देव म्हणाले. नंतर निघण्याची तयारी केली. 'देव व कुटुंब बरोबर घ्यावें' असें देवाचें पुनः सांगणें झालें. बुवांनीं घरीं जाऊन मातोश्रींना वंदन केलें व देवाची आज्ञा झाल्यानें येथून आपण आतां निघणार असल्याचें सांगितलें. त्या वेळींही मातोश्री कांहीं वेडेंवांकडें बोलल्या. नंतर कुटुंबाला येणार असल्यास चल असें म्हणतांच अन्नपूर्णाबाईही निघाल्या. 'अंगावर काय असेल तें काढून ठेवावें, एका मंगळसूत्रावांचून दुसरें कांहीं नको' असें बुवांनीं सांगतांच अन्नपूर्णाबाईनीं नाकांतील एक लहान नथ व कानांतीलही एक लहान बुगडीजोड काढून ठेवला. बुवांनीं दोन मूर्ति, पंचायतनाचा संपुष्ट व एक तांब्या इतकें बरोबर घेतलें. कुटुंबाजवळ एक धोतर व एक लुगडें इतकेंच सामान होतें. सर्व मंडळी पोंचविणेस निघाली. त्यांना आपलें येथें कांहीं नाहीं असें बुवांनीं सांगितलें. 'निर्मानमोहा जितसंगदोषः' इत्यादि भगवद्वचनाप्रमाणें झालेलें हें चरित्र आहे. आकरा वाजण्याचे सुमारास सावंतवाडीस उकिडवे यांचे दत्तमंदिरांत दोघंही पतिपत्नी येऊन पोंचलीं. अन्नपूर्णाबाई नारोपंतांच्या घरीं जेवणास गेल्या. इकडे बुवांनीं नियमाप्रमाणें भिक्षा आणली व स्वयंपाक करून भोजन केलें. सबनीस, आणावकर वगैरे

मंडळी भेटण्यास आली होती. नारोपंतांनीं देव ठेवण्याकरितां एक व्यवस्थित करंडा कांखेला लावतां येईल असा बुवांना करून दिला. तसेंच त्यांच्या आईनें अन्नपूर्णाबाईंना एक मुकटा व एक तांब्या आग्रहानें दिला. नंतर सायंकाळचे वेळीं बुवा पत्नीसह वाडीस जाण्याकरितां निघाले. त्यावेळीं गेल्यावर मात्र पुनः या भागांत त्यांचें येणें कधींच झालें नाहीं. शके १८११ पौष मासांत बुवांनीं माणगांव सोडलें. रस्त्यानें जातांना मध्यें कांहीं बैलगाडया लागल्या. त्या बाजूनें चालेनात तेंव्हां देवाच्या गणांनीं त्यांपैकीं एक गाडी उचलून दूर फेकून दिली. ती गाडी मोडली. त्या गाडीवानाला लागलें. तें पाहून बुवांना वाईट वाटलें आणि वाडीस गेल्याबरोबर देवाचे गण देवाचे ताब्यांत देण्याचें त्यांनीं ठरविलें. नंतर दोघेही नरसोबाचेवाडीस पोंचले. दत्तदर्शनानंतर नारायणस्वामींचे धर्मशाळेंत कुटुंबाला ठेवून बुवा श्रीमौनीस्वामी व श्रीगोविंदस्वामी यांचे दर्शनार्थ गेले व दोघांनाही साष्टांग वंदन करून इकडे येण्याबद्दल देवाची आज्ञा झाल्याचें त्यांना कळविलें. कोरान्न भिक्षा रोज मागून आणावी. तांब्यांत तांदूळ व वस्त्रांत जोंधळें घ्यावेत. एक वर्षभर वाडींत राहाण्याबद्दल बुवांना देवांनीं सांगितलें होतें. श्रीगोविंदस्वामींनीं आपल्या जवळचा शाळिग्राम व उपनिषदांच्या पोथ्या बुवांना देण्याचा आपला मानस कळविला. पण सध्यांची अडचण दूर झाल्यावर घेण्याचें बुवांनीं सांगितलें. पुढें लवकरच अन्नपूर्णाबाई गोखल्यांच्या ओरींत प्रसूत झाल्या व त्यांना मुलगा झाला. बुवांना ही वार्ता समजतांच जातकर्म करण्याकरितां ते आले पण पुत्र मृत झाल्याचें समजतांच तें सर्व राहिलें. बाळंतपण दुर्गा मावशीनेंच केलें. पण कांहींतरी वांकडें बोलण्याची तिला संवय होती. 'माणगांवला आईला त्रास दिला, आतां मला येथें त्रास देण्यास आला आहे. यांचे कष्ट कोणीं करावे!' अशा तऱ्हेनें दुर्गामावशी बोलत असत. पुढें कांहीं दिवसांनीं बुवा सहकुटुंब

ब्रह्मानंदाचे माडीवर राहूं लागले. त्या ठिकाणीं अतिथिसत्कारपूर्वक उत्तम गृहस्थाश्रम केला.

असें कांहीं दिवस गेल्यावर गोविंदस्वामींचा समाधिकाळ जवळ आला. त्यांनीं बुवांना बोलावून दशोपनिषदं सांगितलीं व त्या पोथ्या आणि शाळिग्राम त्यांना दिला. नंतर गोविंदस्वामी आजारी पडले. एकदां गोविंदस्वामीनीं आपणांस मनन ऐकवावें अशी इच्छा दर्शविली. त्यांचेंच पुस्तक घेऊन बुवा मनन वाचूं लागले. त्यावेळीं त्यांतील रहस्यार्थ गोविंदस्वामीनीं बुवांना समजावून दिला व पूर्ण आशीर्वाद दिला. बुवांनींही अशा ब्रह्मनिष्ठ गुरूंना साष्टांग नमस्कार घालून आपली गुरुनिष्ठा व्यक्त केली. गोविंदस्वामींच्या समाधीच्या पूर्व दिवशीं बुवांना दृष्टांत झाला कीं, 'उद्यां स्वामी देह सोडणार.' तेव्हांपासून बुवा त्यांचे जवळ बसून राहिले. दुसरे दिवशीं गोविंदस्वामींचें निर्याण झालें. त्यावेळीं मौनीस्वामीसारख्या जीवन्मुक्त पुरुषांनाही वाईट वाटलें. नंतर यथाशास्त्र सर्व कर्म करून कृष्णाबाईच्या डोहांत गोविंदस्वामींचा देह विसर्जन केला. शेवटीं मौनीस्वामींच्या आज्ञेप्रमाणें बुवांच्या हस्तेंच त्यांचा समाराधनाविधि झाला.

वाडीस असतांना बुवांची इच्छा संन्यास घेण्याची होती. पण अद्यापि एक वर्ष अवकाश असल्याबद्दल देवांचें सांगणें झालें. गोविंदस्वामींनींही तसेंच सांगितलें होतें. वाडीस एके दिवशीं मौनीस्वामी बुवांचेकडे येऊन सकाळचे वेळीं म्हणाले, 'बुवा! आज कोणी स्वामी भिक्षेस तुमचेकडे येणार आहेत कीं नाहींत?' बुवा म्हणाले 'आज कोणास सांगितलेलें नाहीं.' तेव्हां मौनीस्वामी म्हणाले, 'आज सर्वच स्वामी तुमचेकडे भिक्षेस येणार आहेत. स्वयंपाक लवकर करा.' लगेच बुवांनीं भिक्षा मागून आणली. स्वयंपाक तयार झाला. इतक्यांत पुजारी मंडळींना

अशौच आल्यामुळें सर्वच स्वामी बुवांचेकडेच त्या दिवशीं भिक्षेस आले. त्या वेळीं मौनीस्वामींच्या बोलण्याचा अर्थ बुवांचे लक्षांत आला.

कांहीं दिवसांनीं वाडी सोडून उत्तर दिशेस जाण्याची बुवांना आज्ञा झाली. ही गोष्ट पुजारी मंडळींना समजताच त्यांनीं बुवांना न जाण्याबद्दल पुष्कळ सांगून पाहिलें. पण देवाच्या आज्ञेबाहेर आपणांस जातां येत नाहीं असें बुवांनीं सांगितलें. शेवटीं सर्व मंडळींनीं मौनीस्वामींचेकडे जाऊन, बुवांना आपण जाऊं देऊं नका अशी विनंति केली. त्यांनीं मंडळींचे समाधानार्थ 'बरें तर जाऊं देत नाहीं' असें सर्वांना सांगितलें. निघण्याची तयारी झाल्यावर मौनीस्वामींचे दर्शनास बुवा गेले तेव्हां मौनीस्वामींनीं विचारलें, 'बुवा ! कोठें जाणार?' बुवा म्हणाले, 'कोल्हापुरास जाणार.' तेव्हां स्वामींनीं सांगितलें कीं 'बरें तर कोल्हापुरीं दोन दिवसांपेक्षां जास्ती राहूं नका.' हें ऐकून बुवांना, स्वामींच्या मुखानें ही देवाची आज्ञा झाली असें वाटलें. कारण त्यांनीं पुनः परत वाडीस या असें कांहीं सांगितलें नव्हतें. नंतर देवाची प्रार्थना करून, वंदन करून बुवा वाडीहून निघाले व हळूहळू कोल्हापुरास पंचगंगेच्या घाटावर येऊन पोंचले. अन्नपूर्णाबाई बरोबर होत्याच. त्यांना तेथील प्रसिद्ध सत्पुरुष कुंभारस्वामी यांच्या दर्शनाची इच्छा झाली. इतक्यांत कुंभारस्वामीच पळत पळत तेथें आले. त्यांनीं अन्नपूर्णाबाईच्या हातांतील तांब्या घेऊन पंचगंगेवर जाऊन पाणी प्राशन केलें व परत तो तांब्या त्यांना देऊन पळत पळत आले तसें निघून गेले. नंतर महालक्ष्मीचें दर्शन घेऊन बुवांनीं तेथें दोन दिवस मुक्काम केला. तेथून पुढें भिलवडीस भुवनेश्वरीचें दर्शन घेऊन नंतर औदुंबरीं श्रीदत्तपादुकांचे दर्शनार्थ गेले व तेथून पंढरपुरी येऊन पोंचले.

पांडुरंगाचें दर्शन घेऊन बाहेर पडल्यावर एक ब्राह्मण बुवांना प्रसाद म्हणून डाळें देऊं लागला. पण बुवांनीं तें घेण्याचें नाकारलें. शेवटीं

'तो प्रसाद आहे. बांधून ठेवावा' असें कुटुंबाचें म्हणणें ऐकून त्याप्रमाणें तें डाळें घेऊन एका फडक्यांत बांधून ठेवलें. रात्रीं पांडुरंगांनीं विचारलें कीं, 'तुम्ही प्रसाद कां घेतला नाहीं?' बुवा म्हणाले, 'आपण बाजारचें भाजलेलें डाळें खात नाहीं.' 'बरें खाऊं नका' असें सांगून ते ब्राह्मण-स्वरूपी पांडुरंग अदृश्य झाले. बुवा जागे होऊन पाहतात तों आपण सकाळीं डाळें बांधून ठेवलेली गाठोडी गेली.

पंढरपुराहून पत्नीसह बुवा बार्शीस येऊन त्यांनीं अंबरीषवरदाचें दर्शन घेतलें. तेथें माणगांवचेच राहणारे दत्तूशास्त्री साधले यांचेकडे बुवांचा तीन दिवस मुक्काम होता. दत्तूशास्त्रींनीं बुवांना सहा रुपये दिले, पण तें बुवांनीं घेतले नाहींत. शेवटीं बुवा बाहेर गेल्याचें पाहून ते रुपये दत्तू-शास्त्रींनीं मुकाट्यानें देवाचे करंड्यांत टाकले. बुवांनीं बाहेरून येतांच सांगितलें कीं आमच्या देवाला आतां द्रव्यसंग्रह करावा असें वाटूं लागलें आहे. हें ऐकल्याबरोबर दत्तूशास्त्रींना फारच आश्चर्य वाटलें.

बार्शीवरून निघून हळूहळू बुवांनीं गोदातीरीं गंगाखेड येथें येऊन मुक्काम केला. तेथें कांहीं दिवस राहणें झालें. पुढें एके दिवशीं बुवांना असा दृष्टान्त झाला कीं, 'आजपासून चौथे दिवशीं तुम्हांला दोघांनाही नेण्याकरितां आम्ही येऊं.' हें ऐकून बुवा म्हणाले, 'आपणांस संन्यास घ्यावयाचा असल्यानें आपण येणार नाहीं. तिला वाटल्यास न्या. आपली हरकत नाहीं.' नंतर अन्नपूर्णा-बाईंना थोडा ताप आला व महामारीचा उपद्रव सुरू झाला. त्या वेळीं त्यांचीं वस्त्रें धुणें, त्यांना नेसविणें वगैरे सर्व कामें बुवांनींच केलीं. त्याच आजारांत शके १८१३ वैशाख वद्य १४ शुक्रवारीं दुपारीं त्या अत्यंत पुण्यवान् साध्वीचा आत्मा अनंतांत विलीन झाला. त्या वेळीं बुवा सर्व बंधनांतून मुक्त झाले. त्या वेळचें त्यांचें पत्र असें आहे—"गंगा-

खेड. श्रींचे आज्ञेनें उत्तरखंडी जाणें होत असतां गोदावरीतीरीं वैशाख वद्य १४ शुक्रवार दुपारीं सौभाग्यवतीला देवाज्ञा झाली. क्रिया करून नंतर उत्तरपंथीं जाणें होईल. चि. दत्तु व भालु यांस वरील मजकूर प्रविष्ट व्हावा. इहपर भयानें सत्कालक्षेप करावा. मातोश्री आईस मानसिक वंदन असावें. यावर आतां भेट होणें प्रारब्धाधीन आहे. परंतु सदैव चरणकमल हृदयीं ठेवलें आहे. तेथील सर्व इष्ट स्पृष्ट कृतोपकार मंडळींचें स्मरण आहे. हा मजकूर ती. बाबाजीपंत गोडे यांस प्रविष्ट व्हावा. ”

पत्नीचा विधि झाल्यावर सहावे दिवशीं अशौचांतच रात्रीं एक रक्तवस्त्र नेसलेली विधवा बाई बुवांचे स्वप्नांत आली व तिनें बुवा शिवूं नको म्हणत असतां त्यांच्या गुडघ्यांचेवर घट्ट धरून मी तुम्हांला घेऊन जाणार असें बुवांना म्हणाली. बुवा जागे झाले व आतां आपलीही दशा बायकोप्रमाणेंच होणार असें पाहून त्यांना वाईट वाटलें. त्यांनीं त्या वेळीं देवाची निंदा करण्यास आरंभ केला—‘ आजपर्यंत तीन वेळां संन्यासाची इच्छा व्यक्त केली असतां ती पुरी होऊं दिली नाहीं. आणि आतां अशौच असतांना मृत्यु यावा हें देवाला शोभतें काय? देवाची यत्किंचितही आज्ञा आजपर्यंत मोडली नाहीं. आणि देवानें मात्र अशा ऐन वेळीं उपेक्षा करून आपला घात करणें चांगलें आहे काय? देव लबाड आहे असें मौनीस्वामी म्हणतात तें खरें आहे. कांहीं झालें तरी संन्यास घेतल्यावांचून आपण देह सोडणार नाहीं ’ असें बुवांनीं देवास सांगितलें. बाळाचा प्रेमळ हट्ट माता कां पुरविणार नाहीं? बुवांचा त्या वेळीं अपमृत्यु टळला. पण त्या बाईनें जेथें स्पर्श केला होता त्या जागेवर मात्र गजकर्णाप्रमाणें एक चट्टा पडला.

गंगाखेड मुक्कामीं बुवांच्या पत्नीचें देहावसान झाल्याचें वृत्त मागे दिलेंच आहे. त्यानंतर तेरा दिवसपर्यंत पत्नीचें सर्व और्ध्वदेहिक यथा-

विधि केलें आणि लगेच चौदाव्या दिवशीं संन्यासाश्रम घेतला. रात्रीं श्रीदत्तप्रभूंनीं श्रीगोविंदस्वामींच्या रूपानें स्वप्नांत येऊन प्रणवाचा उपदेश करून त्याचा जप करण्यास सांगितलें व यापुढें माधुकरीचेंच अन्न घ्यावें, मठभिक्षा नको असें सांगितलें. 'अनाश्रमी न तिष्ठेत' या वचनाप्रमाणें गृहस्थाश्रम संपल्याबरोबर संन्यास झाला हें विशेष आहे. दुसरे दिवशीं गोदावरीच्या तीरावर जाऊन, सर्व ब्राह्मण मंडळींना बोलावून प्रायश्चित्ताचा विधि केला. स्नान झाल्यावर, एखादे स्वामी जर या वेळीं प्रेषोच्चार करविण्याकरितां असते तर बरें झालें असतें असें सर्वांना वाटलें. सर्वांच्या समक्ष एकदा प्रेषोच्चार होणें बरें असें बुवांनाही वाटलें. इतक्यांत नदीपलीकडून अकस्मात् एक संन्यासी आले आणि त्यांनीं बुवांचेकडून प्रेषोच्चार करवून घेऊन संन्यास दिला. आतां पूर्वीचें बुवा हें नांव गेलें. यापुढें महाराज याच नांवानें उल्लेख करणें बरें. श्रीमहाराज सर्व विधि आटोपून गांवांत आले. इतक्यांत स्मरण झाल्यामुळें त्या स्वामींना भिक्षेस बोलविण्याकरितां मंडळी गेली असतां तेथें कोणीच नसल्याचें पाहून मंडळी विस्मयचकित झाली. श्रीमहाराजांना मात्र वाईट वाटलें. त्या दिवशीं ब्राह्मण मंडळींच्या आग्रहामुळें माधुकरी न आणतां तेथेंच भिक्षा केली. त्यामुळें अतिसाराचा उपद्रव सुरू झाला. मंडळींनीं देवांची प्रार्थना केल्यानंतर तो थांबला.

उज्जयिनी येथें नारायणानंदसरस्वती नांवाचे स्वामी आहेत. त्यांचेकडे जाऊन दंड घ्यावा अशी श्रीमहाराजांना देवांची आज्ञा झाली. नारायणानंदसरस्वती हे कारंजा गांवीं होऊन गेलेले दत्तावतार श्रीनृसिंहसरस्वती यांचे वंशांतील शुक्लयजुर्वेदीय माध्यंदिन शाखेचे होते. हे समर्थ संप्रदायांतील होत. शेवटीं त्यांची समाधि चाफळ येथें श्रीरामप्रभूपुढें झाली. आपल्या गुरूंचा संप्रदाय लक्षांत घेऊन श्रीमहाराजही दासनवमीचा उत्सव करीत असत.

गंगाखेडहून प्रवास करीत करीत श्रीमहाराज वाशीमच्या जवळ सर-हद्दीवर आले. तेथें पोलीस ठाण्यांत श्रीमहाराजांना पोलिसांनीं बसवून ठेवलें. पुढें सोडीनात. संध्याकाळपर्यंत तेथें बसावें लागलें. सायंकाळीं वरिष्ठ अधिकारी तेथें सहज आला. त्यानें चौकशी केली. तेव्हां श्रीमहाराजांना निष्कारण त्रास दिल्याबद्दल त्यानें पोलीस लोकांची बरीच कानउघाडणी केली. नंतर त्या अधिकाऱ्यांचा राग शांत करून महाराज पुढें वाशीमला आले. तेथून चंद्र-ग्रहणानिमित्त महाराज उमरखेड येथें गेले. तेथील प्रसिद्ध सत्पुरुष गोचरस्वामी यांचे मठांत मुक्काम होता. त्या वेळीं गोचरस्वामी नुकतेच समाधिस्थ झाले होते. त्यांना आजारी असतांना संन्यास दिला. नंतर ते बरे झाले. पण त्यांनीं पूर्वी सहस्र ब्राह्मणभोजनाचा संकल्प केला होता. तो पूर्ण होण्याकरितां त्यांनीं पुढें कांहीं काळ असा नियम केला कीं, भिक्षेला बोलावण्याकरितां कोणी आल्यास त्याला सांगावयाचें कीं, 'बाबा! माझ्या बरोबर तूं अकरा ब्राह्मणांना भोजनास सांगशील तर आम्ही तुझे घरीं भिक्षेस येऊं.' असा त्यांनीं नियम केल्यामुळें लवकरच त्यांचा सहस्रभोजनाचा संकल्प पूर्ण झाला. गोमयानें प्रथम जमीन सारवून त्यावर भिक्षा वाढायची व ती गायीप्रमाणें मुखानें खायची. यामुळें यांना गोचरस्वामी असें लोक म्हणत. लोक दागिने देण्याचा नवस करीत व काम झाल्यावर दागिने, कांकणें वगैरे अंगावर आणून घालीत. यांचे गुरुबंधु तुकाराम महाराज येळेगांवकर हेही प्रसिद्ध सत्पुरुष होते.

श्रीमहाराज उमरखेडहून माहूर येथें गेले. तेथें श्रीरेणुकामाता, श्रीदत्त यांचें दर्शन घेऊन परतले. पुढें खांडवा, बढवाईवरून ओंकारेश्वरी येऊन धर्मशाळेंत मुक्काम केला. तेथें नवज्वराचा त्रास सुरू झाला. तरी

नसल्यामुळें चार पांच दिवसांनंतर एका ब्राह्मणाच्या आग्रहावरून त्याचे घरीं गेले. पुढें ४।५ दिवसांनीं घाम येऊन ताप निघाला. अशक्तता मात्र फारच झाली. एके दिवशीं ' चुकलों चुकलों. यापुढें राहणार नाहीं ' असें मोठ्यानें श्रीमहाराज बडबडूं लागले. लोकांना कांहीं कळेना. नंतर त्याचा खुलासा झाला. ब्राह्मणाचे घरीं अतिथीनें तीन दिवसांपेक्षां अधिक राहूं नये असा शास्त्रनियम असल्यामुळें देवांनीं तेथून निघन दुसरीकडे जाणेकरितां श्रीमहाराजांना शिक्षा केली. मग तेथून महाराज लगेच निघाले व हळूहळू मंडलेश्वरीं येऊन पोंचले. तेथें कैवल्याश्रम म्हणून अधिकारी स्वामी होते. त्यांनीं महाराजांना मी दंड देतों, असें सांगितल्यामुळें महाराज तेथें राहिले. पण रात्रीं ' माझी आज्ञा मोडतोस काय ? ' असें देवांचें सांगणें ऐकून तें कैवल्याश्रमांना सांगितलें व त्यांची अनुज्ञा घेऊन उज्जनीस जाण्यास निघाले.

मंडलेश्वराहून निघून त्यांनीं बलवाडा येथें मुक्काम केला. तेथें माधुकरी मागून आणली व ठाणेदाराच्या आग्रहावरून त्याचे घरीं भिक्षा सोडण्यास महाराज गेले. ठाणेदार मोठा भाविक मनुष्य होता. त्या वेळीं एक यात्रेकरू ब्राह्मणही जेवणास आला होता. त्या ब्राह्मणानें पात्रावर बसून आपोशन हातांत घेऊन त्या ठाणेदारास सांगितलें कीं, ' मला तुम्ही दोनशें ब्राह्मणांना पुरेल इतका शिरापुरीचा शिधा देण्याचें कबूल करा, तरच मी जेवण करीन, नाहींतर मी उठून जाईन. ' ती त्या ब्राह्मणाची वाणी ऐकून आतां हा ऐन दुपारचे वेळीं भरलेलें पात्र टाकून जाणार म्हणून ठाणेदार व त्याची पत्नी दोघेंही घाबरलीं. त्यानें दहा ब्राह्मणांचा शिधा देतों असें कबूल केलें तरीही तो ब्राह्मण आपला हेका सोडीना. शेवटीं ठाणेदारानें या धर्मसंकटांतून आपणांस सोडविण्याबद्दल महाराजांची प्रार्थना केली. तेव्हां महाराजांनीं त्या ब्राह्मणाला स्पष्ट सांगितलें कीं,

'तुम्ही अगोदर कांहीं न सांगतां ऐन वेळीं असा त्रागा करतां त
तुम्हांला आतां एकाही पानाचा शिधा मिळणार नाहीं. तुमच्यासारख्य
हेकेखोर, लोभी ब्राह्मणांना दान देण्याची शास्त्राची आज्ञा नाहीं. तुम्ह
पानावरून उठून गेला तरी यजमानास कांहीं दोष लागणार नाहीं. जेवा
बयाचें असेल तर मुकाट्यानें जेवून चला;' असें खरमरीत उत्तर मिळाल्याव
मग मात्र तो ब्राह्मण कांहीं गडबड न करतां मुकाटयानें जेवून निघू
गेला. महाराजांनीं आपणांस या संकटांतून वांचविल्याबद्दल ठाणेदारासह
आनंद झाला.

प्रवास करीत करीत अखेर महाराज उज्जनीस येऊन पोंचले. श्रीदत्त
मंदिरांत जाऊन नारायणस्वामींना वंदन करून आपलें येण्याचें कार
महाराजांना सांगितलें. 'आपले गुरु अनिरुद्धानंदसरस्वती येथेंच आहे
त्यांची आज्ञा झाल्यावर दंड देतों' असें नारायणस्वामी म्हणाले. मह
राजांनीं त्यांचेकडे जाऊन श्रीदत्तमहाराजांची दंडग्रहणाबद्दलची आज्ञ
कळविली. तेव्हां त्यांनीं नारायणस्वामींचेकडून महाराजांना विधीप्रमाणे
दंड देवविला आणि 'वासुदेवानंदसरस्वती' हें नांव ठेवलें. हेंच न
संन्यासग्रहणसमयीं महाराजांना देवांनीं सांगितलें होतें. त्या वेळीं स
संन्याशांना मठभिक्षा दिली आणि आपण माधुकरी मागण्याकरितां आज्ञ
घेण्यास गुरुस्वामींचेकडे गेले. त्यावर त्यांनीं सांगितलें कीं, 'आज
तुम्हीं दंडग्रहण केलें आहे, करितां आमच्याबरोबर येथेंच आज भिक्ष
करा.' 'देवाच्या आज्ञेविरुद्ध आपणांस तसें करतां येत नाहीं.' अ
महाराजांनीं सांगितलें. पण गुरुस्वामी ऐकेनात. 'तुम्ही ये
भिक्षा केली नाहीं तर आम्हीसुद्धां करणार नाहीं' असें त्यान
सांगितलें. त्यामुळें नाइलाजानें त्या दिवशीं महाराजांनीं तेथें सर्वां
बरोबर भिक्षा केली. पण लगेच महाराजांना सारख्या उलट्या हो
लागल्या. कांहींच उपाय चालेना. तें पाहून गुरुस्वामी घाबरले व त्यांन

देवाची प्रार्थना केली कीं, 'देवा! यांच्याप्रमाणें मीही आपला शिष्य आहें. आपणच माझ्याकडून यांना दंड देवविलात. करितां व्यवहारास अनुसरून यांना आज येथें भिक्षा करण्यास मींच सांगितलें. माझ्या अपराधाबद्दल यांना शिक्षा कां? लवकर यांच्या उलट्या बंद कराव्यात. यापुढें मात्र मी आपल्या आज्ञेविरुद्ध कांहींही सांगणार नाहीं.' याप्रमाणें गुरुस्वामींनीं प्रार्थना केल्यावर महाराजांच्या उलट्या थांबून त्यांना बरें वाटलें. महाराजांचे गुरु नारायणानंदसरस्वती, त्यांचे गुरु अनिरुद्धानंद-सरस्वती व त्यांचे गुरु अच्युतानंदसरस्वती अशी श्रीमहाराजांची गुरु-परंपरा आहे. नंतर कांहीं दिवस उज्जनीसच मुक्काम होता. पहिला चातुर्मास उज्जनीसच झाला. 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति' या उक्तीप्रमाणें जगत्कल्याणाकरितांच श्रीमहाराजांचा सर्व काळ गेला.

महाराजांनीं माणगांव सोडल्यानंतर तेथील देवस्थानचें महत्त्व कमी झालें. देवळांतील मूर्ति महाराजांनीं नेली होती त्या जागीं उत्सवमूर्ति ठेवून महाराजांचे बंधु हरीभट हे पूजाअर्चा करूं लागले. प्राप्ति विशेष नसल्यानें गुरुद्वादशी, दत्तजयंती वगैरे उत्सव थोडक्यांत दहापांच ब्राह्मण सांगून हरभटजी करीत असत. हरभटजीनें आपल्या हयातीपर्यंत हें अर्चनाचें काम चालविलें होतें. महाराजांच्या हाताखालीं ते तयार झाले असल्यानें सर्व कार्य व्यवस्थित करीत असत. ब्रह्मावर्तास महाराजांचा मुक्काम असतांना त्यांना भेटण्यास हरीभटजी गेले होते. त्यांना तेथेंच गंगातीरीं राहून देहाचें सार्थक करण्याबद्दल महाराजांनीं सांगितलें; पण प्रापंचिक ओढीमुळें ते परत माणगांवीं आले. पुढें त्यांच्या मातोश्री आजारी पडल्या. त्यांची स्मृति शेवटपर्यंत गेली नाहीं. अगदीं शेवटीं 'माझा अंतकाळ समीप आला आहे. सर्वांचीं जेवणें झालीं ना!' असें त्या माउलीनें विचारलें. हरीभटजींनीं मातेचें मस्तक मांडीवर घेतलें. नंतर हरिस्मरण करीत ती परमपवित्र माता उत्तम लोकाला गेली. मातेचें

उत्तरकार्य हरभटजींनींच केलें. पुढें हरभटजीही कांहीं दिवसांनीं वारले. त्यांची पत्नी त्यांचे पूर्वींच गेली होती. एक मुलगा ४।५ वर्षांचा होता, तोही पुढें १।२ वर्षांनीं वारला. नंतर हरभटजींचे जामात दत्तोबा धूपकर हे माणगांवीं येऊन राहिले. त्यांनीं निरंतर देवस्थानची व्यवस्था चालावी या उद्देशानें माणगांव देवस्थानचें विश्वस्तपत्र करून ठेवलें. श्रीमंत महाराणीसाहेब सौ. इंदिराबाई होळकर इंदूर यांचेकडून माणगांवीं देवास वार्षिक कांहीं स्थावर उत्पन्नही येत असून दरमहा कांहीं मदत होत असते. धूपकर असतांना त्यांचेकडे देऊळ बांधण्याकरितां सौ. राणीसाहेबांनीं तीन हजार रुपये दिले होते. त्यांतून देवळाचें काम पायापर्यंत आलें होतें. धूपकरांचे पश्चात् पंचमंडळी व्यवस्था पाहत होती. महाराजांचें घर मोडकळीस आल्यामुळें धूपकरांची मंडळी व देव धर्मशाळेंत होते. सौ. राणीसाहेबांनीं पुनः सहा हजार रुपये खर्च करून माणगांवीं देवळाचें काम पुरें केलें व शके १८६० वैशाख शुद्ध १३ स श्रीक्षेत्र काशी येथील श्रीब्रह्मानंदसरस्वती यांचेकडून देवळांत श्रीदत्त, श्रीशंकराचार्य, श्रीसरस्वती व श्रीगुरुमहाराज यांच्या मूर्ति बसविल्या आहेत. महाराजांच्या पूर्वीच्या घराच्या जागीं सौ. राणीसाहेबांनीं उत्तम दुमजली घर बांधून दिलें आहे. पूजा करणाऱ्यानें त्या घरांत नैवेद्य वैश्वदेव करून राहावें व देवाची नित्य पूजा करावी असा सौ. राणीसाहेबांचा हेतु आहे. याप्रमाणें श्रीमहाराजांचें चरित्राचा पूर्वार्ध येथें समाप्त झाला.

श्रीगुरुचरणारविंदार्पणमस्तु

श्रीगुरुदेवदत्त

# उत्तरार्ध

## श्रीक्षेत्र उज्जनी चातुर्मास १ शके १८१३

उज्जनी येथें श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनें श्रीनारायणानंदसरस्वतीस्वामींचे कडून महाराजांनीं दंड ग्रहण केला. सर्वत्र वर्णाश्रमलोप झालेला आहे तरी सर्व भरतखंडांत पायींच संचार करून सर्व लोकांना उपदेश करावा व धर्ममार्गाची स्थापना करावी अशी श्रीदत्तप्रभूंची आज्ञा महाराजांना झाली. त्याप्रमाणें महाराजांचें वागणें सुरू झालें. दंडग्रहण झाल्याबरोबर पहिला चातुर्मास महाराजांचा उज्जनी येथेंच झाला. गुरुस्वामींच्या आग्रहानें अन्यत्र कोठें न जातां तेथेंच राहिले. महाराजांचा कार्यक्रम नित्याचा पुढीलप्रमाणें होता– पहांटे उठून शौचमुखमार्जन केल्यावर स्नान व्हावयाचें. स्नान नेहमीं त्रिकाल होत असे. नंतर दंडतर्पण, प्रणवजप झाल्यावर दत्तमूर्तीस स्नान घालून भस्म लावावें. संन्याशांना फुलें, तुळशी तोडतां येत नसल्यानें कोणीं आणून दिल्यास दत्तमूर्तीस फुलें वगैरे उपचार मिळत. नाहींतर नुसतें भस्मावरच भागवावें लागे. कोणी विद्यार्थी असल्यास त्याला वेद, शास्त्र आवश्यक तो पाठ द्यावयाचा. दुपारीं पुनः स्नानादि नित्यकर्म झाल्यावर दक्षिणी ब्राह्मणांचे घरून भिक्षा आणून तें सर्व अन्न एकत्र करून खावें. तीनच घरीं भिक्षा घ्यावयाची असा नियम होता. दुपारीं कोणी कांहीं शास्त्रीय विषय समजावून घेणेकरितां येत. त्या वेळीं त्यांना तो विषय समजावून सांगून त्यांचें समाधान करावें व संध्याकाळचें अनुष्ठान झाल्यावर पुराण सांगावयाचें. महाराजांची प्रवचनशैली उत्कृष्ट होती. सर्व विषय सप्रमाण सोपपत्तिक पटवून देण्याची हातोटी उत्तम होती. प्रवचनांतून वेद-

वाक्यांचा प्रसंगानें नुसता अर्थ सांगत असत. प्रत्यक्ष वेद्वाक्यांचा उच्चार पुराणादिसमयीं करूं नये. तसें केल्यास वेदपुरुषाचा शाप होतो असें महाराजांचें सांगणें असे.

संग्रही वृत्ती महाराजांची पूर्वीपासूनच नव्हती. लंगोट्या ४, छाट्या २, दंड व लाकडी किंवा वेळवाचा कमंडलू, एखादे वेळीं धाबळी, उपनिषदांची पोथी, पंचायतनाचा संपुष्ट, दोन दत्तमूर्ति व पाणी काढण्याची दोरी इतकेच जिन्नस बरोबर असावयाचे. याशिवाय कसलाच संग्रह नाहीं. सेवा कोणाकडूनही घ्यावयाची नाहीं. वस्त्रें धुणें वगैरे स्वतःचीं कामें स्वतःच करावयाचीं. कोणालाही स्पर्श करावयाचा नाहीं. स्पर्श झाल्यास किंवा शौचास जाऊन आल्यास स्नान करावयाचें. पायांत कांहीं न घालतां पायांनींच सर्व प्रवास करावयाचा. सर्व सिद्धी प्रसन्न असतांही त्यांचा उपयोग कधींच करावयाचा नाहीं. याप्रमाणें अत्यंत कडकपणानें शास्त्रीय नियमांचें पालन महाराज करीत असत, त्यामुळें त्यांच्या सदुपदेशाचा जनतेवर तत्काल परिणाम होत असे. ‘ आधीं केलें मग सांगितलें ’ असें महाराजांचें वागणें असे.

भाद्रपद पौर्णिमेस चातुर्मास संपल्यावर महाराज उज्जनीहून निघून महत्पुरास आले. तेथें कांहीं मुक्काम झाला. दक्षिणी ब्राह्मणांवांचून इतर कोणाकडेही भिक्षा घ्यावयाची नाहीं असा महाराजांचा नियम असल्यामुळें फार त्रास पडत असे. तशी वस्ती नसल्यास उपवासाचा प्रसंग येई. पण दहा दहा कोसांचा प्रवास उपोषण पडलें तरी व्हावयाचाच, तो कधीं चुकला नाहीं. मुक्काम होईल त्या ठिकाणीं सर्व लोकांना सन्मार्गाचा उपदेश देवांचे आज्ञेनुसार चालूच होता. महाराजांची शांति, विद्या व तप हें पाहून प्रत्येक गांवच्या मंडळींना महाराजांनीं आपल्या गांवीं राहावें असें वाटत असे व त्याप्रमाणें ते लोक महाराजांना

तसा आग्रहसुद्धां करीत असत. पण चातुर्मासानिमित्त फक्त एखाद्या तीर्थक्षेत्रांत महाराजांचा मुक्काम होई. इतर वेळीं तीन दिवसांपेक्षां कोठेंही होत नसे. मंडळींचें विशेष प्रेम, श्रद्धा, भक्ति पाहून एखादे स्थळीं अधिकही मुक्काम कदाचित् होत असे. त्याप्रमाणें महत्पुरांत महाराजांचें वास्तव्य कांहीं दिवस झालें. तेथें एक कालीभक्त ब्राह्मण काळू मैया या नांवाचा राहात असे. पूर्वी आचारधर्माप्रमाणें वागून अनेक वर्षे त्यानें चांगली तपश्चर्या केली. शेवटीं तत्त्वज्ञानसंपन्न असा तो झाला. एकदा ग्वाल्हेरच्या शिंदे सरकारनीं श्रावण मासांत एकलक्ष ब्राह्मणभोजन घातलें, त्यावेळीं तेथें जाऊन त्या पंक्तींतील उच्छिष्ट पात्रांतील अन्न काळूमैयानें खाल्लें व त्या वेळेपासून दगड मारणें, शिव्या देणें, कोणीं ब्राह्मणानें भिक्षा दिली तर ती टाकून देऊन दुसरीकडे कोठेंही भिक्षा घेणें, असें वेड्यासारखें वर्तन काळू मैयाचें सुरू झालें. त्यामुळें अज्ञानी लोक त्याला वेडा समजून त्याची थट्टा करूं लागले. महाराज तेथें गेल्यावर त्यांनीं हा प्रकार पाहिला व काळू मैयांची खरी योग्यता जाणून सर्व लोकांना सांगितलें कीं, ' हे मोठे सिद्ध पुरुष आहेत यांची जर तुम्ही थट्टा कराल तर तुमचा सर्वस्वीं नाश होईल.' याप्रमाणें प्रत्यक्ष महाराजांनीं सांगितल्यावर मग मात्र लोकांना भीति वाटून ते काळू मैयाबरोबर आदरानें वागूं लागले. काळू मैयांची सेवा एकनिष्ठेनें करणारा असा तेथें रामजी नांवाचा ब्राह्मण होता. तो त्यांना स्नान घालून जेवण घालीत असे. वस्त्रें धुणें, कोठें दूर गेल्यास परत आणून आपल्या स्थानावर निजविणें अशी त्यांची सर्व बरदास्त त्यानें ठेवली होती. त्यानें एक चांगली मोठी काठी काळू मैयांना हातांत धरण्यास दिली होती. एकदां रामजीचे सांप्रदायिक गुरु त्या गांवीं आले व रामजीला भेटण्यास काळूमैयांचे स्थानीं आले. त्या वेळीं त्या गुरूंचे समक्ष काळूमैयांनीं आपल्या हातांतील काठीनें रामजीस अतीशय बेदम मारलें. ती त्यांची

उग्र वृत्ति पाहून ते रामजीचे गुरु तर त्या ठिकाणीं क्षणभरसुद्धां राहिले नाहींत. शेवटीं काठीचे तुकडे करून काळूमैयांनीं रामजीचे अंगावर फेकून देऊन सांगितलें कीं, 'ले तेरी लकडी' असें त्याला सांगून कोठें निघून गेले. रामजीनें लगेच उठून 'आपणांस कांहींही माराचा त्रास न होतां ते काठीचे प्रहार म्हणजे फुलांसारखे मृदु लागले,' असा आपला अनुभव लोकांना सांगितला आणि त्या दिवसापासून तो जीवन्मुक्ता-सारखा निश्चिंत वृत्तींत राहूं लागला. गुरुकृपेचें फळ त्याला मिळालें. काळूमैयांनीं देहत्यागापूर्वी ४० दिवस ती उन्मत्तवृत्ति सोडून दिली व नेहमीं ध्यानस्थ बसूं लागले. शके १८२२ मध्यें ते देहबंधनांतून मुक्त झाले.

महत्पुराहून निघून महाराज सारंगपूर या गांवीं आले. लोकांच्या आग्रहामुळें त्यांना कांहीं दिवस तेथें राहावें लागलें. अनेक लोक दर्श-नास येत. महाराजांचे कृपेनें सर्वांच्या कामना पर्ण होत असत. त्या गांवांत एक केशवराव नांवाचा नास्तिक मनुष्य देवीडॉक्टर होता. त्यानें नेहमीं महाराजांची व त्यांचेकडे येणाऱ्या लोकांची निंदा करावी. स्नान संध्या, नैवेद्य वैश्वदेव वगैरे आचारधर्म त्यानें सोडून दिले होते. तो एकदां महाराजांना आपल्या घरीं भिक्षेचें निमंत्रण सांगण्याकरितां आला. तेथें नित्याप्रमाणें पुष्कळ मंडळी बसली होती. केशवरावानें आपला मनोदय महाराजांना कळविला. महाराजांनीं त्याचीं एकंदर चिन्हें पाहून त्याला स्पष्ट सांगितलें कीं, 'तूं ब्राह्मणासारखा दिसत सुद्धां नाहींस, तुझ्या घरीं नैवेद्य वैश्वदेव कांहीं होत नाहीं, म्हणून तुझे घरीं आपण भिक्षेकरितां येणार नाहीं.' हें महाराजांचें बोलणें ऐकून केशवराव त्यांना म्हणाला कीं, 'आपण पुण्याचे कऱ्हाडे ब्राह्मण आहोंत. आपल्या घरीं नैवेद्य वैश्वदेव नाहीं, कोणतेंच ब्राह्मणाचें कर्म मी करीत नाहीं, तथापि आपण म्हणाल तर उद्यां कोणाकडून तरी नैवेद्य वैश्वदेव

करवीन.' हे त्याचे उद्गार ऐकल्याबरोबर महाराज अतिशय संतापले व त्याला म्हणाले, 'तुझ्यासारख्याचें तोंड सुद्धां आपण पाहाणार नाहीं, मग जेवण तर दूरच.'

महाराजांनीं सर्वांसमक्ष केलेली निर्भर्त्सना केशवरावाला सहन झाली नाहीं. तो रागारागानें घरीं निघून गेला व आईला त्यानें घडलेली हकीकत सांगितली; तेव्हां आई उलट त्याच्यावरच रागावून बोलली कीं, 'महाराज म्हणाले तें योग्य आहे. आपल्या घरीं महाराज भिक्षेला येणार नाहींत तर आम्ही ब्राह्मण कसले!' याप्रमाणें उलट आई आपणांवरच रागावलेली पाहून केशवरावास वाईट वाटलें. इकडे महाराजांना मंडळी म्हणाली कीं, 'महाराज! केशवराव फार दुष्ट मनुष्य आहे, तो रागानें निघून गेला. आतां तो कांहीं परत येणार नाहीं.' तें ऐकून महाराज म्हणाले कीं, 'थांबा काय होतें तें पहा. केशवराव परत आलाच पाहिजे.' इकडे आईही रागावल्यावर केशवरावास पश्चात्ताप झाला आणि महाराजांना आपल्या घरीं भिक्षेला कसेंही करून आणावयाचेंच असा निश्चय करून पुनः महाराजांचेकडे आला. महाराजांना साष्टांग नमस्कार घालून त्यानें त्यांची क्षमा मागितली. आणि 'मी महादोषी आहें, आपण दया करून मला पदरांत घ्या. यापुढें आपण सांगाल तसें मी वागेन,' असें अत्यंत नम्रतापूर्वक काकुळतीनें त्यानें सांगितलें. तो पुनः परत आलेला पाहून सर्व मंडळींना आश्चर्य वाटलें. इतक्यांत त्याची आई तेथें आली आणि तिनें महाराजांना विनंती केली कीं, 'आपण माझ्या मुलाला ब्रह्मकर्म शिकवावें व तो शिकून तसें वागूं लागला म्हणजे नंतर आपण आमचे घरीं भिक्षेस यावें.' ती गोष्ट महाराजांनीं कबूल केली. नंतर केशवरावाला महाराजांनीं स्वतः संध्या, पूजा, वैश्वदेव इत्यादि नित्य ब्रह्मकर्म शिकविलें व त्याप्रमाणें तो वागूं लागल्यावर महाराज त्याचे घरीं भिक्षेस गेले. पुढें केशवराव अत्यंत आस्तिक

होऊन नित्यकर्म झाल्याशिवाय पाणीसुद्धां पिईनासा झाला. सत्संगतीचा प्रभाव कसा असतो हें या उदाहरणावरून स्पष्ट लक्षांत येईल. केशवराव मूळचे पुण्याचे राहाणारे. त्यांचें लग्न झालें होतें. नोकरीकरितां एकटेच ते सारंगपुरास आले व तेथें आपलें लग्न झालें नाहीं असें त्यानें सर्वांस सांगितलें. तेथें मामलेदारांच्या घरीं केशवरावांचा मुक्काम होता. केशवरावांची स्त्री वयांत आल्यावर त्यांचा शोध काढून एका बाईच्या सोबतीनें सारंगपुरास येऊन पोंचली. तिला पाहून केशवराव रागावला व मी तुला वागविणार नाहीं असें त्यानें तिला सांगितलें. नंतर मामलेदारांनीं तिला आपलेकडे ठेवून घेतलें व कांहीं दिवसांनीं केशवरावांची समजूत करून त्यांनीं तिला केशवरावांच्या स्वाधीन केलें. ती अत्यंत सुशील असल्यानें केशवराव थोड्याच दिवसांत तिच्याशीं प्रेमानें वागूं लागला. तिला कांहीं दिवसांनीं एक मुलगा झाला. तो आजानुबाहु असून सर्व गांवांतील मंडळींना प्रिय होता. तीन वर्षांपासूनच मनाचे श्लोक म्हणणें, आलेल्या याचकास भिक्षा घालणें इत्यादि सत्कर्मांकडे त्याचा स्वाभाविक ओढा होता. तो मुलगा पांच वर्षांचा झाला असतां एके दिवशीं त्या घरीं एक जटाधारी तपस्वी पुरुष भिक्षेकरितां आले. मुलानें भिक्षा घालतांच त्याला त्या योगी पुरुषानें विचारलें, ' क्यों बच्चा ! कहांतक प्रपंचमें रहनेका विचार है. ' हें ऐकून लगेच मुलानें सांगितलें कीं, 'मै कल आऊंगा.' हें ऐकून तो साधु निघून गेला. हें त्या दोघांचें संभाषण सर्वांबरोबर केशवरावानेंही ऐकलें; पण तिकडे त्यानें कांहीं लक्ष दिलें नाहीं. दुसरे दिवशीं मुलानें सकाळीं स्नान केल्यावर आईबापांचेकडून गांवांतील सर्व मंडळींना बोलावलें. सर्व मंडळी आल्यावर त्यांना ' प्रभूचें स्मरण नित्य ठेवून सन्मार्गानें वागा.' असें सांगून त्या मुलानें ' सदा सर्वदा योग तूझा घडावा ' हा श्लोक म्हणून व प्रभूंना एकदा नमस्कार करून सर्वांसमक्ष आपला देह सोडला. सर्वांना त्यावेळीं फार दुःख झालें; पण त्याच्या

आईनें मात्र दुःख न करतां अत्यंत शांतवृत्ति धारण केली होती. उलट तिनें सर्वांना सांगितलें कीं, 'जगांत कोणाचाही संबंध खरा नाहीं. ऋणानुबंध असेपर्यंतच संबंध असतो. मीही आणखी सहा महिन्यांनीं पंढरपुरीं हा देह ठेवणार आहें.' हें तिचें बोलणें ऐकून ती व तिचा मुलगा कोणीतरी पूर्वीचे योगभ्रष्ट असावेत असें सर्व लोकांना वाटलें. नंतर सर्व मंडळी आपापल्या घरीं गेली. सहा महिन्यांनीं तिनें पंढरपुरीं चलण्याबद्दल पतीला विनंति केली. नंतर तिला घेऊन केशवराव मामलेदारासह पंढरपुरास आले. एकादशीचे दिवशीं चंद्रभागेचें स्नान करून त्या पतिव्रता स्त्रीनें पांडुरंगाचें दर्शन घेतलें. नंतर आपल्या पतीस नमस्कार करून ती म्हणाली कीं, 'मी आज जाणार आहें. माझ्यापासून जरी आपला वंश वाढला नाहीं, तथापि मोरोपंतांच्या कुटुंबांतील एका मुलीबरोबर आपला विवाह होऊन तिच्यापासून आपला वंश वाढेल.' असें पतीस सांगून सर्वांचा निरोप घेऊन हरिस्मरणपूर्वक तिनें प्राण सोडला. नंतर तिचें सर्व क्रियाकर्मांतर करून केशवराव पुण्यास आले. मोरोपंतांना त्यांची बातमी कळतांच ते विवाहाचीं बोलणीं करण्याकरतां आले असतां केशवरावानें स्पष्ट नकार दिला व लग्न मोडण्याकरितां त्यानें अनेक प्रयत्न केले. तथापि प्रथम स्त्रीच्या सांगण्याप्रमाणें तो योग बलवत्तर असल्यानें त्या मुलीशीं केशवरावांचें लग्न शेवटीं झालें. पुढें सर्व मंडळी सारंगपुरास आली. अशा विलक्षण घटना घरांतच घडल्या तरीही केशवरावाचा नास्तिकपणा गेला नाहीं. पण वर वर्णन केल्याप्रमाणें महाराजांची संगति घडतांच तो पूर्णपणें नाहींसा झाला.

महाराजांचेजवळ दोन दत्तमूर्ति होत्या. एक कागलची माणगांवास ठेवली होती ती व दुसरी लहान प्रवासी मूर्ति. सारंगपुरचे राहाणारे गोविंदराव यांनीं त्या दोन मूर्तींपैकीं मोठी मूर्ति पूजेकरितां महाराजांचे जवळ मागितली. त्यावेळीं महाराजांनीं सांगितलें कीं, 'यांपैकीं कोणतीही

मूर्ति तुमच्या उपयोगी नाहीं. त्यांची कोठें तरी स्थापना करणेचा आपला मनोदय होता. पण देवांनीं सांगितलें कीं, ही मूर्ति जेथें जाईल त्या घराचा व गांवाचाही नाश होईल. म्हणून या मूर्ति कोणीही घेत नाहीं व आपणही कोणाला देत नाहीं.' असें महाराजांनीं सांगितलें तरी त्यांची आज्ञा मोडून ती मोठी मूर्ति गोविंदरावांनीं एक लहान देऊळ बांधून त्यांत नेऊन ठेवली. पुढें लवकरच त्यांचा एकुलता एक मुलगा वारला व पुढें ते स्वतः आजारी पडले. नंतर कांहीं वर्षांनीं गोविंदरावांना त्या मूर्तीनें स्वप्नांत येऊन सांगितलें कीं, मला बढवाई येथील श्रीवासुदेव दत्तमंदिरांत नेऊन पोंचीव. बढवाईचे दत्तमंदिरांतील ब्रह्मचारी लक्ष्मणबुवा यांनाही आपणांस सारंगपुराहून येथें घेऊन येण्याबद्दल दृष्टांत झाला होता. नंतर लक्ष्मणबुवांनीं सारंगपुराहून ती मूर्ति आणून नर्मदातीरीं बढवाईस दत्त-मंदिरांत नेऊन ठेवली. याप्रमाणें या मूर्तीची थोडक्यांत हकीकत आहे.

सारंगपुराहून बजरंगगडास जाण्याकरितां महाराज निघाले. रस्त्यांत एका गांवीं सारखा पाऊस लागल्यामुळें एका अग्निहोत्री बुवांच्या घरापुढील ओटयावर उतरले. महाराज येत असल्याबद्दल त्या अग्निहोत्री बुवांना सारंगपुराहून मंडळींनीं कळविलें होतें, त्या प्रमाणें ते वाट पाहातच होते. पण दैवयोग असा विचित्र कीं, महाराज येण्याचे ऐन वेळेसच अग्निहोत्रीबुवा अन्यत्र कांहीं कामाकरितां गेले. महाराज त्यांच्या कट्टयावर उतरले. थोडें भिजलेलें अंग पुसून सामान काढून तेथें ठेवलें. इतक्यांत त्यांना कट्टयावर बसलेले पाहून अग्निहोत्र्यांचा १७।१८ वर्षांचा मुलगा बाहेर आला व 'तुमच्याकरितां घर बांधलें नाहीं. कोणाच्या परवानगीनें येथें उतरला? आतांच्या आतां चालते व्हा, नाहींतर दंड-कमंडलू फेकून देईन' इत्यादि अद्वा-तद्वा महाराजांना बोलला. त्या मुलाचें तें कठोर भाषण ऐकून महाराज तेथून उठले आणि गांवाबाहेर येऊन तेथें एका झाडाखालीं रात्रभर

राहिले. पहांट झाल्यावर पुढील प्रवासास लागले. महाराज निघून गेल्याबरोबर अग्निहोत्र्यांच्या मुलाला भ्रम होऊन तो वेड्यासारखा बडबडूं लागला. कांहीं वेळानें अग्निहोत्री बुवा घरीं येऊन पाहतात तों मुलगा वेडा झालेला त्यांचे दृष्टीस पडला; तेव्हां बायकोनें सांगितलें कीं 'कोणी एक स्वामी बाहेर कट्टयावर येऊन उतरले असतां मुलगा त्यांना रागानें बोलल्यामुळें ते निघून गेले. तेव्हांपासून मुलगा भ्रमिष्ट होऊन बडबड करूं लागला.' हें बायकोचें म्हणणें ऐकून अग्निहोत्री बुवांना वाईट वाटलें. सारंगपूरच्या पत्राप्रमाणें ते महाराजच असले पाहिजेत, पण आपल्या दुर्दैवानें ऐन वेळीं आपण बाहेर निघून गेल्यामुळें हा घोटाळा झाला. त्यांचें दर्शन घेऊन क्षमा मागितली पाहिजे असा विचार करून रात्र संपल्याबरोबर सकाळीं सर्व आन्हिक उरकून अग्निहोत्री बुवा महाराजांच्या शोधार्थ बाहेर पडले. बरेच दिवस फिरूनही महाराजांचा शोध कांहीं लागला नाहीं. तथापि त्यांनीं प्रयत्न चालू ठेवला. पुढें एक दीड वर्षानें शोध लागल्याबरोबर अग्निहोत्री बुवा महाराज होते त्या गांवीं गेले व साष्टांग नमस्कार घालून झालेल्या अपराधाबद्दल त्यांनीं महाराजांची क्षमा मागितली. अग्निहोत्री बुवा म्हणाले, 'महाराज! आपण येणार म्हणून मीं बराच वेळ आपली वाट पाहिली. पुढें कांहीं काम निघाल्यामुळें मी थोडा वेळ बाहेर गेलों इतक्यांत आपलें येणें झालें. मुलानें आपणांस न ओळखतां आपला अवमान केला. तरी हा अपराध पोटांत घालून गुरुमाउलीनें कृपा करावी.' असें अग्निहोत्री बुवांचें भाषण ऐकून महाराज किंचित् रागानें त्यांना म्हणाले कीं, 'तुम्ही गृहस्थ असतां अतिथीबद्दल तुमच्या घरांतील मंडळींचे मनांत कांहींच आदरभाव दिसत नाहीं, तुम्ही त्यांना तसें शिक्षण द्यावयास नको काय? अतिथी-सत्कार हें गृहस्थाचें मुख्य कर्तव्य आहे. यति, ब्रह्मचारी यांनीं गृहस्थाचे घरीं जावयाचें नाहींतर कोठें जावयाचें? तुमच्या घरच्या एकंदर प्रकारा-

वरून तुमचें अग्निहोत्र म्हणजे एक नुसता पोटपूजेचा प्रकार आहे असें कां म्हणूं नये ? आम्हीं कांहीं तुमच्या मुलाला वेड लावलें नाहीं. तें तुमच्याच कर्माचें फल आहे. तुम्ही आतां घरीं निघून जा." असें महाराजांचें स्पष्ट भाषण ऐकण्याबरोबर अग्निहोत्रीबुवा फारच कष्टी होऊन त्यांनीं अत्यंत दीन होऊन महाराजांची वारंवार क्षमा मागितली; तेव्हां महाराजांनाही दया येऊन त्यांनीं थोडा अंगारा मंत्रून देऊन तो मुलाला लावण्यास सांगितलें. नंतर महाराजांची आज्ञा घेऊन अग्निहोत्रीबुवा घरीं आले व त्यांनीं तो अंगारा मुलाला लावतांच तो मुलगा पूर्वीप्रमाणें बरा झाला.

महाराजांचा प्रवास चालूंच होता. ते पिछोरा नांवाच्या गांवांत आले. तेथें कांहीं मुक्काम झाले. अधिकारी मंडळींना उपनिषदें समजावून सांगितलीं. संध्याकाळीं पुराणही नित्य चालत असे. तेथील मामलेदारांचा बंधु भास्करराव यास अपस्माराचा व्याधि जडल्यामुळें त्यानें तो बरा होण्याकरितां पुष्कळ प्रयत्न केला, पण त्याला यश आलें नाहीं. एके दिवशीं संध्याकाळीं भास्करराव महाराजांचें पुराण चालूं असतांना तेथें आला व 'मला या व्याधींतून मुक्त करा' अशी त्यानें महाराजांची प्रार्थना केली. इतक्यांत त्याचे अंगांत पिशाच संचार होऊन तो कांहीं बडबडूं लागला. तेव्हां महाराजांनीं त्याला सांगितलें कीं, 'आतां येथें पुराण चालूं आहे. यांत व्यत्यय नको, उद्यां येऊन तुमची हकीकत सांगा म्हणजे विचार करूं.' असें महाराजांनीं सांगतांच तें पिशाच निघून गेलें. भास्कररावही नंतर आपले घरीं गेले. दुसरे दिवशीं पुराणाचे अगोदर येऊन भास्कररावांनीं आपली हकीकत सांगितली. त्याच वेळीं पिशाचानें त्यांच्या शरीरांत प्रवेश करून सांगितलें कीं, 'मी ज्या पिंपळावर राहातों त्याखालीं हा लघुशंका करीत असल्यामुळें अस्वच्छता होते, म्हणून मी याला पीडा देत आहें.' हें पिशाचाचें

सांगणें ऐकून महाराज त्याला म्हणाले कीं, 'अरे याचा अपराध केवढा आणि शिक्षा केवढी ? तूं लबाड आहेस. याला सोडून तूं जातोस कीं नाहीं ? का शिक्षा केली पाहिजे ? ' ही महाराजांची वाणी ऐकण्याबरोबर तें पिशाच घाबरलें आणि त्यानें आपली खरी हकीकत सांगितली कीं, 'महाराज ! मी पूर्वी निपुत्रिक अवस्थेंत मरण पावल्यामुळें माझें और्ध्व-देहिक झालें नाहीं; त्यामुळें ही पिशाच योनी मला मिळाली. हा भास्कर-राव चांगला श्रीमंत असल्यामुळें याच्याकडून आपण नारायणबली करविल्यास मी या योनींतून मुक्त होईन आणि या उद्देशानेंच याला मी त्रास देतों. तरी याला नारायणबली करण्याची आज्ञा व्हावी.' अशी पिशाचाची विनंति ऐकून महाराजांनीं भास्कररावाकडून त्या पिशाचाचे उद्धारार्थ नारायणबली करविला. त्यामुळें त्या पिशाचालाही मुक्ती मिळून भास्कररावाचीही अपस्माराची पीडा कायमची दूर झाली.

महाराज पुढें खरेरा या गांवीं आले. तेथें कांहीं दिवस राहाणें झालें. श्रीमहाराजांच्या दर्शनास नित्य पुष्कळ मंडळी येत होती. एकदा एक बाई दर्शनास आली व महाराजांच्या लहान दत्तमूर्तीची पूजा करूं लागली. तिनें उदबत्ती पेटविल्याबरोबर तिच्या अंगांत पिशाचसंचार होऊन ती ओरडूं लागली. तें ऐकून सर्व मंडळी तेथें जमली. 'तूं कोण आहेस ?' असें प्रथम महाराजांनीं त्या पिशाचाला विचारलें. तेव्हां त्यानें सांगितलें कीं, 'मी या जवळच्या मशिदीचा मालक जिंद आहें. त्या मशिदीजवळ या बाईनें लघुशंका केल्यामुळें मीं या बाईस धरलें आहे. हिचा नवरा चांगला श्रीमंत आहे. त्यानें माझी मशिद चांगली बांधून द्यावी म्हणजे मी या बाईला सोडतों.' हें पिशाचाचें सांगणें ऐकून महाराज त्याला म्हणालें कीं, 'तूं या बाईच्या तीन गर्भांचा नाश केल्यामुळें तुझी मशिद दुरुस्त करण्याबद्दल हिच्या नवऱ्यास आपण सांगणार नाहीं. तरी तूं मुकाटयानें निघून जा.' ही महाराजांची वाणी त्या पिशाचानें ऐकून

फारच काकुळतीनें महाराजांची त्यानें प्रार्थना केल्यामुळें तिच्या नवऱ्यास महाराजांनीं ती मशीद दुरुस्त करून देण्यास सांगितलें. त्यानें त्याप्रमाणें करतांच त्या बाईची पिशाचबाधा दूर होऊन तिची संततीही पुढें वांचली.

त्या गांवाहून महाराज काशीस जाण्याकरितां निघाले. ते पायवाटेनें निघालेले पाहून मंडळींनीं सांगितलें कीं, 'रेलवे झाल्यापासून या पायवाटेनें कोणी प्रवास करीत नाहींत. रस्त्यांत जंगल फार असल्यानें हिंस्त्र पशूंचा त्रास, दोन दोन दिवस गांव लागत नाहीं, तरी आपण पायवाटेनें न जातां रेलवेनें जावें.' असें मंडळींचें म्हणणें ऐकून महाराज म्हणाले कीं, 'आजपर्यंत सर्व प्रवास श्रीदत्तगुरूंचे आज्ञेप्रमाणें पायांनींच झाला असून पुढेंही तसाच होईल. श्रीदत्तप्रभूंची जशी इच्छा असेल तसें घडेल.' असें सर्व मंडळींना सांगून महाराज त्या पायवाटेनें निघाले. कांहीं वाटचाल झाल्यावर श्रीदत्त भिल्लवेषानें महाराजांचे जवळ येऊन म्हणतात कीं, 'तुम्हांला काशीला जावयाचें आहे ना? तुम्हांला मी रस्ता दाखवितों. माझ्या पाठीमागून या.' असें म्हणून तो भिल्ल पुढें चालूं लागला व महाराज त्याच्या पाठीमागून चालले. थोड्याच वेळांत एक लहानशी टेकडी उतरून आल्यावर तो भिल्ल म्हणाला कीं, 'तो समोर जो गांव दिसतो तेथें जा, म्हणजे मग तेथून तुम्हांला पुढें सरळ रस्ता लागेल;' असें सांगून तो भिल्ल एकदम दिसेनासा झाला. त्यानें दाखवून दिलेल्या रस्त्यानें महाराज त्या गांवांत येऊन पोंचले. ज्या गांवीं येण्यास २।३ दिवस लागतात तेथें आपण एक दोन घंटयांतच येऊन पोंचलों हें नंतर महाराजांना कळून आलें, तेव्हां त्यांना प्रभूंची अतर्क्य लीला पाहून कौतुक वाटलें. सर्व मंडळींनाही तो प्रकार समजल्यावर आश्चर्य वाटलें.

पुढें महाराज प्रवास करीत करीत जालवण मुक्कामीं आले. तेथें मंडळींच्या आग्रहामुळें कांहीं दिवस मुक्काम झाला. तेथेंही नित्याप्रमाणें वेदाचें, उपनिषदांचें शिक्षण देण्याचें काम चालू होतें. रात्रीं पुराणही चालू होतें. पुढें दासनवमी आली. त्या दिवशीं महाराजांनीं, दासबोधाचें वाचन व्हावें असें ठरविलें. त्या गांवांतील एका शास्त्रीबुवांना ती गोष्ट पटली नाहीं. ते संस्कृतचे अभिमानी होते. त्यांचें मत असें होतें कीं– ‘दासबोध प्राकृत ग्रंथ आहे. ज्यांना संस्कृतचा गंधही नाहीं त्यांनीं फार तर तो वाचावा.’ हें त्यांचें मत महाराजांना समजलें तेव्हां त्या दिवशीं रात्रीं दासबोध वाचतां वाचतां त्यांनीं एका वेदवाक्याचा अर्थ सांगन त्याचें विवरण केलें. आणि तशाच अर्थाची दासबोधांतील एक ओवीही वाचून दाखवून त्या शास्त्रीबुवांना विचारलें कीं, ‘काय शास्त्रीबुवा! दासबोध ग्रंथ प्राकृत आहे का संस्कृत आहे, तें आतां तरी नीट विचार करून सांगा.’ तें महाराजांचें म्हणणें शास्त्रीबुवांना चांगलें लागलें व आपली चूक पटून त्यांनीं महाराजांची क्षमा मागितली. नंतर महाराजांनीं त्यांना समजून सांगितलें कीं ‘ग्रंथ वाचीत असतांना तो प्राकृत आहे कीं संस्कृत आहे या बाह्यांगाचा विचार करूं नये. त्यांतील सांगितलेल्या अर्थाकडे अनुसंधान ठेवावें. समर्थ रामदासस्वामी प्रत्यक्ष मारुतिरायांचे अवतार असून प्रभु श्रीरामचंद्राचे निस्सीम भक्त होते. त्यांना संस्कृत येत नव्हतें असें म्हणतां येणार नाहीं. सर्वही लोकांना समजण्याकरितां म्हणून त्यांनीं प्राकृत भाषेंत ग्रंथ करून त्यांतून सर्व शास्त्रांचीं प्रमेयें व्यवस्थित रीतीनें मांडलेलीं आहेत. तो ग्रंथ प्रासादिक आहे. कलियुगांत आचारधर्म लुप्तप्राय झाल्यानें नुसत्या वेदपठणाचा व्हावा तसा उपयोग होत नाहीं. पण साधुपुरुषांनीं केलेल्या प्रासादिक प्राकृत ग्रंथांचा या वेळीं फार मोठा उपयोग होण्यासारखा आहे. याचा तुम्ही अनुभव घेऊन पाहा. तुम्ही संस्कृत ग्रंथांचें पठण करूनही

तुमच्या घरांतील ब्रम्हसमंध अद्यापि गेला नाहीं हें खरें आहेना ? तर मग आतां आपण सांगतों त्याप्रमाणें मराठी गुरुचरित्राचा सप्ताह करून पहा, म्हणजे तो समंधही मुक्त होईल आणि तुमचाही त्रास जाईल. ' याप्रमाणें महाराजांनीं त्या दिवशीं प्राकृत सत्पुरुषांच्या ग्रंथांविषयीं विशेष प्रशंसोद्गार काढले. त्याचा परिणाम शास्त्रीबुवांचे मनावर होऊन त्यांनीं महाराजांचे आज्ञेप्रमाणें प्राकृत गुरुचरित्राचा सप्ताह केला, त्यामुळें त्यांच्या घरांतील बरेच दिवसांचा ब्रह्मसमंध नाहींसा झाला. तेव्हां शास्त्रीबुवांचा इतका विश्वास बसला कीं, ते पुढें रोज नियमानें गुरुचरित्र वाचूं लागले. तसेंच इतरही संतांचे प्राकृत ग्रंथ वाचण्याचा त्यांना नाद लागला; आणि असा अनुभव आल्यामुळें पुढें त्यांनीं प्राकृत ग्रंथांची निंदा कधींही केली नाहीं. जालवणास गणपतराव गर्दे म्हणून एक वकील आर्यसमाजीय होते. त्यांचीं मतें नास्तिकच होतीं. पण महाराजांच्या उपदेशाचा परिणाम त्यांचे मनावर होऊन ते पूर्ण आस्तिक बनले.

## चातुर्मास २ ब्रह्मावर्त—शके १८१४

महाराज जालवणाहून निघून फिरत फिरत ब्रह्मावर्तास येऊन पोंचले. येथें येण्याची ही त्यांची पहिली खेप. या वेळीं येथें आठ महिने मुक्काम झाला. अंताजीपंतांचे घाटावर राममंदिरानजिक एका झोपडींत महाराजांचें वास्तव्य होतें. तेथें रोज सकाळीं शौचमुखमार्जन व स्नान झाल्यावर झोपडीचें दार लावून भिक्षेची वेळ होईपर्यंत बसत असत. नंतर पुनः गंगेवर मध्यान्ह स्नान करून येऊन व आवश्यक तीं कर्मे करून तीन घरची भिक्षा आणावयाची व ती घ्यावयाची. हें होईपर्यंत झोपडीचें दार उघडें असे. नंतर पुनः सायंकाळ होईपर्यंत दरवाजा बंद. याप्रमाणें आठ महिने कार्यक्रम चालू होता. तोंपर्यंत महाराजांच्याबद्दल कोणासच कांहीं माहिती झाली नाहीं. पुढें चातुर्मास सुरू झाला तेव्हां

मंदिरांत पुराण ऐकण्यास महाराज जाऊं लागले. दोन तीन दिवस झाल्यावर एके दिवशीं पुराण झाल्यावर महाराज पुराणिकबुवांना म्हणाले कीं, 'उद्यां आपलें पुराण संपल्यावर आपण एक श्लोक सांगूं.' पुराणिकबुवांनींही महाराजांचें म्हणणें मान्य करून उद्यां महाराज पुराण सांगणार असल्याबद्दल सर्व मंडळींना कळविलें. दुसरे दिवशीं पुराण झाल्यावर महाराजांनीं, एका गीताश्लोकाच्या आधारानें पुराणास आरंभ केला. तें ऐकत असतां महाराजांची विद्वत्ता व योग्यता लोकांच्या लक्षांत येऊन सर्वच मंडळी विस्मयचकित झाली. महाराजांचें पुराण संपल्याबरोबर पुराणिकबुवांनीं महाराजांना सांगितलें कीं, 'आमचा चातुर्मास आजच संपला व आपला सुरू झाला. तरी आपणच उद्यांपासून पुराण सांगावें. मी कांहीं उद्यांपासून या व्यासपीठावर बसणार नाहीं.' याप्रमाणें सर्वांसमक्ष पुराणिकबुवांनीं प्रार्थना केल्याप्रमाणें महाराज रोज पुराण सांगूं लागले. केवळ श्रीदत्तप्रभूंची आज्ञा म्हणूनच महाराजांचें हें काम चाललें होतें. त्यांत लोकैषणेचा कांहीं संबंध नव्हता. त्यामुळें नित्य अनेक मंडळी पुराणश्रवणास येऊं लागली. कांहीं विद्यार्थीही अध्ययनास येऊं लागले. आषाढ पौर्णिमेपासून चातुर्मास सुरू झाला. ज्योतिष, याज्ञिक, वेदांत, योग इत्यादि विविध विषयांच्या अभ्यासाकरितां महाराजांचेकडे अनेक लोक येऊं लागले. महाराजांचा मुक्कामही त्यावेळीं ब्रह्मावर्तास चांगला दीड वर्ष झाला. बऱ्याच मंडळींना सन्मार्गाचा उपदेश होऊन त्यांचें कल्याण झालें. वर्णाश्रमधर्माकडे लोकांची प्रवृत्ति विशेष वाढली. पुढें पुढें महाराजांची कीर्ति बरीच दूरवर पसरली. ती ऐकून ग्वाल्हेर लष्कर येथील एक महापंडित गोपाळाचार्य हे आपल्या शिष्यमंडळीसह एकदा महाराजांचें दर्शन घ्यावें म्हणून ब्रह्मावर्तास आले. सायंकाळची वेळ. महाराजांचें पुराण चाललें होतें तें पाहून गोपाळाचार्य मंदिरांत एका बाजूस उभे राहिले. लगेच

महाराजांनीं त्यांना पाहून आपलें पुराण संपविलें आणि त्यांना घेऊन आपल्या आश्रमांत आले. बाकीची मंडळी बाहेरच थांबली. आंत गोपाळाचार्य व महाराज यांची कांहीं चर्चा होऊन त्यांत आचार्यांचें समाधान झालें. दुसरे दिवशीं गोपाळाचार्य महाराजांचा निरोप घेऊन परत गेले.

ब्रह्मावर्तास असतांना महाराजांनीं दत्तपुराण नांवाचा एक ग्रंथ संस्कृत भाषेमध्यें लिहिला. एकंदर श्लोकसंख्या साडेतीन हजार असून टीकाही विस्तृत केलेली आहे. एकंदर अध्याय ६४ असून आठ अष्टकें आहेत. ऋक्संहितेप्रमाणेंच याची रचना झालेली आहे. ऋक्संहितेंतील प्रत्येक अध्यायांतील आरंभ व दत्तपुराणांतील अध्यायाचा आरंभ एकसारखा आहे. पहिल्या अध्यायांतील प्रत्येक श्लोकांत एक, दोन असे ऋक्पाद घालून स्तुति केली आहे. यालाच वेदपादस्तुति असें म्हणतात. असा हा अप्रतिम ग्रंथ ब्रह्मावर्तास गंगातीरावर निर्माण झाला.

## चातुर्मास ३ हरिद्वार–शके १८१५

ब्रह्मावर्ताहून निघून गोकुळ, मथुरा, वृंदावन इत्यादि स्थानें पाहत पाहत महाराज शके १८१५ वैशाख पौर्णिमेच्या सुमारास हरिद्वारास येऊन पोंचले. तेथें गंगेच्या तीरावर अहिल्याबाईच्या धर्मशाळेजवळ असणाऱ्या दत्तमंदिरांत महाराजांचा मुक्काम झाला. त्या वेळीं तेथें शारदापीठाधीश श्रीराजराजेश्वरस्वामी शंकराचार्य यांचाही मुक्काम होता. त्यांच्या आग्रहावरून तेथेंच चातुर्मासांत राहण्याचें महाराजांनीं ठरविलें. चातुर्मासांत शंकराचार्यांना उपनिषद्भाष्य ऐकवून भाद्रपद पौर्णिमेनंतर बदरीनारायणाचे यात्रेकरितां महाराज निघाले. रस्त्यांत महाराजांना नर्मदातीरावरील भालोद गांवांतील यात्रेला निघालेले बळवंतराव वगैरे लोक भेटले. एकदां बळवंतरावांस फार थंडी वाजूं लागल्यामुळें डॉक्टरांना प्रकृति दाखविली. तेव्हां डॉक्टरांनीं त्यांना चुकून सोमलाच्या गोळ्या

दिल्या. त्या गोळ्या त्यांनीं घेतल्या व अशक्तपणामुळें डोलींत बसून पुढें निघाले. त्या सोमलांच्या गोळ्यांचा परिणाम थोड्याच वेळांत दिसून आला. बळवंतरावास सारखे जुलाब होऊं लागले. अंगांत उष्णता वाढल्यामुळें सर्व शरीराचा दाह होऊं लागला. शेवटीं एका झऱ्यावर आपणांस घेऊन जाण्याबद्दल त्यांनीं डोलीवाल्यास सांगितलें. त्याप्रमाणें ते डोलीवाले झऱ्याजवळ येतांच बळवंतराव दाह शांत व्हावा म्हणून त्या पाण्यांतच जाऊन बसले. ही त्यांची स्थिति पाहून डोलीवाले घाबरून बळवंतरावांना तेथेंच टाकून पळून गेले. महाराजांना हें समजल्याबरोबर लगेच पोलीसमध्यें वर्दी देऊन त्या डोलीवाल्यांस पकडून आणविलें व ती डोली घेऊन बळवंतराव जेथें पाण्यांत बसले होते तेथें महाराज येऊन पोंचले. नंतर बळवंतरावांची ती अवस्था पाहून महाराज त्यांना म्हणाले कीं, ' बळवंतराव ! एकाएकी तुमची अशी अवस्था कां झाली ? कांहीं औषध वगैरे खाल्लें काय ? ' बळवंतरावांचा गळा उष्णतेनें सुजला होता. त्यांना बोलतां येईना. त्यांनीं खुणांनीं सर्व सांगितलें व पदरांत बांधलेलें डॉक्टराचें औषध महाराजांना दाखविलें. तें पाहतांच महाराज म्हणाले, 'हा तर प्रत्यक्ष सोमल आहे, याची पीडा जाण्याकरितां तूप खाल्लें पाहिजे.' पण तेथें पुष्कळ शोध केला तरी तूप मिळालें नाहीं. पुढें तसेंच त्यांना डोलींत घालून उतरण्याचे ठिकाणीं आणलें. तेथें आल्याबरोबर बळवंतराव बेशुद्ध पडले. ती रात्रीची वेळ, थंडी अतिशय, सहानुभूतीचें माणूस जवळ कोणी नाहीं. शेवटीं रात्रभर महाराज बळवंतरावचे जवळ बसून होते. सारखे जुलाब होतच होते. वस्त्रें कोण धुणार ? शेवटीं तीं वस्त्रेंसुद्धां महाराजांनींच धुतलीं व बळवंतरावास एका बाजूस निजविलें. मध्यरात्रीच्या सुमारास बळवंतराव सावध होऊन कांहीं खावयास मागूं लागले. तेव्हां महाराज उठून एका हलवायाचे दुकानासमोर येऊन मोठ्यानें ' नारायण ' असें म्हणाले.

हलवाई तो आवाज ऐकून जागा झाला व इतक्या रात्रीं त्रास कां देतां असें त्यानें महाराजांना विचारलें. महाराजांनीं त्याला सांगितलें कीं, 'बाबा, एक गरीब ब्राह्मण फार आजारी असून त्याला फार भूक लागली आहे. आपला व त्याचा कांहीं संबंध नाहीं. तथापि या वेळीं त्याचे आप्त कोणी जवळ नसल्यामुळें त्याचें दुःख पाहून आपण संन्यासी असूनही या वेळीं कांहीं मिठाई मागण्यास आलों आहों, पैसे उद्यां देऊं.' हें महाराजांचें बोलणें ऐकून त्या हलवायानें कांहीं मिठाई लगेच दिली व आपण एका अनाथ ब्राह्मणाकरितां ही नेत असल्यामुळें याचे पैसे नकोत असें त्यानें महाराजांना सांगितलें. नंतर ती मिठाई घेऊन महाराज बळवंतरावांना निजविलेल्या ठिकाणीं आले व थोडी थोडी मिठाई त्यांच्या तोंडांत घालूं लागले. ती मिठाई पोटांत गेल्यावर बळवंतरावांस हळूंहळूं बरें वाटूं लागलें. रात्र संपल्यावर महाराजांनीं तार करून त्याच्या मुलाला बोलावून घेतलें व तो आल्यावर सर्व सामानासह बळवंतरावास त्याचे स्वाधीन केलें. त्याच दिवशीं बळवंतराव इहलोक सोडून गेले. महाराजही पुढील यात्रेस निघून गेले. इतःपर यात्रेच्या वेळीं कोणाचीही संगति नको असें महाराजांनीं ठरविलें.

## चातुर्मास ४ व ५ हिमालय—शके १८१६-१७

महाराज बदरीनारायणाचे दर्शनार्थ निघाले. रस्त्यांत हृषीकेश, देवप्रयाग, रुद्रप्रयाग, गुप्तकाशी, बदरीकेदार इत्यादि स्थानें पाहत पाहत बदरीनारायणाचें दर्शन केलें. प्रत्येक ठिकाणीं एक दोन दिवस, कोठें अधिकही मुक्काम होत असे. बरोबर दक्षिणी ब्राह्मण यात्रेकरू असल्यानें भिक्षेची अडचण पडली नाहीं. हिमालयांत बदरीनारायणाचे दर्शनास जात असतां एका ठिकाणीं मोठा कडा तुटलेला असून पुढें जाण्यास मार्ग नाहीं असें पाहून महाराज तेथेंच थबकले. इतक्यांत कड्या-

वरून दोघेजण खालीं येऊन महाराजांना म्हणाले कीं, 'पुढें जाण्यास रस्ता नाहीं. मागें परत जा. नाहींतर देहपात होईल.' हें त्या दोघा पुरुषांचें बोलणें ऐकून महाराजांनीं त्यांना सांगितलें कीं, 'देह पडला तरी हरकत नाहीं. नरनारायणांचे दर्शनार्थ आपण आलों आहों. तें दर्शन झाल्याशिवाय आपण परत फिरणार नाहीं. पुढें वाट नसेल तर आपण दोघे तिकडून कसें आला?' हें महाराजांचें निर्धाराचें भाषण ऐकून ते दोघेही पुरुष अदृश्य होऊन त्या ठिकाणीं प्रत्यक्ष नरनारायण मुनि दिसूं लागले. महाराजांनाही नरनारायणांचें दर्शन घडल्यामुळें आनंद झाला. याप्रमाणें श्रीमहाराजांना दर्शन देऊन नरनारायणप्रभु दिसेनासे झाले. हिमालयांत एका सरोवरांत तपश्चर्या करणारा एक योगी पुरुष महाराज तेथें येतांच वर येऊन त्यानें त्यांचें दर्शन घेतलें. महाराजांनींही हात वर करून 'नारायण' म्हणून त्याला आशिर्वाद देतांच तो योगी पुरुष पूर्ववत् सरोवरांत अदृश्य झाला.

बदरीनारायणाचे रस्त्यांत मध्येंमध्यें प्रवासी लोकांच्या उतरण्याच्या जागा बांधलेल्या आहेत. तेथें येणाऱ्या गरीब लोकांना अन्न, वस्त्रें, कांबळी, धाबळ्या इत्यादि वस्तु श्रीमंत लोक देत असतात. काळीकंबळीवाला या प्रसिद्ध साधुपुरुषानें अनेक श्रीमंत लोकांना भेटून ही व्यवस्था करून ठेवली आहे. पहाडांत थंडी फार, बर्फ पडतें त्यामुळें पुष्कळ लोक या स्थानांतून आपणांस जरूर त्या वस्तूंचें दान घेतात. अशाही ठिकाणीं महाराजांचेकडे दोन छाट्या व एक धाबळी यांखेरीज वस्त्राचा संग्रह नाहीं, अग्नीला तर स्पर्शही करावयाचा नाहीं. याप्रमाणें राहून हिमालयांत महाराजांनीं प्रवास केला. दैवीशक्तीवांचून हें केव्हांही शक्य नाहीं. ही शक्ति केवळ सदाचरणानें मिळूं शकते हें महाराजांनीं आपल्या दिव्य चरित्रावरून सर्वांना दाखवून दिलें होतें.

बदरीनारायणाचे मूर्तीचें दर्शन दुरूनच घ्यावें लागतें. कारण मूर्ति परिसाची आहे अशी लोकांची समजूत असल्यामुळें तेथें जवळ जाऊन कोणी लोखंडाचें सोनें करतील या भीतीनें देवळाचे गाभाऱ्यांत यात्रेकरूंना जाण्यास बंदी आहे. पण महाराजांना मात्र तसा कांहीं प्रतिबंध न होतां त्यांनीं अगदीं जवळ जाऊन दर्शन व पूजन केलें.

गंगोत्रीस गेल्यावेळीं तेथें स्नान करतांच थंडीनें महाराजांचें अंग अगदीं गारठून गेलें. कांहीं हालचाल होईना. इतक्यांत कोणी पेटलेली शेगडी आणून ठेवली. बराच वेळ शेकल्यावर अंगांत ऊब आली. अग्निस्पर्श न करण्याबद्दल श्रीदत्तांची आज्ञा होती. पण या ठिकाणीं मात्र ती पाळतां आली नाहीं. संपूर्ण आयुष्यांत हा शेकण्याचा प्रसंग एकदांच आला असल्याचें महाराज सांगत असत.

गंगोत्रीच्या वाटेवर एक गांव लागला. तेथें मुसलमानांची बरीच वस्ति होती. मंडळींना बाहेर पाठवून महाराज बाहेरच एका दगडावर बसून राहिले. नंतर थोड्या वेळानें महाराज त्या दगडावर छाटी पांघरून निजले. लवकरच त्यांना गाढ झोप लागली. त्या वेळीं जोरांत पाऊस पडूं लागला. लगेच मंडळी गांवांतून तेथें येऊन पाहतात तों महाराजांना त्या शिळेवर गाढ झोप लागली आहे व खालून वरून सारखें पाणी वाहत आहे, तरी आपले महाराजांना त्याचें भानही नाहीं.

## चातुर्मास ६ हरिद्वार शके–१८१८

महाराज हिमालयांत गेले असतां त्यांचे दोन चातुर्मास कोठें झाले ही माहिती लागत नाहीं. त्या वेळीं प्रत्यक्ष महाराजांनाही कोणीं यासंबंधीं विचारलेलें दिसत नाहीं. त्यामुळें हीं दोन वर्षें महाराजांचा अज्ञातवास होता एवढेंच समजून पुढील चरित्र पाहावें. हिमालयांतील यात्रा आटोपून

महाराज शके १८१८ वैशाख पौर्णिमेचे सुमारास हरिद्वार येथें परत आले. या वर्षीचा चातुर्मास तेथेंच झाला. तेथें या खेपेस सहा महिने मुक्काम होता. नंतर तेथून ब्रह्मावर्तास येण्याकरितां महाराज निघाले. बरोबरचे ब्राह्मण यात्रेकरू पूर्वीच पुढें निघून गेले होते. त्यामुळें व रस्त्यांत दक्षिणी ब्राह्मणांची सोय न झाल्यामुळें महाराजांना १८ दिवस उपवास घडला. कांहीं ठिकाणीं गुजराथी ब्राह्मणांकडून फळें मिळालीं, तेवढीं खाऊनच राहावें लागलें. रस्त्यांत एका गुजराथी ब्राह्मणाच्या बाईनें शेंगाचे दाणे, चणे व गहूं भाजून त्याचें पीठ करून महाराजांचे बरोबर दिलें होतें. तें रोज पाण्यांत कालवून खावयाचें आणि २०।२५ कोस चालावयाचें असा महाराजांचा त्या वेळीं क्रम असे. असा प्रवास करीत महाराज ब्रह्मावर्तास येऊन पोंचले. तेथें घाटावर राममंदिरांत मुक्काम ठेवला. गणपतिबुवा म्हणून एक मोठे साधु १८५७ सालीं झालेल्या बंडाचे वेळीं असलेले तेथें राहत होते. त्यांचा बाटून मुसलमान झालेला पुतण्या आपल्या पत्नीस नेण्याकरितां तेथें आला. त्या स्त्रीनें, ‘ अशा पतीबरोबर जावें कीं नाहीं, याबद्दल शास्त्रनिर्णय काय ?’ असा प्रश्न महाराजांना केला. महाराजांनीं तिला सांगितलें कीं, ‘ पति प्रायश्चित्त घेऊन शुद्ध झाल्यावांचून त्याच्याशीं संसर्ग ठेवूं नये असें शास्त्र आहे.’ ही महाराजांची आज्ञा ऐकून त्या स्त्रीनें आपल्या पतीस प्रायश्चित्त घेऊन शुद्ध होण्यास सांगितलें, पण त्यानें तें ऐकलें नाहीं. त्यामुळें त्या स्त्रीनेंही त्याच्याबरोबर न जातां ब्रह्मावर्तासच राहून हरिभजनांत काळ घालविण्यास सुरुवात केली. तिच्या पांच वर्षांच्या मुलाला पिशाचबाधा होती. तो वारंवार बेशुद्ध होत असे. तिच्या प्रार्थनेप्रमाणें एक यंत्र महाराजांनीं भूर्जपत्रावर लिहून त्या मुलाच्या हातांत बांधण्याकरितां म्हणून तिच्याजवळ दिलें होतें. तें बांधल्यामुळें त्या मुलाची पीडा कमी झाली. पुढें एकदां ती बाई अस्पर्श

झाली असतां तिच्याजवळ जाण्याकरितां तो मुलगा हट्ट धरून बसला. शेवटीं त्याच्या हातांतील तें यंत्र काढून दुसरीकडे ठेवलें. त्या वेळीं होळीचा सण असल्यामुळें त्या मुलाला त्याच्या मामानें मुलांचे खेळ पाहण्याकरितां बाहेर नेलें. जातांना रस्त्यांत मुसलमानांचें कबरस्थान होतें. त्याच्याजवळ येण्याबरोबर त्या पिशाचानें मुलाची मान मुरगाळल्या-मुळें तो खालीं पडला. थोड्याच वेळांत त्याचें प्राणोत्क्रमण झालें. त्या वेळीं त्या पिशाचानें बाईच्या शरीरांत प्रवेश करून खुलासा केला कीं, ‘ माझा दीड रुपया देणें तूं दिलें नाहींस म्हणून मीच तुझा हा मुलगा मारला व तुझ्या नवऱ्यालाही मींच भ्रष्ट केलें. तुझ्या मोठया मुलाला वेड लावून तुझा गर्भपातही मींच केला आहे. ’ हा केवढा भयंकर कर्मविपाक !

ब्रह्मावर्तास एका ब्राह्मणानें कांहीं पुस्तकें घेण्याकरितां कांहीं पैसे ठेवले होते. तेथें कुलूप किल्ली कांहीं नसल्यामुळें पैसे बाहेरच पडले होते. ते एका चांगल्या घराण्यांतील मुलानें चोरले. पुष्कळ शोध केला तरी पत्ता लागेना. शेवटीं महाराजांनीं चोरीचा तपास करण्याविषयीं दत्तमहाराजांच्या गणास आज्ञा केली. लगेच एका गणानें त्या मुलाच्या शरीरांत प्रवेश करून मीं चोरी केली असें महाराजांचे समक्ष त्याचेच तोंडानें कबूल करण्यास लावलें. नंतर त्या मुलानें पैसे परत आणून दिले. ‘ चांगल्या घराण्यांत जन्म घेऊन तूं चोरीचें नीच कर्म करतोस हें चांगलें नाहीं ’ असें महाराजांनीं त्या मुलाला सांगतांच त्यानें महाराजांची क्षमा मागून पुढें तो सद्वर्तनानें वागूं लागला.

कानपूर येथें एक गौड ब्राह्मण राहत होता. त्याची मुलगी दहा वर्षांची होती. लवकरच त्यानें एक चांगलेंसें स्थळ पाहून तिचें लग्न करणेचें ठरविलें. हें मुलीला समजतांच तिनें बापाला विचारलें असतां

तो मुलगा नोकरी करतो असें त्यानें मुलीस सांगितलें. तें ऐकून मुलीनें ' अशा ब्राह्मणाबरोबर मला लग्न करावयाचें नाहीं, तसेंच व्यापार व शेती करणारा ब्राह्मणही वर मला पसंत नाहीं. जो केवळ भिक्षा मागून तपश्चर्या करणारा ब्राह्मण असेल त्याच्या बरोबरच माझें लग्न करावें,' असें स्पष्ट बापास सांगितलें. त्या वेळीं बापाला काय करावें तें सुचेना; म्हणून महाराजांचेकडे येऊन त्यानें सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून महाराज त्याला म्हणाले, ' ही तुझी मुलगी कोणीतरी योगभ्रष्ट आहे. तिच्या इच्छेविरुद्ध तूं जाऊं नकोस. तिच्या श्रद्धेप्रमाणें तिला इष्ट तो वर अनायासानें मिळेल, तूं निश्चित रहा. ' अशी त्या ब्राह्मणाची समजूत करून महाराजांनीं त्याला घरीं पाठविलें. पुढें थोडयाच दिवसांत, त्या ब्राह्मणाच्या घराजवळच असणाऱ्या धर्मशाळेंत एक ब्रह्मचारी तपस्वी ब्राह्मण तीर्थयात्रा करीत करीत येऊन उतरला. त्या मुलीनें त्या ब्रह्मचाऱ्याला पाहून त्याच्या बरोबर माझें लग्न करा असें आपल्या पित्याला सांगितलें. नंतर तिच्या पित्यानें त्या ब्रह्मचाऱ्यास घरीं जेवणास बोलावून त्याच्या जवळ लग्नाची गोष्ट काढली, पण तो नाकबूल झाला. शेवटीं महाराजांनीं या लग्नाची मध्यस्थी केली. ते त्या ब्रह्मचाऱ्यास म्हणाले कीं, ' या मुलीनें तुला मनानें वरलें आहे. जर तूं आतां लग्न केलें नाहींस तर तुला स्त्री-हत्येचें पातक लागेल. तुमचें घटित गोत्र सर्व जमलें आहे व ही तुला प्रपंचांत अनुरूप अशी वधू आहे. ' ही महाराजांची आज्ञा झाल्यावर प्रारब्धभोग मानून त्या ब्रह्मचाऱ्यानें लग्नास शेवटीं संमति दिली. पुढें उत्तम मुहूर्तावर त्यांचा विवाह झाल्यावर ती मुलगी आपल्या त्या पतीबरोबर तीर्थयात्रेस निघून गेली.

प्रयाग क्षेत्रांत एक मोठी धर्मशास्त्र परिषद होणार होती. त्याकरितां हिंदुस्थानांतील अनेक पंडित मंडळी येणार होती. मोठमोठया राजांनींही या परिषदेस साहाय्य केलें होतें. इंदूरच्या महाराजांच्या तर्फे प्रति-

व्यापारी अमुकच पदार्थ घेतला पाहिजे असा आग्रह मुळींच करीत नाहीं. घेणाऱ्यानें आपण कोणता माल घेणें श्रेयस्कर होईल हें ठरविलें पाहिजे. या उदाहरणाप्रमाणंच महापुरुषांनीं अनेक प्रकारचीं साधनें जरी दाखविलेलीं असलीं तरी जो आपल्या मनाचा संयम करून चांगलीं साधनें करीत राहातो त्याचें कल्याण होतें. आणि जो पूर्वजन्मींच्या दुर्वासनांमुळें वाईट साधनांकडे वळतो त्याला अधोगति मिळते.' याप्रमाणें महाराजांनीं सर्वांना समजावून सांगून सर्वांचें समाधान केलें.

ब्रह्मावर्तीत गंगातीरीं महाराजांचा मुक्काम आहे. तसेंच महाराजांनीं आपल्या तीरावरही यावें असें नर्मदा नदीला वाटून तिनें महाराजांना दृष्टान्त देऊन आपली इच्छा कळविली. पण तिकडे महाराजांनीं लक्ष दिलें नाहीं. पुढें एकाएकीं असा चमत्कार घडला कीं, एका ब्राह्मणाच्या अंगावर फोड झाले होते. त्या व्याधीनें तो फार गांजला होता. त्याला कोणीं सांगितलें कीं 'तूं महाराजांच्या पायांचें तीर्थ घेशील तर तुझा रोग बरा होईल.' तो ब्राह्मण याची संधि पाहूं लागला. एके दिवशीं महाराज लिहिण्यास मांडी उपडी करून बसले होते त्या वेळीं त्यांचे पाय मागें होते. ब्राह्मणानें ती संधि साधून पाठीमागें जाऊन महाराजांच्या पायांवर पाणी घातलें व एकदम त्यांना शिवून तें सर्व तीर्थजल गोळा करून पिऊन टाकलें, अंगाला लावलें. महाराजांनीं एकदम मागें वळून पाहून असें करण्याचें कारण त्या ब्राह्मणाला विचारलें. तेव्हां त्यानें 'आपल्या असह्य व्याधीच्या परिहारार्थ एकाच्या सांगण्यावरून आपण असें केलें आहे' असें सांगून अपराधाची क्षमा करण्याबद्दल महाराजांना विनंति केली. लगेच महाराज उठून गंगेवर जाऊन स्नान करून आले. पण त्यांच्या चित्तास समाधान वाटेना. कांहींतरी आपल्या शरीरास पीडा होणार असा महाराजांना भास झाला. त्याच दिवशीं रात्रीं स्वप्नांत एक चांडाळीण महाराजांना शिवली. त्यांनीं

लगेच उठून देवाचें ध्यान केलें. सकाळीं उठून पाहातात तों सर्व अंग-भर फोड उठले आहेत. ब्राह्मणाचें अंग बरें झालें पण तो रोग महाराजांचे शरीरावर पसरला. महाराजांनीं त्या वेळीं गंगेची स्तुति पांच श्लोकांनीं केली. लोकांनीं कांहीं उपचार करतों असें सांगतांच महाराजांनीं सांगितलें कीं, 'हा दुसऱ्याचा प्रारब्धभोग आहे, तो भोगूनच संपविला पाहिजे. याला औषधोपचारांचा उपयोग होणार नाहीं.' त्याच रात्रीं दृष्टांत झाला कीं, 'अनधिकारी माणसाला पायाचें तीर्थ दिल्यामुळें हा त्रास भोगावा लागला. तथापि हें कृत्य बुद्धिपूर्वक घडलेलें नाहीं. करितां तीन दिवस नर्मदेचें स्नान केल्यावर शरीर पूर्ववत् चांगलें होईल.' याप्रमाणें दृष्टांत झाल्यावर गंगेची अनुज्ञा घेऊन महाराज नर्मदा किनारीं येण्याकरितां ब्रह्मावर्ताहून निघाले. ते मार्गशीर्ष मासांत जालवण मुक्कामीं आले. तेथें झालेल्या महिना दीड महिन्याच्या मुक्कामांत तेथील बऱ्याच मंडळींना अरणें शिकविलीं. तेथून निघून सारंगपूर, महतूर, या गांवांवरून हरणगांवीं आले. तेथें असा चमत्कार दिसला कीं, तो सर्व गांव जळून गेला असून एकच घर तेवढें चांगलें शिल्लक राहिलें आहे. असें होण्याचें कारण महाराजांनीं तेथील मंडळींना विचारलें असतां त्यांनीं पुढीलप्रमाणें हकीकत सांगितली. 'गांवांत एकदा दुपारच्या वेळीं एक साधुपुरुष आला होता. त्यानें सर्वांच्या घरीं जाऊन अन्नयाचना केली. पण कोणींही त्याला भोजन दिलें नाहीं. त्या वेळीं तो साधु संतापून म्हणाला कीं, 'मी तीन दिवसांचा उपाशी असतांही या गांवांत मला कोणीं विचारलें नाहीं. जळो हा गांव!' असें रागानें बोलून तो साधु निघून गेला. रस्त्यांत, राहिलेल्या घरचा मालक परगांवाहून येत होता त्याला साधु भेटले. त्यानें त्यांची विचारपूस करतांच साधूनें वरीलप्रमाणें त्याला उत्तर दिलें. नंतर त्या माणसानें एका झाडाखालीं साधुमहाराजांना बसवून मी अन्न घेऊन येतों असें सांगून गांवीं आला. तोंच गांवांतील

सर्व घरांना आग लागली असून आपलें घरमात्र सुरक्षित असल्याचें त्याला दिसलें. नंतर त्यानें त्वरेनें घरीं जाऊन अन्न सर्व तयार करून त्या साधुमहाराजांना नेऊन वाढलें. तेही जेवून तृप्त होऊन निघून गेले.' ही हकीकत मंडळींनीं सांगतांच महाराजांनीं सर्वांना सांगितलें कीं, 'दुपारीं आपल्या दारांत कोणीही आला तरी त्याची जात वगैरे न पाहातां त्याला शक्तीप्रमाणें अन्न द्यावें, हा गृहस्थांचा मुख्य धर्म आहे.' असा महाराजांचा उपदेश ऐकून सर्व लोक त्याप्रमाणें वागूं लागले.

पुढें महाराज नर्मदातीरीं नेमावर येथें येऊन पोंचले व नर्मदामातेची नमस्कारपूर्वक प्रार्थना केली कीं, 'माझ्या थोड्या अपराधाबद्दल केवढी ही कडक शिक्षा केली? माझ्याशिवाय तुझें महत्व वाढविणारा दुसरा कोणी नाहीं काय?' अशी प्रार्थना करून तेथें मुक्काम केला. तीन दिवसांत नर्मदामातेच्या स्नानानें तो विस्फोटक रोग बरा होऊन महाराजांचें शरीर पर्वीप्रमाणें उत्तम झालें. त्यावेळीं नर्मदालहरी म्हणून नर्मदेची स्तुति केली. नंतर तेथून निघून ब्रह्माणी घाटावर महाराज आले.

घाटावरून चालण्याचे वेळीं पाय घसरून महाराजांचे कमरेंत लचक भरली. त्यामुळें हालचाल अगदीं बंद झाली व महाराज निजून राहिले. भिक्षेची वेळ झाली तरीसुद्धां उठतां न आल्यामुळें तसेंच पडून राहिले. हें पाहून नर्मदामाता कुमारिकेच्या रूपानें येऊन महाराजांना म्हणाली कीं, 'महाराज! भिक्षेची वेळ झाली, उठा. मी तुमची लचक बरी करतें.' इतकें बोलून त्या मुलीनें थोडेसें भस्म घेऊन व मंत्र म्हणून तें महाराजांच्या कमरेस चोळलें व उभे राहून पाय खालीं बडवा असें महाराजांना सांगितलें. त्याप्रमाणें महाराजांनीं करतांच खरोखरीच त्यांना उत्तम चालतां येऊं लागलें. महाराजांनीं नर्मदामातेला ओळखून तिची स्तुति केली. नंतर नर्मदामाता गुप्त झाली. तो मंत्र महाराजांना येत

होताच, पण नर्मदा मातेचें वात्सल्य पाहून महाराजांना कौतुक वाटलें. नंतर महाराज भिक्षेकरितां गांवांत गेले त्या वेळीं त्यांना तेथील हकीकत पुढें लिहिल्याप्रमाणें समजल्यामुळें त्यांनीं त्या गांवांत भिक्षा केली नाहीं. तें कारण असें—' पुण्यांतील एक ब्राह्मण आपल्या लग्न झालेल्या मुलीस घेऊन या ब्रह्माणी गांवांत आला. तो मोठा द्रव्यलोभी होता. त्यानें आपली ती लग्न झालेली मुलगी तिचें लग्न झालें नाहीं असें सांगून तेथेंच एका ब्राह्मणास दिली. तो ब्राह्मण कांहीं दिवसांनीं वारला. त्याबरोबर त्या मुलीचें केशवपन करून टाकलें. कांहीं दिवसांनीं तिच्या पहिल्या नवऱ्यास ही हकीकत कळल्याबरोबर तो तिला घेऊन जाण्याकरितां पुण्याहून त्या गांवीं आला. त्या गांवांत गणूभय्या नांवाचा आडदांड मनुष्य होता. त्याचें व त्या मुलीच्या दुसऱ्या नवऱ्याचें वैर असल्यामुळें त्यानें तिचा पुण्याचा पहिला नवरा आलेला पाहून त्या मुलीस आपल्या ताब्यांत घेतलें आणि तिला पुनः केस ठेवावयास लावून तिच्या पहिल्या नवऱ्याच्या ताब्यांत देऊन टाकलें.' ही त्या गांवांत घडलेली हकीकत महाराजांना समजतांच त्यांनीं त्या गांवांत भिक्षा न घेतां त्या गांवाबाहेर येऊन एका झाडाखालीं स्वस्थ बसून राहिले. भर दुपारची वेळ. या वेळीं जायचें तरी कोठें ! ऊन कमी झाल्यावर पुढें दुसऱ्या गांवीं जावें. आजचा दिवस उपवासच घडणार असा विचार करीत महाराज त्या झाडाखालीं बसून राहिले असतां, पूर्ववत् कुमारिकेच्या रूपानें नर्मदा माता तेथें आली व महाराजांना म्हणाली, ' आपण या ब्रह्माणी गांवांत भिक्षा न घेतां येथें कां बसून राहिला ? ' त्या वेळीं महाराज त्या मुलीला म्हणाले कीं, ' या गांवांतील लोक धर्मभ्रष्ट असल्यानें अशा लोकांच्या घरचें अन्न घेण्यापेक्षां नर्मदेचें जलपान करून राहाणें काय वाईट ? '. हें महाराजांचें भाषण ऐकून ती मुलगी म्हणाली कीं, 'महाराज ! नेमावर नांवाचें माझें गांव येथून जवळच आहे. तेथें आमचे घरीं आपण भिक्षेस

चलावें.' असें मुलीचें म्हणणें ऐकून महाराज तिला म्हणाले कीं, 'आपणांस एकाच घरची भिक्षा चालत नाहीं.' तें ऐकून तिनें तेथें सतरा घरें दक्षिणी ब्राह्मणांचीं असल्याचें सांगितलें व ती मुलगी दिसेनाशी झाली. नंतर महाराजांनीं नेमावरला जाऊन भिक्षा घेतली. तेथें चौकशी केली असतां ब्राह्मणांचीं सतराच घरें असल्याचें समजलें. ती मुलगी मात्र तेथें कोठेंही दिसली नाहीं. नेमावरला महाराज लोकग्रहास्तव कांहीं दिवस राहिले. नेमावर हें नर्मदेचें नाभिस्थान असून तेथें सिद्धेश्वर म्हणून प्रसिद्ध देवस्थान आहे.

नेमावरला ब्राह्मणमंडळींना आचारधर्माचें शिक्षण देऊन महाराज उज्जनीस आले. तेथें गणपतिबुवा म्हणून एक गणेशोपासक होते. त्यांनींच सत्यविनायकव्रत प्रकाशित केलें आहे. त्यांना योगाची थोडीबहुत माहिती होती, पण आपणांस योग पूर्णपणें अवगत असल्याचें ते भासवीत. त्यांना महाराजांचा अधिकार प्रथम माहीत नसल्यामुळें ते एकदां महाराजांना आपल्या घरीं घेऊन गेले व आपल्या अभ्यासाच्या खोलींत नेऊन तेथें योगासंबंधीं कांहीं माहिती महाराजांचे पुढें सांगितली. महाराजांनीं त्यांचें भाषण स्वस्थपणानें ऐकून घेतलें आणि एक धौतीचा कपडा गिळून थोड्या वेळानें तो बाहेर काढला. तो कपडा सबंध रक्तानें लाल झालेला दिसला. नंतर असें होण्याचें कारण महाराजांनीं गणपतिबुवांना विचारलें. तेव्हां मात्र बुवांची खात्री झाली कीं, महाराजांची योग्यता मोठी आहे, आपण व्यर्थ अहंकार दाखविला. याप्रमाणें वाटून त्यांनीं महाराजांची क्षमा मागितली. नंतर महाराजांनीं त्यांना सर्व समजावून सांगितलें.

उज्जनीहून निघून फिरत फिरत परत नर्मदाकिनारीं ओंकारेश्वर येथें महाराज आले. तेथें एक ज्योतिर्लिंग प्रसिद्ध आहे. तेथें धावरीकुंड म्हणून एक कुंड नर्मदेचें योनिस्थान आहे. त्या कुंडांत महाराज स्नानाकरितां उतरले

आणि बुडी मारून वर येतांना त्यांनीं आपल्या ओंजळींतून नर्मदा बाण वर आणले. इतक्यांत भिल्लवेषानें शंकर प्रकट होऊन महाराजांना म्हणाले कीं, 'तुम्हीच या बाणाची पूजा कराल ना?' यावर महाराज म्हणाले, 'बेल तुळशी संन्यासाला तोडतां येत नसल्यामुळें या बाणांची पूजा आपणांकडून होणें अशक्य आहे. बरें दिसल्यामुळें हे बाण आपण घेतले.' हें ऐकून भिल्लरूपी शंकरांनीं सांगितलें, 'तर मग हे बाण येथेंच टाकून द्या, नेऊं नका.' असें सांगून ते भिल्ल दिसेनासे झाले. महाराजांनींही नर्मदेंत ते बाण परत सोडून दिले. ओंकारेश्वरीं महाराज ३२ दिवस राहिले. रोज पुराण चाले. त्या वेळीं तेथील राजाचे कार्यवाह बळवंतराव यांना महाराजांनीं सर्व नित्यब्रह्मकर्म शिकविलें. तेथून मंडलेश्वर, महेश्वर इत्यादि गांवांवरून महाराज पेटलाद या गांवीं येऊन पोंचले.

## चातुर्मास ७ पेटलाद शके–१८१९

इंदूर संस्थानांतील एक मोठें गांव पेटलाद हें महीनदीचे तीरावर आहे. येथें ब्राह्मणवस्ती चांगली आहे. या गांवीं महाराजांनीं शके १८१९ सालीं चातुर्मास केला. तेथेंच आषाढ शुद्ध पक्षांत दत्तलीलामृतसिंधु हा प्राकृत एक सहस्र ओव्यांचा ग्रंथ महाराजांनीं रचला. चातुर्मास संपल्यावर पेटलादहून निघून महाराज 'चिखलदा' या गांवीं आले. येथें व्यंकटराव नांवाचा गृहस्थ पत्नी मृत झाल्यावर नोकरी सोडून देऊन नदीतीरावरील एकां मंदिरांत रहात असे. महाराज चिखलद्यास आल्यानंतर आपणांस योगाभ्यास सांगण्याविषयीं त्यानें महाराजांना विनंति केली. त्याप्रमाणें त्याला षट्क्रिया व प्राणायाम याचें शिक्षण महाराजांचेपासून मिळालें. तेथें नानासाहेब, गंगाधरराव, बाळा वैद्य इत्यादि मंडळींची श्रद्धा पाहून महाराजांनीं त्यांना उपनिषद्भाष्याचा पाठ सांगितला. नित्य पुराणही चालूं होतें. तेथेंच महाराजांची दिवाळी झाली. नरकचतुर्दशीच्या आदले

दिवशीं महाराजांना दत्तमहाराजांचा दृष्टान्त झाला कीं, 'उद्यां दिवाळी असल्यामुळें आपणांस अभ्यंग स्नान घालावें.' महाराजांनीं त्याच वेळीं देवाला सांगितलें कीं, 'आपण संन्यासी असल्यानें अग्नीला शिवतां येत नाहीं, तरी ऊन पाणी कोठून आणतां येईल? सुगंधी तेलही आपणांकडे नाहीं, तरी अभ्यंगस्नानाची सोय आपणांकडून होणार नाहीं. रोजच्याप्रमाणें साध्या गार पाण्यानें स्नान घालतां येईल, आणि निवतांना आपण रोज थंड पाण्याचें स्नान घालून भस्म लावलें म्हणजे झालें, जास्ती उपचारांची आवश्यकता नाहीं असें आपण सांगितलें होतें.' याप्रमाणें महाराजांनीं दत्तमहाराजांना जबाब दिला. दुसरे दिवशीं महाराज स्नान करून आले आणि रोजच्याप्रमाणें स्नान घालून व भस्म लावून मूर्ति ठेवून दिली. मंगलस्नान न घातल्यामुळें मूर्तीला राग येऊन ती नर्मदेच्या पाण्यांत जाऊन बसली. ही गोष्ट महाराजांना कांहींच माहीत नव्हती. रोजच्याप्रमाणें दुपारीं भिक्षा मागून आल्यावर, हस्तपादप्रक्षालन व आचमन करून नैवेद्य दाखविण्याकरितां मूर्तीजवळ महाराज गेले मात्र, एकदम मोठा तोफेसारखा आवाज होऊन दत्तमहाराजांनीं बोलण्यास आरंभ केला कीं, 'आज दिवाळी असून मला मंगलस्नान घातल्यावांचून नैवेद्य दाखवितोस काय? मी इकडे नर्मदेंत बसलों आहें. मला नैवेद्य नको कांहीं नको.' ही प्रभूंची रागाची वाणी ऐकून महाराज घाबरून नर्मदेच्या तीरावर आले. इतक्यांत लहान मुलाच्या रडण्याचा आवाज पाण्यांतून ऐकूं आला. त्या आवाजाच्या अनुरोधानें महाराज पाण्यांत शिरले. इतक्यांत पाण्यांत उत्तम प्रकाश पडला. त्याबरोबर महाराजांनीं एकदम पाण्यांत बुडी मारून ती मूर्ति प्रेमानें घेतली आणि वर आले. भिक्षेच्या वेळीं महाराजांना नदीवर जाण्याचें कारण काय तें कांहींच न समजल्यामुळें नानासाहेब वगैरे सर्व मंडळी तेथें जमली होती. महाराज मूर्ति घेऊन वर आले तेव्हां श्रीदत्तप्रभूंची इच्छा सर्व मंडळींना

समजली. लगेच ऊन पाणी, सुगंधी तेल, पंचामृत आणलें व महाराजांनीं अत्यंत प्रेमार्द्र चित्तानें दत्तमूर्तीची महापूजा केली. आरती, मंत्रपुष्प झाल्यावर महाराजांनीं एका अभंगांत या प्रभूच्या लीलेचें वर्णन केलें आहे तें असें—' भिन्न भिन्न जरि भांडती । तरी पुनः एक होती ॥ १ ॥ दंपतीचा हो कलह । लवमात्र न तुटे स्नेह ॥ २ ॥ देवभक्तांचें भांडणें । पराभक्तीचें तें ठाणें ॥ ३ ॥ वासू म्हणे हा विनोद । देतो दत्ता परानंद ॥ ४ ॥ ' ज्ञानोत्तर भक्तीचें हें दिव्यदर्शन झाल्यानें सर्व लोक विस्मयचकित झाले.

चिखलदा येथील व्यंकटराव, नानासाहेब, गंगाधरपंत, बाळा वैद्य इत्यादि मंडळींना त्यांच्या प्रार्थनेवरून महाराजांनीं योगाचें कांहीं शिक्षण दिलें. आणि मुख्य उपदेश हाच केला कीं, ' सगुण परमेश्वराची उपासना करून मनुष्यानें कृतार्थ व्हावें. सगुण उपासना केल्यावांचून ब्रह्मसाक्षात्कार होणार नाहीं. राजाला जसा आपल्या शिक्कामोर्तबाचा आणि कायद्याचा अभिमान असतो, तसाच देवाला आपल्या सगुण-रूपाचा व वेदशास्त्रांचा अभिमान आहे. शिक्कामोर्तब म्हणजे राजा नाहीं हें खरें; पण शिक्कामोर्तबाशिवाय राजाचा व्यवहार होऊं शकत नाहीं आणि राजाशिवाय नुसत्या शिक्कामोर्तबालाही महत्त्व नाहीं. प्रजाजनांनीं राजाचे कायदे पाळले म्हणजे राजाला जसा संतोष होतो, तसाच संतोष शास्त्रनियम पाळल्यानें ईश्वराला होतो. करितां शास्त्राज्ञे-प्रमाणें वागून ईश्वराची सेवा करा व आपलें कल्याण करून घ्या.' याप्रमाणें सर्वांना उपदेश करून महाराज चिखलदा सोडून निघाले. ते शके १८२० मध्यें वैशाख शु॥ १० दिवशीं नर्मदातीरावरील तिलक-वाडा या गांवीं येऊन पोंचले. त्या वेळीं ठिकठिकाणीं प्लेगाचा त्रास विशेष असल्यानें पुढें जाण्यास सरकारी प्रतिबंध होता. त्यामुळें तिलक-वाड्यासच मुक्काम करण्याचें महाराजांनीं ठरविलें.

## चातुर्मास ८ तिलकवाडा–शके १८२०

तिलकवाडा येथें मारुतीच्या मंदिरांत महाराजांचा चातुर्मास झाला. हें गांव बडोदा संस्थानांतील एक महाल आहे. नोकरीनिमित्तानें आलेले ७।८ दक्षिणी ब्राह्मण व इतर गुजराथी ब्राह्मण वगैरे मंडळींची वस्ती येथें बरी आहे. येथील मंडळी भाविक असल्यानें सर्व लोक नित्य महाराजांचे दर्शनास येत असत. रोग, पिशाच, संततिप्रतिबंध इत्यादिकांवर महाराजांनीं उपाय सांगावेत आणि श्रद्धा ठेवून लोकांनीं ते उपाय करून सुखी व्हावें असा क्रम सुरू होता. त्याच गांवांतील मणिशंकर नांव असणारा एक गुजराथी ब्राह्मण एके दिवशीं महाराजांचेकडे आला व त्यानें आपली पत्रिका दाखवून आपणांस संतति न होण्याचें कारण महाराजांना विचारलें. पत्रिका पाहून त्याला महाराजांनीं सांगितलें कीं, 'तुम्ही पूर्वजन्मांत सर्प मारला असल्यामुळें तुमच्या संततीला प्रतिबंध होतो. तो दोष दूर होण्याकरितां तुम्ही नागपंचमीव्रत करून नागबली करा म्हणजे तुम्हांला संतती होईल.' ही महाराजांची आज्ञा शिरसामान्य करून त्या ब्राह्मणानें तें सर्व यथाविधि केलें. त्यामुळें त्याला थोडक्याच काळांत मुलगा झाला. तिलकवाडयास रोज नर्मदाखंडाचें व्याख्यान चालूं होतें. येथेंच कूर्मपुराण आंध्रलिपींतील पोथीवरून देवनागरींत लिहून काढलें.

तिलकवाडयास गोविंद आत्माराम करंजगांवकर या गृहस्थांचे बंधु व मातोश्री राहत असून गोविंदराव बडोद्यास राहात होते. कांहीं उद्योग नसल्यामुळें गोविंदराव रिकामेच होते. त्यांना कांहीं तरी उद्योग लागावा म्हणून त्यांच्या मातोश्रीनें महाराजांना कांहींतरी उपाय गोविंदरावाकरतां सांगावा अशी विनंति केली. पण आपणांस कांहीं यासंबंधीं समजत नाहीं असें महाराजांनीं प्रथम सांगितलें. शेवटीं त्या बाईचा फारच आग्रह पाहून,

'तुमच्या मुलाला इकडे बोलावून घ्या म्हणजे मग पाहतां येईल' असें महाराजांनीं सांगितलें. त्याप्रमाणें बडोद्याहून गोविंदरावांना त्यांच्या मातोश्रीनें बोलावून आणलें. महाराजांची ती दिव्य मूर्ति पाहून गोविंद-रावांचे मनांत पूर्ण श्रद्धा उत्पन्न होऊन त्यांनीं अनन्यभावानें महाराजांना वंदन करून ते निश्चित झाले. दुसरे दिवशीं नदीवर स्नान करून ओल्यानें येण्याबद्दल गोविंदरावांना महाराजांची आज्ञा झाली. त्याप्रमाणें ते स्नान करून आल्यावर महाराजांनीं त्यांना एक मंत्र लिहून देऊन त्याचा जप करण्यास सांगितलें. महाराजांच्या आज्ञेप्रमाणें अत्यंत श्रद्धेनें गोविंदरावांनीं जप केला. त्याचें फळ म्हणून लगेच ८।१९ दिवसांतच त्यांना उत्तम नोकरीचा योग आला. वयाचे ५६ वर्षांपर्यंत त्यांनीं नोकरी केली व पुढें स्वेच्छेनें नोकरी सोडून पेन्शन घेतलें. मध्यंतरीं ते गरुडेश्वरीं महाराजांचे दर्शनार्थ आल्यावेळीं स्मार्ताग्नि ठेवण्या-बद्दल महाराजांची त्यांना आज्ञा झाली होती. त्याप्रमाणें पत्नी होती तोंपर्यंत त्यांनीं अग्निसेवा केली. ' स्वधर्माप्रमाणें वागावें म्हणजे परमेश्वर कल्याण करील ' असें त्यांना महाराजांचें नित्य सांगणें असे.

गणेश अनगरे या नांवाचे एक गृहस्थ सरकारी नोकर होते. यांचें कुटुंब नर्मदाबाई यांना बरेच दिवस संतति नव्हती. यांचें माहेर तिलक-वाड्यास होतें. नर्मदाबाईच्या मातोश्री वारूबाई करंजगांवकर यांचा एक नियम होता कीं, नर्मदाप्रदक्षिणा करणारे जे कोणी तेथें येतील त्यांना विचारून ज्याला जें आवश्यक असेल तें भांडीं, अन्न, वस्त्र इत्यादि देऊन त्याला साहाय्य करावयाचें. कोणी संन्यासी आल्यास त्यांना भिक्षेस बोलवावयाचें. असा नियम त्या बाईचा बरेच दिवस चालूं होता. महाराज तिलकवाड्यास आल्यावर तेथें दक्षिणी ब्राह्मणांचीं फारशीं घरें नसल्यामुळें त्या बाईच्या प्रेमाग्रहावरून त्यांचे घरीं केव्हां केव्हां जात

असत. एक दिवस असेच महाराज भिक्षेस आले असतां किंचित् रागावून वारूबाई महाराजांना म्हणाल्या कीं, 'महाराज! आपल्या सारख्या साधूंची सेवा करून आम्हांला काय फळ मिळालें? मुलीला (नर्मदाबाईला) अद्यापि मूलबाळ झालें नाहीं.' तें तिचें म्हणणें ऐकून महाराज म्हणाले कीं, 'तुमच्या मुलीला मुलगा होईल. कांहीं काळजी करूं नका. पण पांचव्या महिन्यांत शूलपाणीश्वराच्या देवळांत त्याची गव्हाच्या कोंडयाची तुळा करून मग त्याला द्यावें म्हणजे सर्व कल्याण होईल. त्याचें नांव वासुदेव असें ठेवावें.' याप्रमाणें महाराजांच्या आशीर्वादाप्रमाणें लवकरच नर्मदाबाईस मुलगा झाला. त्या मुलाच्या मुंजीस महाराजांनींच मुहूर्त काढून दिला होता. मुंज झाल्यावर त्याला महाराजांनीं विद्याप्रद मंत्र देऊन त्याचा जप रोज करण्यास सांगितलें होतें. त्याप्रमाणें तो पुढें मोठा होऊन त्याला काठेवाडमध्यें चूडानरेशांचेकडे गायन वादन मास्तराची नोकरी लागली. याच वासुदेव अनगरे याची वेणूबाई नांवाची बालविधवा मावशी योगाभ्यास करीत असे. समाधीपर्यंत या बाईचा अभ्यास झालेला होता. तिलकवाडयाहून ओल्यानें एक दिवसाआड महाराजांच्याकरितां ताकाचें मडकें डोक्यावर घेऊन वेणूबाईनें गरुडेश्वरीं जावें असा तिचा नियम असे.

एकदा गुरुवारीं एकादशी होती. त्या दिवशीं महाराजांचे दर्शनास गरुडेश्वरीं जावें असें ठरवून, वासुदेव, त्याची आई नर्मदाबाई व तेथील फौजदार हर्डीकर यांची पत्नी व मुलें इतकी मंडळी दुपारीं गरुडेश्वरीं जाण्याकरितां निघाली. गरुडेश्वरीं वारंवार येत जाऊं नये असें नर्मदाबाईस महाराजांनीं बजावून सांगितलें असतांही विशेष दर्शनाच्या ओढीमुळें त्या दिवशीं ती महाराजांची आज्ञा मोडून निघाली. वाटेंतच संध्याकाळ झाली. अंधार पडून शेवटीं रस्ता चुकला व मंडळी भलत्याच

रस्त्याला लागली. पुढें एका ठिकाणीं कडा तुटलेला असून रस्ता बंद झाला. सर्व मंडळी घाबरली. मुलें तर घाबरून रडूं लागलीं. रस्त्यांतच सर्व मंडळींनीं बसून महाराजांची प्रार्थना सुरू केली. तेव्हां एकदम थोडया अंतरावर एका बाजूस श्रीगुरुदेवदत्त असा महाराजांचेसारखा आवाज झालेला सर्वांनीं ऐकला. त्याबरोबर ती मंडळी उठली व त्या आवाजाच्या अनुरोधानें त्या दिशेला निघाली. थोडेसें पुढें गेल्यावर पुनः तसाच आवाज ऐकूं आला. याप्रमाणें तो शब्द ऐकत ऐकत त्याचे मागोमाग ती मंडळी शेवटीं गरुडेश्वरीं सुरक्षित येऊन पोंचली. त्या वेळीं तेथें भजन चाललें होतें. भजन संपल्यावर ही तिलकवाडयाची मंडळी महाराजांचे दर्शनास गेली. महाराजांनीं लगेच रागावून सांगितलें कीं, 'आज एक वेळ तुम्हांला श्रीदत्तमहाराजांनीं रस्ता दाखविला. यापुढें तुम्ही चुकल्यास आपणावर जबाबदारी नाहीं.' हें महाराजांचें रागाचें भाषण ऐकूनही दर्शन घडल्यानें सर्वांना पूर्ण समाधान वाटलें.

आश्विन मासांत महाराज तिलकवाडयाहून निघाले ते मणिनागेश्वर, कुंभेश्वर, गंगनाथ महादेव इत्यादि देवतांचीं दर्शनें घेऊन व कर्नाळी, चांदोद, व्यास, शुक इत्यादि क्षेत्रें पाहून बरकाळजवळ अत्रिमहर्षींच्या आश्रमांत येऊन पोंचले. तेथें एक अनसूयामातेचें स्तोत्र व एक पद महाराजांनीं केलेलें आहे.

तेथून निघाल्यावर कार्तिक वद्य पक्षांत शिनोर या गांवीं येऊन तेथें मार्कंडेश्वराचे मंदिरांत महाराजांनीं मुक्काम केला. येथें एक दीड महिना मुक्काम झाला. या गांवीं रामशास्त्री प्रकाशकर म्हणून एक ब्राह्मण राहात असत. एक संन्यासी आपले गांवांत आले आहेत असें समजल्यावरून ते महाराजांचेकडे गेले. तरुण वय असल्यामुळें साहजिकच थोडासा ताठा होता. तेथें येऊन रामशास्त्रींनीं उभ्यानेंच

नमस्कार केला व मर्यादा न ठेवतां कसेतरी बसले. महाराजांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. ते आपल्या चांदीच्या दत्तमूर्तीकडे पाहात बसले होते. त्यांना रामशास्त्री मोठ्यानें म्हणाले, 'कां महाराज ! कोणीकडून आला?' महाराजांनीं नुसते बोटांनीं अमुक दिशेकडून आल्याचें सांगितलें. नंतर 'तुमचा पूर्वीचा गांव कोणचा ? तुमचें पर्वाश्रमांतील नांव काय ? काय उद्योग करीत होता ? कोठें शिकला ?' असे एकसारखे बरेच प्रश्न रामशास्त्रींनीं महाराजांना केले. तेव्हां महाराजांनीं रागावून उत्तर दिलें कीं, 'तुमचा कोणी संबंधी बेपत्ता झालेला असल्यास तो आपण नाहीं.' हें महाराजांचें रागाचें भाषण ऐकून रामशास्त्रीही रागावून घरीं चालते झाले.

महाराज राहत होते त्याचे खालचे भागांत लीलानंदसरस्वती म्हणून एक स्वामी ६।७ वर्षें राहत होते. यांचे चातुर्मास अधिक झाले असल्यानें यांना महाराज वंदन करीत असत. त्या वेळीं त्यांनीं म्हणावें, 'महाराज ! मुद्रा, दंडसूत्र, कटिसूत्र आमचें कांहींच आश्रमास अनुसरून नसल्यानें आपणांकडून वंदन करून घेण्यास संकोच वाटतो.' तें ऐकून महाराजांनीं त्यांना जानवीं जमविण्यास सांगितलें. तीं जमल्यावर कटिसूत्र, दंडसूत्र सर्व त्यांना व्यवस्थित करून दिलें. दोघांचाही परस्पर संभाषणाचा योग नित्य येत असे. एकदा बोलतां बोलतां सहज महाराज म्हणाले कीं, 'काय करावें, रामचंद्रासाठीं आपण येथें आलों. तो तर इकडे येत सुद्धां नाहीं. एकदा फक्त येऊन गेला.' असें महाराजांचें बोलणें ऐकून लीलानंदांनीं रामचंद्रशास्त्रींना बोलावून आणून त्यांना त्याबद्दल विचारलें असतां ते म्हणाले कीं, 'टेंबेस्वामी विद्वान असले तरी ते फार संतापी असल्यानें त्यांचें आमचें जमणार नाहीं. त्यांचेकडे आपण जाणार नाहीं.' असें

लीलानंदाना सांगून रामशास्त्री परत गेले. त्या गांवांतच आपल्या मामाकडे ते राहात असत. तेथें एक पोक्त बाई बहुश्रुत अशी असून तिचें रामचंद्रशास्त्रीवर फार प्रेम होतें. यांनीं महाराजांच्याकडे जाऊन कांहीं तरी शिकावें असें तिला वाटे. कारण महाराजांची विद्वत्ता तिला अवगत झाली होती. म्हणून तिनें व मामानीं फार आग्रह केल्यामुळें रामशास्त्री पुनः महाराजांचेकडे आले, पण अद्यापि त्यांचें औद्धत्य कायम होतें. कसातरी नमस्कार करून एका बाजूस बेफिकीरपणानें बसले. महाराजांनीं बोलण्यास सुरवात केली. 'तूं काय शिकलास ?' असा महाराजांचा प्रश्न ऐकून 'आपलें वेदाध्ययन झालें असून कौमुदी, काव्य वगैरे झालें आहे. सध्यां आपण एके ठिकाणीं भागवत पुराण सांगतों' असें रामशास्त्रींनीं सांगितलें. नंतर त्यांना 'जन्माद्यस्य यतोन्वयात्' हा श्लोक सांगण्यास महाराजांनीं सांगितलें. तेव्हां रामशास्त्री म्हणाले कीं, 'मला अशा वेदांत श्लोकाचें विवेचन करतां येत नसल्यामुळें ते श्लोक कसेंतरी सांगतों. यावर महाराज म्हणाले कीं 'अरे! मुख्य समजणें आवश्यक असलेलें जर समजलें नाहीं तर भागवत वाचनाचा उपयोग काय ?' हें ऐकून रामशास्त्रींना राग आला. तें पाहून शांतपणें महाराज म्हणाले 'मात्रे अध्यात्मनिवेदनं। किं तदध्यात्मं। जीवब्रह्मणोरैक्यप्रतिपादनं। तदहं कथं विजानीयाम्। यावत्पूर्णो न वत्सरः।' हीं वाक्यें महाराजांच्या मुखांतून ऐकण्याबरोबर एकदम एक वर्षापूर्वी पडलेल्या स्वप्नाची आठवण रामशास्त्रींना झाली. लगेच सर्व राग शांत होऊन कंठ दाटून आला. अंगावर रोमांच येऊन नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. आणि एकदम उठून महाराजांचे पुढें येऊन रामशास्त्रींनीं साष्टांग नमस्कार घातला. स्वप्नांत पाहिलेली ती हीच मूर्ती अशी खात्री झाली. थोडया वेळानें महाराजांनीं रामचंद्रशास्त्रींना आज्ञा केली कीं 'आतां घरीं कांहीं उद्योग न करतां इकडे येऊन अभ्यास

सुरू कर. पंचदशी व भागवताचा पहिला श्लोक सुरू करूं.' हें ऐकून त्याप्रमाणें रामशास्त्रींनीं महाराजांचे जवळ अभ्यास सुरू केला. सर्व वेळ त्यांतच जात असे. फक्त आन्हिक व भिक्षा यांसाठीं कांहीं तास जात असत. एकदा असाच पाठ चालू असतां आपली पाणी पिण्याची नरोटी प्रसाद म्हणून रामशास्त्रींना महाराजांनीं दिली. ती त्यांनीं घरीं ठेवली. याप्रमाणें चालू असतां महाराज एके दिवशीं कोणासही न सांगतां तेथून निघून गेले. नंतर रामशास्त्रींना स्वप्नांत येऊन महाराजांनीं सांगितलें कीं–'उद्विग्न न होतां योगायोगानें जितकें मिळालें तितकें संभाळून उपासना चालू ठेवावी. दंडाचें लक्ष्मीवस्त्र व कटीसूत्र कोनाड्यांत राहिलें आहे तें नर्मदेच्या प्रवाहांत सोड किंवा तुजकडे ठेव.' याप्रमाणें आज्ञा ऐकून रामशास्त्रींना समाधान झालें. त्यांनीं तें लक्ष्मीवस्त्र व कटीसूत्र आपले जवळ ठेवलें. महाराजांचें दर्शन होण्यापूर्वींची रामशास्त्रींची हकीकत थोडक्यांत अशी कीं—रामशास्त्रींचे वडील बडोद्यास राहात असून रामशास्त्री वेदाध्ययनाकरितां शिनोरास आपल्या मामाकडे राहात असत. त्यांच्या आठराव्या वर्षी वडील प्लेगनें वारल्यामुळें त्यांना फार दुःख झालें व घरांतून कोठेंतरी निघून जाण्याचा त्यांनीं विचार केला. त्या वेळीं रात्रीं रामशास्त्रींच्या स्वप्नांत एक संन्याशी आले आणि म्हणाले कीं, 'तुझ्या जाण्यानें मातोश्रींना किती दुःख होईल हा तूं विचार केलास काय? कर्दमऋषि वनांत निघून गेले तरी कपिलमुनि आपल्या मातेला सोडून न जातां त्यांनीं तिला अध्यात्मोपदेश करून शोकरहित केलें.' हें स्वामींचें भाषण ऐकून रामशास्त्री त्यांना म्हणाले, 'अध्यात्म म्हणजे काय?' स्वामी म्हणाले, 'जीवब्रह्मांचें ऐक्य प्रतिपादन हेंच अध्यात्म.' त्यावर रामशास्त्री म्हणाले कीं, 'तें मला कसें समजेल?' तेव्हां स्वामी म्हणाले, 'तूं सध्यां उपदेशास अयोग्य असल्यामुळें एक वर्षानंतर हें सर्व तुला

ळेल ' हा सर्व संवाद स्वप्नांत संस्कृतांतच झाला. ते संन्याशी राम-
ास्त्रांचे स्वप्नांत वारंवार येऊन त्यांना सूचना करीत असत व आज्ञे-
माणें घडून न आल्यास चांगले मारीतही असत. याप्रमाणें राम-
ास्त्र्यांना उपदेश करण्याबद्दल देवांचें सांगणें झाल्यावरून महाराज
शिनोरास आले होते. प्रथम महाराज तेथें भुसाकळी या मोहोल्यांतील
वेठ्ठल मंदिरांत उतरले होते. त्या मंदिराच्या पंचांपैकीं एका गुजराथी
ब्राह्मणानें दुसऱ्या सोइस्कर जागेंत मार्कंडेयाच्या माडीवर महाराजांची
राहाण्याची व्यवस्था करून दिली होती. दुसरे खेपेस महाराज त्याच
ठिकाणांत उतरले होते. 'आणखी एक खेप इकडे होईल' असें महाराज
त्या वेळीं बोलले होते. शिनोरास आलेल्या दिवशीं रामशास्त्रींचे मामा
विनायकभटजी गौतम पंचवटींतून आलेले यांचे घरीं महाराज भिक्षेस
गेले. पण त्या दिवशीं रामशास्त्रींच्या वडिलांचें वर्षश्राद्ध असल्यामुळें
रामशास्त्रींनीं भिक्षा नाहीं असें सांगितलें. तेव्हां महाराज म्हणाले, 'मूनृत
भाषणानें यति विन्मुख गेल्याचा दोष लागत नाहीं.' असें सांगून
शास्त्रवचनही म्हणून दाखविलें.

शिनोरास महाराजांचा मुक्काम असतां त्यांच्या दर्शनास एके दिवशीं एक विधवा गुजराथी वृद्ध बाई आली. तिनें एक मोठा द्रोण भरून खडी-साखर महाराजांच्या पुढें ठेवली होती. महाराजांनीं त्या द्रोणाकडे ढुंकूनही पाहिलें नाहीं व इतरही कोणाला ती खडीसाखर घेण्यास सांगितलें नाहीं. २।३ दिवस तो द्रोण तेथेंच पडून होता. रामशास्त्रींनीं ती खडीसाखर न घेण्याचें कारण महाराजांना विचारलें. तेव्हां महाराज म्हणाले कीं, ' तीन दिवसांत त्या द्रोणावर माशी तरी बसलेली तूं पाहिलीस काय ? ' हें महाराजांचें सांगणें ऐकून नंतर रामशास्त्रींनीं तिकडे लक्ष ठेवलें. तेव्हां त्यांना दिसून आलें कीं जवळ माशा पुष्कळ असूनही त्या द्रोणावर एकही माशी बसत नाहीं हें महाराजांचें सांगणें खरें आहे.

मग याचें कारण रामशास्त्रींनीं विचारलें असतां 'तुला समजन काय करावयाचें? जिची साखर तिनें न्यावी.' असें सांगून महाराज स्वस्थ बसले. नंतर त्या बाईनें अत्यंत खिन्न होऊन ती खडीसाखर परत नेली. पुढें चौकशी केल्यावर, ती बाई पूर्ववयांत अतिशय दुराचारी असल्याचें समजलें. तेव्हां महाराजांची सर्वज्ञता सर्वांना पटली.

शिनोरास महाराजांचे जवळ रामशास्त्रींचें ग्रंथवाचन चालू होतें. भागवतांतील वेदस्तुतीसारखे विषयसुद्धां अत्यंत सुबोध पद्धतीनें सांगण्याची महाराजांची शैली होती. एकदां आपण पाठ घेतांना प्रश्न विचारून महाराजांना निरुत्तर करूं असें ठरवून रामशास्त्री तसा कांहीं विषय पाहून आले. त्या दिवशीं पाठास सुरवात झाल्याबरोबर महाराज त्यांना म्हणाले कीं, 'विद्या शिकणाऱ्यानें आपली विद्या पूर्ण होईपर्यंत तरी शिकविणाऱ्यास मी प्रश्न विचारून निरुत्तर करीन असें विचार मनामध्यें आणतां कामा नये' एवढेंच महाराज बोलले व त्या दिवशीं रामशास्त्री जो विषय विचारणार होते तो विषय आपण स्वतःच प्रसंगानें काढून त्याचें अत्यंत सोपपत्तिक विवेचन केलें. त्यामुळें रामशास्त्रींचा गर्व पूर्णपणें जिरून गेला.

रोज सायंकाळीं नर्मदेच्या घाटावर संध्येकरितां दक्षिणी ब्राह्मण जमत असत. महाराजही त्या वेळीं तेथें जात. त्यांनीं एकदा असें पाहिलें कीं, ब्राह्मण मंडळी घाटावर कपडे काढून ठेवून पाण्याशिवायच लघुशंकेस जातात. हें पाहून महाराजांनीं एकदा पुराणाचे वेळीं प्रसंग पाहून 'आचारः प्रथमो धर्मः' हा विषय काढला व त्याचें सांगोपांग विवेचन केलें. त्या वेळेपासून सर्व ब्राह्मणमंडळी लघुशंकेस जातांना पाणी नेऊं लागली व नित्य वैश्वदेव करूं लागली.

एकदां असेच महाराज व लीलानंदस्वामी दोघे सायंकाळीं घाटावर चालले होते. रस्त्यांत कांहीं मुलें पतंग उडवीत होतीं. त्याचा दोरा

दोघांनाही लागला. संध्याकाळचे वेळीं पुनः स्नान करण्याचा त्रास पड-णार हें पाहून लीलानंदस्वामी म्हणाले कीं, 'आम्हांला संन्याशांना-सुद्धां हीं पोरें किती त्रास देतात?' पण महाराज म्हणाले कीं, 'अहो, त्रास कशाला मानावा? हीं आपलींच मुलें आहेत. यांचा त्रास कसा मानतां येईल?' हें महाराजांचें शांत बोलणें ऐकून लीलानंद गप्प बसले.

महाराजांना शौचाचा विकार बराच होता. एकदा एक संग्रहणीचा रोगी महाराजांचेकडे आला असतां त्याला त्याबद्दल उपाय सांगून 'आपणांसही ही व्याधि आहे. तो पूर्वाश्रमांतच एकानें आभिचारिक प्रयोगानें आपल्या पाठीमागें लावला आहे. ताक, सुरण, जायफळ व एखादे वेळीं अफू यांचा उपयोग हा रोग वाढल्यास करण्यांत येतो' असें म्हणाले.

रामशास्त्रींच्या व त्यांच्या मामांच्या घरीं दत्तोपासना पर्वी नव्हती. रामशास्त्रींचा जन्म झाल्यावर एका ब्राह्मणानें त्यांच्या मामांना गुरुचरित्राची पोथी आणून दिली व त्यांना तें नित्य वाचण्यास सांगितलें. त्याप्रमाणें मामांनीं गुरुचरित्र वाचण्याचा नियम ठेवला होता. पुढें दत्तजयंतीचा उत्सव आला तेव्हां गुरुचरित्र सप्ताहाकरितां ती पोथी आणण्यास महा-राजांनीं मामांना सांगितलें. तेव्हां मामांनीं पोथी आणून दिली. त्या वेळीं महाराज सहज थट्टेनें बोलले कीं, 'तुम्ही वैदिक मंडळी! प्राकृत गुरु-चरित्राकडे पाहणारदेखील नाहीं. तर वाचन कोठलें?' हें ऐकून मामांनीं आपण रोज वाचीत असल्याचें सांगितलें. नंतर एक दोन दिवसांतच रामशास्त्रींच्या मामांना दत्तमंत्राचा उपदेश महाराजांनीं केला.

एके दिवशीं पाठ चालू असतां महाराज रामशास्त्रींना म्हणाले कीं, 'लवकरच एक नेहमीं भटकत फिरणारा अक्षरशत्रु मनुष्य येणार आहे.' हें ऐकून रामशास्त्रींना वाटलें कीं, असेल कोणीतरी पूर्वीचा ओळखीचा

ानुष्य. नंतर २।३ दिवसांनीं एक मध्यम वयाचा बरोबर फक्त दोन पंचे, ांब्या व काठी इतकेंच सामान असलेला असा एक गुजराथी ब्राह्मण महाराजांचे दर्शनास आला. तो शिनोरास सर्वांच्या ओळखीचा होता. पूर्वी तो ारंवार इकडील भागांत गुळाचा व्यापार करण्यास येत असे. तोच गृहस्थ ा वेळीं अत्यंत विरक्त बनून महाराजांचेकडे आलेला होता. महाराज आठ देवसपर्यंत त्याच्याशीं बोललेच नाहींत. तो रोज पहांटे स्नान करून महाराजांचे माडीवर एका बाजूस बसून राही. महाराज भिक्षेस निघाले कीं तो ाहेर कोठें तरी जेवण उरकून पुनः महाराज परत येण्याचे आंत येऊन असे. पुढें 'एकदा येथें तूं कां बसून राहतोस?' असें महाराजांनीं त्याला वेचारलें असतां 'हेच समर्थपाय माझा उद्धार करतील अशा विश्वासानें मी या पायांजवळ शरण आलों आहें' असें सांगून त्या ब्राह्मणानें आपली पूर्वीची सर्व हकीकत महाराजांना सांगितली. ती अशी 'माझें गांव तेलंगपूर. लहानपणीं अल्लडपणामुळें मला लोक गांडा म्हणजे वेडा म्हणत. माझें मूळ नांव कल्याण. माझें लग्न वयाच्या आठवे वर्षीच झालें. शिक्षण झाल्यानंतर कांहीं दिवस शाळेंत व नंतर व्यापाऱ्याकडे माझी नोकरी झाली. पण मनःशांति नसल्यामुळें साधुपुरुषांचे शोधार्थ मद्रासपर्यंत फिरलों, पण संतांची भेट झाली नाहीं. माझें उपास्य दैवत महादेव असून मी जातीचा ब्राह्मण आहें व ब्राह्मणजातींतीलच सद्गुरु मला मिळावेत अशी माझी इच्छा आहे. कांहीं दिवस मी पांदेचरीस नोकरीस होतों. पण लवकरच माझी ती नोकरी सुटली. त्यामुळें मी परत घरीं आलों. पण मला त्या वेळीं चित्ताच्या तळमळीमुळें अन्नपाणीही गोड लागेना. आईबाप जिवंत असल्यानें तपश्चर्येकरितां बाहेर पडतां येईना. घरची चांगली श्रीमंती होती, पण कोणत्याही विषयापासून सुख समाधान कांहीं मला मिळेना. म्हणून व्यापाराचें निमित्त करून नर्मदातीरावर राहून तेथील ब्राह्मणांची सेवा करण्यांत काळ घालवूं

लागलों. परंतु हें वडिलांना पसंत पडलें नाहीं. ते मला त्याबद्दल फार कटु बोलले म्हणून मीं व्यापार बंद केला व वसुलीच्या निमित्तानें घरां-तून बाहेर पडलों. नंतर बैराग्याच्या वेषांत ओंकारेश्वराचे झाडींत एका वडाखालीं राहूं लागलों. सद्‌गुरु केव्हां भेटतील ही उत्कंठा मला सारखी लागली होती; मला लोक तेव्हांपासून ब्रह्मचारी म्हणूं लागले. नंतर कांहीं दिवसांनीं पांडुरंग महाराज म्हणून एक समर्थ पुरुष नर्मदातीरावरच होते. त्यांचेकडे जाऊन मीं सर्व हकीकत त्यांचेपुढे सांगितली. त्यांचा असा नियम होता कीं भिक्षा मागून धान्य आणावें व तें स्वतः दळून नर्मदाप्रदक्षिणा करणाऱ्यांना तें अन्न घालावें. त्यांनीं तयार केलेलें अन्न चोरांनीं चोरी करून एके रात्रीं खाल्लें. त्याबरोबर त्यांचीं पोटें फुगलीं व त्यांचे प्राण जाण्याची पाळी आली. तेव्हां ते चोर पांडुरंग महाराजांना शरण आले. नंतर त्या सर्वांना महाराजांनीं पुनः अन्न देऊन व उपदेशानें त्यांची वृत्ति सुधारून परत पाठवून दिलें. नर्मदामाता महाराजांचेवर प्रसन्न होत्या. त्यांनीं माझी स्थिति पाहून सांगितलें कीं, 'अरे या भयंकर अरण्यांत साधु कसे सांपडतील ? तूं नेमावर येथील सिद्धनाथाच्या देवळांत जपानुष्ठान कर म्हणजे तेथेंच तुला सद्‌गुरूंचा शोध लागेल.' अशा त्यांच्या आज्ञेप्रमाणें मी नेमावर येथें येऊन अनुष्ठान करूं लागलों. तेथें कांहीं मंडळींचेकडून आपली वार्ता समजल्यामुळें आपणांस शरण आलों तरी आपण माझ्यावर कृपा करून कृतार्थ करावें.' ही आपली सर्व हकीकत त्या ब्राह्मणानें महाराजांना सांगून आपलें येण्याचें कारण सांगितलें. त्या ब्राह्मणास लोक गांडाबुवा असे म्हणत होते. गांडाबुवांचें वृत्त ऐकून घेऊन महाराज नुसते हंसले. पुढें कांहीं दिवसांनीं त्यांना बरोबर घेऊन महाराज सिनोरहून निकोदा या गांवीं आले. तेथें एका शंकराच्या देवळांत गांडाबुवांना राहण्यास सांगून महाराज म्हणाले कीं, 'तूं येथें शंकरासमोर योगाभ्यास कर,

श्रद्धेप्रमाणें शंकरपरमात्मा तुला फळ देतील ' एवढें सांगून त्यांना योगाभ्यासाची दिशा दाखवून दिली व महाराज पुढें निघून गेले. नंतर कांहीं दिवसांनीं गांडाबुवा महाराजांचे दर्शनास आले असतां महाराजांनीं त्यांना आज्ञा केली कीं, ' तूं प्रथम आईबापांकडे जाऊन त्यांची क्षमा माग आणि त्यांची प्रेमानें आज्ञा घेऊन चातुर्मासाचे सुमारास द्वारकेंत आपणांकडे ये.' याप्रमाणें आज्ञा झाल्यामुळें गांडाबुवा घरीं निघून गेले.

शिनोर येथें कृष्णराव पेंढारकर म्हणून एक मनुष्य कोर्टांत उमेदवार होते. ते रोज महाराजांचे दर्शनास नियमानें येत असत. महाराजांना भिक्षेचे वेळीं गांवांतील दक्षिणी ब्राह्मणांचीं घरें पेंढारकर दाखवीत व एक कळशी भरून घेऊन तें पाणी पुढें टाकीत पेंढारकरांनीं जावें व महाराजांनीं त्या जागेवरून पाठीमागून जावें असें चाललें होतें. तीन घरची भिक्षा महाराजांनीं आणावी, येतांना नर्मदेच्या पाण्यांत ती मधुकरीची झोळी बुडवून मग मंदिरांत यावें. तेथें पेंढारकरांनीं गाईच्या शेणानें जागा सारवून ठेवलेली असे, तेथें मधुकरी ठेवावी. नंतर अन्नाचे तीन भाग करून त्यांपैकीं एक नर्मदामातेस व दुसरा गाईस देऊन तिसऱ्या भागाचें सेवन आपण करावयाचें. एखादे दिवशीं विटाळ वगैरे झाल्यास तें अन्न नर्मदेंत सोडून उपवास करावयाचा. पाठप्रवचन मात्र त्या दिवशींही नित्याप्रमाणें चालूंच राहावयाचें. पेंढारकरांची सात्त्विक वृत्ति पाहून त्यांना महाराजांनीं एक मंत्र देऊन त्याचें अनुष्ठान करण्यास सांगितलें. तें त्यांनीं श्रद्धेनें करण्याबरोबर त्यांना चांगली नोकरी लागली. पुढें मामलेदाराच्या जागेपर्यंत त्यांची नोकरी होऊन शेवटीं पेन्शन मिळाली. नोकरीवर असतांना कांहीं आरोप त्यांच्यावर आला होता. पण महाराजांच्या कृपेनें त्या संकटांतून ते मुक्त झाले.

गांडाबुवांना आपल्या आईबापांचेकडे पाठवून महाराज गिरनार पर्वतावर आले. तेथें श्रीदत्तपादुकांना वंदन करून, सोरटी सोमनाथाचें दर्शन व्हावें म्हणून माघ महिन्यांत प्रभास क्षेत्रांत आले. सोमनाथाचे पुजारी बाळंभट मोडे यांचे आग्रहावरून महाराज कांहीं दिवस प्रभास क्षेत्रांत राहिले. तेथें बडोद्याचे दिवाण वगैरे मंडळी दर्शनार्थ आली. महाराजांची संगति त्यांना घडल्यामुळें त्या लोकांच्या आचारविचारांत पूर्ण परिवर्तन घडून आलें. सर्वांनीं नास्तिक्य टाकून आपल्या आचारधर्माप्रमाणें वागण्यास सुरुवात केली.

प्रभासपट्टणांत महाराजांना द्विसाहस्री गुरुचरित्रावर टीका लिहिण्याबद्दल देवाची आज्ञा झाली. त्या वेळीं मूळ प्रतसुद्धां जवळ नव्हती तरीही आज्ञेप्रमाणें टीकेस आरंभ केला व दिव्यस्मृतीनें ९ अध्यायांपर्यंत तेथें टीका झाली. त्याबद्दलचें महाराजांचें पत्र असें आहे ‘ तूर्त येथें विशेष पाठ देण्याचें वगैरे नसल्यामुळें रोज दोन घटका गुरुचरित्रावर टीका लिहिण्याची होत असते. स्तुति व पहिले चार अध्याय आतांच पुरे झाले. संस्कृतटीका करणेची लहर लागली आहे. तूर्त बाराशें झाली. पुढें कशी लहर लागेल कोण जाणें. श्रीदत्त ’

सावंतवाडीच्या रामभाऊ सबनीसांचे चिरंजीव गजानन बापू सबनीस हे त्या वेळीं द्वारकेस मामलेदार होते. ते महाराजांना येऊन भेटले. यांची मुंज पूर्वाश्रमांत महाराजांचे हस्तें झाली होती, हें दोघांच्याही लक्षांत येऊन परस्परांची पूर्ण ओळख पडली. सबनीसांच्या मनांत महाराजांचे विषयीं आदर निर्माण झाला. त्यांची वृत्तीच पूर्णतया पालटुन गेली. पुढें गरुडेश्वरींही महाराजांचे दर्शनार्थ ते गेले होते.

प्रभासक्षेत्राहून निघून महाराज प्राचीसरस्वतीस जाऊन पोंचले. या ठिकाणींच येऊन श्रीकृष्ण परमात्मा निजधामास गेले होते. तेथें वंदन

करून महाराज पोरबंदर म्हणजे सुदामपुरीं या ठिकाणीं आले. तेथें कांहीं दिवस वास्तव्य करून नंतर ज्येष्ठ मासांत श्रीक्षेत्र द्वारका या सातव्या मुक्तिपुरींत महाराज येऊन पोंचले.

## चातुर्मास ९ द्वारका–शके १८२१

द्वारकेंत आल्यावर श्रीशंकराचार्यांच्या शारदा मठांत महाराजांचा मुकाम होता. या वर्षी पाऊस नसल्यानें या भागांत भयंकर दुष्काळ पडलेला होता. चारा नसल्यानें पांच रुपयांससुद्धां म्हैस घेण्यास कोणी कबूल होईना. आपापल्या बायका मुलांनासुद्धां सोडून देण्यापर्यंत पाळी आलेली होती. गायकवाड सरकारनें त्या वर्षी अडीच लाख रुपये लोकांना अन्नासाठीं वांटले होते. महाराजांच्या येण्यानें तेथील सर्व लोकांना आनंद वाटून चातुर्मास मुक्काम येथेंच करण्याबद्दल सर्व लोकांनीं महाराजांना विनंति केली. त्याप्रमाणें तेथेंच शके १८२१ सालचा चातुर्मास झाला. दक्षिणी ब्राह्मणांची वस्ती द्वारकेंत असल्यामुळें भिक्षेची अडचण भासली नाहीं.

द्वारकेस येतेवेळीं गुजराथ प्रांतांतूनच महाराजांना यावें लागलें. त्या प्रांतांत दक्षिणी ब्राह्मणांचीं घरें अगदींच कमी. त्यामुळें महाराजांना ३३ दिवस भिक्षा मिळाली नाहीं. गुजराथी ब्राह्मणांचेकडून मिळालेलें खारीक खोबरें खाऊनच राहावें लागलें. पण धर्मरक्षणाचे उद्देशानें महाराजांनीं तसे भयंकर शारीरकष्टही सहन करून द्वारकेची यात्रा पुरी केली. अशा त्रासामुळें रक्त पडलें. संग्रहणीचा विकार जास्ती बळावला. केव्हांतरी पाणी प्याल्याबरोबर तो विकार वाढत असे. म्हणून पाणी न पितां मिळेल तेथें महाराज ताकच घेत असत. प्रारब्ध भोगूनच संपविलें पाहिजे अशा निर्धारामुळें त्याचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न कधींच महाराजांचेकडून झाला नाहीं. असे कष्ट नेहमीं होत असून देखील नेहमींच्या कार्यांत

कधींच खंड पडला नाहीं. एकंदर चार महिने द्वारकेंत महाराजांचा मुक्काम झाला.

महाराजांनीं तेथील शंकराचार्यांच्या गादीचा स्वीकार करावा म्हणून ग्रामस्थ मंडळींनीं महाराजांना आग्रहाची विनंति केली. पण महाराजांनीं हें काम आपण पतकरणार नाहीं असें सर्वांना स्पष्ट सांगितलें. पण तरीसुद्धां पुढें दोन वर्षेंपर्यंत तेथील मंडळी तें पीठ स्वीकारण्याबद्दल महाराजांना आग्रह करीत होतीच. महाराजांनीं जेव्हां आतां यापुढें हा आग्रह आपणांस बिलकूल खपणार नाहीं असें सांगितलें तेव्हां नाइलाजानें मंडळी गप्प बसली.

द्वारकेंत असतांना द्विसाहस्री गुरुचरित्राची टीका दहाव्या अध्यायापासून सुरू करून ती पूर्ण केली. मूळ ग्रंथ जवळ नसतांनाच ही टीका झाली. मूळ गुरुचरित्र १९ वर्षांपूर्वीं माणगांवीं तयार झालें होतें. त्या मूळ श्लोकांचें या वेळीं नुसतें स्मरण करूनच टीका झाली. याचें स्वतः महाराजांनाही आश्चर्य वाटलें. त्यासंबंधी महाराजांचे एका पत्रांत पुढीलप्रमाणें उल्लेख आहे. ‘ आश्विन वद्य ७ शके १८२१ द्वारका. सौराष्ट्र देश श्रीक्षेत्र प्रभास येथें ९ अध्यायांची टीका झाली. बाकीची आनर्त देश श्रीक्षेत्र द्वारका येथें १४ अध्याय पूर्ण झाली. ही टीका होणें येवढा ह्या व्यक्तीचा अधिकार नाहीं. रामो हरी करणाऱ्या मुखाचें हें माहात्म्य नव्हे. तर श्रीस्वामींचा अनुग्रह व स्वहृदयस्थ स्वमहिमव्यापक श्रीगुरुप्रसाद जाणावा.’

द्वारकेंत असतांनाच एका गुजराथी गृहस्थाच्या सांगण्यावरून गुरुचरित्रावर महाराजांनीं चूर्णिकाही लिहून तयार केली.

पूर्वी महाराजांनीं आज्ञा केल्याप्रमाणें गांडाबुवा घरीं आईबापांना भेटून त्यांची परवानगी घेऊन द्वारकेंत महाराजांचेकडे आले. त्यांनीं

सांगितलें कीं ' आईबापांनीं आपणांस तीन अटी घातल्या आहेत. एक-मरणाचे वेळीं त्यांचेजवळ उपस्थित राहाणें, दुसरी-त्यांचे और्ध्वदेहिक कृत्य पार पाडणें व तिसरी-माझ्या मुलीचें लग्न लावून देणें. अशा तीन गोष्टी करण्याचें वचन घेऊन आईबापांनीं मला जाण्यास परवानगी दिली आहे.' तें गांडाबुवांचें भाषण ऐकून महाराजांनीं सांगितलें, ' कांहीं हरकत नाहीं. श्रद्धेप्रमाणें कार्यसिद्धि होऊन जाईल.'

महाराजांनीं गांडाबुवांची एकदा परीक्षा पाहिली. तो प्रकार असा-द्वारकेंतून दुसरे दिवशीं निघावयाचें होतें. आदले दिवशीं महाराज गांडाबुवांना म्हणाले कीं, 'आज बेटांत जाऊन श्रीकृष्णप्रभूंचें दर्शन घेऊन रविवारीं बोटीनें प्रभासपट्टणास जा. तेथें बाळंभट भोंडे यांची मुलगी द्वारकाबाई आपलें दर्शन नसल्यानें शोक करीत आहे. तिच्या मनाचें समाधान करून राजकोट येथें आपणांस येऊन भेटावें.' अशी महाराजांची आज्ञा होण्याबरोबर गांडाबुवांनीं निघण्याची तयारी केली. तें पाहून जवळच्या मंडळींनीं महाराजांना सांगितलें कीं, ' आज आतां शुक्रवारीं रात्र झाली. या वेळीं रस्त्यानें जाणें धोक्याचें आहे. पायानें जाण्यास वेळ लागेल, तर याला उद्यां पाठविल्यास बरें होईल.' हें लोकांचें बोलणें ऐकून महाराज गांडाबुवाकडे पाहून फक्त हंसले. सद्गुरूंचा अभिप्राय त्या एकनिष्ठ सेवकाचे तत्काळ ध्यानांत आला, आणि लगेच निश्चय करून गुर्वाज्ञा पालन करण्याकरितां गांडाबुवा तेथून निघाले. रात्र आहे कसें जावें असा कांहींही विचार मनांत न आणतां पायींच प्रवास करून मध्यरात्रीचे सुमारास समुद्रतीरावर पोंचले. तेथें त्याच वेळीं एक गलबत बेटांत जाण्यास तयार होतें. त्यांत बसून रात्रीं दोनचे सुमारास बेटांत पोंचले. तेथें नारायणराव महालकरी यांचेकडे मुक्काम केला. दुसरे दिवशीं शनिवारीं सकाळीं नित्यकर्म आटोपून श्रीकृष्णपरमात्म्याचें दर्शन घेतलें व तेथून दुपारीं निघाले. लगेच रविवारीं

सकाळीं द्वारकेस गांडाबुवा हजर. हा चमत्कार पाहून महाराजांच्या अचिंत्य शक्तीबद्दल सर्व लोकांना आश्चर्य वाटलें. महाराज शनिवारींच राजकोटला निघून गेले होते. नंतर दुपारच्या बोटीनें गांडाबुवा प्रभासपट्टणास गेले. दुसरे दिवशीं द्वारकाबाईच्या घरीं जाऊन तिचें समाधान करण्याचा त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला. पण तिचें समाधान कांहीं होऊं शकलें नाहीं. तेव्हां निरुपायास्तव गांडाबुवा तेथून निघून प्राचीसरस्वती, गिरनार हीं स्थानें पाहून राजकोटास महाराजांचा मुक्काम होता तेथें येऊन दाखल झाले. महाराज त्यापूर्वीच द्वारकेहून राजकोटास आलेले होते. सर्व प्रवास सुखाचा झाल्याचें गांडाबुवांनीं महाराजांना सांगितलें. द्वारकाबाईचें दुःख कमी न झाल्यामुळें तिला महाराजांनीं प्रभासाहून बोलावून घेतलें व तिला उपदेश करून तिच्या मनाचें पूर्णपणें समाधान केलें. त्या वेळीं तिच्या मनाला शांति मिळाली. आत्मीय मानलेल्या भक्ताबद्दल महाराजांचा वात्सल्यभाव कसा होता याबद्दलचें हें एक उदाहरण आहे.

राजकोटला महाराजांचे दर्शनार्थ मोठे मोठे इंग्रजी शिकलेले अधिकारी येत असत. पण महाराजांचें तें दिव्य चारित्र्य पाहिल्याबरोबरच त्यांची मान महाराजांचे चरणीं आपोआपच नम्र होत असे व ते महाराजांचे दास बनत असत. एके दिवशीं कोणी माणसें नसतांना एक दयानंदांचा शिष्य महाराजांचे जवळ येऊन त्यांचा अधिक्षेप करूं लागला. तेव्हां महाराज शांतपणानें त्याला म्हणाले कीं, ' बाबा ! तुझा आमचा कांहीं संबंध नसतांना तूं उगाच कां बोलतोस ? आम्हाला मारण्याची तुझी इच्छा असल्यास मार व तुझ्या मनाचें समाधान करून घे ' असें म्हणून महाराजांनीं खरोखरच आपला गाल त्याचे पुढें केला. तो आतां महाराजांना मारणार इतक्यांत हा प्रकार समोरच्या माडीवरून

एका बाईनें पाहून ती मोठमोठयानें ओरडतच खालीं आली व सर्व मंडळींना तिनें ती हकीकत सांगितली. लगेच मंडळी महाराजांचेकडे धांवत आली, पण तो शिष्य त्यापूर्वीच पळून गेला होता.

महाराज राजकोटहून निघाले ते बढवाण, विरमगांव या गांवांवरून सिद्धपूर येथें येऊन पोंचले. गांडाबुवाही बरोबर होतेच. तेथें सरस्वती-नदीची स्तुति करून वंदन केलें आणि हाटकेश्वराचे मंदिरांत वास्तव्य केलें. तेथें तीन महिने वास्तव्य झालें. दत्तजयंतीचा उत्सव त्या ठिकाणीं मोठया प्रमाणांत झाला. तेथें गीतेवर रोज प्रवचनें होत होतीं. पाटणा-गांवाहून बंबमहादेवसरस्वती या नांवाचे एक संन्याशी सिद्धपूर येथें महा-राजांचेकडे आले. त्यांचे इच्छेप्रमाणें महाराजांनीं त्यांना रुद्रभाष्य समजावून सांगून कांहीं वेदान्तही समजावून सांगितला. आणखी कांहीं संन्याशी व ब्रह्मचारी तेथें राहात होते; त्यांपैकीं एक ब्रह्मचारी कर्नाटकां-तील होता. तो बदरीनारायण, बदरीकेदार, गंगोत्री इत्यादि यात्रा करून आलेला होता. त्याला तेथें संग्रहणीच्या त्रासामुळें अत्यंत अशक्तता आली होती. त्या ब्रह्मचाऱ्याची खाण्यापिण्याची व्यवस्था ठेवण्याबद्दल महा-राजांनीं तेथें येणाऱ्या सर्व मंडळींना सांगून पाहिलें, पण तिकडे कोणींच लक्ष दिलें नाहीं. तें पाहून त्या ब्रह्मचाऱ्याची १५ दिवस व्यवस्था ठेवण्याबद्दल महाराजांनीं गांडाबुवास सांगितलें. त्याप्रमाणें गांडाबुवा त्याच्याकडे लक्ष पुरवूं लागले. १५ दिवसांनीं त्या ब्रह्मचाऱ्याचा अंतकाळ जवळ आला असें पाहून महाराज त्याचे जवळ जाऊन त्याला म्हणाले कीं, 'तुझ्याजवळ जें गंगाजळ आहे तें तूं सर्व अंगास लावून पिऊन टाक व ईश्वरनाम-स्मरण कर' त्याप्रमाणें त्यानें केलें व थोडक्याच वेळांत दत्त दत्त असें नामस्मरण करीत महाराजांचेकडे पाहात पाहात त्यानें प्राण सोडला. सत्संगतीमुळें तो सद्गतीस गेला. त्यानंतर महाराजांनीं गांवांतील गृहस्थ

मंडळींना बोलावून त्यांची चांगलीच हजेरी घेतली. तेव्हां त्या मंडळींनीं क्षमा मागून यापुढें यावच्छक्य आपण अतिथीसत्कार करीत जाऊं असें कबूल केलें. याच गांवांत कृष्णंभट वैजापूरकर या नांवाचे एक प्रेमळ गृहस्थ डाकोरजीचे पूजारी राहात असत. कांहीं दुष्ट संगतीमुळें त्यांना गांजाची संवय लागली. ती इतकी कीं, रात्रंदिवस त्या गुंगींतच ते राहात. आपल्या पतीची ती दुरवस्था पाहून त्यांच्या स्त्रीला वाईट वाटून ती महाराजांना शरण गेली व तिनें पतीला सुधारण्याबद्दल महाराजांना उपाय विचारला. महाराजांनीं त्याच्या गळ्यांत बांधण्याकरितां ताईत मंत्रून दिला व कांहीं गोळ्याही देऊन 'त्या गोळ्या पतीस खाण्याकरितां आपण दिल्या आहेत असें सांगन त्याला खाण्यास सांगा' असें त्या स्त्रीला सांगितलें. त्याप्रमाणें त्या स्त्रीनें आपल्या पतीस महाराजांची आज्ञा कळवितांच कृष्णंभटजींनीं ताईत आपल्या गळ्यांत बांधून त्या गोळ्याही खाल्ल्या. एकदां ते महाराजांच्या दर्शनास आले असतां 'कसें काय' म्हणून विचारलें. तेव्हां त्यांना लज्जा वाटून त्यानीं महाराजांचे पाय धरून सांगितलें कीं, 'आपल्या कृपेनेंच मी दुःसंगतींतून मुक्त झालों. आतां माझ्यावर कृपा करावी व कांहीं सेवा घ्यावी.' नंतर महाराजांनीं त्यांना मंत्रोपदेश केला. पुढें ते महाराजांचे एकनिष्ठ भक्त झाले. प्रतिवर्षी महाराज असतील त्या ठिकाणीं जाऊन महाराजांचें दर्शन घेण्याचा त्यांचा नियम होता. मुक्त्याला येथें त्यांनीं शेवटचें दर्शन घेतलें. गुरुकृपेनें शेवटीं त्यांचा अधिकार मोठा वाढला. शेवटीं आजारी झाल्यामुळें त्यांनीं आतुर संन्यास घेतला. अंतकाल जवळ आला असें पाहून त्यांनीं घरांतील सर्व मंडळींना सांगितलें कीं, 'आतां मला बरें वाटतें. तुम्ही सर्व जेवण करून या.' या त्यांच्या सांगण्याप्रमाणें सर्व मंडळी जेवणास निघून गेली असें पाहून कृष्णंभटजी उठून रणछोडजीच्या मूर्तीसमोर जाऊन बसले आणि महाराजांचें त्यांनीं ध्यान केलें. नंतर एकदम मोठ्यानें प्रणवोच्चार करून

लगेच देह सोडला. महाराजांच्या कृपेनेंच त्यांना याप्रमाणें उत्तम गति मिळाली.

सिद्धपुराहून दत्तजयंती झाल्यावर महाराज निघाले व डाकोरास येऊन पोंचले. आपण डाकोरास येत असल्याचें शिनोरास रामशास्त्रींना पत्रद्वारें महाराजांनीं कळविलं होतें. त्याप्रमाणें रामशास्त्री, त्यांचे बंधु बाळकृष्ण-शास्त्री व महाराजांचे जवळ कांहीं योगाचें शिक्षण घेतलेला एक गुजराथी ब्राह्मण असे तिघेजण मार्गशीर्ष वद्य द्वितीयेलाच डाकोरास येऊन पोंचले. तेथें ते तीन दिवस राहिले तरी महाराज आले नाहींत, तेव्हां त्यांनीं पंचमीस संध्याकाळीं निघण्याचें ठरविलें. त्याच दिवशीं संध्याकाळीं ही मंडळी निघण्याचे तयारींत असतां महाराज आले व दारातूंनच म्हणाले कीं, 'ज्यांची जाण्याची तयारी असेल त्यांनीं भेट होतांच जावें' याप्रमाणें एकाएकीं महाराजांना पाहतांच सर्वांनीं उठून नमस्कार केला. त्या दिवशीं अर्थातच कोणी गेलें नाहीं. नंतर सायं-संध्या वगैरे झाल्यावर महाराजांनीं द्विसाहस्रीची पोथी रामशास्त्रींना वाचण्यास दिली. नुकतीच ती टीका व चूर्णिका द्वारकेस तयार झाली होती. त्याच वेळीं त्या ग्रंथावर कांहीं प्रवचन महाराजांनीं केलें. थोडया वेळानें तुळशीवृंदावनाच्या ओटयावर बसून महाराजांनीं एका वर्गाचीं पदें म्हणण्यास रामशास्त्रींना सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं पदें म्हणतांच आपण स्वतः त्याच्या जटा, घन, पंचसंधि, माला, रथक्रम, दंडक्रम इत्यादि विकृति महाराजांनीं म्हणून दाखविल्या व रामशास्त्रींचेकडूनही म्हणून घेतल्या. दुसरे दिवशीं पहांटे शौचमुखमार्जन झाल्यावर राम-शास्त्रींना बरोबर घेऊन महाराज गोमती नदीवर गेले. नदीला पाणी थोडें होतें पण तेथेंच स्नान वगैरे आटोपून परत आले. नंतर 'डाकोर-नाथाचे दर्शनास जावयाचें आहे काय?' असें रामशास्त्रींनीं विचारलें

असतां महाराजांनीं 'नाहीं' असें सांगितलें. याचें कारण महाराज आदले दिवशीं सायंकाळीं आले त्या वेळीं एका भजनी बाईच्या सांगण्यावरून डाकोरनाथांच्या दर्शनाकरितां देवळांत गेले. पण दरवाजा बंद होण्याची वेळ झाली नसतांही दरवाजा एकाएकीं बंद झाला. हें पाहून डाकोरनाथाची दर्शन देण्याची इच्छा नाहीं असें म्हणून महाराज परत आले व पुनः तिकडे गेले नाहींत.

याप्रमाणें त्या दिवशीं संध्याकाळपर्यंत मुक्काम झाला. सायंकाळीं पांच वाजतां बोलणें चालू असतांनाच दंडकमंडलु घेऊन श्रीगुरुदेवदत्त म्हणून महाराज एकदम उठून उभे राहिले. तें पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें. दोन चार दिवस तेथें राहण्याबद्दल मंडळींनीं आग्रह केला पण 'आतां जाऊं या' असें म्हणून महाराज निघाले. रामशास्त्री बरोबर होते. त्यांनीं शिनोरास चलण्याबद्दल आग्रह केला. पण महाराज म्हणाले कीं, 'एकदां शिनोरास येणें झालें आहे. आतां पुनः काय आहे?' हें उत्तर ऐकून रामशास्त्रींनीं सांगितलें कीं, 'तर मग आपण जाल तेथें मी पायानें येतों.' हें ऐकून शेवटीं शिनोरास येण्याचें महाराजांनीं कबूल केलें व तूं गाडीनें जा असें रामशास्त्रीला सांगितलें. तरी रामशास्त्री चालतच पाठीमागून निघाले. तेव्हां एकदम रागानें मागें वळून महाराज त्यांना म्हणाले कीं, 'आतां तूं मागें फिरतोस कीं नाहीं?' हा राग पाहण्याबरोबर मात्र रामशास्त्री निरुपायास्तव मागें फिरले व त्याच रात्रीं गाडीनें बडोद्यास येऊन मार्गशीर्ष वद्य अष्टमीस संध्याकाळीं शिनोरास येऊन पोंचले. त्या वेळीं तेथील मंडळी रामशास्त्रींना म्हणाली कीं, 'तुम्ही महाराज येणार म्हणून तेथें दर्शन घेण्यास डाकोरला गेला आणि महाराज तर परवांच संध्याकाळीं संध्येचे वेळीं घाटावर आले.' हें ऐकून रामशास्त्रींना आश्चर्य वाटलें. षष्ठीला संध्याकाळीं पांच वाजतां तर डाकोरहून महाराज निघाले आणि लगेच घंटा दीड घंटयांतच शिनोरास पोंचले, ही आश्चर्य वाटण्या-

सारखीच गोष्ट आहे. नंतर संध्या वगैरे आटोपून रामशास्त्री महाराजांचे दर्शनास गेले तेव्हां महाराज नुसते हंसले. या वेळीं शिनोरास महाराज तीन महिने राहिले होते. त्या वेळींही रामशास्त्रींचा बराच अभ्यास झाला. एकदां महाराज रामशास्त्रींना म्हणाले कीं, ‘ आतांपर्यंत झालेला अभ्यास नीट टिकविशील तर तुला त्याचा पुष्कळ उपयोग होईल.’ ही महाराजांची वाणी ऐकून रामशास्त्री म्हणाले कीं, ‘मुक्काम हलविण्याचा विचार या वाणीवरून दिसतो. तरी मलाही आपल्या बरोबर न्यावें.’ हें ऐकून महाराज म्हणाले कीं, ‘ पुनः भेट होईल व त्या वेळीं शेवटपर्यंत तूं राहाशील.’ या सांगण्याप्रमाणें शेवटीं गरुडेश्वरीं भेट झाली आणि महाराजांच्या समाधिकालापर्यंत रामशास्त्री जवळ राहिले, व शिनोरास सांगितलेल्या वाक्यांतील गूढार्थ त्या वेळीं त्यांच्या लक्षांत आला.

जगला या नांवाचा कोळी जातींतील मनुष्य त्याचें लग्न ठरवितांच घरांतून पळून निघाला तो शिनोरास येऊन थांबला. थंडी, वारा, पाऊस सहन करून तो राहत असे. जडभरताप्रमाणें त्याचें देहाकडे लक्षही नसावयाचें. तो तेथें दोन वर्षें राहत होता. एकदां महाराज तेथें असतांना घाटावरून स्नान करून येत होते, त्या वेळीं जगलानें त्यांचेपुढें येऊन हात पसरून त्यांना आडविलें. तेव्हां महाराज त्याला पाहून म्हणाले कीं, ‘ तूं येथें राहतोस काय ? रात्रीं मार्कंडेयाच्या मंदिरांत ये ’ असें त्याला सांगुन महाराज पुढें निघून गेले. संध्याकाळीं महाराजांनीं मंडळींना सांगितलें कीं, आज रात्रींपासून गीता सांगावयाची आहे. हें ऐकून रात्रीं सर्व मंडळी जमली. जगलाही अगदीं वेळेवर येऊन एका बाजूला बसला. याप्रमाणें गीताश्रवणास जगला रोज नियमानें येत होता. गीतेचे १७ अध्याय सांगून झाल्यावर त्या दिवशीं तो म्हणाला कीं, ‘ या पुढें कांहीं आपणांस ऐकावयाचें नाही करितां आपण इकडे येणार

नाहीं ' असें सांगून तो निघून गेला. पुढें एक दोन महिन्यांनीं त्याचें देहावसान झालें.

या वर्षी या भागांत सर्वत्र दुष्काळ असून शिवाय कॉलराही होता. त्यामुळें अनेक माणसें मृत्युमुखीं पडत असत. महाराजांचेबरोबर यावेळीं गांडाबुवा होते. त्यांच्याकडून येणाऱ्या पुष्कळ श्रद्धाळू माणसांना महाराजांनीं औषध देऊन बरें केलें. जंगलांतून लांकडें आणवून त्याचा व्यापार करणारे कबाडी म्हणून लोक इकडे आहेत त्यांपैकीं कबाडीदादा म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या एका गृहस्थाचा मुलगा विनायक परीक्षेंत नापास झाल्यामुळें खिन्न होऊन महाराजांचे जवळ आला व त्यानें विनंति केली कीं, ' महाराज, मी परीक्षेंत नापास झाल्यामुळें मला आतां नोकरी मिळणार नाहीं. त्यामुळें घरीं चरितार्थ चालाविणें फार कठीण आहे. तरी माझ्यावर कृपा करावी.' हें त्याचें भाषण ऐकून महाराजांनीं त्याला मंत्र व त्याचा विधि लिहून देऊन त्याला अनुष्टान करण्यास सांगितलें. त्यानें श्रद्धेनें अनुष्टान केल्याबरोबर वरच्या मोठया अधिकाऱ्यानें त्याला बोलावून घेऊन त्याच्या बापाच्या नोकरीवर लगेच त्याची नेमणूक केली. मंत्रशक्तीचा प्रभाव याही काळांत दिसून येऊं शकतो. श्रद्धा मात्र पाहिजे. तेथून महाराज निघाले व चिखलदा गांवीं येऊन पोंचले.

## चातुर्मास १० चिखलदा–शके १८२२

शिनोराहून निघून वैशाख वद्य अमावस्येला चिखलदा मुक्कामीं महाराज येऊन पोंचले. तेथील मंडळी पूर्वी परिचित झालेलीच होती. तेथें नर्मदातीरावरील राममंदिरांत महाराजांचा मुक्काम झाला. नर्मदेच्या पलीकडे बडवाणी म्हणून एक संस्थान आहे; तेथील राजे ठाकोरसाहेब हे महाराजांचे भक्त होते. सर्व मंडळींनीं चिखलद्यासच चातुर्मास व्हावा अशी आग्रहाची विनंति केल्यामुळें तेथेंच शके १८२२ त महाराजांनीं चातुर्मास केला.

याच वेळीं महाराजांची अनुज्ञा मिळवून, महाराजांनीं केलेलें गुरुचरित्र सावंतवाडीचे नारोपंत उकिडवे छापीत होते. त्याच समयीं दुसऱ्याच एका गृहस्थानें गुरुचरित्र छापीत असल्याबद्दल महाराजांचे परवानगीशिवाय जाहिरात दिली होती. ती उकिडव्यांचे पाहण्यांत येऊन त्यांनीं ती जाहिरात महाराजांचेकडे पाठवून पत्रांत असें लिहिलें कीं,—'या अपरिचित मनुष्यानें पुस्तक छापणें सुरू केलें आहे तरी याचेवर खटला कां करूं नये?' असें नारोपंतांचें पत्र तेथें मंडळींनीं पाहिलें. त्या वेळीं तेथें बसलेले एक दुसरीकडचे गृहस्थ बोलले कीं, 'महाराजांच्या वृत्तींत लोकैषणा, वित्तैषणा यांचा कांहींच संबंध नसल्यामुळें कोणीही ग्रंथाला नांवें ठेवलीं किंवा तो शिरीं धरला म्हणून त्याचा हर्षविषाद महाराजांना कांहींच नाहीं. लोकांच्या उपयोगाकरितां कोणी छापत असल्यास तें चांगलेंच आहे' याप्रमाणें त्या परकी गृहस्थांनीं तेथें उद्गार काढले. महाराजांनीं स्वतः ग्रंथ छापण्याबद्दल खास परवानगी अशी कोणालाच दिलेली नाहीं. 'अप्रातिषिद्धमनुमतं भवति' या न्यायानें कोणी कोणी कांहीं ग्रंथ छापून काढले इतकेंच.

सावंतवाडीचे राहणारे विश्वनाथ चिटणीस यांना कांहीं पिशाचबाधा असल्यामुळें अन्न मुळींच पचत नसे. अन्न खाल्लें कीं तें उलटून पडावें त्यामुळें ते फार अशक्त झाले होते. ते आपल्या बंधूस बरोबर घेऊन चिखलदा मुक्कामीं महाराजांचे दर्शनास आले. महाराजांना नमस्कार करून आपली सर्व हकीकत त्यांनीं सांगितली. तेव्हां महाराज म्हणाले कीं, 'कुलदेवतेची आराधना तुमच्या कुळांतील माणसांचेकडून योग्य प्रकारें घडत नाहीं. त्यामुळें ही पीडा होत आहे. आतां कुळांतील मंडळी इतस्ततः असल्यानें आपल्या पुरताच विचार करणें भाग आहे' असें त्यांना सांगून महाराजांनीं त्यांना दत्तमंत्र व देवीमंत्र दिला व गोरख-

चिचेंतील औषधही दिलें. नंतर घरीं परत आल्यावर त्यांनीं मंत्रजप केला, त्यामुळें त्यांची प्रकृति हळूहळू बरी झाली. प्रकृतिस्वास्थ्याकरितां ते एकदोन वेळां महाराजांच्याकडे गेले होते.

या प्रांतांत त्या वर्षी पुष्कळ माणसें दुष्काळामुळें व महामारीच्या उपद्रवामुळें मरण पावलीं. त्यामुळें चातुर्मास संपतांच महाराज चिखलदा सोडून नर्मदातटाकीं मंडलेश्वर मुक्कामीं आले. तेथें चार पांच महिने मुक्काम झाला. तेथें फारसें मंडळींचें येणेंजाणें नव्हतें. कर्नाटकांतील एक सरकारी नोकर कांहीं आरोप आल्यामुळें वेषांतर करून चिखलदा मुक्कामीं येऊन महाराजांचे जवळ राहिले. त्यांचें नांव आप्पा निगडीकर म्हणून होतें. हेही मंडलेश्वरीं येऊन योगाभ्यास करूं लागले. मंडलेश्वर हें गांव इंदूर संस्थानांतील एक जिल्ह्याचें ठिकाण होतें. तेथील अधिकारी हे ब्राह्मण असून भाविक होते. ते नित्य महाराजांचेकडे येऊन भागवतांतील वेदस्तुति समजावून घेत असत. वामनराव जेलर हेही देशस्थ ब्राह्मण रोज दर्शनास येत होते. तेथील इनामदारांचीही महाराजांचेविषयीं आदरबुद्धि होती. त्यांचे घरांतून महाराजांचेकडे रोज ताजें ताक येत होतें. विश्वेश्वराच्या मंदिरासमोरील एका धर्मशाळेंतील मोकळ्या पडवींत महाराज राहत असत व रात्रीं निजण्याकारितां दुसऱ्या एका बंदिस्त धर्मशाळेंत जात. रात्रीं तेथेंच गणेशपुराण सांगत असत. पुराण झाल्यावर तेथेंच एका पाटावर एक छाटी आंथरून व एक पांघरण्यास घेऊन निजत असत.

वामनरावांच्या गाईस एके दिवशीं रात्रीं बराच आजार निर्माण झाल्यामुळें तिला त्या वेळीं हळूहळू महाराजांच्या निद्रास्थानीं आणलें. वामनरावांचा शब्द ऐकून महाराज लगेच उठून अंधारांतच बाहेर गेले व कोठून तरी औषध आणून त्यांनीं औषध दिल्याबरोबर ती गाय उत्तम बरी होऊन तत्काल घरीं गेली.

इंदूर येथें राहणारे सखारामशास्त्री टिल्लू म्हणून प्रसिद्ध नैय्यायिक होते. त्यांनीं सुद्धां वारंवार महाराजांचेजवळ येऊन वेदस्तुति, ब्रह्मस्तुति, उपनिषद्भाष्य इत्यादि विषय समजावून घ्यावेत. पण महाराजांनीं प्रसंगानें असें म्हणावें कीं, 'या नैय्यायिकांना आपण काय सांगूं शकणार? आपणांस न्यायशास्त्राचा गंध देखील नाहीं. जसें समजेल तसें सांगावयाचें.' निरभिमानवृत्ति हेंच पूर्णज्ञानाचें चिन्ह आहे.

मंडलेश्वरीं तापाची सांथ सुरू झाली. तेव्हां गोळ्या तयार करवून आजारी लोकांना द्याव्यात. मंत्र व यंत्र यांचाही उपयोग करीत असत. नरसोबाचेवाडीहून गुंडभट खोंबारे पुजारी आले होते. त्यांच्या विनंतीप्रमाणें 'कृष्णावेणीपंचगंगायुतिस्थं' हें वाडीवर्णनात्मक स्तोत्र तयार करून गुंडभटजींच्या जवळ वाडीच्या एका ब्राह्मणासाठीं दिलें.

महाराज मंडलेश्वरीं असतांना तेथें त्यांच्या दर्शनार्थ मुद्दाम सावंतवाडी भागांतील चार ब्राह्मण आले होते. शंकरभटजी सप्रे हे महाराजांचे पूर्वाश्रमापासून मोठे भक्त. हे राहणार सावंतवाडीचे, चांगले सदाचारसंपन्न होते. यांनीं भिक्षावृत्तीवर शेवटपर्यंत अग्निसेवा केली. महाराजांचे बरेचसे ग्रंथ छापण्याचें काम यांचेकडून झालें. २ सखारामपंत निगुडकर हे भडगांवास वकिली करीत असत. ३ सितारामपंत निगुडकर हे सावंतवाडीस सबजज्ज असून उत्तम निःपक्षपाती न्यायाधीश म्हणून प्रसिद्ध होते. यांना महाराजांनीं दत्तमंत्राचा उपदेश दिला होता. यांची महाराजाच्या ठिकाणीं मोठी श्रद्धा होती. यांना एकदां 'काम, क्रोध व लोभ हें त्रिविध नरकद्वार सोडावें' असा महाराजांचा दृष्टान्त होण्याबरोबर लगेच यांनीं सबजज्जाची नोकरी सोडून दिली व सदाचरणांत सर्व काळ घालवूं लागले. 'अनायासेन मरणं' इतकीच यांची मागणी देवाजवळ होती. या प्रार्थनेप्रमाणेंच सहज बोलतां बोलतांच यांना मृत्यु

आला. ४ चौथे ब्राह्मण कोलगांवचे राहणारे गणेश सातवळेकर हे आले होते. महाराजांचे दर्शनाविषयीं यांना घरीं असतांना इतकी तळमळ लागली होती कीं, त्या भरांत ते एके दिवशीं घरांतून न सांगतां निघून गेले. पण वडिलांनीं त्यांना शोधून परत आणलं. पण यांची वारंवार तशी प्रवृत्ति पाहून 'मी महाराजांचें दर्शन करून परत येईन' अशी गुरुचरित्राची पोथी हातांत धरून यांना शपथ घेण्यास लावलें आणि नंतर यांना महाराजांचे दर्शनास जाण्याची परवानगी घरांतील मंडळींनीं दिली. त्याप्रमाणें ते मंडलेश्वरीं येऊन पोंचले. त्यांनीं महाराजांचे जवळ वेदस्तुति, ब्रह्मस्तुति, मनन यांचा अभ्यास केला व पुढें उत्तरायण लागल्यावर महाराजांनीं कांहीं उपनिषदें सांगून यांना अनुग्रह दिला. महाराजांचा प्रसाद झाल्यावर पुढें कांहीं दिवसांनीं भाष्यचिंतनिका करीत हे विश्वेश्वराचे मंदिरांत दुपारीं बसले असतां श्रीदत्तमहाराजांनीं संन्यासी रूपानें यांना दर्शन दिलें, त्यामुळें यांचें चित्त शांत झालें. शेवटीं इच्छा नसतांही कबूल केल्याप्रमाणें घरीं यावें लागलें. त्यानंतर नरसोबावाडीस दोन वेळ व गरुडेश्वरास एक वेळ असे तीन वेळ महाराजांचें दर्शन सातवळेकरांना घडलें. महाराजांनीं यांना योगाची माहिती सांगितली व औषधाविषयींचे अनुभव स्वहस्तानें लिहून देऊन तोच व्यवसाय चालू ठेवण्याबद्दल आज्ञा केली.

महाराजांचे गुरुस्वामी कांहीं दिवस मंडलेश्वरीं राहिले होते. एक तरुण घरांतून भांडून आलेला होता त्यांनीं त्याला संन्यास दिला होता. तो शिष्य त्या वेळीं त्यांचेबरोबर होता. एकदां भिक्षेस गेल्यावेळीं त्यानें एका गृहस्थाची माळच चोरून आणली. तें पाहून महाराजांनीं गुरुस्वामींना स्पष्ट सांगितलें कीं, 'अनधिकारी माणसाला संन्यासदीक्षा दिली असतां अशी स्थिति होते. अशा माणसाला तुरुंगांत घालावें.' याप्रमाणें

महाराजांचें कडक भाषण ऐकून लोकांनीं त्या स्वामींना दुसऱ्या गांवीं पोंचविलें.

सावंतवाडीचे सप्रे यांनीं अग्निहोत्र घेण्याची आपली इच्छा महाराजांचेजवळ व्यक्त केली, त्या वेळीं महाराज म्हणाले कीं, ' शारीरिक व आर्थिक दृष्टीनें अग्निहोत्र चालविणें कठीण जाईल. सध्यां स्मार्ताग्नि आहेच तेवढी अग्निसेवा पुरे ' असें महाराजांनीं सांगितलें; तथापि पुढें सप्रे यांची बलवत्तर इच्छा पाहून महाराजांनीं तसा निषेध केला नाहीं. ही महाराजांची संमतीच समजून सप्रे यांनीं अग्निहोत्र घेतलें व आजन्म भिक्षा मागून अग्निनारायणाची सेवा केली.

एकदा एकानें महाराजांना स्वतःला उद्देशून प्रश्न केला कीं, ' संन्याशी माणसानें मातोश्रीची भेट घ्यावी व जन्मभूमि पाहावी असें लोक म्हणतात तेव्हां याचा अभिप्राय काय आहे ? ' हा प्रश्न ऐकून महाराजांनीं त्याबद्दल खुलासा केला कीं, ' संन्याशानें इतर कोणासही वंदन करूं नये; पण माता दिसल्याबरोबर तिला मात्र वंदन केलें पाहिजे. पण मुद्दाम मातोश्रीची भेट घेतली पाहिजे असें नाहीं. तसेंच संन्यास घेतल्यावर जन्मभूमि पाहणें म्हणजे मूल प्रपंचाधिष्ठान पाहणें व त्यांतच लीन होणें असा मुख्य अर्थ आहे. ' याप्रमाणें खुलासा केला.

मंडलेश्वरीं महाराजांना रोज ताप येऊं लागला. पण स्नानादिक विधि कधींही बंद पडले नाहींत. मंडळी पाठ ऐकण्याकरितां येऊन बसली म्हणजे महाराजांना थंडी वाजण्यास सुरुवात व्हावी. त्या वेळीं मंडळींना सांगत, ' थोडे बसा, हें हींव घालवून येतों. ' असें सांगून निजण्याचें खोलींत जात व प्राणायामादिकांनीं ती थंडी घालवून लवकरच बाहेर परत येऊन पाठ सुरू करीत. ताप अंगांत असेच. तरी पाठ कधींही बंद ठेवला नाहीं. लोकांनीं, ' ताप आहे आज पाठ राहूं दे '

असें सांगितलें तरी महाराज म्हणत कीं, ' ताप रोजचाच आहे. तो राहीना कां, भोग संपला कीं तो जाईल ' असें सांगून पाठ सुरू करावयाचा. औषध तर महाराज कधींच घेत नसत. एकदां एकानें आपणाजवळ मात्रा आहे ती घ्यावी अशी विनंति केली. महाराज त्याला म्हणाले कीं, ' आपणांजवळ त्रिमात्रांचा संग्रह आहे. आतां फक्त अर्धमात्रेचाच प्रश्न आहे. उपदेशानंतर त्रिमात्रांप्रमाणें तिचाही संग्रह होईल. फक्त आतां अर्धमात्रेची जरूरी असल्यानें तुमच्या सगळ्या मात्रेचा कांहीं उपयोग नाहीं. ' या वाक्यांतील गूढार्थ सर्वांना समजणें अशक्य आहे. ताप येत असतांही महाराज भिक्षा घेतच असत. सातवळेकर म्हणाले कीं, ' महाराज ! आपणांस ताप अंगांत असतांना अन्न जातें तरी कसें ?' त्यावर महाराज म्हणाले, ' अहो, आपण अन्न खाल्लें पाहिजे. तापाचा व अन्नाचा संबंध काय ? ' पुढें सातवळेकरांनाही ताप येऊं लागला. तो महाराजांनीं बांधला पण अन्नद्वेष गेला नाहीं. या वेळीं महाराजांच्या उपदेशाचा उपयोग झाला. पुढें प्रसंगानें सातवळेकरांना ताप आला तरी महाराजांचें वाक्य लक्षांत असल्यामुळें तापांतही ते अन्न खात असत.

एकदां सर्वत्र पुनर्विवाहाबद्दल वाद चालू होता. याबद्दल एखादा खंडनपर लेख महाराजांनीं लिहून द्यावा म्हणून मंडळींनीं आग्रह केल्यामुळें महाराज लिहिण्याकरितां बसले. लेखणी हातांत घेतली मात्र लगेच ' लेखणी खालीं ठेव ' असें देवांचें सांगणें झालें. झालें, तो लेखही राहिला व लिहिण्याचेंही बंद झालें. पुढें एक वर्ष झाल्यावर एका ठिकाणीं एक दौत व जवळच एक काडी पडलेली महाराजांना दिसली. तेव्हां ती काडी हातांत घेऊन श्रीदत्त इत्यादि कांहीं अक्षरें कागदावर लिहिल्यावर देवांच्या आज्ञेची आठवण होऊन काडी खालीं ठेवली. लगेच देवांनीं सांगितलें कीं, ' आपण कांहीं इतर लिहिण्यास बंदी केली नव्हती. तो

लेख लिहिण्यासच फक्त बंदी होती.' हा देवांचा अभिप्राय समजल्यावर पुनः लिहिण्यास आरंभ झाला.

'गुरुस्वामी नारायणानंदसरस्वती हे आजारी आहेत, त्यांची सेवा करण्यास जावें' असें देवांचे सांगण्यावरून महाराज मंडलेश्वराहून निघाले व फाल्गुन अखेर इंदूर येथें पोंचले. महाराज गांवाबाहेर आले हें समजतांच सर्व प्रमुख ब्राह्मण मंडळी स्वागतासाठीं बाहेर आली व सर्वांनीं साष्टांग नमस्कार करून गांवांत येण्याविषयीं महाराजांना आग्रहाची विनंति केली. 'आपण शहरांत राहत नाहीं, अडचणी असतात.' असें महाराजांनीं सांगितलें. तेव्हां त्या सर्व अडचणी दूर करतों, आपण यावें, असा मंडळींचा आग्रह पाहून चार दिवसच मुक्काम राहील असें महाराज म्हणाले. त्याप्रमाणें सरकारी बागेजवळ सुबरायाच्या वाड्यांत महाराजांची राहण्याची व्यवस्था केल्यावर महाराज तेथें येऊन उतरले. त्या वाड्यांतच वेदशास्त्र पाठशाळा होती. आप्पा निगडीकर यांना गुरुस्वामींच्या शुश्रूषेकरितां महाराजांनीं पुढें पाठवून दिलें. चार दिवस झाल्यावर अधिक राहण्यास सवड नाहीं असें महाराजांनीं सांगितलें. पण कांहीं उपदेशामृताचा लाभ व्हावा असा सर्वांचा आग्रह पाहून शेवटीं तेथें १८ दिवस महाराजांचा मुक्काम झाला. मंडळींच्या इच्छेप्रमाणें तेथें सर्वानुक्रम व गायत्रीभाष्य सांगितलें. भिक्षेचा वेळ सोडून बाकीचा सर्व वेळ सांगण्याचें काम चालू होतें तरीही तें संपलें नाहीं. मोठमोठी विद्वान् मंडळी दर्शनास व श्रवणास येत. महाराजांचें अगाध ज्ञान पाहून सर्व चकित झाले. पुढें मंडळींची आणखीही श्रवणाची इच्छा होती पण उज्जनीहून 'गुरुस्वामी फार आजारी आहेत. वासुदेवानन्द आल्यावांचून आपणांस बरें वाटणार नाहीं असें गुरुस्वामी म्हणतात.' असें पत्र आल्यावरून महाराज इंदुराहून निघून उज्जनीस गेले.

इंदुरास एकदां एका माणसानें महाराजांना येऊन विचारलें कीं, 'माझी गाय चुकली आहे ती केव्हां सांपडेल?' हा त्याचा प्रश्न ऐकून महाराजांनीं सांगितलें कीं, 'आपण कांहीं ज्योतिषी नाहीं.' पण शेवटीं त्या माणसाचा विशेष आग्रह पाहून सांगितलें कीं, 'गाय गोठयांत येऊन उभी राहिली आहे.' त्यानें घरीं येऊन पाहिलें तर खरोखरच गाय गोठयांत होती. हें पाहून त्याला आश्चर्य वाटलें.

एका गृहस्थानें विचारलें कीं, 'आपण देवस्वरूप झाला. आतां आपणांस ही मूर्तिपूजा कशाला पाहिजे?' हें ऐकून महाराज म्हणाले कीं, 'ज्या मूर्तीच्या पूजेनें ही स्थिति मिळाली त्या मूर्तीला विसरणें योग्य कसें होईल! तथापि तसा श्रद्धावान् कोणी पूजा करणारा भेटला तर ही मूर्ति त्याला देतां येईल.'

उज्जनीस गेल्यावर महाराजांनीं गुरुस्वामींची सेवा उत्तम प्रकारें केली. त्यांना औषधोपचार करून बरें केलें. तेथेंही मंडळींची उपाधि मागें होतीच. तेथें श्रीमद्भागवत सांगणें सुरूं झालें. पुराण श्रवणास पुष्कळ मंडळी जमूं लागली. गुरुस्वामींना किंचित् याबद्दल हेवा वाटूं लागलेला पाहून शेवटीं त्यांना मनस्ताप देणें नको असा महाराजांनीं विचार केला. व आतां त्यांची प्रकृतीही बरी झाली होती, त्यामुळें तेथें राहण्याचें कांहीं कारण उरलें नाहीं. तेव्हां महाराज उज्जनीहून गुरुस्वामींची आज्ञा घेऊन निघाले आणि वैशाख मासांत महतपूर येथें येऊन पोंचले.

## चातुर्मास ११ महत्पूर—शके १८२३

महत्पूर येथें मंडळींच्या आग्रहावरून महाराजांनीं चातुर्मास करण्याचें ठरविलें. सुमारे सहा महिने त्यांचा तेथें मुकाम होता. तेथील मंडळींच्या सांगण्यावरून महाराजांनीं दत्तपुराणांतील सर्व कथांचा संग्रह करून दत्त-माहात्म्य या नांवाचा एक प्राकृत ओंवीबद्ध, रसाळ असा ग्रंथ केला व

तेथेंच त्रिशती गुरुचरित्र म्हणून तीनशें श्लोकांचें एक संस्कृत काव्यही तयार केलें. या ग्रंथाबद्दल महाराजांचें पत्र असें आहे—'श्री. शु. ११—कांहीं लोकांचा येथें आग्रह असा होता कीं, सविस्तर दत्तमाहात्म्य असावें. त्यावरून ओंवीबद्ध तृतीयाष्टकापासून सहाव्याच्या सहाव्या अध्यायापर्यंत आजपर्यंत ओंव्या लिहिल्या. प्रायः प्रत्यहीं १०८ होत गेल्यामुळें तेवढाच अध्याय ठेवला. उद्यां ५० वा अध्याय पुरा होईल. सुमारें साडेपांच हजार ग्रंथ झाला. आतां पुढें लिहिण्याची इच्छा होत नाहीं. नारायण.'

सटीक गुरुचरित्र छापून झाल्यावर सावंतवाडीहून सप्रे यांनीं महाराजांचेकडे तें पाठविलें व अशुद्ध बरेंच राहिलें, काय करावें असें विचारलें. त्यावर महाराजांचें पत्र असें आहे.—'श्री. व. ११ महत्पूर. छापलेल्या पुस्तकांत अशुद्धें राहिलीं तरी राहोत. 'गच्छतःस्खलनं क्वापि' हा न्याय सर्वत्र आहेच. शुद्धिपत्र मात्र द्यावें म्हणजे झालें. नारायण.'

ग्वाल्हेरसंस्थानांत गुणा छावणी म्हणून एक लष्करी ठिकाण आहे. तेथील एक सर्जन डॉक्टर विश्वनाथराव ताटके म्हणून होते. ते उत्तम डॉक्टर म्हणून प्रसिद्ध असून महाराजांचे भक्त होते. त्यांच्या पायाला हाडया व्रण झाल्यामुळें तो पाय आंतून सडूं लागला. वैद्य-डॉक्टरांचें पुष्कळ उपाय झाले पण गुण कांहीं येईना. शेवटीं पाय कापल्याशिवाय कांहीं उपाय नाहीं असा सर्व डॉक्टरांनीं निर्णय दिला. शेवटीं ताटके सर्जन महाराजांना शरण आले. महाराज म्हणाले, 'तुम्ही सर्वांना औषध देणारे. तुम्हांला औषध कोणीं द्यावें?' असें बोलून त्यांना एक मंत्र लिहून देऊन त्याचा जप करण्यास सांगितलें व पायास पोटीस बांधण्यास सांगून शिवाय औषधही दिलें. डॉक्टरनीं अनुष्ठान वगैरे केल्यावर हळूहळू त्यांचा पाय अगदीं पहिल्याप्रमाणें चांगला झाला. तें पाहून सर्व

डॉक्टर मंडळींना आश्चर्य वाटलें. ही बातमी ऐकून अनेक लोक श्रद्धेनें महाराजांचे दर्शनास येऊं लागले. विश्वनाथराव डॉक्टर पूर्वी नास्तिक वृत्तीचे होते. पण महाराजांची भेट झाल्यापासून त्यांचा तो नास्तिकपणा पूर्णपणें गेला. संध्येपासून सर्व ब्रह्मकर्म महाराजांचे जवळ शिकून पुढें ते आचारधर्मानें वागूं लागले. महाराजांचे ते एकनिष्ठ भक्त होते. यांनींच श्रीदत्तमाहात्म्य ग्रंथ स्वतःच्या खर्चानें छापून प्रसिद्ध केला.

महत्पुरांत असतांना कार्तिक पौर्णिमेस ग्रहण आलें. तेव्हां त्या वेळीं क्षिप्रा नदीचें स्नान करून नंतरच महत्पूर सोडावें अशी महाराजांची इच्छा होती. पण त्याचे अगोदरच महत्पूर सोडून गंगातीरीं ब्रह्मावर्तास जाण्यास महाराजांना श्रीदत्तमहाराजांची आज्ञा झाली. पण स्नान करून जावें या उद्देशानें महाराज तेथेंच राहिले. त्याच रात्रीं भयंकर विषारी नाग महाराजांना चावला. आतां पुढें काय परिणाम होतो याची कांहींच कल्पना करतां न आल्यामुळें सर्व मंडळी अत्यंत दुःखद मनःस्थितींत होती. औषध तर केव्हांही घ्यावयाची पद्धति नव्हती. सर्पदंश झाल्याबरोबर महाराज समाधिस्थितींत बसून राहिले. तीन चार तासांनीं समाधींतून उठले. तथापि विषाचा जोर कमी झाला नव्हता. त्याचे वेग सारखे येतच होते. पुनः महाराजांनीं समाधि लावली. याप्रमाणें दोन दिवस निघून गेले. नंतर विषाची बाधा बरीच कमी झाली. पण मस्तक मात्र फारच जड झालें होतें. त्याचें कारण पाहत असतां सर्पदंश झालेल्या जागीं सापाचा दांत मोडून पायांत राहिला आहे असें दिसून आलें. तो दांत काढून टाकल्याबरोबर मस्तक हलकें झालें. महत्पूर सोडीपर्यंत विष पूर्णपणें उतरलें नव्हतें. पुढें दहावे दिवशीं महत्पूर सोडल्याबरोबर विष पूर्णपणें उतरून पाय चांगला बरा झाला. पुढें सूर्यग्रहण होतें. त्या वेळीं महत्पुराहून महाराज निघून आलोट या गांवीं आले. तेथें त्यांनीं अनादिकल्पेश्वराचें स्तोत्र करून वंदन केलें. तेथें कांहीं दिवस राहिले.

सखाराम कानडकर या नांवाचा एक मुलगा आलोट गांवीं राहत होता. बाप मेल्यामुळें आई, लहान भाऊ, बहीण या सर्वांची पोषणाची जबाबदारी त्याचेवर पडली. वयही त्याचें लहान होतें. पुढें जीवन चालावें म्हणून त्यानें हरिकीर्तन करण्यास आरंभ केला. त्या व्यवसायांत त्याला चांगलें यश मिळूं लागलें हें त्यच्या शत्रूला सहन न झाल्यामुळें त्यानें प्रसंग पाहून एकदा कानडे याला पाण्यांतून शेंदूर पाजला. त्यामुळें आवाज बसला. कीर्तनही अर्थात्च बंद पडलें आणि दारिद्र्यामुळें पुनः प्रपंचाची फारच ओढाताण होऊं लागली. त्यामुळें फार त्रासून जाऊन आत्महत्या करावी असेही विचार त्याचे मनांत येऊं लागले. इतक्यांत महाराज महत्पुरास आहेत हें समजल्यावरून तो तेथें गेला व महाराजांचेपुढें साष्टांग नमस्कार घालून त्यानें अत्यंत दीनपणानें आपली झालेली दुरवस्था महाराजांना निवेदन केली. आणि याबद्दल कांहींतरी उपाय सांगावा अशी त्यांना विनंति केली. त्याची हकीकत ऐकून घेऊन महाराज म्हणाले, 'तूं चार महिने आपणांजवळ राहा म्हणजे तुझी इच्छा पूर्ण होईल.' हें ऐकून तो म्हणाला कीं, 'घरीं प्रपंचाची अडचण असल्यामुळें आपणांस बरोबर राहतां येणार नाहीं.' त्या मुलाची परिस्थिति जाणून महाराजांनीं त्याला सांगितलें कीं, 'तूं आलोटला जा. तेथें आपण येणारच आहोंत. तेथें आल्यावर भेट म्हणजे तुझें कार्य होईल.' पुढें सूर्यग्रहणाचे सुमारास महाराज आलोटला गेले. तो मुलगा वाट पाहतच होता. तो लगेच महाराजांचे दर्शनास गेला. तेव्हां त्याला महाराजांनीं एका वनस्पतीचा रस पिण्यास दिला व त्याच रसानें त्याच्या जिभेवर एक मंत्र लिहून त्या मंत्राचा जप ग्रहणांत करण्यास सांगितलें. महाराजांच्या आज्ञेप्रमाणें त्या मुलानें ग्रहण लागल्यापासून तें सुटेपर्यंत क्षिप्रा नदीच्या पाण्यांत उभें राहून एकनिष्ठेनें जप केला. त्याबरोबर त्याचा आवाज उत्तम सुरेल होऊन बुद्धीही चांगली तरतरीत झाली. स्मरणशक्ति वाढली. 'तुझें काम झालें. तूं आतां जा.'

असें महाराजांनीं सांगतांच तो महाराजांना वंदन करून आपले घरीं निघून गेला. पुढें त्याचा कीर्तनव्यवसाय उत्तम प्रकारें चालू होऊन पैसा पुष्कळ मिळाला. सखाराम कानडकर कीर्तनाचार्य या नांवानें ते प्रसिद्ध झाले.

आलोटहून निघून मार्गशीर्षांत महाराज सारंगपुरास आले. खेचरी मुद्रेनिमित्त जिव्हा छेदनाकरतां गांडाबुवांना गुणाछावणी येथें डॉ. विश्वनाथराव ताटके यांचेकडे पाठविलें होतें. त्यांचें जिव्हाछेदन उत्तम पार पडलें. नंतर आप्पा निगडीकर व व्यंकटराव स्टेशनमास्तर हे दोघे डॉ. ताटके यांचेकडे जिव्हा छेदनाकरितां आले. जिभेखालची शीर तोडावयाची असते. हें काम फारच नाजूकपणानें झालें पाहिजे. तेथेंच दुसऱ्या एखाद्या मोठ्या शिरेला धक्का लागला तर प्राण जाण्याचाच प्रसंग. आप्पा निगडीकर व व्यंकटराव यांचा खेचरीचा योग नव्हता असेंच म्हणावें लागतें. त्यांची शीर काढण्याचें काम चालू असतां दुसरीच एक शीर तुटली आणि भयंकर रक्तस्राव होऊं लागला. डॉक्टरनीं रक्त थांबविणेकरितां पुष्कळ उपाय केले पण रक्तस्राव थांबेना. हें पाहून डॉक्टरना भीति वाटून त्यांनीं तार करून महाराजांना सर्व हकीकत कळविली. तेथून सारंगपूर चाळीस कोस. तार पोंचतांच महाराज सारंगपूरहून निघून, दुसरे दिवशीं गुणाछावणीस पोंचले. आणि दोघांच्याही जिभेची स्थिति एकदां पाहून त्यावर एक वनस्पती वाटून लावली. त्याबरोबर थोडक्याच वेळांत रक्तस्राव थांबून दोघेही सावध झाले. हें महाराजांचें अद्‌भुत सामर्थ्य पाहून डॉक्टरनाही मोठें आश्चर्य वाटलें. व्यंकटरावांच्या जिभेखालीं एक मांसाचा गोळा वाढला; आणि आप्पाची शीर बरोबर तुटली गेली नाहीं, त्यामुळें त्या दोघांनाही पुढें खेचरीमुद्रेचा अभ्यास करून उपयोग झाला नाहीं. ‘तुम्हांला अशक्तपणा आलेला आहे, सबब तुम्ही हवा मानवेल त्या ठिकाणीं जाऊन राहा.

यापुढें आपणांबरोबर येऊं नका' असें महाराजांनीं सांगितलें असताही ती आज्ञा न मानतां व्यंकटराव व आप्पा निगडीकर हे दोघेही महाराजांचे बरोबरच ब्रह्मावर्तास जाण्यास निघाले. गांडाबुवांनीं भडोच मुक्कामीं राहून योगाभ्यास सुरू केला. तेथून महाराज निघाले ते वेत्रवतीच्या तीरावर भेलसा या गांवीं येऊन कांहीं दिवस राहिले. तेथें एक महाराजांचे भक्त गोविंदराव पंडित या नांवाचे गृहस्थ होते. त्यांना त्या वेळीं महाराजांनीं योगाभ्यासाचें शिक्षण दिलें.

महाराज सारंगपुरास होते, तेव्हां सावंतवाडीच्या मंडळींनीं, 'इकडील भागांत येणें कधीं होईल?' असें विचारलें होतें. याबद्दल महाराजांनीं जें पत्र पाठविलें तें असें— 'पौ. २० नारायण. हा देह तिकडे येण्याची इत्यादि इच्छा करणेची गरज नाहीं. क्षणभंगुर नश्वर देहापेक्षां यशःकाय कायम राहणार नाहीं काय? (जयंति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः। नास्ति येषां यशःकाये जरामरणजं भयम्) जरी यशःकायानें शंका समाधान भाषणादिक कसें घडेल? म्हणणें. तर प्राकृत लोकांकरितां भक्तिज्ञानरसभरित दत्तमाहात्म्य प्रसिद्ध झालें आहे. शिवाय संस्कृत प्राकृत अनेक ग्रंथांची प्रसिद्धी झाली. तेणें शंका समाधान होईल. नारायण.'

भेलशाहून निघून महाराज जालवण मुक्कामीं आले. तेथें सरकारी देवळांत चार महिने वास्तव्य झालें. तेथील कांहीं वयोवृद्ध विद्वान मंडळींना अरणें म्हणावयाचीं होतीं. पण आजपर्यंत सांगणारा कोणी योग्य मनुष्य सांगणेस भेटला नव्हता. महाराज ईशकृपेनें तेथें आल्याबरोबर सर्वांना आनंद होऊन सर्वांनीं महाराजांचे जवळ अरणें व उपनिषदें म्हटलीं व त्यांचा अर्थही समजावून घेतला. श्रीदत्तमहाराजांनींच महाराजांच्या रूपानें येऊन ही आपली फार दिवसांची इच्छा पूर्ण केली

असें त्या मंडळींना वाटलें. त्या गांवांत कांहीं ग्रामण्यानिमित्त वरेच दिवस दोन तट पडले होते. हें पाहून महाराजांनीं सांगितलें कीं, 'तुम्ही दोनही पक्षांच्या मंडळींनीं मनांतील वैरभाव टाकून जर एकी केली तरच आपण येथें राहूं.' हें महाराजांचें स्पष्ट मत पाहून शेवटीं सर्व मंडळींनीं एकी करण्याचें ठरविलें. तेथें महाराजांचा शिष्य बाळा जोशी म्हणून होता. त्यानें दत्तजयंतीचे दुसरे दिवशीं पारण्याकरितां गांवांतील दोनही पक्षांच्या मंडळींना भोजनास बोलावलें. तेव्हां महाराजांच्या आज्ञेप्रमाणें दोनही पक्षांची मंडळी एकवाक्यता करून तेथें एकत्र भोजनास गेली आणि हें फार दिवसांचें ग्रामण्य पूर्णपणें संपलें. जालवण्यास पुष्कळ मंडळींनीं महाराजांचा अनुग्रह घेतला. तेथें दत्तउपासना सर्वांची सुरू झाली. तेथील मंडळी गुरुद्वादशी व दत्तजयंती या दिवशीं पादुकांचें पूजन करून चांगला उत्सव करतात. जालवणाहून महाराज ब्रह्मावर्तास जाण्याकरितां निघाले. आप्पा निगडीकर व व्यंकटराव यांना आज्ञा नसतांही महाराजांचे बरोबर निघाले.

## चातुर्मास १२ ब्रह्मावर्त–शके १८२४

ब्रह्मावर्त क्षेत्रांत चैत्र शु।। १३ स दुपारच्या वेळीं महाराज येऊन पोंचले. ही येथें येण्याची तिसरी खेप. या वेळीं या ठिकाणीं अडीच वर्षें मुक्काम झाला. म्हणजे लागोपाठ तीन चातुर्मास येथें झाले. अंताजीपंत यांच्या घाटावरील राममंदिरांतच महाराज राहत होते. दोन खोल्या व मध्यें सोपा असें घरासारखेंच हें राममंदिर आहे. महाराज आले असें समजल्याबरोबर पूर्वीची सर्व मंडळी दर्शनास धावून आली. कुशल प्रश्न वगैरे झाल्यावर सर्वांना आजपासून अध्ययनाकरितां या असें त्यांनीं सांगितलें. नंतर गंगेवरून महाराज स्नान करून आले व नित्यकर्म आटोपून भिक्षेस गेले. तीन घरची भिक्षा आणून ती सेवन केली. इतक्यांत अध्ययना-

करितां मंडळी आलीच. त्यांच्या त्यांच्या आवडीप्रमाणें उपनिषदें, भाष्य, पंचदशी, जीवन्मुक्तिविवेक, मनुस्मृति इत्यादि विविध ग्रंथांचें अध्यापन महाराज करीत असत. लहान मुलांना संध्यादि ब्रह्मकर्म व कांहीं काव्यही सांगत असत. वैदिक मंडळीही तेथें येऊन पदें, सर्वानुक्रम वगैरे शिकत. कांहीं लोक योगाभ्यास शिकत तर कांहींना वैद्यकाचेंही शिक्षण महाराजांचेकडून मिळत असे. एक दिवस मुलांना समासचक्र शिकविण्याचें काम चालू होतें, त्या वेळीं 'कृष्णश्वासौ सर्पश्चकृष्णसर्पः' हें मुलांना सांगतां सांगतांच महाराजांना समाधि लागली. कोणी रोगी आल्यास त्याला औषधेंही देण्याचें काम चालू होतें. हा खर्च व्यंकटराव वगैरे मंडळी करीत. पिशाचबाधा, रोगपीडा वगैरे जाण्याकरितां यंत्रें लिहून देत. मंत्र तंत्रही सांगून अनुष्ठानही करवून घेत असत. शकुन, प्रश्नपत्रिकाही पाहण्याचें काम मधून मधून चालू असे. श्रीमद्भागवत एकादशस्कंधावर तिसरे प्रहरीं पुराण होत असे. त्या वेळीं विषय नीट समजावा म्हणून पांच सहा मंडळी पोथ्या घेऊन श्रवणास येत असत. भक्ति, ज्ञान, वैराग्य या गुणांची वाढ लोकांमध्यें व्हावी या उद्देशानें पुराण चालू होतें. या श्रवणानें पुष्कळ मंडळी परमार्थमार्गाकडे वळली होती. संध्याकाळीं भक्तांचेकडून आलेल्या पत्रांना उत्तरें स्वतः लिहून पाठवीत असत.

द्वारकेकडे जात असतां मध्यें बरेच दिवस भिक्षा न मिळाल्यामुळें खारीक, खोबरें असें खाऊनच महाराजांना काल काढावा लागला. त्यामुळें संग्रहणीचा विकार जडला होता. ब्रह्मावर्तास पाणी पिण्यांत आल्यामुळें तो विकार बळावला, त्यामुळें शौचाला वारंवार जावें लागत असे. शौचास जाऊन आल्यावर प्रत्येक वेळीं थंड पाण्यानें स्नान होत असे. संकेश्वर करवीर मठावरील विद्यमान श्रीशंकराचार्य गुरु स्वामि-

महाराज शिरोळकर हे त्या वेळीं आपल्या पूर्वाश्रमांत ब्रह्मावर्तास महाराजांचे सान्निध्यांत राहण्याकरितां मुद्दाम गेले होते. त्यांनीं त्या वेळीं प्रत्यक्ष पाहिलेली स्थिति सांगितली ती अशी—'ब्रह्मावर्तास उन्हाळ्यांत गंगा नदीचा प्रवाह घाटापासून बराच दूर गेलेला असतो. महाराजांनीं शौचास जाऊन यावें आणि भर दोन प्रहरीं ती तापलेली वाळू तुडवीत प्रवाहापर्यंत जाऊन स्नान करून परत यावें. पुनः शौचाला गेले कीं तशीच पद्धत. ज्या तापलेल्या वाळूकडे नुसते दुपारीं पाहणेंसुद्धां असह्य, अशी वाळू दोन तीन फर्लांग तुडवीत शांतपणानें जावयाचें व परत तसेंच शांतपणें यावयाचें. एवढें दृश्य पाहूनच 'दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः' ही जीवन्मुक्त स्थिति महाराजांची होती हें सहज सर्वांच्या लक्षांत येत होतें. अशा ब्रह्मनिष्ठ, देहावर ज्यांची बिलकुल आसक्ति नाहीं अशा महात्म्याच्या दर्शनानें, व भाषण, सान्निध्य इत्यादिकांचा लाभ ईशकृपेनें झाल्यानें आम्ही धन्य झालों.' ही ब्रह्मावर्तास घडलेली हकीकत श्रीशंकराचार्य महाराज प्रेमार्द्र अंतःकरणानें अद्यापिही सांगत असतात. महाराज औषध तर कधींच घेत नसत. फक्त ताक तेवढें घेत असत. इतका शौचाचा नित्य उपद्रव होत असूनही चालू नित्य व्यवसायांत खंड कधींच पडला नाहीं. एके दिवशीं फार रक्त पडलें. त्या वेळीं महाराज म्हणाले, 'आज देह हलका झाला. १९ खेपा झाल्या.' या स्थितीबद्दल खिन्नता कधींच नाहीं. याबद्दलचें महाराजांचें एक बोधप्रद पत्र पुढीलप्रमाणें आहे—

"ब्रह्मावर्त. पौष शु॥ २ शके १८२४. नारायण. द्वारकेस जाते वेळीं रस्त्यांत ३२ दिवस भिक्षा न झाली व कोठें कोठें कोणी खजूर, खोबरें दिलें. त्या सेवनानें कांहीं दिवस रक्त पडून संग्रहणीवर आज तीन वर्षे पल्ला पोंचला व पाणी प्यायल्यावर जास्त उपद्रव. हें जाणून ताकावर

तीन वर्षें घालविलीं. गेल्या ज्येष्ठ शुद्ध द्वादशीस पाणी पिण्यांत आल्यानें जास्तीच उपद्रव जाहला व त्याचा प्रतिकार करण्याची मुळींच इच्छा नाहीं. कारण ( भोगादेव क्षयः कार्योनान्यथारब्धकर्मणः ) मग उगीच तन्निमित्तक विचार कशास करावा? देहबुद्धीनेंही कदाचित् पाहिलें तरी ही 'क्षुद्व्याधिश्चचिकित्स्यतां प्रतिदिनं भिक्षौषधं भुज्यताम्' यापरता दुसरा विचार करावयास नकोच. कदाचित् कोणी म्हणेल कीं शरीरकष्टानें ईश्वराचें भजन तरी कसें घडेल? तर स्वल्पोपद्रवानें भजनाला आज अडथळा येईल तर अंतीं 'शतवृश्चिकदष्टस्य या पीडा सानुभूयते' अशा कष्टांत तरी 'अंतकाले च मामेव' इत्यादि कसें घडावें? तर हा दृढ होण्याचा कित्ताच गिरविला जातो. कळावें. नारायण."

वरील पत्रावरून देहादिकाविषयीं महाराजांची अनासक्ति लक्षांत येईल. वैशाख महिन्याच्या अखेरीस महाराजांचे पूर्वाश्रमांतील कनिष्ठ बंधु सीतारामभट ( भलोबा ) हे महाराजांचे दर्शनास येऊन तेथेंच राहिले. महाराजांचे आज्ञेप्रमाणें येथें सीतारामबुवांनीं गायत्री पुरश्चरण केलें. येथें राहाणारे व्यंकाप्पा नांवाचे एक गृहस्थ महाराजांचेबरोबर एके दिवशीं फार कडाक्यानें भांडले. महाराज स्वस्थ ऐकत होते. महाराजांच्या बरोबरची लहान दत्तमूर्ति त्या राममंदिरांतच रामचंद्राचे मूर्तीजवळच ठेवलेली होती. तेथेंच तिची नित्य पूजा होत असे. याप्रमाणें आषाढ पौर्णिमेस गुरुपूजन करून शके १८२४ मध्यें बारावा चातुर्मास महाराजांनीं ब्रह्मावर्तास केला.

रोज प्रत्येकाच्या आवडीप्रमाणें ते ते विषय शिकविण्याचें काम चालू होतेंच. त्याबरोबरच लहान मोठया शिकणाऱ्यांचेकडून मध्यें मध्यें कीर्तन करवून घेत, पुराण सांगून घेत व तें ऐकण्यास तेथें स्वतः बसत असत. अत्यंत हौसेनें सर्वांना शिकवून तें कौतुकही पाहाण्याकरितां स्वतः

तेथें असावयाचे. खरा ब्रह्मनिष्ठ पुरुष सर्वही व्यवहार अगदीं साक्षेपानें करतो, त्यांत यत्किंचितही न्यून होऊं देत नाहीं, याचें उदाहरण म्हणजे महाराजांचें दिव्य चरित्र आहे. कीर्तनाकरितां पूर्वरंग व आख्यानाचीं पदें स्वतः तयार करून देत असत. याप्रमाणें त्या वेळीं सात आठ मंडळी कीर्तन पुराणांत तयार झाली होती. यांपैकीं—रामचंद्र खरे, शंकरशास्त्री शिरोळकर (हे पुढें संकेश्वरकरवीरमठाचे शंकराचार्य झाले), गोपाळ राजाध्यक्ष अशी बरीच मंडळी होती. त्या प्रसंगानें महाराजांनीं तेथें पुष्कळ पदें, कविता, स्तोत्रें इत्यादि तयार केलीं. रामचंद्र खरे हा नित्य स्नान संध्यादि अनुष्ठान करून मधुकरी मागून ब्रह्मावर्तांत राहात असे. याचे मनांत महाराजांचेविषयीं अत्यंत पूज्यबुद्धि असल्यामुळें महाराजांनीं तयार केलेलीं आख्यानें पूर्वरंग पाठ करून यानें कीर्तन करीत असावें. वालावली येथील पूर्वाश्रमांतील जयरामशास्त्री उपाध्ये प्रज्ञानानंदसरस्वती नांवाचे संन्याशी ब्रह्मावर्तास महाराजांचे जवळ राहिले होते.

गोपाळ राजाध्यक्ष म्हणून एक गौड ब्राह्मण रत्नागिरीकडचा राहाणारा होता. तो बदरीनारायणाची यात्रा करून ब्रह्मावर्तास येऊन राहिला होता. मधुकरी मागून दत्तभजन करण्यांत काळ घालवीत असे. महाराजांची सर्वत्र पसरलेली कीर्ति ऐकून त्याला महाराजांचें दर्शन आपणांस केव्हा घडेल अशी सारखी तळमळ लागली होती. त्याच्या पूर्वपुण्यानें त्याला त्याच ठिकाणीं महाराजांचें दर्शन झाल्यामुळें अत्यंत आनंद झाला. महाराजांच्या संगतींत त्याचा काळ आनंदांत जाऊं लागला. एकदा त्यानें 'आपणांस कीर्तन करण्याची फार हौस आहे, तरी ही महाराजांनीं पुरवावी,' अशी प्रार्थना एकांतांत महाराजांना केली. अधिकार नसतांही महाराजांचे कृपेनें त्याची इच्छा पूर्ण झाली. त्याच्याकडून महाराजांनीं कीर्तन तयार करवून एकादशीस त्याचें कीर्तन करवूनही घेतलें. तो जेव्हां

कीर्तन करण्यास उभा राहिला तेव्हां ‘ हा मधुकऱ्या काय कीर्तन करणार ? ’ असा लोकांनीं प्रथम त्याचा उपहास केला. पण त्यानें महाराजांचा पूर्ण आशीर्वाद ग्रहण केलेला असल्यानें प्रथमपासूनच रंगदेवता प्रसन्न होती. तें पहिलेंच कीर्तन ऐकून सर्व लोक आश्चर्यचकित झाले. पुढें पुढें स्वतःच गुरुचरित्रांतील कथानकावर राजाध्यक्षांनीं आल्यानें तयार करावींत व तीं महाराजांना वाचून दाखवून तीं कीर्तनें करावींत असा क्रम चालू झाला.

नरसोबावाडीजवळ शिरोळ येथील राहाणारे शंकरराव कुलकर्णी यांचा ड्राइंगचा अभ्यास पूर्ण झाला होता. घरचीही परिस्थिती उत्तम. पण त्यांना विरक्ती उत्पन्न झाल्यामुळें असलेली उत्तम नोकरी सोडून देऊन ते औंधला राहूं लागले. रोज ज्ञानेश्वरी, दासबोध असे संतांचे ग्रंथ वाचण्याचा त्यांना नाद होता. ते पुढें काशीस गेले तेव्हां ज्ञानेश्वरींतील योगनिरूपण वाचून त्यांना योगाभ्यास करण्याची इच्छा झाली. कोठें जावें या विचारांत ते असतां तारक मठांतील प्रज्ञानानंदसरस्वती यांनीं त्यांना सांगितलें कीं, ‘ ब्रह्मावर्तास वासुदेवानंदसरस्वती हे योगी पुरुष राहातात, तेथें तुम्ही चला.’ हें ऐकून शंकरराव कुळकर्णी ब्रह्मावर्तास आले व महाराजांना साष्टांग नमस्कार करून आपली योगाभ्यासाची इच्छा महाराजांचेजवळ निवेदन केली. त्यावेळीं महाराजांनीं त्यांना योगाभ्यास सांगण्याचें कबूल करून षट्क्रिया शिकविल्या व त्यांना सांगितलें कीं, ‘खरा आनंद वेदान्ताच्या अभ्यासावांचून मिळणें शक्य नाहीं. पण वेदान्त ग्रंथ संस्कृतमध्यें आहेत.’ हें ऐकून शंकरराव म्हणाले, ‘ मी आपल्याजवळ राहातों. मला आपण सर्व शिकवावें. ’ नंतर महाराजांनीं त्यांना नारायणशास्त्री एकसंबेकर यांचेकडे जावयास सांगितलें. मग शंकरराव एकसंबेकरांचेकडे आले व त्यांनीं त्यांना महाराजांची आज्ञा सांगितली.

त्याप्रमाणें नारायणशास्त्रींनीं त्यांचेकडून प्रथम वेदाध्ययन करवून घेऊन शास्त्राभ्यासही त्यांना सांगितला. याप्रमाणें शंकरशास्त्रींचें ब्रह्मावर्तास पूर्वी राहाणें असतां त्यांना महाराजांनीं आल्यानें, वेदान्त निरूपणानुरूप अशीं करून दिलीं. त्यावरून दर एकादशीस शंकरशास्त्री ब्रह्मावर्तास कीर्तन करीत असत. केशवशास्त्री जोशी यांचेकडे स्वतः हातांनीं लिहिलेली ब्रह्मसूत्रभाष्याची पोथी महाराजांनीं दिली आणि ती पोथी, शंकरशास्त्रींना द्यावी असें त्यांना सांगितलें. ती पोथी, शंकरशास्त्रींची भेट न झाल्यामुळें केशवशास्त्रींनीं वाडीस दीक्षितमहाराजांचेकडे ठेवली होती. पुढें एक दीड वर्ष ती तेथेंच होती. पुढें वाडीस महाराजांचे दर्शनार्थ शंकरशास्त्री आले असतां ती पोथी त्यांना महाराजांनीं देवविली. पुढें थोड्याच दिवसांत मार्कंडेय ब्रह्मचारी यांचेकडून श्रृंगेरीची हकीकत समजल्यावर शंकरशास्त्री तिकडे शास्त्राभ्यास करण्यास गेले. तेथें न्याय-वेदांतादि शास्त्रांचा अभ्यास करून परत आल्याबरोबर पुढें थोडक्याच दिवसांत त्यांना जगद्‌गुरु पीठावर बसण्याचा योग आला. यामुळेंच आपणांला महाराजांनीं सूत्रभाष्याची पोथी दिली असें ते वारंवार म्हणत असतात.

ब्रह्मावर्तास दिपवाळीचा सण आला. तेव्हां दत्तमूर्तीच्या पूजेकरितां पंचामृतादि पूजासाहित्यांनीं भरलेलीं पांच पन्नास ताटें मंडळींनीं आणलीं आणि दत्तमूर्तीची अत्यंत प्रेमानें पूजा केली. सुगंधित फुलांचा तर तेथें मोठा ढीगच पडला होता. मूर्ति लहान असल्यानें ती फुलांचे राशींत बुजून जाई. पुनः ती काढून वर ठेवावी व पुनः फुलें घालावींत असा क्रम चालला होता. उत्सवांत भजन कीर्तन, पुराण इत्यादि कितीतरी कार्यक्रम नित्य चालू होते. गांवांतील सर्व उत्सवांपेक्षां महाराजांच्या दत्तमूर्तीचा उत्सव फारच मोठा झाला. तें पाहून महाराजांचेवरील ईश्वरकृपा

सर्वांचे लक्षांत आली. सर्व मंडळींनीं अत्यंत प्रेमानें त्या दत्तमूर्तीचें पूजन केलें. महाराजांचे अंतःकरणांतही उपास्यदेवतेविषयीं उत्कट प्रेम होतें. त्यामुळें प्रभूंनींच भक्तवात्सल्य प्रकट करण्याकरितांच आपला उत्सव मोठ्या थाटानें करून घेतला. पुढें दत्तजयंतीचा उत्सव तर यापेक्षांही मोठ्या प्रमाणांत झाला. गुरुचरित्राचे दहा वीस पाठ, भजन, कीर्तन इत्यादि अनेक कार्यक्रम सारखे चालू होते. श्रोते मंडळींना त्या कार्यक्रमामुळें स्वयंपाक, जेवण, झोप यांकरितां सुद्धां वेळ मिळेना. कांहीं कांहीं श्रोते मंदिरांतच सारखे पडून असत. शेवटच्या दिवशीं समाराधना होऊन चार पांचशें पान झालें. रात्रीं ललीत झालें. दुसरे वर्षी विश्वेश्वराचे मंदिरांत हा उत्सव झाला.

ब्रह्मावर्तास सुभेदार म्हणून एक कण्वशाखीय घराणें चांगलें श्रीमंत होतें. त्यांचे वाडयांतील छत्रांत एकदां ४।५ बैरागी अन्नाकरितां आले व जातांना त्यांनीं तेथील कांहीं लांकडें न विचारतां नेलीं. त्यामुळें सुभेदारांनीं त्यांना तुरुंगांत घातलें. जातांना ते बैरागी मालकाजवळ येऊन संतापानें म्हणाले कीं, 'आम्हांला त्रास दिल्याबद्दल ईश्वर तुझे हाल हाल करील' असें बोलून ते गेले. यानंतर सुभेदारांचे वडील बंधु मरण पावले. एके दिवशीं मध्यरात्रीच्या वेळीं एक स्त्री सुभेदारांच्या वाडयांतून बाहेर पडून रडत रडत गंगाकिनाऱ्याकडे गेली. महाराजांनीं ती कोण होती तें ओळखून दुसरे दिवशीं सुभेदारांचा पुतण्या आल्या वेळीं त्याला महाराज म्हणाले कीं, 'माधवराव ! काल रात्रीं लक्ष्मी तुमच्या वाडयांतून बाहेर पडून रडत रडत निघून गेली. तरी यापुढें फार सावधगिरीनें वागावें.' हें महाराजांचें बोलणें ऐकून तो खिन्न झाला.

एकदां ग्वाल्हेर येथील गोपालाचार्यांचे एक शिष्य महाराजांचे दर्शनास आले. नित्याप्रमाणें महाराजांचें पुराण चालू असतां मध्येंच त्या

शास्त्रीबुवांनीं महाराजांचें सांगणें व्याकरणशास्त्राच्या विरुद्ध आहे असें दाखविण्याचा प्रयत्न केला. पण महाराजांनीं अनेक ग्रंथांचे आधार दाखवून, सौम्यपणानेंच आपण केलेले समास व अर्थ योग्य मानण्यास हरकत नाहीं असें त्यांना सांगितल्यावर त्या शास्त्रीबुवांचें समाधान झालें. नंतर पुनः रात्रीं त्या शास्त्रीबुवांनीं महाराज एकटेच आहेत असें पाहून विचारलें कीं, 'महाराज! आपण संन्यासाश्रमी असतां मूर्तिपूजा कां करतां? संन्याशानें मूर्तिपूजा करावी याबद्दल शास्त्राधार कुठें आहे? आपण गायत्रीजप करतों पण मूर्तिपूजेवर तर आपला बिलकुल विश्वास नाहीं!' हें शास्त्रीबुवांचें म्हणणें महाराजांनीं शांतपणानें ऐकून घेतलें आणि त्यांना महाराज म्हणाले कीं, 'शास्त्रीबुवा! निर्गुण उपासनेचा अधिकार ज्यानें मिळविला त्यानें सगुण उपासना केलीच पाहिजे असें नाहीं. आपला अधिकार मोठा असल्यानें आपणांला मूर्तिपूजा करण्याचें कारण नाहीं. पण ही मूर्तीच आम्हाला सोडून जात नाहीं. मग आम्हीं पूजा करावी किंवा न करावी तें आतां तुम्हीच सांगा.' असें महाराजांचें म्हणणें ऐकून शास्त्रीबुवांनीं महाराजांना सांगितलें कीं, 'आपणच मूर्तीला सोडून द्या म्हणजे झालें.' हें शास्त्रीबुवांचें म्हणणें ऐकून 'बरें तसें करूं' असें त्यांना सांगून त्यांचें समाधान केलें. पुढें एके दिवशीं शास्त्रीबुवांना घेऊन महाराज गंगेवर गेले. बरोबर दत्तमूर्ति घेतलीच होती. स्नान केलें आणि ती मूर्ति गंगेच्या प्रवाहांत ठेवून महाराज तीरावर आले मात्र, तों इतक्यांत चमत्कार असा दिसून आला कीं, जलप्रवाहांत समर्पण केलेली ती अंगुष्ठप्रमाण दत्तमूर्ति महाराजांच्या समोर येऊन तयार! हें पाहिल्याबरोबर मात्र शास्त्रीबुवांचा निर्गुणोपासनेबद्दल असलेला अहंकार लयाला जाऊन ते सगुणोपासना करूं लागले. नामदेवादि भक्तांप्रमाणें महाराजांचेबरोबर देव खरोखरच बोलतात अशी त्यांची खात्री झाली. या त्यांच्या वागण्यानें लोकांच्या मनांत त्यांच्याविषयीं श्रद्धा उत्पन्न झाली.

पुढें दशाहारांत शास्त्रीबुवांना पुराण सांगणेची इच्छा झाली. परंतु दुसऱ्या कोणत्या तरी मंदिरांत सांगावें, कारण येथें महाराजांचें पुराण चालू आहे, असा त्यांनीं विचार केला. पण महाराजांनीं राममंदिरांतील आपलें चालू असलेलें पुराण बंद करून तेथेंच शास्त्रीबुवांना पुराण सांगण्यास सांगितलें व आपण स्वतः पुराण श्रवणास बसले. श्रोतृवर्ग अन्यत्र येणार नाहीं म्हणून येथेंच पुराण करविलें. 'समः सर्वोपकारकः' हें साधुलक्षण या चरित्रावरून लक्षांत येईल. हें महाराजांचें दिव्य चारित्र्य पाहून शास्त्रीबुवा मात्र महाराजांचे निस्सीम भक्त झाले.

दत्तजयंतीचा उत्सव झाल्यावर महाराज एकदां ध्यानस्थ बसले असतां, त्या गांवांत प्लेग सुरू होणार याबद्दल महाराजांना एक दृश्य दिसलें— कांहीं पिशाच मंडळी यवनरूप घेऊन आपल्या पदरांत असलेला पदार्थ गांवभर फेकण्याचें काम करीत आहेत असा देखावा महाराजांना दिसला. त्याच वेळीं त्यांचेपैकीं एक यवन महाराजांचेकडे येऊन त्यांना म्हणाला कीं, 'उद्यांपासून या गांवावर आमचा हल्ला होणार आहे, तरी आपण हें गांव सोडून दुसरीकडे चला.' असें त्याचें म्हणणें ऐकून महाराज त्याला म्हणाले कीं, 'ज्याचे आज्ञेनें आपण येथें आलों त्याची आज्ञा झाल्याशिवाय आपणांस येथून हालतां येत नाहीं.' याप्रमाणें महाराजांचें व त्या मनुष्याचें वरीलप्रमाणें देवळांत बोलणें झालें. तें ऐकून एका बाईनें ग्रामस्थ मंडळींना सांगितलें कीं, 'ईश्वराच्या अवकृपेमुळें या गांवांत लवकरच प्लेग सुरू होणार आहे. तरी सर्वांनीं बाहेर राहण्यास जावें.' हें समजल्याबरोबर पुष्कळ मंडळी बाहेर राहाण्यास गेली. कांहीं गांवांतच राहिली. माधवराव हा सुभेदारांचा पुतण्या घरांतच राहिला. शेवटीं प्लेगनें त्याची आहुती घेतली. पुढें त्याच्या बायकोनें इस्टेटीचा वांटा मिळण्याबद्दल दावा केला; त्यांत खर्च बराच आल्यानें सुभेदार-

साहेबांना अत्यंत विपत्ति आली. साधूंचा शाप याप्रमाणें या युगांतही नाशक होतो याचें हें प्रत्यक्ष उदाहरण आहे. प्लेग कोणाला होणार तें महाराज अगोदरच सांगत असत. पण महाराजांचें न ऐकतां लोभानें जे घरींच राहत ते मृत्युमुखीं पडत. अशीं दहावीस माणसें गेलीं. नंतर एकदां आप्पा निगडीकर यांस प्लेग होणार असें महाराजांना सांगणें झालें. त्यांना भीति वाटेल म्हणून स्पष्ट न सांगतां फक्त मृत्यूचीं चिन्हें तेवढीं महाराजांनीं सांगून ठेवलीं. पुढें आप्पांना प्लेग झाला व महाराजांनीं सांगितलेलीं मृत्युलक्षणें आप्पांना दिसूं लागलीं. तेव्हां आपणांस संन्यास घेण्याची इच्छा असल्याचें आप्पांनीं महाराजांना सांगितलें. लगेच त्यांना आतुरसंन्यास देऊन पद्मासन घालून बसविलें व त्यांच्याकडून तीन वेळ प्रेषोच्चार करवून घेतला. शेवटीं दीर्घप्रणव उच्चार करीत असतांच आप्पांचें देहावसान झालें. यांच्या मरणाबद्दल महाराजांच्या एका पत्रांत प्रशंसोद्गार काढले आहेत, तें पत्र असें—"पौ. वद्य ७ शके १८२४ च्यार वर्षे बरोबर आप्पा या नांवाचे कर्नाटक ब्राह्मण होते. त्यांनीं साबेसुबेपणीं संन्यास घेऊन तत्काळ तीन वेळ प्रणव म्हणून देहोत्सर्ग केला. हें मरण योग्यांनासुद्धां दुर्मीळ. कळावें. नारायण."

आप्पांच्या देहाचें विसर्जन झालें. इतक्यांत महाराजांनाही प्लेगनें गांठलें. त्या रोगाचें तेथें कांहीं चाललें नाहीं हें निराळें. 'आपण उपास्यदेवतेच्या आज्ञेशिवाय ही जागा सोडून जाणार नाहीं' असें स्पष्ट त्या रोगदेवतेस महाराजांनीं पूर्वीच सांगितलें होतें. पण शेवटीं तो रोग महाराजांच्या मुखावाटें निघून गेला आणि प्रकृति पूर्वीप्रमाणें झाली. महाराज प्लेगनें आजारी असतांनाच समश्लोकी गुरुचरित्र करण्याबद्दल त्यांना देवांची आज्ञा झाली व कशी रचना असावी वगैरे सर्व देवांनीं सांगितलें. त्याप्रमाणें समश्लोकी हा ग्रंथ ६७९० श्लोकांचा ४९ दिवसांत तेथें पूर्ण

झाला. या ग्रंथाबद्दल महाराजांचें एक पत्र आहे तें असें—"ब्रह्मावर्त. चै. वद्य १३–१८२९. ब्रह्मावर्तास असतांना गांवांत प्लेग असल्यामुळें सर्व लोक गांवाबाहेर गेले. कांहीं वृद्ध मात्र गांवांत राहिले होते. त्या वेळीं तेथें समश्लोकी करण्याचें सांगणें झालें. व तेथें एक लेखी जुनें पुस्तक ९१ अध्यायांचें होतें. त्यावरून संस्कृत करण्याचें सांगणें झालें. हें मोठें काम कधीं व कसें संपावें असें त्या वेळीं मनांत येतांच पुनः सांगणें झालें कीं, तूर्त पाठ वगैरे देण्याचें नसल्यामुळें २००।२९० श्लोक होऊन महिना सवा महिन्यांत ग्रंथ पुरा होईल. असें म्हणून सुमारें ६७९० श्लोकसंख्या दाखविली. नंतर त्या गुरुचरित्राची जास्त संख्या पाहून ६।२६।३६।३७ ४१।४२ या अध्ययांतील ओंव्या अर्थानुसंधानास अडचण न येणाऱ्या कमी करून समश्लोकी केल्यावर संख्या भरतें. तरी तसें करावें.काय अशी प्रार्थना केल्यावर तसें करण्याची आज्ञा झाली. त्याप्रमाणें ग्रंथ झाला. आतां कमी जास्त करतां येत नाहीं." हा ग्रंथ कसा होत गेला याबद्दल ग्रंथाच्या शेवटीं दोन श्लोकांत महाराजांनीं सांगितलें आहे कीं, 'प्रत्येक दिवशीं शंभरांपेक्षां अधिक श्लोक झाले. त्यांतच पांच दिवस तर दोनशेंपेक्षांही अधिक श्लोक तयार झाले' असा अर्थाचा उल्लेख आहे. दोनशें श्लोक एका दिवसांत नुसते लिहून सुद्धां होणार नाहींत. मग त्यांची नवीन रचना तर दूरच राहिली. शिवाय रोजचे प्रासंगिक कार्यक्रम, आजारीपण अशी एकंदर स्थिती असतांना इतकी श्लोकरचना रोज होत असे, यावरून महाराजांच्या दिव्य शक्तीची कल्पना कोणासही येऊं शकेल.

ब्रह्मावर्तास महाराजांचे पूर्वाश्रमांतील बंधु सीताराम ऊर्फ भलोबा येऊन राहिले होते. त्यांनीं महाराजांचे आज्ञेप्रमाणें तेथें गायत्रीपुरश्चरण केलें. महाराजांनीं माणगांव सोडल्यापासून त्यांची व सीतारामबुवांची हीच प्रथम भेट. त्या वेळचें एक महाराजांचें पत्र असें—"येथें भला येऊन

पांच महिने राहिला आहे. पूर्वीचा दैवयोग काय होता तो असो. पण तूर्त येथें वेदान्ताचे पाठ चालतात. त्याबरोबर श्रवणाचा व पठणाचा उद्योग बराच चालविला आहे. त्याला जा अथवा राहा असें कांहींच सांगितलें नाहीं. चार पढतात त्यांत कां पढेना? सन्मार्ग आहे व गंगास्नान होत आहे. नारायण.''

ब्रह्मावर्तास आप्पा खाडिलकर म्हणून एक ब्राह्मण होता. त्याला एकदां रक्ताची हगवण सुरू होऊन तो फार अशक्त झाला. त्या वेळीं त्याच्या आईला कोणी तरी असा उपाय सांगितला कीं, 'तुम्ही पंचपक्वान्नें तयार करून तें अन्न त्या मुलावरून उतरवून कोणास तरी खावयास घाला म्हणजे तुमचा मुलगा बरा होईल.' हें ऐकून आप्पाच्या आईनें तसें अन्न आपल्या मुलावरून उतरवून व्यंकटरावला भिक्षेला बोलावून खाऊं घातलें. यानें आप्पाला बरें वाटलें. पण व्यंकटरावाला तो आप्पाचा रोग जडला आणि तो दिवसंदिवस अशक्त होत चालला. 'तूं उतार खाल्ल्यामुळें तुझी ही अवस्था झाली आहे. तूं यांतून बरा होशील असें कांहीं दिसत नाहीं' असें महाराजांनीं व्यंकटरावास सांगितलें. व्यंकटरावानें बरें होण्याकरितां पुष्कळ उपचार केले; पण त्याला यश आलें नाहीं. शेवटीं दम्याची व्यथा जडून त्यांतच त्याचें देहावसान झालें. आप्पा निगडीकर व व्यंकटराव महाराजांची आज्ञा मोडून त्यांचे बरोबर आले होते. त्यामुळें दोघांचीही अशी दशा झाली. ब्रह्मावर्तासच महाराजांनीं 'लघुमननसार' या नांवाचा वेदान्तावर ग्रंथ लिहिला.

महाराजांचे पूर्वाश्रमांतील दुसरे बंधु हरिभट ऊर्फ दत्तोबा हे ब्रह्मावर्तास महाराजांना भेटण्यास आले होते. ते येण्यापूर्वींच सीतारामबुवा आले होते. त्यांच्याकडून मातोश्रींचें देहावसान झाल्याचें वृत्त महाराजांना जेव्हां समजलें तेव्हां महाराजांनीं लगेंच स्नान केलें

वैशाख शुद्ध ३ शनिवार शके १८२४ हा महाराजांच्या मातोश्रींचा निर्याणदिवस आहे. हरभटजी आल्यावर त्यांना महाराजांनीं सांगितलें कीं, 'तुमच्याकडे आलेल्या कोनकरांच्या मिळकतीस शाप असल्यामुळें तिचा अभिलाष न धरतां तुम्ही सोडून द्या. तसेंच मातोश्री निवर्तल्यामुळें तेथील पुण्याई संपली आहे, याकरितां माणगांवांस आतां कांहीं राहणार नाहीं.' असें महाराजांचें सांगणें ऐकूनही हरभटजींनीं कोनकरांची मिळकत सोडून न दिल्यामुळें टेंब्ये यांचा वंश राहिला नाहीं.

पुढें कांहीं दिवस लोटल्यावर प्लेग कमी होऊन चैत्र महिन्यापासून मंडळी गांवांत राहण्यास येऊं लागली. तीन महिने गांव बाहेर होता. लोक जमल्यावर पूर्वीप्रमाणें सर्व कार्यक्रम सुरू झाले. प्लेगनिवारणार्थ हरिभजन हाच उपाय आहे असें महाराजांचें सांगणें ऐकून तेथील मंडळींनीं भजनसप्ताह चालूं केले. सर्व मंडळी अहोरात्र निष्ठेनें भजन करीत होती. महाराजांच्या दिव्य सामर्थ्याचा प्रभाव पाहून सुभेदार वगैरे श्रीमंत मंडळीही आनंदानें भजन करूं लागून द्रव्यसाहाय्यही उत्सवाकरितां करूं लागली. याप्रमाणें तेथें लागोपाठ सात भजनसप्ताह झाले. त्याकरितां महाराजांनीं सांगितलेले नाममंत्र—१ सप्ताह–शिवहरशंकर गौरीशंकर. २ सप्ताह–हरेराम हरेराम राम राम हरे हरे। हरेकृष्ण हरेकृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे. ३ सप्ताह–श्रीपादश्रीनृसिंहस्वामी। श्रीमदत्तात्रेयमौनी. ४ सप्ताह–गणेश गौरीहरनंदन। विघ्नविनाशन गजानन. ५ सप्ताह–हरिहर गणपति भास्करशक्ति। स्वरूप ईशो वरदो जयति। ६ सप्ताह–जय पुरुषोत्तम। शरणद सत्तम. ७ सप्ताह–शिवहरशंकर। गौरीशंकर. याप्रमाणें सात सप्ताह झाल्यावर 'दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा' या नाममंत्राचा सप्ताह केला. पुढें दशाहारार्थ भागीरथीप्रीत्यर्थ एक सप्ताह केला. 'भागीरथि जय पावन गंगे। जान्हवि तारय पातक

भंगे ' या मंत्रानें तो नववा सप्ताह झाला. प्रत्येक सप्ताहसमाप्तीचे वेळीं मुक्तद्वार ब्राह्मणभोजन होऊन सांगता उत्तम होत असे. इतरही सर्वांना अन्नसंतर्पण होत असे. आषाढ पौर्णिमेस व्यासपूजा करून हा शके १८२५ चाही चातुर्मास महाराजांनीं ब्रह्मावर्तासच केला.

## चातुर्मास १३ ब्रह्मावर्त--शके १८२५

ब्रह्मावर्तास येऊन महाराजांना एक वर्ष होऊन गेलें होतें. 'नित्यश्रीर्नित्यमंगलम्' सर्व काळ आनंदाचा सर्व मंडळींना जात होता. शके १८२४ प्रमाणें १८२५ चा चातुर्मासही येथेंच झाला. एकदां एक बाई प्रसूतीचे वेळीं अडली, त्यामुळें तिच्या घरची मंडळी महाराजांचेजवळ येऊन रडूं लागली. महाराजांनीं त्या सर्वांना आश्वासन देऊन त्या बाईची कांहीं मंत्रप्रयोगानें तत्काळ सुटका केली.

याप्रमाणें महाराजांची कीर्ति सर्व ठिकाणीं पसरल्यामुळें काशी, प्रयाग इत्यादि स्थानांहून तिकडे येण्याविषयीं महाराजांना आग्रहाचीं पत्रें येऊं लागलीं. पण उपास्यदेवतेच्या आज्ञेवांचून महाराजांना कोठेंच जातां येत नसल्यानें येतां येत नाहीं एवढेंच उत्तर सर्व पत्रांना महाराजांचेकडून गेलें. तेव्हां काशीस राहणारे मोठे अधिकारी संन्यासी महाराजांचे दर्शनार्थ मुद्दाम काशीहून ब्रह्मावर्तास आले. हे मोठे उपासक व ज्ञानी असून चाळीस वर्षे भागवताचें अखंड सप्ताहरूपी तप यांचें झालेलें होतें. दोघेही अधिकारी पुरुष. एकमेकांना पाहण्याबरोबर दोघांच्याही नेत्रांतून आनंदाश्रूंचा प्रवाह सुरू झाला. तेथील अध्ययन वगैरे नित्य चालूं असणारे कार्यक्रम पाहून शांताश्रमस्वामी तेथें इतके रमून गेले कीं त्यांना महाराजांना सोडून परत काशीस जावें असें वाटेचना. त्यांचा मुक्काम तेथें चार महिने झाला. दूरदूरचे विद्यार्थी अध्ययनाकरितां महाराजांचेजवळ येऊन राहिले होते. तेथें कार्तिक महिन्यांत महाराजांनीं सप्तशती गुरु-

चरित्र या नांवाचा सातशें ओव्यांचा प्राकृत ग्रंथ तयार केला. गुरुचरित्रांतील कथा यांत साररूपानें दिलेल्या आहेत. प्रत्येक ओंव्रींतील तिसरें अक्षर असें वाचलें असतां भगवद्गीतेंतील पंधरावा अध्याय तयार होतो. तेथें अध्ययनाकरितां येऊन राहिलेल्या मंडळींत रत्नागिरी जिल्ह्यांतील पालघरचा राहणारा विष्णुबुवा पटवर्धन म्हणून एक ब्राह्मण होता. याचें वय सुमारें तीस वर्षांचें होतें. इंग्रजी शिक्षण कांहीं झालें होतें. बायको वारल्यामुळें त्रासून घरांतून हा गृहस्थ बाहेर पडला होता. काशीहून महाराजांचे दर्शनार्थ विष्णुपंत येथें आले होते. यांचा स्वभाव प्रेमळ असून हे भजन-कीर्तन करीत असत. एकदां हे कीर्तन करीत असतां एका सुंदर स्त्रीला पाहून यांचे मनांत दुष्ट वासना उत्पन्न झाली. कीर्तन संपल्याबरोबर सीतारामबुवांच्या नांवानें चिठ्ठी लिहून ठेवून विष्णुपंत डोळ्यांना शिक्षा करण्याकरितां म्हणून रानांत गेले व तेथें त्यांनीं शेराचा व रुईचा चीक आपल्या डोळ्यांत घातला. त्यामुळें डोळ्यांस इजा होऊन कांहीं दिसेना. अन्न नाहीं, पाणी नाहीं अशी अवस्था झाली. रानांत एका शिपायानें या ब्राह्मणाची ही मरणोन्मुख अवस्था पाहून याला बटाटे उकडून खाऊं खातले व गांवांत आणून सोडलें. ही गोष्ट महाराजांना समजण्याबरोबर त्यांनीं विष्णुपंताची कानउघाडणी केली. विवेकानेंच हळूहळू मन स्वाधीन करून घ्यावें, असें साहसानें नुसतें बाह्य इंद्रियाचें दमन करणें योग्य नाहीं. अशा घोर कृतीचा कांहीं उपयोग नाहीं, हा महाराजांचा अभिप्राय. शेवटीं अंधारकोठडींत ठेवून उपचार केल्यावर विष्णुपंताचे डोळे बरेच सुधारले. पुढें एके दिवशीं ते बाहेर बसले असतां डोळ्यांत धूळ गेली. त्यामुळें पुनः बिघाड उत्पन्न झाला. नंतर तेथील सुभेदार वगैरे मंडळींनीं त्याला कानपूर येथें सिव्हिल सर्जनकडे पाठविलें. त्याची शुश्रूषा सीतारामबुवांनीं करावी. इतक्यांत बेळगांव भागांतील वेंकटय्या एक ब्राह्मणाचा मुलगा

महाराजांची सेवा करण्याकरितां म्हणून ब्रह्मावर्तास आला. त्याला महाराजांनीं सांगितलें कीं–‘ विष्णुपंताचे जवळ कानपूरास राहून त्यांची सेवा करावी, त्या अनाथ ब्राह्मणाची केलेली सेवा आपणांस पोंचेल.’ ही महाराजांची आज्ञा मान्य करून तो मुलगा कानपुरांत विष्णुपंतांचे सेवेकरितां येऊन राहिला. पुढें विष्णुपंतांचे डोळे बरे झाल्यावर ते दोघेही ब्रह्मावर्तास आले; तथापि डोळ्यांत थोडी कसर राहिली होती. महाराजांनीं त्यांना सांगितलें कीं–‘ आतां जरूरीपुरतें तुमचें काम झालें आहे. नर्मदातीरावर ईश्वरभजन करून राहावें. ’ याप्रमाणें महाराजांची आज्ञा मान्य करून ते मंडलेश्वर येथें राहिले. विष्णुपंतांचा स्वभाव पूर्वीपासून हट्टी होता. पूर्वी पंढरपुरांत एका गृहस्थाबरोबर भांडण झाल्यामुळें यांनीं आपली जीभ कापून घेतली होती व नाशिकला असतांनाही असाच भजनासंबंधीं कांहीं तंटा झाला त्या वेळींही अशीच जीभ कापून घेतली.

व्यंकटय्या हा नंतर कांहीं दिवस महाराजांचे जवळ होता. त्याला कांहीं शिक्षण दिलें. नंतर आणखी कांहीं भजनसप्ताह तेथें झाले. त्यापैकीं एकनाममंत्र–‘ नृसिंहमूर्ते । जय हतभीते । ’ असा होता. हनुमान जयंतीनिमित्त एक भजनसप्ताह झाला त्यावेळचा नाममंत्र–‘ अंजनिसुता रुद्रावतारा । जय रामदूता भवभयवारा ’ असा होता. याप्रमाणें तेथें नित्य उत्सवाचा आनंद सर्व लोकांना मिळूं लागला. पण महाराजांना फारच उपाधि होऊं लागल्यामुळें तिसऱ्या चातुर्मासांत मौन धरण्याचें महाराजांनीं ठरविलें. त्यापूर्वी आपल्याजवळच्या दत्तमर्तीची कांहीं तरी व्यवस्था करावी असा विचार महाराजांनीं केला. त्यामुळें ती मूर्ति रुसून गंगेंत जाऊन बसली. मूर्ति दिसेनाशी झाल्यावर महाराजांना वाटलें बरें झालें, आपली उपाधि कमी झाली. पण इतक्यांत गंगेकडून रडण्याचा आवाज कानीं आला. त्या अनुरोधानें गंगातीरावर

महाराज आले. तेथें शोध करतांच ती मर्ति सांपडली. हें चरित्र पाहून महाराजांनीं मर्तीची व्यवस्था करण्याचा विचार सोडून दिला. पण उपाधीचा त्रास पाहून महाराज म्हणाले कीं–'ही मूर्ति कोणी चोरून कां नेत नाहीं?' हें बोलणें वेंकटय्यानें ऐकून त्यानें ती मूर्ति नेली. तें महाराजांना समजल्यावर महाराज त्याला म्हणाले कीं 'नुसती मूर्ति मिळाली म्हणजे काम झालें नाहीं. ती नीट जपली पाहिजे. फुकटचा हत्ती मिळाला तरी तो पोसण्याची शक्ति नसेल तर काय उपयोग?' हें महाराजांचें बोलणें लक्षांत ठेवून वेंकटय्या त्या मूर्तीची पूजा करीत मंडलेश्वरीं राहिला होता. पुढें तो मेल्यावर त्या मूर्तीचें काय झालें तें कळत नाहीं. मूर्ति नेली त्या वेळींच महाराज म्हणाले, 'ही मूर्ति जेथें जाईल त्याच्या सर्वस्वाचा नाश होईल. कारण आपणांइतकी पाळणूक कोणांकडूनही होणार नाहीं.'

## चातुर्मास १४ ब्रह्मावर्त–शके १८२६

पूर्वी ठरविल्याप्रमाणें या चातुर्मासांत आषाढ पौर्णिमेपासून महाराजांनीं मौन धारण केलें. पुराणसुद्धां बंद होतें. विशेष कांहीं सांगणें असल्यास पाटीवर लिहून दाखवीत. बहुतेक सर्व काळ समाधींतच जात असे. दोन तीन दिवसांनीं केव्हांतरी भिक्षा होत असे. गोपाळराव राजाध्यक्ष यांनीं गुरुचरित्रांतील कथानकांवर कीर्तनोपयोगी अशीं आख्यानें तयार केलीं व तीं महाराजांना वाचून दाखविलीं. महाराजांनीं 'नारायण' एवढेच शब्द उच्चारून समाधान दर्शविलें. गंगेचा प्रवाह पलीकडे गेला व महाराजही येथून लवकर जाणार असें दिसूं लागलें. हें पाहून दुसरीकडे जाऊन राहण्यास त्यानें महाराजांची आज्ञा मागितली. तेव्हां 'नेमावर येथें नागेश्वराच्या मंदिरांत राहून गायत्री पुरश्चरण करावें. खर्चास कांहीं पाहिजे काय?' असें त्याला पाटीवर लिहून सांगितलें. त्यानें आज्ञा

मान्य करून निघण्याची तयारी केली. 'आपणांस कांहीं नको, फक्त पुनर्दर्शन व्हावें' अशी विनंति राजाध्यक्षांनीं केली. महाराजांनीं बरें आहे असें दर्शवितांच ते निर्दिष्ट स्थानीं निघून गेले.

पुढें लवकरच महाराजांना आज्ञा झाली कीं, 'नरसोबाचे वाडीची व्यवस्था फार बिघडली, तेथें अनाचार चालू आहे; तरी तेथें जाऊन व्यवस्था करावी आणि आपली छाटी मिळेपर्यंत तेथें राहावें.' चातुर्मासानंतर काशीकडे जाण्याचा महाराजांचा विचार होता; पण इकडे जाण्याची आज्ञा झाल्यामुळें महाराज वाडीस येण्याकरितां ब्रह्मावर्ताहून चातुर्मास संपतांच निघाले. सर्व मंडळींना वाईट वाटलें. कानपुराहून मंडळी दर्शनार्थ आली होती. सर्वांनीं नमस्कार केल्यावर 'दत्तभजन करून राहा' असें सर्वांना प्रेमानें सांगितलें. नंतर ब्रह्मावर्तापासून जवळच सिद्धेश्वर नांवाचें लिंग ब्रह्मदेवानें स्थापन केलें आहे. त्या मंदिरांत महाराज आले. ब्रह्मावर्तीत राममंदिरासमोर गंगातीरावर एका झोपडींत महाराजांची तपश्चर्या चालू होती. ती झोपडी गंगेच्या प्रवाहांत वाहून गेली. त्यानंतर त्याच जागेवर महाराजांचें स्मारक म्हणून सुभेदारांनीं कायम स्वरूपाची कुटी बांधली आहे. तेथें एक दत्तमंदिरही हल्लीं बांधलें आहे. महाराज निघाले तेव्हां शिवदत्त नांवाचा एक गृहस्थ महाराजांनीं जाऊं नये म्हणून मंदिराच्या दारांत आडवा पडून राहिला. पण ते केव्हां कसे निघून गेले हें त्याला कळलें सुद्धां नाहीं.

महाराज पुढें यमुनातीरावरील काल्पी गांवांत जाऊन नंतर जालवणास गेले. तेथें एक यवन महाराजांना शरण येऊन अनुग्रह करावा म्हणून त्यानें विनंति केली. तेव्हां त्याला एक कुराणांतील वाक्यें सांगून त्याचा जप करण्यास सांगितलें. जालवणाहून महाराज झांशीस येऊन तेथून पिछोरा मुक्कामीं आले. तेथें चार मुक्काम झाले. तेथें आपल्याजवळ

असलेलें सामान धाबळी, कंथा, लहान भोपळ्याचा कमंडलु हें एका ब्राह्मणाकडे देऊन तें ब्रह्मावर्ती पाठविण्यास त्याला सांगितलें. त्याप्रमाणें त्या सर्व वस्तु ब्रह्मावर्ती पाठविल्यावर महाराज राहत होते तेथें त्या वस्तु ठेवून तेथील मंडळी नित्य पूजा, उत्सव करूं लागली.

पिछोराहून निघून महाराज रावेर या गांवीं आले. तेथें भिक्षेकरितां चिटणीस यांचे घरीं गेले, तेव्हां चिटणीसांची मेहुणी अस्पर्श असल्यामुळें घराबाहेर एका मशिदीजवळ जाऊन उभी राहिली. लगेच तिचें शरीर अत्यंत जड होऊन ती आजारी पडली. ही हकीकत महाराजांना समजल्यावर शुद्धीनंतर पांचवे दिवशीं तिला आपणांसमोर आणण्यास महाराजांनीं चिटणीसांना सांगितलें. त्या दिवशीं ती महाराजांचे दर्शनास आल्याबरोबरच ती मोठयानें ओरडूं लागली. 'तूं कोण आहेस व या बाईस कां धरलेस' असें महाराजांनीं त्या पिशाचाला विचारलें. तेव्हां 'मी या मशीदीचा मालक जिंद आहें. हे लोक माझ्या मशिदीजवळ राहतात. पण मशीद कधींच दुरुस्त करीत नाहींत. म्हणून मीं या बाईस धरलें.' असें त्या पिशाचानें महाराजांना सांगितलें. तेव्हां पुनः महाराज त्याला म्हणाले कीं, 'या बाईचा कांहींच अपराध नसतां केवळ तुझ्या मशिदीजवळ उभी राहिली इतक्याच कारणास्तव तूं हिला त्रास देत आहेस. तरी तुला शिक्षा जरूर केली पाहिजे. आपण कांहीं मशीद दुरुस्त करण्यास यांना सांगणार नाहीं.' तेव्हां त्यानें अत्यंत काकुळतीस येऊन प्रार्थना केल्यावरून ती मशीद दुरुस्त करण्याविषयीं चिटणिसांना आज्ञा केली. त्यांनीं त्याप्रमाणें करतांच तो जिंद निघून गेला.

रावेरहून महाराज भेलसा या गांवीं आले. तेथें नरसोबावाडी येथील महाराजांचे प्रिय शिष्य दीक्षितस्वामी महाराजांना भेटले. दीक्षितांची

पत्नी प्लेगनें वारली व पुढें ते स्वतःही प्लेगनें आजारी झाल्यामुळें त्यांनीं आतुरसंन्यास घेतला होता. दंडधारणविधि आपल्या गुरुमहाराजांच्या हस्तें व्हावा अशी त्यांची इच्छा त्यांनीं ब्रह्मावर्तास महाराजांना पत्रद्वारें कळविलीहि होती. त्या वेळीं महाराजांनीं त्यांना 'देवाची इच्छा असेल तसें घडेल; वाडीसच राहावें' असें उत्तर पाठविलें होतें. पण दीक्षितस्वामींना तळमळ फार लागली. कांहींच सुचेना. शेवटीं सीतारामबुवांची तार आल्याबरोबर नुकतेच आजारांतून उठले होते तरी दीक्षितस्वामी तसेच गुरुमहाराजांचे दर्शनार्थ ब्रह्मावर्तास निघून आले. पण तेथून महाराज गेले असें समजतांच शोध करीत ते निघाले असतां भेलसा मुक्कामीं त्यांना महाराजांचें दर्शन झालें. तेव्हां त्यांचें चित्त शांत झालें. वेत्रवती नदीवर स्नानसमयीं 'कलौ वेत्रवती गंगा' असें महाराज त्यांचे बरोबर बोलले. नंतर दीक्षितस्वामींना महाराजांनीं सांगितलें कीं, 'नरसोबावाडीस जाण्याबद्दल श्रीदत्तमहाराजांची आपणांस आज्ञा झाली आहे. त्याप्रमाणें लवकरच येणें घडेल. तुम्ही रेलवेंतून पुढें जावें.' ही महाराजांची आज्ञा झाल्यावर दीक्षितस्वामी वाडीस येऊन महाराज तेथें येणार असल्याची वार्ता त्यांनीं सर्व मंडळींना सांगितली. त्याप्रमाणें वाडींतील सर्व मंडळी महाराजांची वाट पाहूं लागली. भेलशाहून निघून महाराज हुशंगाबादेस आले. तेथें एकदां चार विद्यार्थी महाराजांच्या दर्शनास आले. त्यांनीं विनंति केली कीं, 'आम्ही या वर्षी परीक्षेस बसणार आहोंत. तरी पास होण्याकरितां कांहीं उपाय सांगावा.' तें ऐकून महाराज म्हणाले कीं, 'आपणांस कांहीं माहीत नाहीं. आपण कांहीं ज्योतिषी नाहीं. आणखी कोणास तरी विचारा.' तें ऐकून त्या मुलांनीं जयराम मुजुमदार यांचे द्वारानें पुनः आपली विनंति कळविली. तेव्हां प्रत्येकाला मंत्र सांगून रोज त्या मंत्राचा १०८ जप परीक्षा होईपर्यंत करण्यास त्या मुलांना सांगितलें. त्याप्रमाणें श्रद्धेनें त्यांनीं केल्यामुळें तीं मुलें पास झालीं.

हुशंगाबादेहून हळूहळू प्रवास करीत एके दिवशीं सकाळीं दहा वाजण्याचे सुमारास महाराजांची स्वारी नरसोबावाडीस येऊन दाखल झाली. बरोबर फक्त दोन छाटया, दंड, भोपळ्याचा कमंडलु व उपनिषदांची एक लहान पोथी इतकें सामान होतें. महाराज इतक्या लवकर येतील अशी कल्पना वाडीच्या मंडळींना नसल्यामुळें ती मंडळी स्वस्थ होती. महाराज एकदम श्रीदत्तपादुकांसमोर येऊन उभे राहिले. 'नमो ब्रह्मदेवा' हें पद म्हणून प्रार्थना केली व वंदन करून वरती श्रीनारायणस्वामींचे समाधीचें दर्शन घेऊन स्वारी ब्रह्मानंदांचे माडीवर जाऊन बसली. महाराज आले ही बातमी गांवांत समजतांच पुजारी मंडळी दर्शनास आली. सर्वांचे नमस्कार झाल्यावर महाराजांनीं सर्वांचें कुशल विचारलें. तास दीड तास प्रेमानें बोलणें चाललें होतें. त्या दिवशीं सकाळीं मिरजेच्या घाटावर स्नान झालें होतें. पुनः स्नान करून व कांहीं नित्यकर्म, वेदपठण इत्यादि करून ध्यानस्थ बसतांच समाधि लागली. तासभर या स्थितींत गेला. महाराजांना केव्हांही सहज समाधि लागत असे. वाडीस या वेळीं झालेल्या ४८ दिवसांच्या मुदतींत बरेच वेळां समाधि लागली होती. समाधी उतरेपर्यंत मंडळी सर्व उभी होती. समाधींतून व्युत्थान झाल्यावर महाराज भिक्षेस निघाले. वाडीवर महाराजांचें विशेष प्रेम असल्यामुळें भिक्षेचा तीन घरांचा नियम या ठिकाणीं न पाळतां लोकांच्या समाधानार्थ अधिक घरांतून भिक्षा घेतली. भिक्षा झाल्यावर गांवांतील मंडळी महाराजांचेजवळ येऊन बसूं लागली. संध्याकाळपर्यंत दर्शनाचा क्रम सारखा चालू होता. नारायणराव नंदगांवकर म्हणून वाडींत त्या वेळीं पोस्टमास्तर होते. त्यांना महाराजांच्या दर्शनाविषयीं अतिशय तळमळ लागली होती व ते दर्शनाकरितां ब्रह्मावर्ताकडे जाणारही होते. इतक्यांत त्यांना महाराजांचें दर्शन झाल्यामुळें मोठें समाधान वाटलें. सायंसंध्येकरितां महाराज कृष्णापंचगंगा

संगमावर गेले. तेथून सुमारें आठ वाजतां श्रीदत्तपादुकांचें दर्शन करून ब्रह्मानंदांच्या मठांत आले. तेथेंच नेहमीं मुक्काम असे.

दुसरे दिवसापासून महाराजांचा, उपदेश करण्याचा नित्यक्रम सुरू झाला. पहांटे चार वाजतां उठून कांहीं योगप्रक्रिया सांगत. नंतर सूर्योदयाचे पूर्वी शौचमुखमार्जनादि उरकून स्नान होत असे. नित्यकर्मे आटोपल्यावर खालीं देवदर्शन करून वर मठांत परत येत. नंतर कित्येकांना संध्यादि ब्रह्मकर्माचें शिक्षण देऊन कित्येकांना उपनिषदें सांगत. मध्यान्हकाळचें आन्हिक आटोपल्यावर तीनपासून सात घरांतून भिक्षा घ्यावयाची. सर्वच प्रेमीमंडळी त्यामुळें क्रमाक्रमानें भिक्षेस जात असत. भिक्षा झाल्यावर ज्योतिष, वैद्यक, मंत्र, तंत्र इत्यादि विषयांचे प्रश्न पुढें येत. त्यांना सर्वांना व्यवस्थित सांगणें होत असे. पुढें आलेल्या पत्रांचीं उत्तरें पाठविलीं जात. चार वाजल्यावर श्रीमद्भागवतांतील वेदस्तुति व ब्रम्हस्तुति हे विषय सांगितले जात. तसेंच गुरुचरित्राच्या टीकेंतील कठीण विषयही विचारणाऱ्यांना समजून दिले जात. सायंसंध्येकरितां संगमावर जात. तेथेंही कांहीं विषयांची चर्चा चालूंच असे. श्रींचे पालखीची तिसरी प्रदक्षिणा सुरू झाल्यावर संगमावरून उठून देवाकडे यावें आणि तेथें वंदन करून वर मठांत येणें होत असे. तेथें रात्रीं बारा एक वाजेपर्यंत मंडळी बसलेली असतच. नंतर अंगावरच्या छाटीवरच २।३ घंटे निद्रा होत असे. याप्रमाणें दीड महिना वाडींत नित्य आनंदोत्सव चालला होता. या वेळीं महाराजांचे दर्शनास लांबलांबची मंडळी आली होती. त्यांच्या त्यांच्या कामनेप्रमाणें त्यांना उपाय सांगण्याचें काम नित्य चालूं होतें.

वाडीस महाराज येऊन सुमारें एक आठवडा होऊन गेला. पुढें एके दिवशीं रात्रीचे वेळीं, आपणास दंड देण्याविषयीं दीक्षितस्वामींनीं महाराजांना विनंति केली. शिष्य परीक्षेचाच तो प्रसंग. महाराज त्यांना

म्हणाले, 'तुम्हाला दंड देण्याबद्दल आपणांस आज्ञा झालेली नाहीं, करितां तुम्ही दुसऱ्या कोणाकडून तरी दंड घ्यावा.' हें ऐकून दीक्षितस्वामींना फारच वाईट वाटलें. त्यांनीं महाराजांना आपला निर्धार शेवटीं नाइलाजानें ऐकविला कीं, 'गुरुदेव! मला दंडी करण्याची जर आपली इच्छा असेल तर आपणापासूनच मला दंड मिळाला पाहिजे, नाहींतर हा शिष्य दंडाशिवायच राहील. शिष्याची सर्व चिंता गुरुमाउलीलाच आहे. यापेक्षां मी अधिक काय बोलणार?' हा आपला निश्चय त्या आपल्या सर्वज्ञ गुरुनाथाजवळ निवेदन करून दीक्षित स्वामी रात्रभर अश्रू ढाळीत तेथेंच उभे राहिले. 'जीवनाविणें मासोळी' प्रमाणें अंतरांत सारखी तळमळ चालली होती. ती सर्वसाक्षी प्रभूला कळल्यावांचून कशी राहील? पहांटेच्या सुमारास आपल्या अनुग्रहीत शिष्याला दंड देऊन कृतार्थ करण्याबद्दल महाराजांना देवांची आज्ञा झाली. 'महाराज आतां उठतील. आपलें भवितव्य गुरुमाउलीच्या इच्छेवरच सर्वस्वीं अवलंबन आहे. देवा! माझें दुरित अद्यापि संपलें नाहीं काय?' याप्रमाणें विचार करीत दीक्षित स्वामीजी त्या वंदनीय सद्गुरुचरणांकडे अत्यंत दीन होऊन सारखे पाहात उभे होते. डोळ्यांतून सारखा अश्रुप्रवाह चालू होता. पहांटे चार वाजण्याचा समय होता. इतक्यांत 'स्वामी! तुम्ही रात्रभर येथेंच उभे आहांत? बरें तर जा आतां. तुमच्या इच्छेप्रमाणें दंड-धारणाची तयारी करा. तुमची इच्छा पूर्ण होईल.' अशी श्रीगुरूंची अमृतमय वाणी कानांवर पडण्याबरोबर दीक्षित स्वामीजींनीं गुरुमाउलीच्या पायांवर मस्तक ठेवून ते तयारी करण्याकरितां आनंदानें निघून गेले. पूर्वसूचनेप्रमाणें कोलगांवचे गणेश सांतवळेकर यांनीं दंड आणलाच होता. प्रायश्चित्त वगैरे सर्व विधि झाला. महाराजांनीं दीक्षितस्वामीजींना दंड दिला व त्यांचें नांव 'नृसिंहसरस्वती' असें ठेवलें. हे महाराजांचे एकनिष्ठ भक्त होते. मितभाषी, शांत, दांत, एकांतप्रिय

असे होते. स्वभाव अत्यंत प्रेमळ होता. महाराजांचे आज्ञेप्रमाणें वाडींतच श्रीदत्तपूजा, उत्सवादि कार्य करीत दीक्षित स्वामीजी पुष्कळ वर्षे राहिले होते. पण तेथील मंडळींच्या दुरदृष्टानें किंवा बाहेरच्या मंडळींच्या सुकृतानें दीक्षितस्वामीजींनीं वाडी सोडण्याबद्दल सद्गुरूंची आज्ञा मिळवून वाडींतून बाहेर पडले. त्यामुळें अमरापूर येथील देवस्थानचा जीर्णोद्धार होऊन तेथें ' श्रीवासुदेवानंद सरस्वती पीठ ' म्हणून एक संस्था स्थापन होण्याचा योग आला. गुरूंच्या आज्ञेचें पालन कसें करावें हें दीक्षित-स्वामीजींच्या वागण्यावरून समजून येणारें आहे. ' प्रसंगच आल्यास वाडी सोडावी ' अशी त्यांना पत्रद्वारा महाराजांची आज्ञाही होती.

एके दिवशीं पालखी चालू असतां नित्याप्रमाणें खालीं दर्शन करून महाराज वर येण्यास निघाले. येतां येतां कांहीं पायऱ्या चढून वर आल्या-बरोबर समाधि लागली. त्यावेळीं हातांतील कमंडलू कट्टयावर पडला. पण चमत्कार असा कीं, तो कमंडलू कोठेंही भंगला नाहीं. कमंडलू एकाएकीं पडल्यामुळें समाधि-अवस्था असावी असें लोकांना वाटलें. त्याच स्थितींत वर श्रीनारायणस्वामींचे मंदिरांत हळूहळू महाराज येऊन बसले. कोणा-शींही बोलणें वगैरे कांहीं नाहीं. समाधि-अवस्थेंतच होते. बाहेर जमलेल्या सर्व मंडळींना मात्र आज कांहीं तरी विशेष प्रकार होणार असें वाटूं लागलें. थोडक्याच वेळांत ' चारही फडांतील वृद्ध पुजारी मंडळींना हाक मारा' अशी महाराजांची आवेशयुक्त वाणी ऐकूं आली. ती आज्ञा समजल्याबरोबर सर्व पूजारी मंडळी जमा झाली. तें पाहून महाराजांचे मुखांतून शब्द बाहेर पडूं लागले ते असें कीं, ' तुमच्या चालू आचर-णाचा श्रींना कंटाळा आला असून त्यांत कांहीं सुधारणा करण्याकरितां आपणांस इकडे आणलें आहे. तुम्ही तुमच्या पूर्वजांच्याप्रमाणें वागत नाहीं. तुमचें आचरण बिघडलें आहे. तें तुम्हीं सुधारावें; नाहीं तर तीन

वर्षे झालेली कांहींच नाहीं अशी भयंकर शिक्षा होईल.' हे महाराजांच्या मुखांतून निघालेले शब्द ऐकून सर्व मंडळी भीतिग्रस्त झाली. सर्वांनीं अत्यंत नम्र होऊन प्रार्थना केली कीं, 'झालेल्या सर्व अपराधांची क्षमा करून या आम्हां बाळगोपालांचेकडून पूर्वजांप्रमाणें योग्य इष्ट ती सेवा करवून घ्यावी.' अशी मंडळींनीं प्रार्थना केल्यावर महाराज थोड्या वेळानें पूर्वस्थितीवर येऊन ब्रह्मानंदाचे माडीवर स्वस्थानीं येऊन बसले. तथापि पूर्ण देहभानावर स्वारी नव्हती. तीनचार घटका सर्व मंडळी, महाराजांचा आणखी कांहीं आदेश होईल म्हणून वाट पहात तेथेंच बसली होती. पण नंतर महाराज कांहींच बोलले नाहींत. नंतर एका गृहस्थानें विचारलें कीं, 'श्रींचा रोष जाण्यास काय करावें?' हें ऐकून महाराजांनीं उत्तर दिलें कीं, 'आपल्याला कांहीं कळत नाहीं. आपणही तुमच्यासारखेच एक आहोंत.' हें उत्तर ऐकून सर्व खिन्न झाले.

वाडीस महाराजांचा मुक्काम असल्याचें ऐकून दूरदूरची मंडळी दर्शनाकरितां येऊं लागली. एकदां सातवळेकर, उकिडवे, सप्रे इत्यादि मंडळी सावंतवाडीकडून दर्शनाकरितां आली. पुष्कळ दिवसांनीं महाराजांचें दर्शन झाल्यामुळें त्या मंडळींना अवर्णनीय असा आनंद झाला. त्या सर्व मंडळींनीं महाराजांचा फोटो घ्यावा अशा इच्छेनें कुरुंदवाडहून एका फोटोग्राफरला बोलावून आणलें व महाराजांचे पुढें आपली इच्छा व्यक्त केली. महाराज म्हणाले, 'हृदयांत ठेवावयाचें सोडून कागदावर फोटो कसला काढतां? कांहीं जरूरी नाहीं.' हें महाराजांचें म्हणणें ऐकून 'आतां फोटोची सर्व तयारी केली आहे' असें मंडळी म्हणाली. तेव्हां 'बरें तर चला' असें बोलून महाराज खालीं कट्ट्यावर येऊन बसले. त्या वेळीं घेतलेला हाच महाराजांचा पहिला फोटो आहे. सिद्धासन घालून स्वारी बसलेली असून डावा हात पायावर पोटाकडून ठेवलेला व

उजव्या हातांत दंड घेतलेला असा हा फोटो आहे. जवळच भोपळ्याचा कमंडलू आहे.

सावंतवाडीचे कारभारी विनायकराव गुप्ते व पेडण्याचे एक प्रभू गृहस्थ महाराजांचे दर्शनास आले. महाराज खालीं दत्तमंडपाजवळ बसले होते. त्यांचे समोर जाऊन नमस्कार करून गुप्ते बसले. त्यांना पाहतांच महाराज त्यांच्याकडे पाठ करून बसले. तें पाहून गुप्ते महाराजांच्या समोर गेले. तेव्हां महाराजांनीं त्यांच्याकडे पुनः पाठ केली. मग मात्र गुप्ते समोर न जातां पाठीमागूनच महाराजांना म्हणाले कीं, 'माणगांवीं केव्हां येणें होईल?' हें ऐकून महाराज म्हणाले, 'कांहीं काम नाहीं.' पुनः गुप्ते म्हणाले, 'मातृभूमीकडे संन्याशानें यावें असें आहे ना?' महाराज म्हणाले, 'तोच मार्ग धरला आहे, पूर्ण साधेल तो सुदिन.' याप्रमाणें बोलणें झाल्यावर गुप्ते निघून गेले. झालेल्या प्रकारामुळें ते सावंतवाडीस गेल्यावर महाराजांची निंदा करूं लागले. पुढें १।२ वर्षांतच त्यांना कामावरून कमी करून संस्थानचे हद्दींत पुनः पाय न ठेवण्याबद्दल ताकीद देण्यांत आली. अधिकार नसतांना हे वेदोक्त कर्म करीत असत, तें महाराजांना खपलें नाहीं.

बागल म्हणून एक शिरोळास मामलेदार होते. ते एकदां महाराजांचे दर्शनास येऊन त्यांनीं महाराजांना प्रश्न केला कीं, 'सध्यां जिकडे तिकडे बुवा दिसतात, तर यांतील खरे कोण व खोटे कोण हें आमच्यासारख्या अज्ञ माणसांनीं कसें ओळखावें?' हा प्रश्न ऐकून महाराज म्हणाले कीं, 'साधु होऊनच साधूला ओळखतां येतें. इतरांना तें कळावयाचें नाहीं.' हें महाराजांचें उत्तर कानावर पडतांच मामलेदार गप्प बसले.

तात्यासाहेब इनामदार म्हणून कवठे गुळंद येथील राहाणारे गृहस्थ आपल्या पत्नीसह महाराजांचे दर्शनास आले. त्यांनीं नमस्कार करून

महाराजांना विनंति केली कीं, ' आपल्या आज्ञेप्रमाणें या स्त्रीबरोबर मीं विवाह केला. पण आज ४२ वर्षें झालीं संतति नाहीं;' असें बोलून त्यांनीं स्त्रीची पत्रिका पुनः महाराजांना दाखविली. ती पाहून महाराज म्हणाले, 'ही स्त्री तर वंध्या आहे.' तें ऐकून तात्यासाहेब म्हणाले, ' आपणच अशी वंध्या स्त्री आम्हाला दिली.' नंतर महाराज हंसले आणि तात्यासाहेबांना एक अनुष्ठान लिहून देऊन नारळ प्रसाद दिला. घरीं जातांना तात्यासाहेबांनीं महाराजांचा एक फोटो उपाध्यायांचेकडून आणविला. पण तो चांगला नाहीं असें वाटल्यावरून तो बदलून दुसरा फोटो आणून मग घरीं गेले. रात्रीं दोघा पतिपत्नींना दृष्टांत झाला. महाराज स्वप्नांत येऊन म्हणाले कीं, ' माझें स्वरूप तुम्हाला पसंत पडलें नाहीं. करितां प्रसाद परत द्या. ' असें सांगून प्रसादाचे दोनही नारळ महाराजांनीं स्वप्नांत परत घेतले. हें स्वप्न पडल्या-पासून त्या दोघा पतिपत्नींना वाईट वाटत होतें. पुढें महाराजांचे दर्शनास जाऊन त्यांनीं घडलेली हकीकत सांगितली. तेव्हां महा-राज म्हणाले कीं, ' काल एकानें अशीच गोष्ट सांगितली कीं, ' मी निजलों असतां एकानें चापट मारून सांगितलें कीं, ' मूर्खा माझ्याकडे पाय करून निजलास ? ' हें ऐकून मी लगेच जागा होऊन पाहातों तों खराच फोटोकडे पाय करून निजलों होतों. पुनः असें होऊं नये म्हणून देवानेंच शिक्षा केली असावी असें वाटून स्वस्थ राहिलों.' अशी गोष्ट काल एकानें सांगितल्याचें महाराजांनीं तात्यासाहेबांना सांगितलें व या-पुढें वर्तन सुधारण्यास सांगून त्यांना पुनः नारळ प्रसाद दिला. तो प्रसाद घेऊन ते घरीं गेले. पुढें त्यांना एक मुलगा व एक मुलगी झाली.

माणगांवीं महाराजांनीं पूर्वाश्रमांत शंभूशास्त्री साधले यांचेजवळ थोडेंसें काव्य वाचलें होतें. पुढें त्यांनींच आपल्याकडे शिक्षणास येण्याची महा-राजांना बंदी केली होती. त्यांचे चिरंजीव गजाननशास्त्री साधले हे मुंब-

ईस राहात असत. त्यांच्या पत्नीच्या नाकांतून रक्त पडत असे. वैद्य-डॉक्टरांचे उपायानें कांहींच गुण येईना, म्हणून ते पत्नीसह महाराजांचे दर्शनास वाडीस आले व त्यांनीं बरोबर आणलेलें फळें, छाटी, धाबळी, कमंडलू हें सामान नमस्कार करून महाराजांचे पुढें ठेवलें. महाराजांनीं तें सामान वांटून टाकलें आणि येण्याचें कारण गजाननशास्त्रींना विचारलें. त्यांनीं तें सांगितल्यावर महाराजांनीं त्यांना तीन भस्माच्या पुड्या करून दिल्या व गांवीं गेल्यावर तुंब्याच्या रसांतून तें नाकांत घालण्यास सांगितलें व दोघांनाही संततीकरितां मंत्र लिहून दिला. पुढें महाराजांची आज्ञा घेऊन साधले गांवीं आले व त्यांनीं तें औषध घालतांच तीन दिवसांतच पत्नीच्या नाकांतील रक्त पडण्याचा तो पुष्कळ दिवसांचा रोग पूर्ण बरा झाला. पुढें त्यांनीं तें मंत्रजपाचें अनुष्ठान केल्यावर त्यांना एक मुलगी व एक मुलगा अशी संतति झाली. त्यांच्या बंधूसही संतति नव्हती. त्यांच्या कुटुंबास अश्वत्थप्रदक्षिणा घालण्यास सांगितलें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं करतांच त्यांनाही मुलगा झाला.

वाडीस आण्णाजी कृष्ण पूजारी यांना लोकांचें देणें फार होतें. ते नेहमीं खिन्नमुद्रेनें महाराजांचे जवळ जाऊन बसत. एके दिवशीं महाराजांनींच त्यांना विचारलें कीं, 'काय कर्ज वगैरे नाहींना? सर्व ठीक आहे ना?' हें ऐकून अण्णाजी कृष्ण यांनीं सांगितलें कीं, 'महाराजांच्या कृपेनें सर्व ठीक आहे. पण पोस्टमनची नोकरी करून प्रपंच कसा चालेल व कर्ज कसें फिटेल?' हें त्यांचें बोलणें ऐकून महाराजांनीं त्यांना पाक तयार करण्याची कृति सांगितली. त्याप्रमाणें पुढें त्यांनीं 'शक्तिवर्धक पाक' म्हणून पाक तयार केला. त्याचा बराच खप होऊन सर्व कर्जांतून आण्णाजी कृष्ण पुजारी हे पूर्ण मुक्त होऊन सुखानें नांदूं लागले.

सखारामबापू गेंडे म्हणून एक पुजारी वाडींत आहेत. त्यांना पूर्वी सर्वत्र

विटाळ आहे असा भास होत असे. त्यांचें उत्पन्नही तंट्यामुळें त्यांना मिळत नसे. महाराजांनीं त्यांना 'दत्तमाला मंत्रांचा जप' करण्याबद्दल पत्रानें कळविलें होतें. त्याप्रमाणें त्यांनीं श्रद्धेनें अनुष्ठान करतांच तो सर्व भास दूर होऊन उत्पन्नही कुळांकडून वेळचेवेळीं मिळूं लागलें. हे गृहस्थ अत्यंत सात्विक वृत्तीचे असून उत्तम फोटोग्राफर आहेत.

याप्रमाणें वाडींत महाराजांचा मुक्काम असतां अनेक लोकांनीं येऊन आपले मनोरथ पूर्ण करून घेतले. लहान मुलांचे रोग बरे झाले. भूत-पिशाच बाधा दूर झाल्या. कित्येक मुली आपापल्या पतिगृहीं नांदूं लागल्या. महाराजांनीं वाडींतील लोकांना त्यांच्या प्रार्थनेवरून कांहीं आचरणाचे नियम करून दिले. पण कांहीं पूजारी मंडळींना तें पसंत न पडल्यानें त्यांनीं त्यावेळीं महाराजांची निंदा केली. पुढें पूजारी मंडळींनीं श्रींचा कट्टा धुण्याचा वार्षिक समारंभ करून संप्रोक्षण विधि केला आणि श्रींचा प्रसाद होण्याकरितां दोन महारुद्र केले. त्यावेळीं महाराज स्वतः पूजेस बसत. पहिल्या महारुद्राची सांगता बाळंभट खोंबारे यांचे घरीं झाली. चार पांचशें पान झालें. त्यावेळीं महाराज प्रसादास आले होते. दुसरी सांगता झाल्यावर पूजाऱ्यांनीं श्रींची एक छाटी महाराजांचें अंगावर घातली. तें वस्त्र मिळाल्याबरोबर पूर्वी सांगणें झाल्याप्रमाणें उत्तरेकडे जाण्याची आज्ञा मिळाली असें समजून आपला येथून निघ-ण्याचा विचार महाराजांनीं मंडळींना कळविला. तें ऐकून सर्व मंडळींना अत्यंत दुःख झालें. मंडळींनीं राहाण्याविषयीं महाराजांना पुष्कळ आग्रह केला. पण 'देवाच्या आज्ञेबाहेर आपणांस जातां येत नाहीं' असें महारा-जांनीं सर्वांना सांगितलें. तथापि श्रीनारायणस्वामींचा पुण्यतिथीचा उत्सव चैत्र ३० स आहे तो तरी करून जावें असें मंडळींनीं सांगितल्यावरून चार दिवस मुक्काम वाढला. उत्सव संपल्याबरोबर निघण्याचें ठरलें. मंडळींनीं पुष्कळ आग्रह केला; पण 'आपणांस श्रींची आज्ञा उल्लंघन

करतां येणार नाहीं ’ असें महाराजांनीं सर्वांना स्पष्ट सांगितलें, त्यामुळें नाइलाज झाला. शेवटीं वैशाख शुद्ध प्रतिपदेस वाडीहून निघण्याचें ठरलें. त्या दिवशीं सकाळीं दहा वाजल्यापासून सर्व स्त्री-पुरुष आबालवृद्ध मंडळी महाराजांचें दर्शन घेऊन प्रसाद घेऊन जाऊं लागली. संध्याकाळीं चार वाजेपर्यंत हें काम सारखें चालूं होतें. त्या वेळीं इतकी गर्दी झाली कीं, तीन तीन तास थांबून सुद्धां महाराजांचें दर्शन होण्याचा योग येईना. शेवटीं सायंकाळीं चार वाजतां महाराज उठले आणि आपल्या छाट्या वगैरे सामान घेऊन खालीं श्रीदत्तपादुकांचे दर्शनार्थ मंडपांत आले. तेथें श्रीसन्निध बसून प्रार्थना केली व चारी फडांतील पूजाऱ्यांना तसेंच इतरांनाही पुष्पप्रसाद स्वहस्तें देऊन महाराजांनीं उपदेश केला कीं—‘ आपल्या पूर्वजांप्रमाणें सदाचार न सोडतां श्रींची सेवा करावी, म्हणजे सर्व संकटांतून पार पडाल. नित्य ब्रह्मकर्म झाल्यावर थोडें तरी गुरुचरित्र वाचल्याशिवाय अन्न घेऊं नका, म्हणजे कांहीं कमी पडणार नाहीं. श्रीनृसिंहसरस्वतींना येथेंच ठेवलें आहे. त्यांच्या आज्ञेनें वागावें. वारंवार हेंच सांगणें कीं श्रींचे पाय सोडूं नका. ’ याप्रमाणें सांगून व श्रींना वंदन करून महाराज उठले आणि मंडपाबाहेर पडणार इतक्यांत १०।१९ मुलें उभीं राहून ‘ गुरुराया जाऊं नका हो । टाकुनिया आम्हा दीनासी । साहवेल विरहा कैसें । तुजविणें सर्व उदासी । ’ हें पद सद्गुरु श्रीनृसिंहसरस्वती गाणगापुराहून निघाले त्या वेळच्या हकीकतीचें अत्यंत करुणरसपूर्ण असें म्हणूं लागलीं. त्या वेळीं सर्वांच्याच नेत्रांतून अश्रू वाहूं लागले. सर्वांचें तें विलक्षण प्रेम पाहून महाराजही गहिंवरले. कसें बसें सर्वांचें समाधान करून वर श्रीनारायणस्वामींचे मंदिरांत उत्सवमूर्तीचे दर्शनास गेले. दर्शन करून बाहेर येऊन पाहातात तों शेंकडों लोक प्रसाद घेण्याचे राहिले आहेत. हें पाहून तेथेंच कट्ट्यावर बसून अर्ध्या घंटयांत प्रसादाचें काम कसें बसें उरकून महाराज निघाले. गांवां-

तील सुवासिनी स्त्रियांनीं महाराजांना ओंवाळलें. रस्त्यांतही ठिकठिकाणीं सुवासिनींनीं महाराजांचे मस्तकावर अक्षता टाकून ओंवाळलें. कन्यागती श्रींची स्वारी पालखींतून शुक्लतीर्थाकडे गंगास्नानास जाते, त्या वेळीं जसा सुवासिनींचा आरतीचा थाट होतो त्यापेक्षांही अधिक या वेळीं समारंभ झाला असें वृद्ध मंडळी सांगतात. याप्रमाणें पुढें भजन करीत, श्रींच्या व महाराजांच्या नांवांचा जयजयकार करीत सर्व मंडळी निघाली होती. महाराज सर्वांच्या मधून चालले होते. गांवांतून निघून जोडलिंबाच्या मारुतीपर्यंत सर्व मंडळी महाराजांचे बरोबर आली. तेथें महाराजांनीं उभे राहून सर्वांच्या अंगावर कमंडलूंतील पाणी शिंपडलें व वर हात करून सर्वांना आशीर्वाद देऊन परत जाण्यास सांगितलें. 'तुम्ही सर्वच जण इकडे आल्यावर तिकडे श्रींची धूप पालखी इत्यादि कार्ये कोण करणार? तरी लवकर परत जा.' असें महाराजांनीं सांगितलें तरी लोकांचे पायच वळेनात. शेवटीं मोठया कष्टानें मंडळी महाराजांना नमस्कार करून परत फिरली. कांहीं मंडळी शिरोळपर्यंत भजन करीत महाराजांचे बरोबर आली. शके १८२७ वैशाख शु।। १ स महाराज एक घटका रात्रीचे वेळीं शिरोळास पोंचले. तेथें भोजनपात्र म्हणून श्रीदत्तांचें स्थान आहे तेथेंच महाराज उतरले. श्रीनृसिंहसरस्वतीही बरोबर होते. तेथें तीन मुक्काम झाले. महाराज येणार म्हणून तेथील बाबूराव कुलकर्णी यांनीं व त्यांचे चुलत्यांनीं देऊळ झाडून, दिवाबत्ती करून व्यवस्था केली होती. पाणीही चांगलें भरून ठेवलें होतें. पंचगंगा तेथून एक मैल लांब असल्यामुळें रात्रीं तिकडे जाणें शक्य नव्हतें. महाराज वाडीस असतां रोज सायंकाळीं संगमावर जात. तेथील महाराजांची घाटावर बसण्याची जागा बाबूराव रोज धुऊन ठेवीत असत. शिरोळ येथें मंदिरांत आल्याबरोबर श्रींस वंदन करून महाराजांनीं स्नान केलें. सर्वांचें फराळपाणी झालें. महाराजांनीं लिंबाचें तयार केलेलें सरबत थोडें घेतलें. इतकें होईपर्यंत मध्यरात्र झाली. नंतर सर्व मंडळी निद्रावश झाली.

पहांटे उठून महाराज पंचगंगेवर जाऊन स्नान करून आले. नित्य-कर्म झाल्यावर जिज्ञासू मंडळींना उपनिषदें सांगितलीं. भिक्षा झाल्यावर आलेल्या आर्त लोकांना पीडानिवारणार्थ योग्य ते उपाय सांगण्यांतच संध्याकाळ होत असे. वाडींतील दादो नारायण पुजारी यांचे पत्नीचे अंगांतील पिशाच शिरोळास गेलें. मिरजेकडून येणेविषयीं मिरज मळे-करीणबाईनीं आग्रह केला. पण त्यांना आज कांहीं सांगतां येत नाहीं असें उत्तर मिळालें. वाडीला येणारी मंडळी येथेंही येत, त्यामुळें येथेंही बरीच यात्रा जमत असे. वाडींतील बऱ्याच मंडळींनीं येथें अनुग्रह घेतला.

वैशाख शु० ४ सोमवारीं भिक्षा झाल्यावर महाराज शिरोळहून पुढें जाण्यास निघाले. निघतांना वाडीप्रमाणेंच गर्दी झाली. वाजत गाजत गांवाबाहेर एक मैल आल्यावर नृसिंहसरस्वती व इतर सर्व मंडळींना महाराजांनीं तीर्थ दिलें व आशीर्वाद देऊन सांगितलें कीं, 'प्रत्यक्ष परमेश्वर नांदत आहे. निष्ठा ठेवून वागा म्हणजे झालें.' याप्रमाणें सांगून सर्वांना परत पाठविलें. नंतर २०।२५ मंडळींसह महाराज मिरजेच्या घांटावर येऊन पोंचले. तेथें एकदोघांना मंत्र लिहून दिलें. कोणी महाराजांच्या सभोंवतीं लोटांगणें घातलीं. कित्येकांनीं पाय चुरले. पाठ रगडली. तेव्हां महाराज म्हणाले, 'या देहाला कोणाचा स्पर्शसुद्धां नव्हता. पण येथें कांहीं बोलतां येत नाहीं. असो.' या घांटापासून मिरज गांव ३।४ मैल आहे. तेथून ताक आलें होतें तें महाराजांनीं सायंसंध्या झाल्यावर घेतलें. नंतर श्रींचा धांवा वगैरे नरहरिबुवांनीं आपल्या नियमाप्रमाणें म्हटल्यानंतर मंडळी निजली. दुसरे दिवशीं महाराज स्नान करीत असतां मंडळी प्रवा-हांत त्यांचे खालीं उभी राहिली. त्या वेळीं महाराजांनीं आपल्या हातानें कृष्णाबाईचें पाणी सर्वांच्या अंगावर घातलें. मंडळींनींही महाराज स्नान करून वर आल्यावर महाराजांच्या पायांवर पाणी घालून तीर्थ घेतलें.

नित्यकर्म झाल्यावर उपनिषदांची पोथी तपासून दिली. तोंपर्यंत एक वाजला. नंतर भिक्षा झाली.

येथेंही मंडळी इतकी जमली कीं, गांवांत नारळ विकत मिळेनात. मिरजेच्या फोटोग्राफरनीं येथें एक फोटो घेतला. नंतर सर्वांना निरोप देऊन महाराज पंढरपुराकडे निघाले. वाडीस येतांना तेथील मंडळींनीं राहण्याचा आग्रह केला होता. त्या वेळीं परत येतांना पाहूं असें त्यांनीं सांगितलें होतें, म्हणून स्वारी तिकडे वळली. रस्त्यांत कमळापूरला मुक्काम झाला असतां रात्रीं एक आजानुबाहु पुरुष महाराजांचे स्वप्नांत येऊन म्हणाला कीं, 'तुम्ही सर्वत्र फिरतां, कविताही करतां, मग आमच्याकडे तुमचें लक्ष कां नाहीं ?' महाराज जागृत झाल्यावर हे पुरुष कोण म्हणून महाराजांनीं देवांना विचारलें. तेव्हां देव म्हणाले कीं, 'हे अक्कलकोटचे स्वामी असून यांची इच्छा तुम्हीं अक्कलकोटास यावें व आपलें चरित्र काव्यरूपानें लिहावें अशी दिसते.' हें देवांचें म्हणणें ऐकून महाराज म्हणाले, 'ही जिव्हा श्रीदत्तचरणीं समर्पण केली आहे. श्रींची आज्ञा होऊन माहिती मिळाल्यास कवित्व करतां येईल.' असें म्हणून महाराज दुसरे दिवशीं निघाले. 'पंढरपुरास जाऊन पुढें अक्कलकोट मार्गानें जातों' असें महाराजांनीं सांगितल्यावर देवांनीं सांगितलें कीं, 'अक्कल-कोटास जाऊन मग गाणगापुरास जावें. गाणगापुरास पादुकांचें फक्त दर्शन करावें व तेथें त्रिरात्र मुक्काम करून मौन धरावें.' याप्रमाणें देवांच्या सांगण्याचा खुलासा मागाहून झाला. तो असा—गाणगापुरांत तुकाराम नांवाचा मोठा गुरुभक्त ब्राह्मण केवळ फलाहार करून तीन वर्षें सेवा करीत होता. सद्गुरु दत्तात्रेयांचें प्रत्यक्ष दर्शन व्हावें अशी त्याची उत्कट इच्छा होती. त्याला महाराजांच्या रूपानें दर्शन देणेचें असल्यानें तिकडे जाण्याची महाराजांना आज्ञा झाली. त्याप्रमाणें गाणगापुरास जाण्या-करितां महाराज निघाले. प्रवासांत अतिसाराचा उपद्रव फार झाला. तसी

तसेच अक्कलकोटास स्वामींचें दर्शन करून पुढें गाणगापुरास येऊन पोंचले. तेथें मठांत श्रीपादुकांचें दर्शन झालें; पण प्रत्यक्ष दर्शन न झाल्यामुळें महाराज पापविनाशतीर्थावर आले व दर्शन झाल्यावांचून उठावयाचें नाहीं असा निश्चय करून तेथें त्रिरात्र मुक्काम केला. नंतर 'संगमावर दर्शन होईल' म्हणून सांगणें झालें. त्याचप्रमाणें तेथें जाऊन दर्शन घेतलें, आणि देवांना विचारलें कीं, 'गाणगापूरचा मठ सोडून जाणार नाहीं अशी आपली प्रतिज्ञा असतां आज असें कसें झालें?' तेव्हां दत्तप्रभु म्हणाले, 'मठांत अनाचार वाढल्यामुळें इकडे राहतों' असें सांगून गुप्त झाले. तेथें देवांच्या आज्ञेप्रमाणें तुकाराम नांवाच्या ब्राह्मणास 'जो सत्य आहे परिपूर्ण आत्मा' हें अष्टक करून दिलें. 'गाणगापुरीं आठराशें सत्तावीस शकामधीं। उदेलें स्तोत्र होंचि आधिव्याधि हरो कुधी'। असा या अष्टकांत शेवटीं उल्लेख आहे.

वाडींत महाराजांचा मुक्काम असतांना पुजारी मंडळींनीं प्रार्थना केली होती कीं, 'गंगालहरीप्रमाणें एक कृष्णालहरी आम्हाला म्हणण्याकरितां तयार करून द्यावी.' या विनंतीप्रमाणें वाडींत कृष्णालहरी होण्याचा योग आला नाहीं. पुढें गाणगापुरीं जातांना कृष्णाबाईनें महाराजांना प्रत्यक्ष दर्शन देऊन कृष्णालहरी करण्याची आज्ञा केली. त्या वेळीं श्रीदत्तप्रेरणेनें ५१ श्लोकांत कृष्णालहरी केली. फार लवकर अत्यंत स्फूर्तीनें हे श्लोक मुखांतून बाहेर पडले. हे श्लोक रचण्याचे वेळीं प्रत्यक्ष कृष्णाबाई पुढें येऊन उभ्या राहत होत्या. ५१ श्लोकांची रचना झाल्यावर 'पुरे' असें सांगून भगवती कृष्णामाता अंतर्धान पावली.

गाणगापुराहून निघून हुमनाबादवरून गंगाखेड येथें वैशाख वद्यांत महाराज येऊन पोंचले. तेथेंच गोदातीरीं दशाहार झाला. तेथेंच महाराजांचा संन्यासाश्रम झाल्यानें बरीच मंडळी ओळखीची होती. तेथून

कारंजपुरास चातुर्मास करावा या हेतूनें निघाले. वाटेंत परळी वैजनाथाचें दर्शन करून माहूर क्षेत्रीं गेले. तेथें दत्तात्रेय, रेणुकामाता इत्यादिकांचें दर्शन करून औंढ्या नागनाथाचे दर्शनार्थ आले. तेथून येवले गांवावरून हिंगोलीस येऊन पोंचले. रात्रभर तेथें मुक्काम करून सकाळीं अनुष्ठान संपवून निघाले. त्या वेळीं पाऊस बराच झाल्यामुळें रस्त्यावर मुंग्या आपली व्यवस्था लावण्याकरितां फिरत होत्या. जपून पाहून चालावें लागे. यामुळें दुपारपर्यंत पांच मैलच चालणें झालें. मध्यें पांगरी नांवाच्या गांवीं भिक्षा करून एक दिवस मुक्काम केला. दुसरे दिवशीं सकाळीं प्रयागला जावें म्हणून महाराज निघाले. तों उत्तरेकडे रस्त्यांत फारच मुंग्या दिसल्या. पाय टाकतां येईना. तेव्हां देवांचें स्मरण करून ज्या दिशेस मुंग्या नाहींत तिकडे जाण्याचें ठरविलें. पूर्वेकडे व दक्षिणेकडेही मुंग्या फार दिसल्या. शेवटीं पश्चिमेकडे पाहिल्यावर तिकडे मुंग्या दिसल्या नाहींत. तें पाहून पश्चिमेस जाण्याची प्रभूची इच्छा दिसते असें समजून महाराजांनीं पश्चिम दिशा धरली. पाऊस सारखा येतच होता. शेवटीं तेथून १२ मैलांवर असलेल्या नरसी या गांवांत महाराज ज्येष्ठ वद्यांत येऊन पोंचले. महाराजांचें दर्शन होण्याबरोबर ग्रामस्थ मंडळींनीं 'श्रीगुरुदेवदत्त' असें मोठयानें म्हणून महाराजांना साष्टांग नमस्कार घातले. महाराजांनीं सर्वांचें क्षेमकुशल विचारून राहण्याकरितां सोइस्कर जागेचा तपास केला. मंडळींनीं गांवांतील देवळें, श्रीमंतांचे वाडे वगैरे स्थानें दाखविलीं, पण तीं महाराजांना पसंत पडलीं नाहींत. स्थानें पाहत पाहत महाराज सीतारामभटजी अष्टेकर या यजुःशाखी ब्राह्मणाच्या घरापर्यंत आले. त्यांच्या दारांत एक अश्वत्थ व एक औदुंबर असे दोन वृक्ष होते. ते पाहिल्याबरोबर हें स्थान बरें आहे असें म्हणून तेथेंच राहण्याचें महाराजांनीं ठरविलें. सीतारामभटजी गंगातीरचे राहाणारे, पण कांहीं अडचणीमुळें नरसीस येऊन राहिले होते. पाऊस कमी झाल्यास पुढें जावें असा महाराजांचा विचार होता. पण

पावसाचा फारच जोर झाला व कयाधू नदीस महापूर येऊन रस्ता बंद झाला. त्यामुळें येथेंच चातुर्मास करण्याचें ठरवून महाराजांनीं आपलें आसन राममंदिरांत ठेवलें.

## चातुर्मास १५ नरसी–शके १८२७

महाराजांचा शके १८२७ चा चातुर्मास आषाढ पौर्णिमेपासून नरसी येथें सुरू झाला. त्या दिवशीं व्यासपूजा झाली. एक महिनाभर प्रथम महाराजांची योग्यता तेथील मंडळींच्या लक्षांत आली नाहीं. त्याप्रमाणें एक महिना महाराजांना विशेष उपाधि झाली नाहीं. पुढें मात्र मंडळी फार जमूं लागली. तेथें महाराजांची बसण्याची जागा अगदीं लहान असल्यामुळें मंडळींना आंत प्रसादास जातां येईना. तेव्हां फार गर्दी झालेली पाहून दुसरें रूप घेऊन महाराज बाहेर येऊन अश्वत्थाच्या पारावर बसले. आंतील लोक बाहेर आल्याबरोबर त्यांना महाराज दिसले व बाहेरच्या मंडळींनाही आंत दिसले. हें पाहून सर्वांनाच आश्चर्य वाटलें. नरसी हें गांव लहान असलें तरी महाराजांच्या वास्तव्यानें त्याला मोठ्या क्षेत्राची शोभा आली. महाराज सकाळीं गंगेस जात त्या वेळीं लोक दर्शनास येत. त्यांची हकीकत तेथेंच ऐकून त्यांना लगेच उपाय सांगितला जात असे. पुढें पुढें तेथील मंडळीही महाराजांच्याबरोबर कयाधू नदीवर स्नानास जाऊं लागली. दोन तीनशेंपर्यंत स्नानास जाण्याच्या मंडळींची संख्या झाली. महाराजांनीं वर स्नान केल्यावर खालीं सर्वांनीं स्नान करावें. महाराज स्नान करून परत येतांनाही कित्येक मंडळी आपल्या घरांसमोर दर्शन करीत.

सकाळीं अनुष्ठान आटोपल्यावर कोणाला काव्य, कोणाला भागवत, कोणाला पंचदशी, कोणाला नित्यकर्म याप्रमाणें शिकविण्याचें काम चालत असे. यांपैकीं तुकारामशास्त्री माहूरकर, श्रीराम, बाबा मोहरीकर

वगैरे मंडळींनीं हा लाभ घेतला. नरसी मुक्कामीं महाराजांनीं 'दत्तचंपू' हें काव्य तयार केलें. येथें पुष्कळांना रोगमुक्त केलें. येथील एक मारवाडी चुनीलाल नांवाचा होता. त्याला मस्तकशूळाचा फार त्रास होता. त्यानें हा रोग जाण्याकरितां पुष्कळ उपाय केले पण गुण आला नाहीं. महाराज आल्यावर त्यानें आपली व्यथा महाराजांना सांगितली. तेव्हां 'आपण कांहीं वैद्य नाहीं, साधू नाहीं. यांतील आपणांस कांहीं समजत नाहीं' असें त्याला सांगून महाराजांनीं प्रथम त्याला घालवून दिलें. पण त्यानें महाराजांचे पाय सोडले नाहींत. महाराज गंगेवर स्नानास जाते वेळीं रस्त्यांतच नमस्कार करून त्यांचे बरोबर पुढें जावें, व महाराज स्नान करून परत येईपर्यंत त्यांचे बरोबर रहावें, असा चुनीलालचा क्रम बरेच दिवस चालूं होता. एकदां महाराजांना त्याची दया येऊन त्यांनीं त्याला विचारलें कीं, 'आपणांपासून तुझा काय फायदा होणार आहे ? कशाला आपल्या नादीं लागलास ? ' ही महाराजांची वाणी ऐकून त्यानें अत्यंत गहिंवरून सांगितलें कीं, 'आपल्याशिवाय मला तारणार कोणी नाहीं. पुष्कळ उपाय केले. आपण आतां तारा किंवा मारा. आपले पाय सोडणार नाहीं.' हें त्याचें बोलणें ऐकून महाराजांना दया आली व त्यांनीं समोरच्या एका झाडाकडे बोट करून त्याला सांगितलें कीं, 'जा, त्या झाडाची साल स्त्रियांचे अंगावरील दुधांत उगाळून डोक्यावर घाल म्हणजे बरें होईल.' ही महाराजांची आज्ञा ऐकून ती साल काढून रात्रीं उगाळून डोक्यावर घालतांच त्याचा निम्मा मस्तकशूळ कमी झाला. अत्यंत आनंदानें त्यानें ही बातमी सकाळीं महाराजांना सांगितली. तेव्हां 'असेंच कांहीं दिवस चालूं ठेव म्हणजे दत्तकृपेनें बरें होईल.' या सांगण्याप्रमाणें कांहीं दिवस त्यानें उपाय चालूं ठेवतांच त्याचा मस्तकशूळ पूर्ण नाहींसा होऊन तो महाराजांचा परमभक्त झाला.

नरसीस विश्वनाथराव जोशी म्हणून एक ब्राह्मण कचेरींत उमेदवार होते. ते शेवटीं महाराजांच्या दर्शनास आले. महाराजांचा अनुग्रह व्हावा ही त्यांची इच्छा; पण नरसीहून महाराजांचा मुक्काम लवकर हालल्यामुळें तो योग जमला नाहीं. पुढें पवनीच्या चातुर्मासांत ती त्यांची इच्छा पूर्ण झाली. दर गुरुवारीं संप्रदायानुसार ते भजन करीत असतात. पवनीहून अनुग्रह घेऊन आल्यावर वकिलीची परीक्षा द्यावी असें त्यांना वाटलें व भगवत्साहाय्य असावें म्हणून बासरक्षेत्रीं त्यांनीं गुरुचरित्राचे दोन सप्ताह केले. पण स्वप्न वगैरे कांहींच झालें नाहीं, त्यामुळें त्यांना विषाद वाटला. पण त्याच दिवशीं रात्रीं स्वप्नांत महाराज आले व सर्व चौकशी करून 'प्रयत्न केल्यावर काय सिद्ध होणार नाहीं?' असें म्हणाले. नंतर विश्वनाथराव जागे झाले व त्या स्वप्नामुळें त्यांना समाधान वाटलें. त्याच वर्षी वकिलीचा अभ्यास करून परीक्षेस बसले, पण परीक्षेंत यश मिळालें नाहीं. ही हकीकत कुरुगड्डीस महाराजांना जाऊन नाथरावांनीं सांगितली व 'आपलें वचन असत्य कसें झालें. मी यापुढें परीक्षेस बसणार नाहीं.' असें त्यांचें बोलणें ऐकून महाराज म्हणाले, 'असा वेडेपणा करूं नकोस. परीक्षेची फी भरण्यास अद्यापि किती अवकाश आहे?' विश्वनाथराव म्हणाले, 'एक महिना अवकाश आहे.' तेव्हां महाराज म्हणाले, 'हैद्राबादला फी भरून घरीं जा.' ही आज्ञा मान्य करून त्याप्रमाणें फी भरून नाथराव घरीं आले. पुढें त्यांचा वेळ आजारीपणांत व दाजूर वगैरे भागांत महाराजांचेबरोबर फिरण्यांतच गेला. अभ्यास कांहीं झाला नाहीं. पण महाराजांचें स्मरण करून ते परीक्षेस बसले व महाराजांचे कृपेनें त्यांना त्या वर्षी परीक्षेंत उत्तम यशही मिळालें. ते सध्यां हिंगोलीस वकीली करीत असतात.

नरसीस असतांना महाराज एके दिवशीं माध्यान्हसमयीं नदीवर स्नानास एकटेच गेले होते. त्याच वेळीं एक बाई पाणी आणण्याकरितां

नदीवर गेली. तों तिला असा चमत्कार दिसला कीं, ‘ तीरावर महाराज एका झाडाखालीं मांडी घालून बसले आहेत. मांडीवर एक सुंदर सहा महिन्यांचें बाळ आपल्या डाव्या हाताचा आंगठा तोंडांत धरून महाराजांकडे पाहत आहे आणि महाराजही त्याच्याकडे सारखे पाहत आहेत.’ हा चमत्कार पाहून तिला पाणी नेण्याची शुद्धी न राहून तीही त्या दृश्याकडे एकाग्र चित्तानें पाहत राहिली. कांहीं वेळानें महाराजांची नजर सहज त्या बाईकडे गेली. त्याबरोबर तें बाळ दिसेनासें झालें व ती बाई एकदम मूर्छित होऊन खालीं पडली. महाराजांनीं त्या बाईजवळ येऊन तिच्या तोंडांत पाणी घालून तिला सावध केलें आणि ‘तूं पुण्यवान् आहेस. ही हकीकत कोणाला सांगूं नकोस; जा.’ असें सांगितल्यावर ती बाई पाणी घेऊन घरीं गेली. पुढें तिच्या तोंडून सर्व लोकांना ही हकीकत कळल्यामुळें फार विस्मय वाटला.

नरसोबावाडींतून महाराज निघाल्यावर वाडी गांवचे आसपास प्लेग सुरू झाला. आतां येथेंही हा रोग झाल्यास फार त्रास होईल अशी भीति वाटून त्या सर्व मंडळींनीं संकटनिवारणार्थ श्रीनृसिंहसरस्वतींची प्रार्थना केली. त्या वेळीं त्यांनीं ‘दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा’ या मंत्राचें भजन अहोरात्र करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें वाडींत ब्रह्मानंदांचे मठांत श्रींच्या पादुका व महाराजांचा फोटो ठेवून भजनास सुरुवात केली व हें वृत्त महाराजांना कळविलें. महाराजांनीं याबद्दल संमति कळवून संकट दूर होईल असा आशीर्वादही दिला. पुढें ईशकृपें प्लेग झाला नाहीं. तेव्हां मंडळींनीं अधिक उत्साहानें महाराज वाडीस येईपर्यंत भजन चालूं ठेवण्याचा निश्चय केला व तो महाराजांना कळविला. ‘ पाय गंगेला लागले म्हणजे तिकडे परततील ’ असें महाराजांचें उत्तर आलें. पुढें एके दिवशीं पालखी चालू असतां गर्दींत गुंडू खोबारे यांचे हातून उत्सवमूर्ति खालीं उतरली. हा भयंकर प्रसंग पाहून

सर्व मंडळी घाबरली व गांवावर कांहींतरी संकट येणार असें सर्वांनाच वाटलें. यांच्या शांतीकरतां उपाय विचारण्यास गुंडभट खोंबारे महाराजांची भेट होईल म्हणून गाणगापुराकडे गेले, पण महाराज न भेटल्यामुळें परत आले. पुढें महाराजांचा मुक्काम नरसीला असल्याचें समजल्यावरून पुजारी मंडळी नरसी मुक्कामीं येऊन त्यांनीं घडलेली हकीकत महाराजांचे कानांवर घातली. तेव्हां पालखींतून खालीं येण्याचें कारण महाराजांनीं देवांना विचारलें असतां देवांनीं क्रोधयुक्त मुद्रा करून सांगितलें कीं, ‘पुजारी लोक तूं घालून दिलेल्या नियमाप्रमाणें वागत नसून उलट तुझी निंदा करितात. माझ्या पादुकांवर अशुद्ध पदार्थ घालतात. तरी पंच नेमून परभारें व्यवस्था ठेवली पाहिजे. त्या देशाच्या लोकांची वागणूक बिघडल्यामुळें त्या देशाचाच कंटाळा येतो. नाकांतली घाण बंद होत नाहीं म्हणून त्यांना शासन झालें पाहिजे.’ हें श्रींचें उत्तर महाराजांनीं पुजारी मंडळींना सांगितलें व महाराज म्हणाले कीं, ‘तुम्ही जर दुर्वर्तन सुधारून योग्य प्रकारें श्रींची सेवा करणार नाहीं तर परिणाम काय भयंकर होईल तें कळणार नाहीं. यासाठीं वर्तन सुधारून देवसेवा करा म्हणजे कल्याण होईल, नाहींतर तुमचा देव जाणे आणि तुम्ही जाणें. झाल्या अपराधाबद्दल श्रींची क्षमा मागून करुणात्रिपदीनें रोज प्रार्थना करावी. मायबाप दयाळू दया करीलच करील व सर्वारिष्ट निरसन करून रक्षण करील. ‘योगिनी वरदानादि भवेत्तस्यान्यथाकथम्। तथापि दमहर्तुस्तत्पादौ वंद्यौ पुनः पुनः’ यासाठीं त्यालाच शरण जावें, असा महाराजांनीं वाडीच्या पुजारी मंडळींना उपदेश केला. तेव्हांपासून करुणात्रिपदी वाडीस रोज पालखीपुढें म्हणतात. महाराजांचे आज्ञेप्रमाणें इष्ट तें वर्तन न सुधारल्यामुळें वारंवार संकटाचे प्रसंग येतात.

याप्रमाणें नरसी गांवांतील लोकांचे दोन महिने अत्यंत आनंदांत गेले. चातुर्मास संपल्याबरोबर तेथून निघण्याबद्दल महाराजांना देवांची

आज्ञा झाली. ही वार्ता सहज महाराजांच्या मुखांतून निघाली. ती ऐकून सर्व लोक कष्टी झाले.

भाद्रपद शुद्ध १४ स सायंकाळीं पुराण संपल्यावर महाराज सहज म्हणाले कीं, 'उद्यां क्षौर करून सीमोल्लंघन करावयाचें आहे.' ही गोष्ट महादेव नांवाच्या एका न्हाव्यानें ऐकली. अनायासें उद्यां महाराजांची सेवा घडेल. त्यांच्या शरीराला हात लागून आपण धन्य होऊं असें महादेवास वाटून त्यानें आपला मनोदय एका ब्राह्मणाकडून महाराजांचे कानांवर घातला. तेव्हां महाराजांनीं त्याला अनुमति दर्शविली. त्या न्हाव्यास फार आनंद झाला. पौर्णिमेस अगदीं पहांटे तो येऊन बसला. क्षौर झाल्यावर महाराजांचे पायांतील कांटे काढण्यास मंडळींनीं महादेवास सांगितलें. त्याप्रमाणें त्यानें पाय धुऊन पाहिलें असतां वीस कांटे निघाले. नंतर स्नानविधि होऊन नित्याचें अनुष्ठान झालें. त्या दिवशीं उपोषणच होतें. सीमोल्लंघनासाठीं दंडास परशुमुद्रा बांधली. तें पाहून महाराज आज निश्चित निघणार असें सर्व लोकांना वाटून त्यांनीं महाराजांना 'आणखी दोन दिवस राहावें. आपण चातुर्मासाची सांगता करणार आहोंत, तरी आजच जाऊं नये' अशी विनंति सर्वांनीं केली. तेव्हां महाराज म्हणाले, 'कसला चातुर्मास व कसली सांगता? देवाप्रीत्यर्थ काय करणें तें करा.' असें महाराजांचें म्हणणें ऐकलें तरी मंडळी आग्रह सोडीनात, म्हणून पुढें दोन दिवस मुक्काम वाढला. लोकांनीं दुसरे दिवशीं चातुर्मासाची सांगता केली. पौर्णिमेच्या दिवशीं महाराज सीमोल्लंघनास निघाले. तेव्हां मंडळींनीं नाना वाद्यें आणलीं. ज्या रस्त्यानें महाराज जाणार होतें तिकडून प्रत्येक दरवाजासमोर रांगोळ्या काढल्या. आरत्या ओवाळीत, वाजत गाजत महाराजांना नेलें. गांवच्या सीमेपर्यंत एक कोस मंडळी गेली. तेथें एका शमीवृक्षाजवळ महाराज बसले व भगवद्गीतेंतील अकरावा अध्याय म्हटला. नंतर आरती करून प्रसाद वांटल्यावर पुनः वाजत गाजत महाराज

गांवांतील आश्रमांत परत आले. नंतर दुसरे दिवशीं नित्यकर्म आटो-पल्यावर महाराज निघाले. उठून श्रीदत्तप्रभूंचें स्मरण केलें व 'श्रीगुरुदेवदत्त' असें म्हणून सीतारामभटजींच्या घरांतून बाहेर पडले. सर्व मंडळी बरोबर चालूं लागली. 'महाराज जाऊं नका' असें सर्व म्हणत होती. पूर्वदिवसाप्रमाणेंच वाद्यें वाजत होतीं. महाराजांच्या नांवाचा जयजयकार चालू होता. अशा थाटानें स्वारी चालली होती. तीनचारशें मंडळी बरोबर होती. याप्रमाणें एक कोसापर्यंत मंडळी आली. इतक्यांत पुढील गांवची मंडळीही महा-राजांना नेण्याकरितां समोरून वाद्यें वाजवीत आली. तेव्हां महाराज तेथें थांबून सर्वांना म्हणाले कीं, 'आतां आपल्या स्नानाची वेळ झाली. तुम्ही सर्व घरीं चला, तुम्ही असें बरोबर आलां तर आम्हांला नित्यकर्में-सुद्धां करतां येणार नाहींत. आपण आतां गंगेवर स्नानास जाणार.' हें महाराजांचें म्हणणें त्या जवळच्या गांवांतील कुलकर्ण्यानें ऐकतांच तो तसाच चिखलांत महाराजांचे पुढें दंडवत पडला. तें पाहून महाराज उभे राहिले व त्याची इच्छा काय आहे तें विचारल्यावर तो कुलकर्णी म्हणाला कीं, 'नरसीगांवीं महाराजांचा निवास दोन महिने झाला. तसाच आमच्या या गोटे गांवीं एक दिवस मुक्काम करून सर्वांना प्रसाद द्यावा. तसेंच या सर्व मंडळींनींही प्रसादास आलें पाहिजे. या गांवांत आमचें एकच घर ब्राह्मणाचें आहे तरी परगांवची मंडळी महाराजांना भिक्षा करण्याकरितां येऊन बसली आहेत.' हें त्या कुलकर्ण्याचें म्हणणें ऐकून महाराजांनीं तें कबूल केलें व गोटेगांवच्या देवळांत जाऊन बसले. गांवांतील सर्व मंडळींना आनंद वाटला. नंतर महाराज नदीवर स्नानास गेले. ती सर्व मंडळीही महाराजांचेबरोबर स्नानास गेली. चुनीलाल मारवाडी याची इच्छा महाराजांच्या पायांवर एकदां डोकें ठेवण्यास मिळावें अशी पुष्कळ दिवसांपासून होती. त्या इच्छेनें महाराज गंगेच्या तीरावर आल्यावेळीं तो त्यांचेसमोर हात जोडून उभा राहिला. महाराज

म्हणाले, ' काय शेटजी ! अजून काय इच्छा आहे ? ' तेव्हां शेटजींनीं आपली इच्छा भीतभीत व्यक्त केली. ती ऐकून महाराज हंसून म्हणाले कीं, ' आतां तर मोठा कठीण प्रसंग आला. प्रत्येकानें जर असा प्रसंग आणला तर येथून जाणें कसें होईल ? दंडत्याग करणें भाग पडेल. ' हें महाराजांचें बोलणें ऐकून त्या मंडळींची निराशा झाली व त्यांच्या डोळ्यांतून अश्रु चालले. तें पाहून महाराज त्यांना म्हणाले, ' येथल्या येथेंच तुमची काय इच्छा असेल ती पूर्ण करून घ्या. पुढें मात्र कोणाचें ऐकलें जाणार नाहीं. आणि नरसीची सर्व मंडळी येथूनच मागें परता. कारण प्रत्येक ठिकाणीं ही मंडळी असाच प्रसंग आणणार.' इतकें बोलून महाराज तेथेंच वृत्तिनिरोध करून स्तब्ध उभे राहिले. त्या वेळचा तो देखावा मोठा पाहण्यासारखा होता. साक्षात् दत्तप्रभूच उभे आहेत असें सर्वांना वाटलें. नंतर मारवाड्यानें पायांवर डोकें ठेवलें. त्याला पुष्कळ दिवसांची इच्छा पूर्ण झाल्यानें फार समाधान वाटलें. या संधीचा फायदा सर्व स्त्रीपुरुषांनीं घेतला. सर्वांना महाराजांचे पायांवर डोकें ठेवण्यास मिळालें. हें सर्व होईपर्यंत दोन तास मोडले. नंतर महाराज देहभानावर आले. सर्व मंडळींनीं ' श्रीवासुदेवानंदसरस्वती स्वामिमहाराज कीं जय ' असा जयजयकार केला. महाराजांनीं सर्वांना आशीर्वाद दिला. महाराजांचें स्नान व आन्हिक होईपर्यंत मंडळी तेथें उन्हांत बसली. नंतर देवळांत येऊन महाराजांनीं भिक्षा केली. सर्वांचीं जेवणें आटोपल्यावर महाराज निघाले. पूर्वीप्रमाणें सर्व मंडळीही बरोबर निघाली. पुढें दोन मैलांवर नदीच्या तीरावर महाराजांना आरती केली व नदीपलीकडे महाराज गेले. मग निरुपायास्तव आलेली सर्व मंडळी मागें परतली. नदीच्या पलीकडेही पुढील गांवची तीन-चारशें मंडळी महाराजांना नेण्यासाठीं वाद्यांसह आली होतीच. याप्रमाणें त्या गांवीं एक रात्र मुक्काम करून दुसरे दिवशीं महाराज तेथून निघाले. याप्रमाणें

वाशीमपर्यंत मंडळी सारखी महाराजांच्या बरोबर होती. चौथे दिवशीं महाराज वाशीमला पोंचले. वाशीमच्या मंडळींनींही महाराजांना गांवांत नेऊन श्रीकरुणेश्वराच्या देवळांत आग्रहानें दोन दिवस ठेवून घेतलें. तेथें सखाराम देशपांडे यांचा मुलगा असाध्य रोगांतून मुक्त झाला. गोविंद दीक्षित अग्निहोत्री यांना महाराजांच्या कृपेनें मुलगा झाला.

वाशीम येथें नारायणराव धनागरे म्हणून वकील आहेत. महाराज तेथें गेले तेव्हां त्यांचे वडील अत्यंत आजारी होते. घरांतील सर्व मंडळी हवालदील झाली होती. अशा वेळीं महाराज दुपारीं भिक्षेस त्यांच्या घरीं गेले. महाराजांना ती गोष्ट समजतांच करुणेश्वराच्या देवळांत येण्यास त्यांच्या वडिलांना सांगितलें. त्याप्रमाणें नारायणराव धनागरे यांचे आजोबा त्या देवळांत गेले. लगेच महाराजांनीं एक यंत्र लिहून दिलें व तें ताइतांत घालून आजारी माणसाच्या गळ्यांत घालण्यास सांगितलें, आणि तो ताईत जमिनीवर कधींही ठेवूं नका असेंही सांगितलें होतें. पुढें त्याप्रमाणें करतांच मरणाच्या द्वारीं असलेले धनागरे यांचे वडील हळूहळू पूर्ण बरे झाले. पुढें कांहीं दिवसांनीं तो ताईत कांहीं प्रसंगानें काढून एका कोनाड्यांत ठेवला. तो तेथें तसाच राहिला. नंतर स्मरण झाल्यावर जाऊन पाहिलें तर कोनाड्यांतील सर्व सामान जळून राख होऊन पडलेली होती. तो ताईतही अर्थात्‌च गेला.

वाशीमहून महाराज तिसरे दिवशीं पुढें जाण्यास निघाले. नरसी, हिंगोली इत्यादि गांवची मंडळी बरोबर येतात असें पाहून त्यांना महाराज म्हणाले, 'यापुढें कोणीही येऊं नये. नाहींतर आपलें जाणें भगवदिच्छेनें कसें व कोणीकडून होईल तें सांगतां येणार नाहीं.' हें ऐकून सर्व मंडळींनीं वेशीपर्यंत येतों असें सांगून दोन कोसपर्यंत महाराजांचे बरोबर प्रवास केला. तेव्हां महाराज एका झाडाच्या छायेंत जाऊन बसले आणि सर्वांना म्हणाले कीं, 'मंडळी जर मागें फिरणार

नाहींत तर येथून पुढें जाणें होणार नाहीं.' असें स्पष्ट सांगतांच सर्व मंडळी महाराजांचा जयजयकार करीत मागें फिरली. फक्त वाशीमचे तीन व इतर दोन अशी पांच भक्त मंडळी तेथें राहिली. त्यांचेसह महाराज पुढें निघाले ते मंगलोर वगैरे गांवांवरून तीन दिवसांनीं कारंज नगरास सकाळीं पोंचले. हें गांव श्रीनृसिंहसरस्वतींचें जन्मस्थान असून येथें श्रीनृसिंहसरस्वती दत्तमहाराजांचें देवालय महाराजांचे भक्त काशीचे ब्रह्मानंदस्वामी यांनीं बांधलें आहे. तेथें काळ्या मारुतीच्या मंदिरांत महाराजांचा मुक्काम झाला. स्नानादि सर्व आटोपून भिक्षा झाली. तेथें दोन दिवस मुक्काम करून महाराज एकटेच पुढें निघाले. सर्व मंडळींना परत पाठविलें.

कारंजा येथें महाराजांचा मुक्काम ज्या मारुतीच्या मंदिरांत होता तेथील पुजारी पूजेचे वेळीं मारुतीस नैवेद्य दाखविल्याबरोबर तो खाऊन टाकीत व नंतर पूजा समाप्त करीत. महाराज आले त्या वेळीं त्यांच्यासमोर नैवेद्य भक्षण करणें त्यांना बरें न वाटून त्यांनीं त्या दिवशीं नैवेद्य खाल्ला नाहीं. त्या दिवशीं महाराज ध्यानस्थ बसले असतां श्रीदत्त न येतां श्रीमारुतिराय ध्यानांत आले. आपणांस भूक लागली असून खावयास कांहीं पाहिजे अशा अभिप्रायानें तोंड उघडून पुढें उभे असल्याचें दिसलें. ध्यान आटोपल्यावर ही गोष्ट महाराजांनीं तेथील पुजाऱ्यांना सांगितली. ती ऐकून मारुतीपुढचा नैवेद्य त्यांनीं लगेच खाऊन टाकला. मग महाराजांच्या ध्यानांत मारुतिराज आले नाहींत. नंतर महाराजांनीं पुजाऱ्यांना सांगितलें कीं, 'देवाला भक्ति फार प्रिय आहे तरी तुम्ही कोणाचीही भीड न धरतां आपल्या नियमांत व भावनेंत बदल करूं नका.'

कारंजाहून महाराज अमरावतीस गेले. तेथें जगदंबेचें दर्शन करून निघाले, ते हळूहळू आश्विन वद्यांत मूळतापीस येऊन पोंचले. पहाड

चढण्याच्या त्रासानें शौचाचा उपद्रव फारच वाढल्यामुळें तेथें सुमारे एक महिनाभर महाराजांचें वास्तव्य झालें. दत्तमंदिरांत मुक्काम होता. वेदान्तादि विषयांचें शिक्षण देणें, भूतबाधादि निरसनार्थ उपाय सांगणें, औषधोपचार करणें इत्यादि कार्यें या ठिकाणीं चालूं होतींच. यांत कधींहि खंड पडला नाहीं. पुढें शौच्याचा उपद्रव कांहीं कमी झाला. दिवाळी झाल्यावर महाराज तेथून निघाले ते चित्रकूट, पयस्विनी-मंदाकिनी संगम करून हुसंगाबादेस मार्गशीर्ष मासारंभीं आले. तेथें दत्तमंदिरांत वास्तव्य होतें. तेथील अनुग्रहीत मंडळींच्या इच्छेवरून तेथें पुराण सांगितलें. नंतर पुढें लवकरच तेथून निघाले व सांची मुक्कामीं कांहीं दिवस राहून पुढें भेलसा या गांवीं आले. तेथें अनुग्रहीत मंडळी फार होती. त्यांच्या आग्रहावरून दत्तजयंतीचा उत्सव तेथेंच केला. तेथें दूरदूरचे लोक दर्शनास येत होते. उत्सवांत सकाळीं एक शास्त्रीबुवा संस्कृत गुरुचरित्र वाचीत व दुपारीं महाराज त्याचा अर्थ सांगत असत.

दत्तजयंतीचा उत्सव झाल्याबरोबर आजच पुढें जावें अशी महाराजांना देवांनीं आज्ञा केली. उत्सवाची सांगता होणें असल्यानें एक दिवस राहण्याबद्दल मंडळींचा आग्रह पडला. महाराजांनीं सांगितलें कीं, 'आपणांस आज्ञेबाहेर जातां येत नाहीं, करितां आजच निघालें पाहिजे.' हें ऐकून मंडळी म्हणाली कीं, 'आपलें राहाणें जर होत नसेल तर उद्यां आम्ही चूल पेटविणार नाहीं व सहस्र भोजनाचें हें सर्व सामान गंगाबाईस समर्पण करूं.' ही मंडळींची विनवणी ऐकून महाराजांनीं देवांची आज्ञा व मंडळींची इच्छा दोघांचाही मान राखण्याकरितां त्या दिवशीं ग्रामांतर करून दुसरे दिवशीं पुनः भेलशास परत आले. नंतर तेथील सहस्र भोजनाचा कार्यक्रम उत्तम पार पडून सर्वांना समाधान वाटलें. त्याच रात्रीं महाराज ध्यानस्थ असतां त्यांच्या गालावर एक जोरानें थप्पड बसली व त्यामुळें त्यांचा एक डोळा व कान अगदीं कामांतून गेलें.

देवाची जाण्याची आज्ञा पूर्णपणें पाळली गेली नाहीं त्याची ही शिक्षा हें महाराजांच्या लक्षांत आलें व त्यांनीं देवाची प्रार्थना केली कीं, 'आपली आज्ञा तंतोतंत पाळली गेली नाहीं हें खरें, पण हें स्वतःच्या-साठीं नसून सर्व ब्राम्हणांच्या समाधानासाठीं करावें लागलें, आणि हें जर आपणांस पसंत नसेल तर दुसराही शिल्लक राहिलेला कान व डोळा घालवून टाका म्हणजे पुनः चूक होण्याची भीति नाहीं.' ही महा-राजांची निश्चयाची वाणी एकून श्रीदत्तप्रभू हंसले व तत्काल गुप्त झाले. महाराजांचा तो दुखावलेला कान व डोळा पूर्ववत् तत्काल दुरुस्त झाला हें सांगणें नकोच.

भेलशाहून महाराज निघाले ते वेत्रवतीतीरावर बासोदा गांवीं आले. तेथें ग्वाल्हेरचे चित्रकार हनुमंत गोपाळ फाळके हे सहकुटुंब महाराजांचे दर्शनास आले. त्यांचे कुटुंबास पिशाचबाधा होती. त्यांना महाराजांनीं तीर्थप्रसाद देऊन मुगावली मुक्कामीं येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें महाराज मुगावलीस गेल्यानंतर फाळकेही तेथें गेले. तेथें दत्तमंदिरांत औदुंबर वृक्षाखालीं फाळके यांना दत्तमंत्र सांगितला व एक ताईत देऊन तो कुटुंबाचे गळ्यांत बांधण्यास सांगितलें. 'लवकरच सर्व बाधा दूर होऊन कल्याण होईल' असा आशीर्वादही महाराजांनीं त्यांना दिला व प्रसादाचा नारळ बाईच्या ओटींत घातला. पुढें एक महिन्यांतच त्या बाईची बाधा दूर होऊन नऊ महिन्यांनीं त्यांना मुलगाही झाला. फाळके यांची महा-राजांचेविषयीं उत्तम निष्ठा आहे. यांनीं ग्वाल्हेर येथें एक दत्त मंदिर बांधलें असून, दत्तपुराण हा महाराजांचा मोठा ग्रंथ यांनींच छापून काढला. यांचा मुक्काम ग्वाल्हेरलाच आहे.

मुगावलीस चार पांच दिवस राहून महाराज पुढें पौष मासांत जाल-वण येथें गेले. तेथें २०।२५ दिवस राहिले. तेथील मंडळी महाराजांची

मार्गप्रतीक्षा करीतच होती. पर्वीची अनुग्रहीत मंडळी तेथें होतीच. महाराज तेथें आल्याबरोबर भजन, पुराण, कीर्तन इत्यादि कार्यक्रम सारखे सुरू झाले. तेथें दोन भजन सप्ताह झाले. त्याची सांगताही चांगली झाली. तेथें इतका प्रसाद वांटला जात असे कीं, तो खातां खातां मंडळींच्या तोंडाला मिठी पडली. तेथेंच श्रीगुरुप्रतिपदेचा ( माघ वद्य १ ) उत्सव थाटानें झाला. तो झाल्यावर महाराज ब्रह्मावर्ताकडे निघाले.

प्रवास करीत करीत फाल्गुनाचे आरंभीं महाराज ब्रह्मावर्तास पोंचले. येथें येण्याची ही महाराजांची चौथी खेप. या वेळीं येथें मुक्काम जास्ती होईल असें वाटलें होतें. पण २०।२५ दिवसच येथें मुक्काम झाला. महाराज तेथें आलेले समजतांच सर्व मंडळी दर्शनार्थ आली. नित्यकर्म आटोपून भिक्षा झाल्यावर पुराणभजनादि कार्यक्रम सुरू झाले. एकदां देवांनीं महाराजांना सांगितलें कीं, 'येथें एक परमहंस आले आहेत.' महाराज म्हणाले, 'आज्ञा असेल तर दर्शनास जातां येईल.' पण दत्तगुरु म्हणाले कीं, 'तेच इकडे येतील.' याप्रमाणें सांगणें झाल्यावर महाराज त्यांचीच वाट पाहत होते. दुसरेच दिवशीं सकाळीं भाष्य पाठ चालूं असतां ते परमहंस महाराजांचेकडे आले. त्याबरोबर त्यांना मोठया मानानें आसनावर बसविलें. ते दिगंबर असून स्थूल शरीराचा अभिमान त्यांना कांहींच नव्हता. गंगेच्या वाळवंटांत नेहमीं पडून राहात. तहान, भूक, थंडी, वारा कोणत्याही द्वंद्वाकडे लक्ष द्यावयाचें नाहीं, निरंतर ध्यानमग्न राहावयाचें अशी यांची स्थिति होतो. महाराजांचेकडे पाहत कांहीं वेळ ते परमहंस आसनावर बसून राहिले. थोड्या वेळानें कांहीं भाषण न करतां ते गंगातीरावर निघून गेले. यांचेविषयीं एकदां महाराजांचे उद्गार असे निघाले होते कीं—'असे परमहंस दुसरे कोणी पाहण्यांत आले नाहींत.'

ब्रह्मावर्तास कुशाबा ऊर्फ कृष्णाजी पटवर्धन नांवाचे एक चांगले सात्त्विक ब्राह्मण होते. त्यांचा एक हात हाड्या व्रणानें सडत चालला होता. कोणत्याही औषधानें गुण येईना. महाराज एके दिवशीं त्यांचे घरीं भिक्षेस गेले, तेव्हां महाराजांना पाहून तो ब्राह्मण रडूं लागला. तेव्हां त्याचें सांत्वन करून महाराज म्हणाले, 'शरीर लवकरच पडेल. दत्तस्मरण करीत राहा.' हें महाराजांचें सांगणें ऐकून ते नामस्मरण करूं लागले. त्याच रात्रीं कुशाबांना दृष्टान्त झाला कीं, 'पूर्वजन्मीं गोविंदभटजींच्या देण्यापैकीं तुम्ही त्यांचे ३९ रुपये देणें आहेत. त्यामुळें हा रोग आहे. ते पैसे देऊन टाकल्यावर शरीर पडेल.' हें स्वप्न पाहून दुसरेच दिवशीं कुशाबांनीं गोविंदभटजींच्या मुलाला बोलावून आणले व 'मी पूर्वजन्मीं तुझ्या बापाचे ३९ रुपये देणेचे आहेत, ते घे' असें सांगून ते पैसे कुशाबांनीं त्या मुलाला दिलें. हें एवढें कार्य झाल्याबरोबर कुशाबाचें देहावसान झालें.

महाराजांना पुढें काशीस जाण्याची आज्ञा झाल्यामुळें ब्रम्हावर्ताहून महाराज निघाले. उन्हाळ्याचे दिवस व काशीच्या मार्गावर दक्षिणी ब्राम्हणांची वस्ती नसल्यामुळें भिक्षेचा त्रास होईल तरी या वेळीं थांबावें अशी सर्व लोकांनीं प्रार्थना केली असतांही 'देवाची आज्ञा मोडावयाची नाहीं' म्हणून महाराज ब्रम्हावर्ताहून फाल्गुनअखेर निघाले. वाटेंत सर्व प्रकारचे कष्ट सोशीत प्रयागला येऊन पोंचले. तेथें त्रिवेणी-संगमावर स्नान करून निघाले ते काशीस चैत्र शुद्ध ८ स येऊन पोंचले. तेथें मणिकर्णिकास्नान व विश्वेश्वरदर्शन करून तारक मठांत येऊन उतरले. काशींतील विद्वान् व संन्यासी मंडळी महाराजांची वाट पुष्कळ वर्षें पाहत होते. तो योग आज आल्याबरोबर सर्व मंडळी दर्शनाकारितां येऊं लागली. काशींतील ४० चातुर्मास झालेले ८० वर्षांचे प्रसिद्ध संन्यासी

श्रीस्वयंप्रकाशस्वामी यांनीं तर महाराजांचे पुढें येऊन साष्टांग नमस्कार घातला व महाराज नको म्हणत असतांही त्यांचा त्यांनीं फार गौरव केला. महाराज स्वयंप्रकाशस्वामींना वंदन करण्यास उठले असतां त्यांनीं सांगितलें कीं, 'आपण तुमचें वंदन घेणार नाहीं' असें सांगून त्यांनीं महाराजांना हाताला धरून खालीं बसविलें. नंतर काशींतील शें-दोनशें संन्याशांनीं महाराजांना वंदन केलें. त्यानंतर शास्त्री, पंडित, विद्यार्थी व इतर मंडळींनींही नमस्कार केले. तेथें महाराजांचा मोठा सत्कार झाला. महाराजांचा मुक्काम या मोठ्या क्षेत्रांत बरेच दिवस होईल अशी सर्व लोकांची अपेक्षा होती, पण त्रिरात्र मुक्काम करून पंचक्रोशीची यात्रा करण्याबद्दल आज्ञा झाली. तेथें एक प्रसिद्ध संन्यासी महाराजांची भेट व्हावी अशी फार दिवसांपासून उत्कंठा बाळगून होते. त्यांच्या देहावसानापूर्वी ३।४ तास त्यांची भेट घेऊन महाराजांनीं त्यांचें समाधान केलें. महाराज पंचक्रोशीस निघाले तेव्हां बरीच मंडळी त्यांचे बरोबर निघाली. रामेश्वरास सर्व मंडळी येऊन पोंचली. तेथें वरुणा नदी व अहिल्याबाईचा उत्तम बांधलेला घाट आहे. तेथें आल्यावर, 'तूं येथें श्राद्धान्न खाण्याकरितां आलास काय?' असा महाराजांना दृष्टान्त झाला. तेव्हां चौकशी केली असतां समजलें कीं, 'पंचक्रोशीच्या यात्रेस आलेली मंडळी त्या त्या ठिकाणीं श्राद्ध न करतां महाराजांना भिक्षा वाढीत होती. त्या वेळीं 'श्राद्ध केल्याशिवाय भिक्षा घालूं नये' असें महाराजांनीं सर्वांना सांगितलें. पण ज्यांना मुळीं श्राद्धच करावयाचें नव्हतें, अशांपैकीं एकानें महाराजांना तशीच भिक्षा घातली. नैवेद्य दाखवून महाराजांनीं घांस तोंडांत घालतांच तो घशांत आडकला. महाराज एकदम घाबरले. तो घांस काढून टाकतांच सावध झाले व ध्यानस्थ बसले. देवांनीं सांगितलें कीं, 'आतां पुढें न जातां वाडीचा रस्ता धरावा' ही देवाची आज्ञा महाराजांनीं मंडळींना सांगितली. तेव्हां-

'एवढी सुरू केलेली पंचक्रोशीची तरी यात्रा पुरी करून जावें' असें मंडळींचें म्हणणें पडल्यावरून महाराजांनीं पंचक्रोशीची वाट धरली. तोंच पोटांत शूळ उत्पन्न झाल्यामुळें पुढें न जातां इथूनच वाडीकडे जाण्यास निघावें असें महाराजांनीं ठरविलें. पण मंडळींनीं त्यांना जाऊं न देण्याकरितां त्यांचे सभोंवतीं जमून गराडा घातला. पण त्या वेळीं असा चमत्कार झाला कीं, त्या ५०।७५ मंडळींतून महाराज एकाएकीं दिसेनासे झाले ते एकदम प्रयागला प्रकट झाले. तेथें संगमावर महाराज स्नानास गेले असतां तेथील मुख्य प्रयागवळ म्हणाले कीं, 'येथें येणाऱ्या यात्रेकरूंकडून आम्ही कांहींतरी घेत असतों. त्याप्रमाणें आपणही आमचें मागणें पुरवावें.' तें ऐकून महाराज म्हणाले, 'आपण संन्यासी! आपणांजवळ काय आहे?' तेव्हां प्रयागवळ म्हणाले, 'आपणांकडून जें मिळेल तें इतरांकडून मिळणार नाहीं, तरी आमची इच्छा पूर्ण करावी.' असें म्हणून त्यांनीं आपली इच्छा एवढीच सांगितली कीं— 'आपण वर स्नान करावें. आम्ही खालीं स्नान करतों.' ही गोष्ट महाराजांनीं कबूल करून तेथें तसा स्नानविधि झाला. बराच वेळ झाला असें पाहून महाराज त्या प्रयागवळांना म्हणाले, 'आतां घरीं लवकर चला. यजमान आले असतील.' तें ऐकून ते प्रयागवळ म्हणाले, 'आपलें दर्शन हेंच दुर्लभ आहे. आपल्या कृपेनें घरीं द्रव्य पुष्कळ आहे व यापुढेंही मिळेल. पण हें दर्शन मात्र पुनः मिळणार नाहीं.' असें त्यांचें निष्ठेचें बोलणें ऐकून महाराज स्वस्थ राहिले. महाराज पंचक्रोशीची यात्रा न करतां एकदम प्रयागास गेले. हें काशींतील मंडळीस समजतांच स्वयंप्रकाशस्वामी, कृष्णानंदसरस्वती व इतरही बरीच मंडळी महाराजांना भेटण्याकरितां प्रयागला गेली. यात्रा पुरी न करण्याचें कारण विचारतां 'देवाची आज्ञा' म्हणून महाराजांनीं उत्तर दिलें. प्रयागला चातुर्मास

करण्याची महाराजांची इच्छा होती. पण नृसिंहवाडीच्या मंडळींनीं महाराज पुनः यावेत म्हणून अहोरात्र भजन चालविलें असल्यामुळें देवांनीं महाराजांना तिकडे जाण्याची आज्ञा केली. त्यामुळें भर उन्हाळ्यांत महाराजांना वाडीच्या प्रवासास निघावें लागलें. 'वाडीकडे येणें होत आहे.' असें पत्र तेथून वाडीस श्रीनृसिंहसरस्वतींना पाठविलें. तें पाहून सर्व वाडीकरांना अत्यंत आनंद झाला.

प्रयागहून निघून महाराज वैशाखारंभीं ब्रह्मावर्तास येऊन पोंचले. तेथें या वेळीं महाराजांचा मुक्काम १० दिवस झाला. रात्रीं रोज भजन होत असे. तेथें गोपाळबुवा राजाध्यक्ष भक्तच होता. त्यानें एकदां 'आपणांस मंत्रोपदेश करून अनुग्रह व्हावा' अशी आपली इच्छा कागदावर लिहून तो कागद महाराजांचे पुढें ठेवला. तो वाचून पाहून महाराजांनीं त्याला तिसरे दिवशीं मंत्रोपदेश करून कृतार्थ केलें. गोपाळबुवांना अतिशय आनंद झाला. महाराजांच्या पायांवर मस्तक ठेवून पूजा केली व नंतर आरती केली. त्या दिवशीं महाराजांनीं गोपाळबुवांचेकडे भिक्षा घेतली.

सावंतवाडीचे अग्निहोत्री शंकरभट सप्ते यांना वाताचा उपद्रव झाल्याचें कोलगांवचे सातवळेकर यांनीं महाराजांना कळविलें. तेव्हां मालामंत्राचा जप करावा व कुचला घ्यावा असें महाराजांनीं त्यांना कळविलें. सातवळेकरांनीं कुचला शुद्ध करून दिला. तो घेऊनही यावा तसा गुण आला नाहीं; तेव्हां महाराजांनीं त्यांना डाग घेण्यास सांगितलें. त्यापासून मात्र त्यांचा तो विकार गेला.

ब्रह्मावर्तास १० दिवस राहून महाराज दक्षिणेकडे निघाले. वाटेंत पुष्कळ मंडळी दर्शनाकरितां आतुर झालेली होती. त्यांना दर्शन देत देत जालवणमार्गें वैशाख वद्यांत सिप्री मुक्कामीं येऊन पोंचले. महाराजांचे पूर्वी भेलशास असलेले योगाभ्यासी शिष्य, गोविंदराव पंडित या वेळीं

सिप्रीस राहत होते. इतरही परिचित मंडळी पुष्कळ होती. कारण महा-
राज या गांवीं पूर्वी तीन वेळ आले होते. तेथें दोन प्रहरच्या वेळीं महाराज
एका ब्राह्मणाच्या घरीं गेले असतां तेथील एका मुलीनें त्यांना सांगितलें
कीं, 'तुम्ही येथें उतरूं नका. गांवाबाहेर चला.' हें त्या मुलीचें म्हणणें
ऐकून ही बुद्धि मुलीची नसून ईशप्रेरणाच आहे असें समजून महाराज
गोविंदराव पंडितांचे घरीं आले. त्या वेळीं ते जेवावयास बसले होते.
महाराज आले हें समजल्याबरोबर ते जेवण सोडून उठूं लागले. तेव्हां
'तुमचें जेवण होऊं दे, आपण येथें बसतों,' असें महाराज म्हणाले. पण
गोविंदराव कांहीं जेवण करीत नाहींत असें पाहून महाराज म्हणाले कीं,
'भिक्षेशिवाय अन्न घेणेचें नाहीं. तरी थोडा सत्तू द्या. आज सत्तूचीच
भिक्षा.' असें म्हणून त्या दिवशीं सत्तूचीच भिक्षा केली. आणि पुढेंही
त्या मुलीच्या सांगण्याप्रमाणें गांवांत न जातां सत्तूवरच बरेच महिने
काढले. भिक्षेनंतर दशाहार येथेंच करावा अशी सर्व मंडळींनीं प्रार्थना
केली. तेव्हां महाराज म्हणाले, 'यापुढें आपले गांवांत राहाणें होणार
नाहीं.' तथापि मंडळींचा आग्रह पाहून सिप्रीजवळ बाणगंगा नांवाचें
तीर्थ आहे तेथें राहून दशाहार करण्याचें ठरविलें. मंडळी गांवांतून तेथें
दर्शनास जात. तेथें दशाहाराचा उत्सव थाटानें पार पडला.

सिप्रीस दशाहार करून महाराज गुणाछावणीवरून सारंगपुरास
आले. तेथें गांवाबाहेर एका शंकराचे मंदिरांत मुक्काम झाला. एका
गृहस्थानें महाराज रात्रीं आलेले पाहून ती बातमी गांवांत कळविली,
त्याबरोबर गांवांतील सर्व मंडळी अपरात्रींच दर्शनास बाहेर आली. सर्व
मंडळींनीं त्रिरात्र तरी मुक्काम व्हावा अशी विनंति केली. पण महाराजांनीं
ती मान्य केली नाहीं. माणगांवची मूर्ती येथें होती तिचें दर्शन करून
महाराज निघाले ते देवास संस्थानमध्यें आले. तेथील राजेसाहेबांनीं
महाराज या रस्त्यानें येतील तरी त्यांना आपल्या वाड्यांत आणण्या-

करितां रस्त्यावर नोकर ठेवले होते व एक संन्याशी येतील त्यांना घेऊन या म्हणून सर्व नोकरांना सांगून ठेवलें होतें. महाराजांना पाहिल्या-बरोबर सर्व राजसेवक त्यांच्या जवळ गेले व राजेसाहेबांची इच्छा त्यांनीं महाराजांना सांगितली; तेव्हां महाराज म्हणाले कीं, 'तुमचा राजा मोठा आहे, तो आमच्यासारख्या संन्याशाला बोलावणार नाहीं, ते दुसरे कोणी तरी पालखींतील संन्यासी असतील. शोध करा.' हे महाराजांचे शब्द ऐकून त्या मंडळींना भुरळ पडून त्यांनीं महाराजांना पुढें आग्रह केला नाहीं. या प्रमाणें देवासच्या राजांची इच्छा तीव्र असूनही तो योग चुकला. आपण बांधलेल्या दत्त-मंदिरांत प्रथम महाराजांच्या हस्तें पूजा व्हावी असें राजेसाहेबांना वाटत होतें. पण महाराज त्या वेळीं सर्वांना चुकवून पुढें निघून गेले. वाटेंत इंदूरावरूनच आले पण गांवांत गेले नाहींत. भोरकुवा येथें त्यांना इंदूरचे गृहस्थ भेटले. त्यांची महाराजांच्या दर्शनाची फार दिवसांची इच्छा तेथें पूर्ण झाली. त्या गृहस्थांनीं इंदूरला जाऊन ही बातमी सखारामशास्त्री टिल्लू यांना सांगितली. ती समजतांच टिल्लू-शास्त्री तावडतोब महाराजांचे दर्शनास इंदूरहून आले. त्या दिवशीं एकादशी असल्यामुळें उदईक भिक्षा होईल असें सांगून महाराजांनीं सखारामशास्त्रींचें समाधान केलें. मग दुसरे दिवशीं बलवाडा येथें सखारामशास्त्रींनीं एका झाडाखालीं भिक्षा केली. आणखी दोन स्वयंपाक निराळे करविले होते. याप्रमाणें तिघांकडील भिक्षा घेऊन टिल्लूशास्त्रींची इच्छा महाराजांनीं पर्ण केली.

नंतर प्रवास करीत करीत महाराज ओंकारेश्वरास येऊन पोंचले. तेथें एक दक्षिणी ब्राह्मण अधिकारी होता; पण तो आचार धर्मानें वागत नाहीं हें महाराजांना प्रथम ठाऊक नसल्यामुळें त्याच्या आईच्या आग्रहावरून त्याच्या घरीं महाराज भिक्षेस गेले व त्या दिवशीं भिक्षा तेथेंच केली.

त्याच वेळीं त्या अम्मलदारानें एका मोठ्या पिपांत बसून स्नान केलें व संध्या, वैश्वदेव न करतां तसाच येऊन जेवावयास बसला. हें पाहिल्याबरोबर महाराज त्याच्या आईला म्हणाले कीं, ' आज तुमच्या घरचें हें अपवित्र अन्न पोटांत गेलें, तें उलटी करून काढून टाकलें पाहिजे. तुमचा मुलगा पिपांत स्नान करून संध्या, वैश्वदेव न करतां जेवला. त्याला आपल्या कुलाचा अभिमान नाहीं. त्याचें अन्न अपवित्र आहे. ब्राह्मणांनीं आपला आचार सोडल्यामुळेंच त्यांना दैन्यावस्था आली असून पदोपदीं त्यांचा अपमान होत आहे. ' हें महाराजांचें भाषण ऐकल्याबरोबर त्या गृहस्थाला पश्चात्ताप होऊन त्यानें हात जोडून महाराजांना विनंति केली कीं, ' झालेल्या अपराधांची क्षमा करावी. यापुढें आपण जसें सांगाल तसें मी वागण्यास तयार आहें. ' हें त्याचे पश्चात्तापाचे बोल ऐकून महाराजांना त्याची दया आली व त्याला ब्रम्हकर्म शिकविण्याकरितां मुद्दाम कांहीं दिवस महाराज तेथें राहिले. त्याला सर्व नित्यकर्म शिकवून तो तें करूं लागल्यावर ओंकारेश्वराहून निघून महाराज बढवाईस आले. गांवांत फक्त तीनच मुक्काम केले. तेथून नर्मदा तटाकीं खेडेघाटीं धर्मशाळेंत येऊन राहिले व त्या वर्षीचा चातुर्मास महाराजांनीं तेथेंच केला.

## चातुर्मास १६ बढवाई—शके १८२८

बढवाई हें गांव इंदूर संस्थानांत नर्मदातीरावर आहे. तेथें खेडेघाटीं धर्मशाळेनजिक एका झोंपडींत राहण्याचें महाराजांचें ठरलें. ती झोंपडी दुरुस्त केली. गांवापासून दोन मैल अंतरावर हें स्थान नर्मदातटाकीं एकान्तांत आहे. लोकांचीं उपाधी नको म्हणून महाराज तेथें येऊन राहिले, पण तेथेंही गर्दी झालीच. एकदा महाराज गर्दीस कंटाळून अरण्यांत जाऊन बसले. तेथेंही लोक आलेले पाहून महाराज म्हणाले, ' जंगलांत

गेलें तरी हे लोक सोडीत नाहींत तरी आतां जावें तरी कोठें?' तेव्हां देव म्हणाले कीं, 'तूं कुठेंही गेलास तरी लोक असेच मागें लागणार; तरी जंगलांत न जातां गांवाजवळच राहा.'

महाराजांचा चातुर्मास यंदा बढवाईस आहे हें समजतांच ठिकठिकाणची मंडळी दर्शनास येऊं लागली. इंदूरहून सखारामशास्त्री टिल्लू, हिंगोलीहून हणमंतशास्त्री, ब्रह्मावर्तांहून नानाशास्त्री व गोपाळबुवा, गुजराथेंतून गांडाबुवा, महाराजांचे पूर्वाश्रमांतील बंधु सीतारामबुवा, नरसोबावाडीहून नंदगांवकार इत्यादि मंडळी तेथें जमली होती.

महाराजांची तेथील दिनचर्या अशी होती कीं, पहांटे उठल्यावर तेथील योगाभ्यास करणाऱ्या गृहस्थांना आसनें प्राणायाम शिकवीत. पुढें स्नान, अनुष्ठान झाल्यावर वेदान्तकेसरी, पंचीकरण, मांडूक्योपनिषद इ. पाठ चालत. नंतर मंडळी महाराजांची पूजा करीत. ती झाल्यावर मध्यान्ह स्नान, आन्हिक होऊन भिक्षा होत असे. फक्त या वेळीं सत्तू, ताक व फळें यांवरच चातुर्मास काढला. अन्न घेतलें नाहीं. सत्तूसुद्धां तीन घासच खात असत. रामभाऊ बापट यांनीं रोज गांवांतून सत्तू व ताक आणण्याचें काम निष्ठेनें करावें. सर्वांचा स्वयंपाक होऊन जेवणें चालूं असतां महाराज तेथें बसत. नंतर एक तास विश्रांति होऊन पुनः पाठास सुरुवात होई. मध्येंच पत्रोत्तरें लिहिण्याचें कामही चालू असे. महाराजांचें पुराणही होत असे. कोणी कांहीं प्रश्न केल्यास त्याला योग्य उत्तरेंही देत. रात्रींपर्यंत सारखी दर्शनेच्छु लोकांची रीघ लागलेली असे. दर्शनास आलेल्या लोकांनीं आणलेल्या फळांचा पर्वतप्राय ढीग पडत असे. देवाला नैवेद्य दाखवून तीं फळें दुपारीं लोकांना वांटण्यांत येत असत. धर्मशाळेंत नेहमीं दोनशेंपर्यंत मंडळी असत. सर्वांची जेवणाची व्यवस्था तेथेंच केली जात असे. भिक्षेपूर्वी थोडा वेळ असल्यास

महाराज ध्यानस्थ बसत. कोणाला औषधें, कोणाला बाधानिवारणार्थ उपाय, संतति, संपत्ति वगैरेवर उपाय, मंत्र, यंत्र, व्रतें, प्रदक्षिणा इत्यादि उपाय सांगण्यांतच संध्याकाळ होऊन जाई. नंतर सायंसंध्या वगैरे झाल्यावर भगवद्भजन मध्यरात्रीपर्यंत चालत असे. विष्णुबुवा, गोपाळबुवा, रामभाऊ व इतरही हरिदास वगैरे मंडळी भजनांत इतकी रंगून जात असत कीं, त्या वेळीं ती प्रेमानें नाचत असत. महाराजांनाही तें प्रेमळ भजन ऐकून आनंद वाटत असे. याप्रमाणें मध्यरात्रीपर्यंत भजन चालत असे. नंतर प्रसाद वांटल्यावर सर्व मंडळी निजण्याकरितां धर्मशाळेंत जात. भजनाचे वेळीं प्रसंगीं बसण्यास जागासुद्धां मिळत नसे इतकीं गर्दी होऊन जाई.

येथेंच राहणारे पेन्शनर पोस्टमास्तर त्र्यंबकराव यांचे तोंडांतून रक्त पडत होतें. औषधाचा कांहीं उपयोग होईना. महाराज तेथें येण्याबरोबर त्रिंबकरावांनीं सर्व स्थिति सांगितल्यावर त्यांना औषध वगैरे देऊन महाराजांनीं त्यांना रोगमुक्त केलें. इंदूरचे शिवाजीराव होळकर बढवाईस राहत होते. ते एकदा कारभाऱ्यासह महाराजांचे दर्शनास आले. कारभाऱ्यानें पुढें येऊन ती वार्ता महाराजांना सांगितली, तेव्हां महाराज त्याला म्हणाले कीं, 'वेड्याच्या दर्शनाचा काय उपयोग ? हे येथें आलेले लोक वेडे आहेत; हाही त्यांतीलच एक वेडा आहे. तरी तुम्ही अशा वेडयांच्या नादीं न लागतां घरीं जाऊन सुखानें राहा.' हे महाराजांचे शब्द निघण्याचें कारण म्हणजे त्या कारभाऱ्यानें किंवा त्याच्या मालकानें असे शब्द महाराजांचे विषयीं काढलेले असावेत. नाहींतर महाराजांनींही स्वत:विषयीं असे उद्गार कधींच काढले नाहींत.

एकदां इंदूरच्या महाराणीसाहेब दर्शनास येणार होत्या. त्यांच्या नोकरानें महाराजांना तसें सांगितलें व तेथें त्या वेळीं कोणी असूं नये असें

तो म्हणाला. तेव्हां महाराज म्हणाले कीं, 'येथें राजा रंक दोन्हीही सारखेच. आपल्याजवळ नेहमीं माणसें येत राहणारच. आपण कोणाला या म्हणणार नाहीं व कोणी जाणारही नाहीं.' हें महाराजांचें निस्पृहतेचें बोलणें ऐकून तो नोकर निघून गेला.

एकदां महाराज स्नानास गेले असतां पाय घसरून कमरेंत लचक भरली. रात्रीं नर्मदा मातेनें स्वप्नांत येऊन मंत्र सांगितला. तो म्हटल्या-बरोबर लचक बरी झाली. पुढें नानाशास्त्री ब्रह्मावर्तकर यांना महामारीचा उपद्रव सुरू झाला. हें कळतांच महाराजांनीं देवाची प्रार्थना केली कीं, 'देवा! या आपल्या बालगोपाळांना त्यांच्या घरीं सुखरूप नेऊन पोंचवा. भाद्रपद पौर्णिमेस आपण येथून निघतों.' या प्रार्थनेप्रमाणें नाना-शास्त्री महामारींतून वांचले.

एकदां महाराज एका श्रीमंताच्या घरीं भिक्षेस गेले. ती श्रीमंत बाई बाहेर येऊन महाराजांचेकडे तिनें पाहिलें व आपल्या नोकरास सांगितलें कीं, 'पानावर सर्व पदार्थ वाढून या स्वामींना तें पान द्या. अशा संन्याशाला असे पदार्थ मिळणें कठीण.' हें भाषण ऐकून महाराज हंसले. लक्ष्मीच्या मदानें महाराजही कळून आले नाहींत.

पौर्णिमेच्या दुसरे दिवशीं आपले घरीं भिक्षा करून निघावें अशी तेथील तहशीलदारानें प्रार्थना केल्यावरून महाराज पौर्णिमेस तेथें राहिले. दुसरे दिवशीं त्याचे घरीं भिक्षा झाली. दोन महिन्यांत अनेक श्रीमंत मंडळींनीं तेथें येऊन समाराधना केल्या. पकान्नें खाऊन लोक कंटाळून गेले. पौर्णिमेस महाराज सर्व लोकांसह सीमोल्लंघनास जाऊन आले.

दुसरे दिवशीं तहशीलदारांचे घरीं भिक्षा करून महाराज निघाले. नर्मदेच्या पलीकडे चार मोठया नौका, फुलांच्या माळा, पताका वगैरे

लावून तयार केल्या. सुगंधी धूप घातला व दीपही नौकेंत लावून ठेवले. त्यांपैकीं एका नौकेंत महाराज व त्यांच्यासमोर कांहीं मंडळी बसली व इतर तीन नौकांतून बाकीची भक्त मंडळी बसली. नौका चालूं लागल्याबरोबर सर्वांनीं महाराजांच्या नांवाचा जयजयकार केला. भजन, गायन सुरू झालें. याप्रमाणें अत्यंत आनंदांत त्या नौका परतीरास येऊन पोंचल्या. तीरावर उतरून जवळच असलेल्या सनावद गांवीं महाराज येऊन राहिले. तेथून नरसोबावाडीच्या मंडळींना रेल्वेनें पुढें जाण्यास सांगितलें. त्यांपैकीं नरू आण्णाजी या गृहस्थांना महाराजांचेबरोबर पायीं प्रवास करावा असें वाटून त्यांनीं महाराजांना आपली तशी इच्छा सांगितली. पण ' तुम्हाला आमच्याबरोबर चालणें होणार नाहीं. शिवाय वाटेंत उपास तापास तुम्हाला झेपणार नाहींत. करितां तुम्ही रेल्वेनें पुढें चला. आम्ही मागाहून येतों ! ' असें महाराजांनीं सांगतांच ते निघाले. वाटेंत महालयश्राद्धासाठीं नाशिकला ते एक दिवस राहिले. तेथें ते ज्वरानें आजारी पडले. तेथेंच त्यांना आतुर संन्यास दिला. नंतर वाडीस आल्याबरोबर चार पांच दिवसांत ते समाधिस्थ झाले.

नानाशास्त्र्यांनाही ब्रह्मावर्ती महाराजांनीं परत जाण्यास सांगितलें. पण तेही रमत गमत पुढें महिना दीड महिन्यानें ब्रह्मावर्तास पोंचले. तेथें ज्या दिवशीं पोंचले त्याच दिवशीं त्यांना महामारीचा उपद्रव पुनः सुरू होऊन त्यांचें देहावसान झालें. चातुर्मासाकरितां आलेल्या मंडळींचे रोग, ती मंडळी आपापल्या घरीं जाईपर्यंत महाराजांनीं रोखून धरले होते.

सीतारामबुवा व गांडाबुवा बरोबर होते. सनावद येथील मुक्कामांत सीतारामबुवांच्या वडिलांची श्राद्धतिथि आली, तेव्हां महाराजांनीं सांगितलें कीं, ' आज पाऊस येणार आहे; करितां तुम्ही गांवांत जाऊन स्वयंपाक करा.' हें महाराजांचें म्हणणें ऐकून गांडाबुवा म्हणाले कीं, ' आतां

तर पावसाचें चिन्ह मुळींच नाहीं. पाऊस कसला येतो ?' असें बोलून तेथें घाटावरच स्वयंपाक केला. श्राद्धकर्म संपतें न संपतें इतक्यांत भयंकर पाऊस सुरू झाला. सर्व मंडळी घाबरून गेली. गांडाबुवांनीं त्या वेळीं महाराजांची क्षमा मागितल्यावर तात्पुरता पाऊस बंद होऊन नंतर मंडळींचीं जेवणें झालीं.

तेथून सर्व मंडळींना आपापल्या स्थानीं जाण्यास आज्ञा करून महाराज पुढें निघाले. त्या दिवशीं पितृतिथि असल्यानें सीताराम बुवा मागाहून निघाले. महाराज अरण्यांतून निघाले. वाटेंत एका गांवीं आले तेव्हां तेथील कुलकर्ण्यानें महाराजांना सांगितलें कीं, 'या अरण्यांतील रस्त्यानें तुम्ही जाऊं नका. रस्ता चुकाल. तिकडे रहदारी बिलकूल नाहीं. मी वाटल्यास रेल्वेचें तिकीट काढून देतों.' पण महाराजांनीं तें मान्य न करतां ते त्या अरण्यांतूनच निघाले. रस्त्यांत एक जंगली मनुष्य भेटून त्यानें, 'तुम्ही कुठें जाणार? कोठून आलांत, एकटेच कां चालला?' असें हिंदी भाषेंत विचारलें. महाराजांनीं मराठींतून त्याला सर्व सांगितलें. तेव्हां तो म्हणाला, 'मला याच रस्त्यानें जावयाचें आहे. माझ्याबरोबर या, मी तुम्हांला रस्ता दाखवितों.' असें म्हणून तो मनुष्य पुढें चालला. याप्रमाणें थोडक्यांतच एका गांवाजवळ त्या माणसानें महाराजांना आणून सोडलें व 'स्नान करून या गांवांत भिक्षा करा.' असें सांगून दिसेनासा झाला. नंतर महाराज गांवांत आले. त्यांना मंडळींनीं विचारल्यावरून 'आपण अमुक रस्त्यानें एकटेच सकाळीं निघून दीड प्रहरांत येथें आलों. एका मनुष्यानें रस्ता दाखविला.' असें महाराजांचें म्हणणें ऐकून सर्वच आश्चर्यचकित झाले. एक दिवसांतही जो मार्ग संपणार नाहीं तो एक प्रहरांत संपवून महाराज तेथें पोंचले हें मोठेंच आश्चर्य होय.

त्या गांवांत भिक्षा करून महाराज पुनः जंगलांतील रस्त्यानें पुढें निघाले. थोडेसें पुढें गेल्यावर वयानें लहान, तेजःपुंज असा एक मनुष्य महाराजांना भेटला. त्यानें महाराजांना आपल्या झोपडींत बोलावून तो भाकरी देऊं लागला. महाराज त्याला म्हणाले कीं, 'आपण भिक्षेशिवाय कांहीं घेत नाहीं आणि भिक्षाही ब्राह्मणाशिवाय इतरत्र घेत नाहीं.' तें महाराजांचें बोलणें ऐकून तो पुरुष म्हणाला कीं, 'अजून आपला द्वैत-भाव गेला नाहीं तर?' महाराज एवढेंच म्हणाले, 'श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेबाहेर आपणांस जातां येत नाहीं.' याप्रमाणें बोलून आणखीही कांहीं त्याच्या प्रश्नांचीं उत्तरें दिल्यावर तो पुरुष गुप्त झाला.

एका गांवीं कल्याणजी नांवाच्या माणसाचा मुलगा फार आजारी पडला. तो लवकरच मरणार अशी स्थिति दिसूं लागली. कल्याणजीनें जाऊन महाराजांना हा वृत्तान्त सांगितल्यावर महाराजांनीं त्या मुलाकरितां एक यंत्र लिहून दिलें. तें गळ्यांत बांधतांच तो मुलगा पूर्ण बरा झाला. पुढें तें यंत्र हरवतांच पुनः ताप येऊं लागला. पुनः महाराजांचेकडून यंत्र आणवून तें बांधतांच ताप नाहींसा झाला.

आर्यसमाजाचे दयानंदसरस्वतींचे एक अनुयायी येऊन एकदां महाराजांचे बरोबर वितंडवाद करूं लागले. त्या वेळीं महाराज कांहीं न बोलतां स्वस्थ बसले. तेथें एक महाराजांचा भक्त ब्राह्मण होता. त्याला राग येऊन त्यानें मंत्रप्रभावानें त्यांचें वाक्स्तंभन केलें. तीन दिवस झाले तरी बोलतां येईना. तेव्हां तो शरण आल्यानें त्या ब्राह्मणास सांगून तो स्तंभन-यंत्र परत घेवविला. परत बोलतां येऊं लागलें असें पाहतांच तो पळून गेला.

सीतारामबुवा महाराजांच्या मागून एक दिवसानेंच निघाले. पण वेगानें चालूनसुद्धां महाराजांना गांठण्यास त्यांना पांच दिवस लागले.

येतांना महाराज पंढरपुरास जाऊन नंतर वाडीकडे आले. रस्त्यांत फक्त तीनच भिक्षा एक महिन्यांत झाल्या. सनावदे गांवाहून निघाल्यावर तापीच्या तीरावर एक भिक्षा, दुसरी मार्गातील एका गांवांत व तिसरी पंढरपुरांत. बाकीचे दिवस नुसता जलाहार. भाद्रपद कृष्ण चतुर्थीस सनावदे मुक्कामाहून निघून आश्विन कृष्ण षष्ठीला नरसोबावाडीस येऊन पोंचले. पंढरपुराहून नरसोबावाडी ८०।९० मैल असून हा प्रवास फक्त एकच दिवसांत झाला. पंढरपुरीं आश्विन वद्य पंचमीस दुपारीं भिक्षा करून निघाले ते आश्विन कृष्ण षष्ठीस दुपारीं वाडीस येऊन पोंचले.

## नरसोबावाडी—शके १८२८

शके १८२८ आश्विन व॥ ६ दिवशीं दुपारीं ११।१२ वाजतां महाराज नरसोबाचे वाडीस येऊन पोंचले. मंडळी सारखी महाराजांची वाटच पाहत होती. महाराज गांवाबाहेर आल्याबरोबर त्यांना गांवच्या सीमेवरून मोठया समारंभानें वाजत गाजत आणावें असा वाडीच्या मंडळींचा विचार होता. पण महाराज एकदम श्रीदत्तपादुकांसमोर येऊन उभे राहिल्यावर मग सर्व गांवांत महाराज आल्याची वर्दी गेली. तशा दुपारच्या जेवणाच्या वेळीं देखील ही बातमी समजतांच गांवांतील लहान थोर सर्व मंडळी घांटावर महाराजांच्या दर्शनार्थ जमा झाली. महाराज खालीं श्रीदत्तपादुकांचें दर्शन घेऊन वर येतांच सर्व मंडळींनीं साष्टांग वंदन करून डोळे भरून ती दिव्य मूर्ति पाहून घेतली व नंतर सर्व आपापल्या घरीं परतले. महाराज ब्रह्मानंदस्वामींच्या मठांत येऊन उतरले. नंतर आलेल्या मंडळींबरोबर थोडें बोलणें झाल्यावर माध्यान्हिक आटोपून भिक्षा झाली. परगांवच्या यात्रेकरूंना महाराजांच्या दर्शनाची उत्कंठा असल्यानें त्या त्या पुरोहितांनीं आपापल्या यजमानांना लगेच महाराज आल्याचें पत्रद्वारां कळविलें. महाराजांच्या आज्ञेप्रमाणें

गांडाबुवा, विष्णुबुवा पटवर्धन ही मंडळी पूर्वीच रेल्वेनें वाडीस येऊन पोंचली होती. श्रीनृसिंहसरस्वतीस्वामीमहाराजांना तर बरेच दिवसांनीं श्रीगुरुनाथांचें दर्शन झाल्यामुळें अत्यंत समाधान वाटलें.

महाराजांचा नित्य कार्यक्रम दुसरे दिवसापासून सुरू झाला. पहांटे चार वाजतां उठल्यावर प्रभुस्मरण होऊन प्रथम श्रीनृसिंहसरस्वतींना संन्यासपद्धतीचें शिक्षण दिलें जात असे. नंतर शौचमुखमार्जन स्नान होई. प्रातःसंध्यादि नित्यानुष्ठान झाल्यावर महाराज खालीं श्रीदत्तपादुकांचे वंदनास जात. नंतर श्रीनारायणस्वामींची पूजा झाल्यावर, श्रीनारायणस्वामींच्या धर्मशाळेंत गीताभाष्य, उपनिषद्भाष्य इत्यादिकांचे पाठ चालत. नंतर सदाशिव ब्रह्मेंद्रकृत ब्रह्मसूत्रवृत्ति व जीवन्मुक्तिविवेक सांगत असत. या वेळीं गांवांतील सर्व जिज्ञासु मंडळी श्रवणाकरितां उत्सुकतेनें येत असत. तेथील परमगणेशभक्त विख्यात पुराणिक वक्रतुंडबुवा कवीश्वर हेही श्रवणास येऊन एका बाजूला बसत. सर्व मंडळी जमल्यावर महाराजांनीं आरंभाचे वेळीं विचारावें कीं–'वक्रतुंडबुवा आले कीं नाहीं?' बुवांनीं लगेच उठून हात जोडून आपण आल्याचें सांगून वंदन करून बसावें. नंतर पाठास आरंभ होई. दहा वाजेपर्यंत पाठ झाल्यावर आलेली यात्रेकरूमंडळी महाराजांची पूजा करीत असत. अशा रोज १०-१२ पूजा होत असत. या वेळीं महाराजांचा मुक्काम वाडींत सुमारें दोन महिनेपर्यंत होता. तोंपर्यंत हजारों रुपये मिळाले. हें सर्व द्रव्य तेथील पुजारी मंडळीच घेत असत. समोर नारळ, केळीं वगैरे कोणीं ठेवल्यास महाराज त्यांना स्वतः प्रसाद देत. पण त्यावर कांहीं पैसे कोणीं ठेवले असल्यास तो प्रसाद दुसऱ्याकडून देववीत. वरती द्रव्य ठेवलेलें पाहून 'हा केर तुम्ही केव्हां काढणार,' असें पुजाऱ्यांना महाराज विचारीत असत. बारा वाजल्यावर महाराज भिक्षा घेण्याकरितां निघत. पांच घरीं भिक्षा घेतली जाई. लोक आपल्या दारापुढें सडा घालून रांगोळ्या काढून महाराजांची वाट पाहत

बसत. बरोबर श्रीनृसिंहसरस्वतीही असत. भिक्षा घेऊन ती श्रीनारायण-स्वामींचे मठांत किंवा ब्रह्मानंदांचे मठांत संपावीत असत. 'अष्टौ ग्रासा मुनेर्भक्ष्याः' या वचनास साजेल असाच महाराजांचा नित्य आहार असे. तिखट, गोड वगैरे तर वर्ज्यच. भिक्षा झाल्यावर ती पत्रावळ काढून जागा सारविण्याकरितां नित्य अनेक स्त्रियांची अहमहमिका सुरू होत असे. एक ब्राह्मणेतर बाई रोज मठाबाहेर येऊन आपणांस महाराजांचें उच्छिष्ट काढण्यास मिळावें म्हणून उत्कंठेनें बसत असे. पण तिला बरेच दिवस तो योग आला नाहीं. शेवटीं ती निराश झाली. पण त्या वेळीं तेथें येण्याचा नियम कांहीं सोडला नाहीं. तिची भावना महाराजांनीं ओळखली होती. एके दिवशीं भिक्षा झाल्यावर बाहेर हात धुण्याचे वेळीं येत असतां महाराजांच्या हातांतील भाताचें शीत रस्त्यांत पडलें. पडलें कसलें पाडलें. लगेच त्या सेवेच्छु बाईस महाराज म्हणाले, 'बाई! ऐवढें शीत काढून जागा साफ करा पाहूं!' ही महाराजांची आज्ञा ऐकून त्या बाईला अत्यंत आनंद वाटून तिनें ती सेवा लगेच केली. तिची इच्छा याप्रमाणें महाराजांनीं पूर्ण केली. भिक्षा झाल्यावर आलेल्या पत्रांना उत्तरें लिहिण्याचें काम महाराज करीत. समक्ष तेथें आलेल्या मंडळींना मंत्र, जप वगैरे लिहून देत असत.

दुपारीं सुमारें तीन वाजल्यावर महाराज श्रीनारायणस्वामींच्या कट्ट्यावर येऊन बसत. पुष्कळच मंडळी महाराजांना आपापल्या कामना सांगून त्यावर उपाय विचारून घेत असत. संध्याकाळपर्यंत हाच कार्यक्रम सुरू असे. महाराज वाडीस आल्याची वार्ता समजल्यापासून हजारों लोक महाराजांचे दर्शनास येऊन आपलें संकट त्यांचे पुढें मांडीत. महाराजही सर्वांना उपाय सांगत. साखरेचे पदार्थ आपणांपुढें व देवापुढें ठेवण्यास महाराजांची बंदी होती. परदेशी साखर अत्यंत अपवित्र असल्यानें तिचा स्पर्श झाल्यासही आपण स्नान करतों असें महाराज प्रसंगानें बोलले होते. मेणबत्ती व परदेशी कापूरही असाच वर्ज्य होता. सूर्यास्तापर्यंत

शेंकडों लोकांना त्यांच्या त्यांच्या कामनेप्रमाणें उपाय सांगून महाराज सायंसंध्येकरितां कृष्णापंचगंगा संगमावर नित्य जात असत. संध्यावंदनोत्तर श्रीनृसिंहसरस्वती महाराजांना वंदन करीत असत. नंतर तेथेंच पीठावर बसून महाराज कृष्णालहरी सांगत. एकदां कृष्णालहरींतील 'मुखं ते सह्याधः सदय हृदयं ते नरहरेः, पुरेऽप्यांघ्रेनाभिः प्रपदयुगलं प्राच्यविषये' हा श्लोक सांगण्याचें काम सुरू झालें. त्याच वेळीं इकडे देवाचे मंडपांत धूप, आरति सुरू झाली. या वेळीं महाराजांना असें प्रेमाचें भरतें आलें कीं, त्यांचा कंठ दाटून डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागले. बोलणेंच बंद झालें. थोड्या वेळानें महाराज म्हणाले कीं, 'दयासागर प्रभु या ठिकाणीं भक्तकार्याकरितां येऊन राहिला आहे, ही केवढी भाग्याची व आनंदाची गोष्ट आहे? प्रभूचें भक्तवात्सल्य अवर्णनीय आहे.' कांहीं दिवसानीं कृष्णालहरी सांगून झाल्यावर श्रीमदाचार्यांची शतश्लोकी सांगण्याचें काम सुरू झालें. महाराजांची प्रवचनपद्धति पाहून सर्व विद्वज्जनांना महाराजांची सर्वज्ञता पूर्णपणें कळून चुकली. श्रींच्या पालखीची तिसरी प्रदक्षिणा सुरू झाल्यावर महाराज संगमावरून उठत व खालीं श्रींचें दर्शन घेऊन ब्रम्हानंदांचे मठांत वर येऊन बसत. शेजारती होईपर्यंत त्या वेळींही कांहीं सकाम मंडळी प्रश्न विचारण्याकरितां येतच असत.

श्रींची शेजारती झाल्यावर श्रीनारायणस्वामींच्या कट्ट्यावर महाराज येऊन बसत. नंतर भजनास आरंभ होई. महाराजांना भजनाची फार आवड असे. भजनाचे वेळीं महाराजांनीं केलेले व इतरही संतांचे अभंग, पदें वगैरे म्हटलीं जात. विष्णुबुवा पटवर्धन वगैरे शिष्यमंडळी भक्तिरसपूर्ण भजन करीत असत. बारा वाजतां भजन संपवून महाराजांची आरती व पुष्पांजलि वाहण्याचा कार्यक्रम होत असे. नंतर प्रसाद घेऊन मंडळी

सोडतां पुनः आज्ञा होईपर्यंत येथेंच थांबावें.' असा पुनः श्रीदत्तप्रभूंचा आदेश महाराजांना झाला. महाराज देवांना म्हणाले कीं, 'अजून हा देह किती विकावयाचा तो विकावा.' नंतर महाराजांनीं देवाची राहण्याविषयीं पुनः झालेली आज्ञा सांगतांच सर्वांना अत्यंत आनंद झाला. त्याच दिवशीं 'वहिवाटीप्रमाणें पुजाऱ्यांनींच उत्सवाचें प्रयोजन करावें,' असा सरकारी हुकूम मिळाल्यामुळें तर मंडळींचा आनंद द्विगुणित झाला. त्या दिवशीं महाराज सायंकाळपर्यंत समाधींतच होते. पण असा एक चमत्कार झाला कीं, 'बेळगांवचे कालकुंद्रीकर वाडीस आले होते. त्यांच्या पत्नींनीं त्या दिवशीं सकाळीं येऊन महाराजांना भिक्षेचें निमंत्रण दिलें होतें व त्या दुपारीं स्वयंपाक तयार करून महाराजांची वाट पाहत बसल्या. त्या वेळीं महाराज दुसरें रूप धारण करून भिक्षेस निघाले. कांहीं मंडळीही त्यांच्या पाठीमागून निघाली. पण रामचंद्रयोगींच्या मंदिरासन्निध येण्याबरोबर तें रूप अदृश्य झालें. त्याच वेळीं गांवाबाहेर वेशींतून येणाऱ्या मंडळींना महाराजांचें दर्शन झालें व त्यांना महाराजांनीं प्रसादही दिला. त्यांनीं गांवांत येऊन आपणांस दिलेला प्रसादही दाखविला. हा चमत्कार समजल्यावर गांडाबुवांच्यानें कांहीं राहवेना. त्यांनीं रोजच्या वेळीं सायंसंध्येस गेल्या वेळीं संगमाच्या घाटावर हा प्रश्न महाराजांना केला. तो ऐकून महाराज हंसले व म्हणाले कीं, 'आपल्याला कांहीं माहिती नाहीं. आपण तर सर्वांसमक्ष मठांत समाधिस्थितींतच संध्याकाळपर्यंत होतों. हें महाराजांचें सांगणें ऐकून सर्व मंडळी आश्चर्यानें थक्क झाली. सर्वांनीं महाराजांना साष्टांग नमस्कार घातले. रात्रीं कालकुंद्रीकरांच्या पत्नीनेंही आज दुपारीं महाराज भिक्षेकरितां आपणांकडे आल्याचें सांगितलें. त्यावरूनही महाराजांच्या लोकोत्तर सामर्थ्याविषयीं सर्व लोकांची खात्री झाली.

त्या वर्षी दोन एकादशा स्मार्त व भागवत आल्या होत्या. महाराजांची एकादशी दुसरी होती. त्याच दिवशीं गुरुद्वादशी असल्यानें प्रसाद कांहीं घेतां यावयाचा नाहीं. आतां काय करावें, अशा विचारांत महाराज असतां श्रीदत्तप्रभूंनीं त्यांना विचारलें कीं, 'मी स्मार्त कीं भागवत ?' महाराज म्हणाले कीं, 'दोन्हीही आपलींच स्वरूपें आहेत.' देव म्हणाले कीं, 'मग कोणतीही एकादशी केली तर चालेल.' हा निर्णय झाल्यामुळें पहिली एकादशी करून महाराजांनीं दुसरे दिवशीं प्रसादभिक्षा केली. गुरुद्वादशीस बनामध्यें पात्रें वाढून झाल्यावर महाराज आले व तेथेंच त्या दिवशीं प्रसाद घेतला. सर्व मंडळींच्या पंक्तींतून महाराज स्वतः एकदां फिरून आले. त्या दिवशीं यात्रेकरूंची गर्दी फारच झालेली होती.

गुरुद्वादशीचे दिवशीं अन्नपूर्णेची पूजा होऊन नैवेद्य होण्याचे पूर्वी एक बाई कांहीं अन्न घेऊन जात होती. तिला पकडून एका पुजाऱ्यानें तिची कडक शब्दांत निर्भर्त्सना केली. ही गोष्ट देवांना आवडली नाहीं. त्यांनीं बटूचा वेष घेऊन त्या पुजाऱ्यास दंडानें फार मार दिला. तो इतका कीं तो पुजारी शेवटीं त्या मारानें बेशुद्ध होऊन खालीं पडला. तो बटु मात्र कोणालाही दिसला नाहीं. फक्त त्या पुजाऱ्यासच तेवढा दिसला. बाकीच्या मंडळींनीं त्या बेशुद्ध पडलेल्या पुजाऱ्यास त्याच्या घरीं पोंचविलें. मार असह्य झाल्यामुळें तो पुजारी अत्यंत तळमळूं लागला. तेव्हां सर्व मंडळींनीं महाराजांना ही गोष्ट सांगितली. तेव्हां महाराज म्हणाले कीं, 'प्रसादाच्या वेळीं अपशब्द बोलल्याबद्दल हें प्रायश्चित्त आहे. तुम्ही सर्व श्रीदत्तपादुकांजवळ जाऊन प्रार्थना करा व प्रसादाचें अन्न त्याच्या अंगाला चोळा म्हणजे तो बरा होईल.' या सांगण्याप्रमाणें सर्वांनीं करतांच त्या पुजाऱ्याला बरें वाटलें. त्याच्या अंगावरील माराचे वळ पुढें महिनाभर लोक पाहत होते.

एका बाईनें आपलें काम झाल्यावर देवाच्या उत्सवांत पोळ्या करीन असा नवस केला होता. त्याप्रमाणें तिचें काम झाल्यावर तिनें उत्सवांत कांहीं पोळ्या केल्या. तेव्हां एका पुजाऱ्यानें त्या बाईची टिंगल केली कीं, 'गर्भाधानाच्या दिवसाप्रमाणें या नाजूक पोळ्या कशाला केल्या?' हें ऐकून त्या बाईस वाईट वाटलें व ती रडूं लागली. तेव्हां श्रीदत्तप्रभूंनीं त्याही पुजाऱ्यास वरीलप्रमाणें चांगला बेदम मार दिला. 'वज्रादपि-कठोराणि' असें अपराध्याविषयीं प्रभूंचें चित्त आहे.

नरक चतुर्दशीचे दिवशीं पहांटे सर्व मंडळी देवाकडे जमली व त्यांनीं महाराजांना अभ्यंग स्नान घातलें. श्रीनृसिंहसरस्वतीस्वामींचे हस्तें महाराजांची षोडशोपचार पूजा मंडळींनीं करविली. शेवटीं 'जय जय श्रीमद्गुरुवर स्वामिन् परमात्मन् हंसा' ही आरती म्हणून मंत्र पुष्पांजली झाल्यावर सर्वांनीं महाराजांना साष्टांग नमस्कार घातले.

श्रीदत्तपादुकांवर दिपवाळींत पांच दिवस ऊन पाणी घालण्याची पद्धत आहे. एक मोठा हंडा भरून तापत ठेवलेला असतो; त्यांतील पाणी घेऊन लोक पादुकांवर पाणी घालतात. पाणी फार कढत आहे कीं थंड आहे इकडे कोणाचें लक्ष असणार? त्या वेळीं असें झालें कीं— श्रीपादुकांवर अत्यंत कढत पाणी घालून लोक निघून गेले. पण त्याचा परिणाम असा झाला कीं, महाराजांना लघवीच्या द्वारांतून रक्त पडूं लागून अत्यंत त्रास होऊं लागला. देवांना विचारतांच देव म्हणाले कीं, 'एक दिवस तुम्हाला ऊन पाणी घातलें तर तुमची ही दशा! मग पुजारी रोज आपणावर कढत पाणी घालतात; आपली काय दशा होत असेल?' हें ऐकून महाराजांनीं चौकशी केली असतां पुजाऱ्यांनीं सांगितलें कीं, 'पाणी कढत आहे याची चौकशी न होतां तसेंच पाणी घातलें जातें ही गोष्ट खरी आहे.' तें ऐकून महाराज म्हणाले कीं, 'तुमच्या अपराधाबद्दल आपणांस शिक्षा झाली आहे. तरी तुम्ही सर्वांनीं देवापुढें नारळ

ठेवून इतःपर व्यवस्थित पाणी घालूं अशी प्रार्थना करावी.' त्याप्रमाणें पुजारी मंडळींनीं प्रार्थना करतांच महाराजांची व्यथा कमी झाली. आयुष्यांत फक्त चार पांच वेळच भक्तांच्या आग्रहास्तव ऊन पाण्यानें स्नान करण्याचा प्रसंग महाराजांचेवर आला.

एका भक्ताच्या प्रार्थनेवरून महाराजांनीं 'साकारता तारका साका-पिसार रसापिका' असा श्लोक त्याला दिला. एक ब्राह्मणाचा मुलगा पिशाच-बाधा झाल्यामुळें वाडीस सेवेकरितां येऊन राहिला होता. एक वर्ष झालें तरी त्याची बाधा दूर झाली नाहीं. त्याचे आई-बाप त्याला नेण्याकरितां आल्याबरोबर तो मुलगा बेशुद्ध होऊन पडला. त्याच्या आई-बापांनीं त्याला बरा करण्याबद्दल महाराजांची प्रार्थना केली. त्या वेळीं महाराज म्हणाले कीं, 'देवाला तुमचा मुलगा पाहिजे असल्यानें त्यानेंच पिशाच सोडून त्याला येथें आपल्या जवळ आणून ठेवलें आहे. तरी मुलाला येथेंच सोडून तुम्ही घरीं चला. त्याची आशा धरूं नका.' हें महाराजांचें सांगणें ऐकून नाइलाजानें मुलाला वाडींतच सोडून ते आई-बाप निघून गेले. पुढें तो मुलगा वाडींतच देवाची सेवा करीत राहिला.

एकदां एक बाई महाराजांचेकडे येऊन तिनें प्रार्थना केली कीं, 'आपणांस मूलबाळ नाहीं, तरी कृपा व्हावी.' तें ऐकून महाराज म्हणाले कीं, 'बाई! संन्याशाकडे कुठलीं मुलेंबाळें? तुम्ही खालीं देवाचे दरबारांत जाऊन मागा म्हणजे मुलें मिळतील.' असें सांगून तिला देवाकडे प्रार्थनेस पाठविलें.

माणगांवचे एक महाराजांचे प्रीतींतील गृहस्थ महाराजांचे दर्शनार्थ आले. त्यांचीं दोन लग्नें होऊनही त्यांना संतति नसल्याचें त्यांनीं महाराजांना सांगितलें. महाराजांनीं त्यांना सोन्याचा पाळणा ब्राह्मणास दान करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं घरीं जाऊन केल्याबरोबर त्यांना संतति झाली.

असाच एक पिशाचबाधा असलेला ब्राह्मण कोंकणांतून महाराजांचे दर्शनाकरितां वाडीस आला. महाराजांचें दर्शन झाल्याबरोबर तें पिशाच अंगांत येऊन बोलूं लागलें. त्यानें महाराजांना सांगितलें कीं, 'महाराज, मी या मुलाचा बाप असून हा माझे नियम पाळीत नसल्यामुळें मी याला त्रास देत आहें. ते नियम असे कीं, मी रोज घरीं विष्णुसहस्त्रनामाचे पाठ करीत होतों व घरीं येणाऱ्या अतिथीस जेवूं घालीत होतों. हे माझे नियम या मुलानें पाळल्यास मी याला त्रास देणार नाहीं.' हें त्या पिशाचाचें भाषण ऐकून महाराजांनीं त्या ब्राह्मणाला त्याप्रमाणें वागण्यास सांगितलें. नंतर तो ब्राह्मण घरीं येऊन बापाच्या इच्छेप्रमाणें वागूं लागल्याबरोबर त्याची बाधा दूर झाली.

माणगांव येथील एका गृहस्थाची संतति वांचत नव्हती. त्याचेकडून महाराजांचे सांगण्याप्रमाणें घरांतील वडील माणसांनीं मंगळाचें व्रत करविल्यानंतर त्याची संतति वांचूं लागली.

इंदूरचे वासुदेवराव ठाकूर यांचे कुटुंबाची प्रकृति नेहमीं बरोबर नसे. त्याकरितां ते मुद्दाम इंदूरहून महाराजांचे दर्शनार्थ वाडीस येऊन त्यांनीं आपली हकीकत महाराजांना सांगितली. त्या वेळीं महाराजांनीं त्यांना सांगितलें कीं, 'तुमच्या कुळांतील एका सत्पुरुषाच्या समाधीची पूजाअर्चा होत नसल्यानें हा त्रास होतो. तरी ती व्यवस्था प्रथम करा म्हणजे कुटुंबास आरोग्य लाभेल.' त्याप्रमाणें ठाकूर यांनीं आपल्या मूळ गांवीं जाऊन बऱ्याच प्रयासानें ती जमिनींत असलेली समाधि शोधून काढली. नंतर तिची पूजेची योग्य ती व्यवस्था करतांच त्यांचे कुटुंबाची प्रकृति उत्तम आरोग्यसंपन्न झाली.

वेंगुर्ल्याचा एक कुष्ठी ब्राम्हण आपला रोग जाण्याकरितां वाडींत पांच सहा वर्षें सेवेस राहिला होता. त्यानें एकाच्या सांगण्यावरून एकदां

कृष्णातीरावर जाऊन महाराजांना आपली हकीकत निवेदन केली. महाराजांनीं त्याला दुसरे दिवशीं भेटण्यास सांगितलें. पण त्या दिवशीं काम न झाल्यामुळें पुनः दुसरे दिवशीं भेटण्यास सांगितलें. नंतर महाराजांनीं देवास त्या ब्राह्मणाबद्दल विचारलें असतां 'त्यानें गर्दभाला पुरण खाऊं घातल्यास तो रोगमुक्त होईल' असें देवाचें सांगणें झालें. त्याप्रमाणें महाराजांनीं त्या ब्राम्हणाला करण्यास सांगितलें व आपल्यासमोर कोणी-तरी ठेवलेल्या पैशांतून त्याला पैसे खर्चास घेण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्या ब्राम्हणानें तेथील एक रुपया घेऊन सर्व सामान आणून पुरण तयार करविलें व तें वनांत जाऊन गर्दभास खाऊं घालून तो ब्राह्मण दुपारीं महाराजांचे स्नानाचे वेळीं कृष्णातीरावर आला, व त्यानें प्रवाहांत महाराजांच्या खालीं जाऊन स्नान केलें. तीन बुडया मारून वर येतांच तो रोगमुक्त झाला.

मागील खेपेस महाराज वाडीहून पंढरपूरमार्गें बार्शीस आले. तेथें माणगांवचे दत्तुशास्त्री साधले राहत असत. यांना बार्शीस बावडेकर शास्त्री असें लोक म्हणत असत. यांचे घरीं महाराज एकदां दुपारचे वेळीं 'श्रीगुरुदेव दत्त' म्हणून येऊन उभे राहिले. सर्व मंडळींनीं येऊन त्यांना बसण्यास आसन दिलें. नंतर भिक्षेचीही योग्य ती व्यवस्था झाली. तेथेंच बाळू साधले म्हणून माणगांवचे गृहस्थ राहत असत. त्यांच्या घरांतील मंडळींचीं नांवें घेऊन महाराजांनीं त्या सर्वांची चौकशी केली. नंतर हेच वासुदेवानंदसरस्वती अशी सर्वांना ओळख पटून सर्वांचे मनांत महाराजांचे विषयींचा आदर अधिक वाढला. पुढें बाळू साधले सांगलीस वेदाध्ययनासाठीं गेले होते. महाराज वाडीस आल्याचें समजल्यावरून ते मुद्दाम सांगलीवरून महाराजांचे दर्शनास आले व त्यांनीं आपणास एखादा मंत्र जप सांगण्याविषयीं महाराजांना विनंति केली. त्या वेळीं

महाराजांनीं त्यांना सांगितलें कीं, ‘ ब्राह्मणास गायत्रीमंत्र हाच मुख्य मंत्र असल्यानें त्याचेंच पुरश्चरण करून ब्राह्मणानें कार्यसिद्धी करून घ्यावी. तसेंच आपल्या कुलदेवतेचा मंत्रजपही त्यानें करावा. आपल्या कुळांतील कोणी तपस्वी पुरुषानें जी देवता प्रसन्न करून घेतली असेल तीच कुलदेवता. ती कुलांतील माणसांचें रक्षण करते. करितां तुम्ही याप्रमाणें कुलदेवतेचा व गायत्रीचा मंत्र नित्य जपत चला. इतर मंत्राचे भानगडींत तुम्ही पडूं नका. आतां वाडीस आला आहांत तर गुरुचरित्राचा सप्ताह करा व ‘ दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा ’ या मंत्राचें भजन करीत चला. ’ याप्रमाणें महाराजांनीं सांगतांच बाळंभट सावले तसेंच सांगलीस गेले.

सावंतवाडीचे अग्निहोत्री सप्रे यांना महाराजांनीं येऊं नये असें कळविलें असतांही ते वाडीस जाण्यास निघाले. पण वाटेंत त्यांना तापानें गांठल्यामुळें तसेंच परत घरीं जावें लागलें. महाराजांची आज्ञा अनुल्लंघनीय आहे.

वाडींतील एका पुजाऱ्यांच्या मनांत, पूजेकरितां महाराजांचेकडून पादुका घ्याव्यात असें आलें. पण मागण्याचा योग मात्र बरेच दिवस आला नाहीं. एकदां महाराज सहज त्यांना म्हणाले कीं, ‘ तुम्हांला देवांनीं अक्षय पादुका दिल्या असतां इतर पादुकांची तुम्ही इच्छा कशाला करतां ? ’ ही मनांतील गोष्ट महाराजांनीं बोलून दाखविलेली पाहून त्या पुजाऱ्यांना मोठें आश्चर्य वाटलें.

एक श्रीमंत गृहस्थ आपल्या पत्नीस पिशाचपीडा होऊं लागल्यामुळें वाडीस पत्नीसह येऊन राहिला होता. तीन महिने सेवा करूनही कांहीं गुण नाहीं असें पाहून त्यानें महाराजांना सर्व हकीकत सांगितली. महाराजांनीं एकदां त्याच्या पत्नीकडे पाहून दुसरे दिवशीं [illegible]

गृहस्थास सांगितलें. त्याप्रमाणें तो गृहस्थ दुसरे दिवशीं महाराजांचे दर्शनास आला असतां महाराज त्याला म्हणाले कीं, 'तुमच्या पूर्वजाकडे एका ब्राह्मणाची बाराशें रुपये ठेव होती ती त्याला परत मिळाली नाहीं. त्यामुळें तो ब्राह्मण पिशाच होऊन पीडा देत आहे. तरी ती रक्कम येथें ब्राह्मण भोजनाकरितां खर्च करा, म्हणजे तुमची पत्नी बरी होईल.' ही महाराजांची आज्ञा ऐकून त्या श्रीमंत गृहस्थानें तारेनें घरून तितके पैसे मागवून ते महाराजांचे पुढें आणून ठेवले. महाराजांनीं ते पैसे एका पुजाऱ्याकडे देऊन रोज ब्राह्मणसंतर्पण करण्यास सांगितलें, व हे पैसे संपेपर्यंत घरीं कोणीही जेवूं नये असें सर्वांना सांगितलें. त्याप्रमाणें अन्नदान सुरू झालें. हळूहळू त्या बाईस आराम पडूं लागला. ज्या दिवशीं तो पैसा सर्व संपला त्या दिवशीं त्या पिशाचाला सद्गति मिळून ती बाईही त्या त्रासांतून पूर्ण मुक्त झाली.

कोलगांव सावंतवाडी येथील राहणारे गणेश सातवळेकर हे या वेळीं वाडीस महाराजांचे दर्शनाकरितां आले. महाराजांच्या संगतीचा लाभ व्हावा म्हणून त्यांनीं कांहीं दिवस वाडींत मुक्काम केला. उपनिषत्पाठाचे वेळीं शेवटीं महाराजांचे पायांवर मस्तक ठेवण्यास मिळावें अशी त्यांची इच्छा होती. पण महाराज कोणालाच शिवून घेत नसल्यामुळें बरेच दिवस ती त्यांची इच्छा पूर्ण होऊं शकली नाहीं. एकदां त्यांनीं धीर करून महाराजांना तसें विचारलें. तेव्हां त्या दिवशीं मात्र महाराजांचे चरणांवर मस्तक ठेवण्याची त्यांची इच्छा पूर्ण होऊन त्यांना धन्यता वाटली. त्यांनीं द्विसाहस्री गुरुचरित्राची एक लहान प्रत लिहून महाराजांना अर्पण केली व अनेक व्याप सारखे पाठीमागें असतांही महाराजांनीं वेळांत वेळ काढून सातवळेकरांना तें गुरुचरित्र समजावून सांगून त्यांची तीही इच्छा पूर्ण केली. तसेंच विंचू, सर्प, दृष्टि, सुलभप्रसूति इत्यादिकांकरितां मंत्रही

त्यांना लिहून दिले. कृष्णाबाईच्या डोहांत पाय घसरून ते पडले असतां मंडळींनीं त्यांना वर काढलें. ही महाराजांचीच कृपा ते समजत असत. नंतर ते गांवीं जाण्यास निघाले व महाराजांचे दर्शनास आले असतां महाराज त्यांना एवढेंच म्हणाले कीं, ' उद्यां का जाना सातवळेकर ! ' पण त्यांनीं सांगितलें कीं, ' टांगा ठरविला असून टांगेवाल्यानें संचकारही नेला आहे.' हें ऐकून महाराज 'बरें तर' असें म्हणाले. पण त्या दिवशीं तो टांगेवालाच न आल्यानें त्यांचें जाणें शेवटीं राहिलेंच. दुसरे दिवशीं निघतांना दर्शनास सातवळेकर गेले; तेव्हां महाराजांनीं एकाकडे पाहून थट्टेनें विचारलें कीं, 'कांहो ! सातवळेकर कालच गेले असतील नाहीं !' नंतर त्यांनीं घडलेली गोष्ट सांगितली व महाराजांची आज्ञा घेऊन घरीं गेले.

एकदां सातवळेकरांनीं महाराजांना विचारलें कीं, ' आपणांस पुनर्जन्म आहे काय ? ' तेव्हां महाराज म्हणाले कीं, ' होय. हा तर अरुणोदय आहे. ' महाराजांनीं त्यांना एकदा लेखनासंबंधीं पुढील गोष्ट सांगितली. भुसावळेस असतांना पुष्कळ मंडळी दर्शनार्थ येत. त्यांना पुढें पुढें सद्वासना उत्पन्न होऊन ती मंडळी शास्त्रविहित कर्म करूं लागली. एकदां सर्व लोकांनीं महाराजांना विनंति केली कीं, ' आपल्या जवळ आलों असतां आमचे विचार उत्तम स्थिर राहतात, पण घरीं गेल्यावर मात्र मनाची चलबिचल सुरू होते. स्नेही मंडळींच्या मनाचें समाधान करतां येत नाहीं, त्यामुळें ती मंडळी थट्टा करतात. करितां आमच्या मनाचें स्थैर्य कायम राहून दुसऱ्याचेंही समाधान आम्हांला करतां येईल, असा एकादा लेख आपण आम्हांला लिहून द्यावा. ' ही त्या मंडळींची विनंति ऐकून महाराजांनीं लेख लिहिण्यास सुरुवात केली. पण लगेच ताप येऊं लागल्यामुळें तें लेखन त्या वेळीं तसेंच राहिलें. पुनः दोन वेळ

असा प्रयत्न केला. पण त्या वेळींही पूर्ववत्‌च स्थिति झाली. तिसऱ्या वेळीं मात्र ताप निघेना व देवांचें सांगणें झालें कीं, ‘तुला याच स्थितींत ठेवलें म्हणजे लिहिण्याचे चाळे सुटतील.’ हें ऐकून देवाला लेख लिहिणें आवडत नाहीं असें वाटून महाराजांनीं तें काम बंद केलें व पूर्वींचे लिहिलेले कागदही फाडून टाकले. तेव्हां प्रकृति उत्तम झाली.

वाडींतील दीक्षितस्वामींचे वडील बंधु दत्तू दीक्षित यांची कन्या सीताबाई भिलवडीस दिली होती. पण नवऱ्यानें ती कृष्णवर्णाची म्हणून तिला एक शेत देऊन विभक्त ठेवलें होतें. ती आपल्या शेतांत कष्ट करून धान्य पिकवून खात असे. मागें वाडीस महाराज आले त्या वेळीं ती दर्शनास आली होती. तिनें त्या वेळीं महाराजांच्या चरणांची धूळ एका डबींत भरून नेली होती. पुढें एकदां तिच्या शेतावर धान्य मळून तयार झालें होतें, इतक्यांत एकदम मोठा पाऊस येऊं लागला. तिनें लगेच महाराजांचें स्मरण करून ती डबींतील महाराजांची चरणधूलि खळ्याभोंवतीं टाकली व ‘मी या संकटांतून मुक्त झाल्यावर वाडीस येऊन ब्राह्मणसमाराधना करीन, मला एवढें अन्नदान महाराजांनीं करावें.’ अशी तिनें मनोमन महाराजांची प्रार्थना केली. त्या वेळीं तिच्या खळ्यावर पावसाचा एक थेंबही न पडतां तिच्या धान्याचें संरक्षण झालें. नंतर महाराज वाडीस आल्याचें समजतांच ती वाडींत आली व आपला नवस तिनें गांडाबुवांचेजवळ सांगून आज समाराधनेचे वेळीं महाराजांनीं भिक्षेस यावें अशी विनंति केली. त्याप्रमाणें तिच्या समाराधनेचे वेळीं जाऊन महाराज वगैरे सर्वांनीं भिक्षा घेऊन तिचें समाधान केलें.

बेळगांव येथें कालकुंद्रीकर म्हणून धनिक गृहस्थ होते. त्यांचे वडिलांची वाचा कोणी मंत्रप्रयोग केल्यानें बंद झाली. बोलतां येईना व कांहीं स्मरणही राहीना. महाराज वाडीस आल्याचें समजल्यावरून कालकुंद्रीकर

आपल्या वडिलांना घेऊन वाडीस महाराजांचे दर्शनास आले. महाराजांनीं त्यांना पाहिल्याबरोबर 'यांच्यावर कोणी मंत्रप्रयोग केल्यामुळें यांची अशी दशा झाल्याचें सांगितलें व आहे या स्थितींतच यांचें राहणें बरें. अंतसमयीं यांना पूर्ववत् स्मरणशक्ति येईल' असें सांगितलें. असें महाराजांचें सांगणें ऐकून कालकुंद्रीकर वडिलांना घेऊन घरीं गेले. पुढें अंतकाळच्या वेळीं त्यांच्या वडिलांना उत्तम स्मृतिलाभ झाला. त्यांनीं आपल्या घरांतील मंडळींना सांगितलें कीं, 'मी परवां द्वादशीस या लोकांतून जाणार, तरी मला लक्ष्मीनारायणांचे दर्शनाकरितां कालकुंद्रीस घेऊन चला.' त्याप्रमाणें त्यांना कालकुंद्रीस नेलें. तेथें एकादशीस उपोषण करून द्वादशीस लक्ष्मीनारायणाचे दर्शनास गेले वेळीं मुखानें हरिस्मरण करीत त्यांनीं प्रभूला साष्टांग नमस्कार घातला तो अखेरचाच. पुनः ते उठलेच नाहींत. महाराजांच्या सांगण्याप्रमाणें शेवटीं त्यांचें कल्याण झालें.

वाडीहून दोन मैलांवर मोळा म्हणून अरण्य कृष्णातीरावर आहे. त्या ठिकाणीं एका साधु पुरुषाच्या सांगण्यावरून वाडींतील मंडळी कार्तिक पौर्णिमेनंतर वनभोजनास जात असतात. या वर्षी सर्वांच्या आग्रहावरून महाराजही तेथें गेले होते. बरोबर नृसिंहसरस्वती वगैरे शिष्यमंडळी होती. वाडींतील प्रसिद्ध प्रासादिक पुराणिक वक्रतुंडबुवा कवीश्वर हेही बरोबर होते. 'दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा' हें भजन महाराज बाहेर निघाले म्हणजे होत असे. त्याप्रमाणें भजन करीत मंडळी महाराजांचे सह मोळ्यांत पोंचली. नंतर महाराजांची भिक्षा व सर्वांचीं भोजनें झाल्यावर वक्रतुंडबुवा कवीश्वर यांनीं पुराणसेवा केली. महाराजांचा अधिकार पूर्णपणें जाणणारे ते होते. त्यांनीं त्या दिवशीं भविष्यपुराण व इतरही पुराणांतील वचनांवरून, श्रीदत्तात्रेयांचे कलियुगांत श्रीपाद

श्रीवल्लभ, श्रीनृसिंहसरस्वती व योगिराज असे जे तीन अवतार होणार त्यांपैकीं पहिले दोन अवतार होऊन गेले, तिसरा योगिराज म्हणजेच महाराज आहेत असें अत्यंत श्रद्धापूर्वक प्रतिपादन केलें. पण महाराज तें कशाला अंगाशीं लावून घेतील? त्यांनीं त्यावेळीं सांगितलें कीं, 'योगिराज अवतार अद्यापि व्हावयाचा आहे. आपल्यावर उगीच हा आरोप नको.' हें महाराजांचें वाक्य ऐकूनही भाविक मंडळींची श्रद्धा तशीच कायम राहिली. असो. संध्याकाळीं सर्व मंडळी महाराजांचेसह भजन करीत गांवांत आली. गांवांत प्रत्येकाच्या दरवाज्यासमोर रांगोळ्या घालून सुवासिनी स्त्रिया आरत्या घेऊन तयार होत्या. महाराज येतांच सर्वांनीं महाराजांना ओवाळून नमस्कार केले. तो समारंभ फारच पाहण्यासारखा झाला.

नारायणस्वामींच्या कट्टयावर नित्याप्रमाणें एकदां महाराज बसले असतां कीर्तन सुरू झालें. कीर्तन ऐकतां ऐकतांच महाराजांना समाधि लागली. त्यावेळीं थंडीवाऱ्याच्या भीतीनें मंडळींनीं सभोंवती पडदे लावले; त्यामुळें तें समाधिदर्शन फारसें कोणालाही झालें नाहीं. योगी पुरुषाचें समाधिस्थितीतील दर्शन म्हणजे साक्षात् ब्रह्मस्वरूप दर्शनच आहे ही माहिती त्या वेळीं कोणास असणार? महाराजांचें व्युत्थान झाल्यावर 'त्यावेळीं पडदा लावण्याचें कारण नव्हतें. अरण्यांतसुद्धां अशी समाधि लागते' इत्यादि महाराजांनीं सांगितलें. या अवस्थेंत महाराजांना वाडीहून निघण्याची आज्ञा होते काय म्हणून मंडळी सचिंत होती. पण तसें कांहीं घडून आलें नाहीं त्यामुळें सर्वांना आनंद झाला. ती समाधि पुढें एक तासानंतर उतरली.

महाराजांचा पूर्वाश्रमांतील एक भाचा पिशाचबाधेनें त्रस्त होऊन महाराजांना शरण आला. महाराजांनीं विचारल्यावरून त्यानें आपली

हकीकत त्यांना सांगितली ती अशी–'आपले आजोबा असतांना एक ब्राह्मण घरीं आला. जेवण वगैरे झाल्यावर त्यानें बत्तीस रुपये आपल्या आजोबांचेजवळ ठेवण्यास दिले, व कांहीं दिवसांनीं परत येऊन रुपये नेईन असें सांगून तो निघून गेला. त्याचे नांवाची व स्थलाचीही चौकशी त्यावेळीं कोणीं केली नाहीं. पुढें कांहीं दिवसांनीं तो ब्राह्मण परत आला. पण त्या वेळीं त्याला सांगूनही त्यानें आपले पैसे नेले नाहींत. पुनः कांहीं तो ब्राह्मण परत आला नाहीं. पैसे मात्र त्याचे राहिले. पुढें लवकरच आजोबा वारल्यावर आमच्या वडिलांना तो ब्राह्मण पिशाच होऊन पीडा देऊं लागला. या पीडेंतून सुटका व्हावी म्हणून दोन वेळ नारायणबळी केला तरी त्याची पीडा कमी होत नाहीं, तरी आपण कृपा करून या त्रासांतून सोडवावें.' ही त्याची हकीकत ऐकून महाराजांनीं त्या पिशाचास बोलावून त्यासंबंधीं विचारलें. तेव्हां त्यानें घडलेल्या सर्व गोष्टी खऱ्या असल्याचें सांगून, अद्यापि मला गति न मिळाल्यानें यानें आणखी एक वेळ आपणांसमक्ष नारायणबळी करावा अशी इच्छा प्रदर्शित केली. नंतर महाराजांनीं त्याला तसें करण्यास सांगून पैसे नसल्यास सीताराम बुवा व्यवस्था करतील असें सांगितलें. नंतर त्यानें त्याप्रमाणें करतांच तो पिशाच-पीडेंतून मुक्त झाला. पिशाचालाही सद्गति मिळाली.

एका बाईला एक ब्रह्मराक्षस फार पीडा देत होता. एखादे वेळीं त्यानें वाऱ्याचे रूपानें त्या बाईस आभाळांत नेऊन नंतर कोठेंतरी दूर नेऊन ठेवावी. ती बाई त्यावेळीं बेशुद्ध झालेली असे. पुढें पुष्कळ वेळानें सावध झाल्यावर तिनें शोध करीत आपल्या घरीं यावें. हा त्रास असह्य झाल्यानें ती बाई आपल्या आईस बरोबर घेऊन वाडीस येऊन राहिली होती. वाडींतही एकदा त्या राक्षसानें तिला भर दुपारीं सर्व मंडळी पाहात असतां एकदम आकाशांत नेऊन कोठेंतरी दूर ठेवून दिलें.

त्या वेळीं तिच्या आईनें घाबरून येऊन महाराजांना ही हकीकत सांगितली. तेव्हां महाराज म्हणाले कीं, 'ती बाई पश्चिम दिशेला असून सुरक्षित आहे. संध्याकाळीं परत येईल. घाबरूं नका.' त्याप्रमाणें ती बाई सावध होऊन सायंकाळीं आपले घरीं परत आली. पुढें तिच्या बापानें विनंति केल्यावरून महाराजांनीं एक यंत्र करून दिलें. तें तिच्या गळ्यांत बांधतांच ती त्या पिशाच्याच्या पीडेपासून मुक्त होऊन आपल्या घरीं गेली.

सखाराम हरी नांवाचा वार्डींतील एक पुजारी कोणाच्या तरी सांगण्यावरून योगाभ्यास करूं लागला. पण त्यांत कांहीं चूक झाल्यामुळें त्याचें मस्तक फिरलें. महाराजांनीं त्याला सुधारण्याकरितां कांहीं औषध व जप सांगितला. पण दुर्दैवानें तें त्यानें न केल्यामुळें त्याची उन्मादावस्था शेवटपर्यंत गेली नाहीं.

एक गृहस्थ, आपल्या मुलास वेड लागलें आहे असें समजून त्याला घेऊन महाराजांचे दर्शनास आला व त्यानें महाराजांना मुलाची हकीकत अशी सांगितली कीं, 'हा मुलगा ५।६ वर्षांपर्यंत चांगला वागत होता. पण पुढें एकाएकीं याची अशी अवस्था झाली. तरी कृपा करून आपण याचें वेड घालवावें.' हें बोलणें ऐकून महाराजांनीं त्या मुलाकडे पाहिलें. तेव्हां तो मुलगाही महाराजांचेकडे टक लावून पाहूं लागला. सुमारे १०।१५ मिनिटें दोघेंही एकमेकांकडे पाहत होते. नंतर महाराजांनीं त्याचे बापास सांगितलें कीं, 'या मुलाचें वेड बरें होण्यासारखें नाहीं, पण तें अपायकारक नाहीं एवढें मात्र खास, उलट कल्याणकारकच ठरेल.' हें ऐकून तो गृहस्थ मुलाला घेऊन आपल्या गांवीं गेला. नंतर महाराजांनीं मंडळींना सांगितलें कीं, 'हा मुलगा कोणीतरी पूर्वजन्मीचा योगभ्रष्ट पुरुष आहे. यानें लोकांची उपाधि नको म्हणून हें वेड्याचें सोंग मुद्दाम

घेतलें आहे. दक्षिणेंत हा मोठा सिद्ध पुरुष आज आपल्या पाहण्यांत आला.' हें ऐकून सर्व मंडळींना कौतुक वाटलें.

कोल्हापूरहून प्रो. विजापूरकर व पुण्याहून प्रो. भानू हे दोघे प्रसिद्ध प्राध्यापक वाडीस महाराजांचे दर्शनार्थ आले होते. दोवांनींहीं महाराजांचे बरोबर थोडा वेळ अध्यात्मचर्चा केली. पण तेवढ्यांत महाराजांच्या पूर्ण ज्ञानानें ते दोघेही दिपून गेले. सायंकाळीं श्रीनारायणस्वामींचे कट्टयावर महाराजांचेसमोर प्रो. भानूंचें व्याख्यान झालें. आचार्यमतास विरोध न करतां व्याख्यान व्हावें असें त्यांना महाराजांनीं प्रथमच सांगितलें होतें.

एक संन्यासी महाराजांची भेट घेण्याकरितां मुद्दाम काशीहून आले होते. ते वाडींत पंधरा दिवस होते. रामेश्वराकडे जाण्याकरितां महाराजांना ज्या वेळीं देवाची आज्ञा झाली त्याच वेळीं त्या संन्याशांनाही उत्तरेकडे जाण्याची आज्ञा झाल्यामुळें ते परत काशीकडे निघून गेले.

कुरुंदवाड संस्थानचे अधिपति बाळासाहेब पटवर्धन हे रोज महाराजांचे दर्शनास येऊन घटकाभर कां होईना सत्संगतीचा लाभ घेतल्यावांचून राहत नसत. त्यांना एकदां रक्ताच्या उलट्या सुरू झाल्या. उपचार करूनही गुण न आल्यामुळें सर्व मंडळींनीं घाबरून एक मनुष्य वाडीस महाराजांचेकडे तांतडीनें पाठविला. कुरुंदवाड व वाडी यांमध्यें फक्त एक मैलाचेंच अंतर आहे. पंचगंगा नदी ओलांडली कीं लगेच कुरुंदवाडची हद्द लागते. महाराजांनीं त्या राजदूतास कांहीं गोळ्या दिल्या आणि श्रीमंतांनीं गोप्रदान करावें असें सांगितलें. त्याप्रमाणें व्यवस्था झाल्याबरोबर तो उपद्रव आपोआप कमी झाला.

संन्यासानंतर एकंदर तीन वेळां महाराजांचें येणें वाडीस झालें. त्यांत प्रथम खेपेची एक वाडीस घडलेली गोष्ट चित्ताकर्षक अशी आहे. वाडींत

जनाथ म्हणून एक ब्राह्मण राहत असे. तो आपणांस अक्कलकोटच्या वामींचा शिष्य म्हणवीत असे. रोज सकाळीं उठल्यावर एक तांब्या ातांत घेऊन त्यानें दहा आकरा वाजेपर्यंत फिरावें. नंतर तास दोन ास अंगाला सारखी माती लावून नदींत स्नान करावें. संध्या नाहीं, जा नाहीं. वाडींत बरेच दिवस राहून देवाला कधीं तांब्याभर पाणीसुद्धां यानें घातलें नाहीं. लोकांनीं त्याला पुष्कळ सांगावें. पण तो उलट सांगे कीं, 'मी समंधीबाधेचा मनुष्य आहें. मला पिशाच कांहींच सुचूं देत नाहीं.' ही त्याची वाणी ऐकून लोकांनाही तें खरें वाटलें व त्यांनीं त्याचा ाद सोडून दिला. वास्तविक तो ब्राह्मण ब्रह्मनिष्ठ पुरुष होता हें पुढें हाराजांच्या सांगण्यावरून सर्वांना कळलें. एक आंखुड पंचा नेसण्यास व एक अंगावर घेण्यास, यांशिवाय तिसरें वस्त्र त्याच्याजवळ दिसलें नाहीं. कोणी जेवणास बोलावलें तर त्याचे घरीं जावें. दक्षिणा एक दोन पैशां-पेक्षां त्यानें कधीं जास्ती घेतली नाहीं. दक्षिणेचे पैसे नंदगांवकर मास्त-रांचेकडे तो ठेवीत असे. त्यांतून वस्त्रें फाटल्यास त्यानें घ्यावींत. हिशोब मात्र स्वतःच ठेवावा. याप्रमाणें जवळजवळ पंचवीस वर्षे त्यानें वाडींत घालविलीं, पण त्याची शिल्लक मात्र इतके दिवसांत आठच रुपये भरली. वैजनाथ नेहमीं खरें बोलत असे. एका दत्तकाच्या खरेखोटेपणाविषयीं वैजनाथास साक्षीदार म्हणून न्यायालयांत नेलें होतें. न्यायाधीशांनीं त्या वेळची स्थिति विचारतांच वैजनाथानें सांगितलें कीं, 'त्या वेळीं जमलेली मंडळी पानें मांडा, भात वाढा, द्रोण द्या असें म्हणत होती.' अशी खरी घडलेली हकीकत लहान मुलाप्रमाणें वैजनाथानें सांगितली.

वैजनाथाचे एकंदर आठ रुपये सांठलेले होते हें वर्णन पूर्वी आलेलेंच आहे. गांडाबुवा एकदां त्यांना म्हणाले कीं, 'तुम्ही इतके दिवस वाडींत राहून देवाची एकदांसुद्धां पूजा केली नाहीं, तरी तुमच्या आठ रुपयां-

तून देवाला महापूजा करूं या.' हें ऐकून वैजनाथ म्हणाले, 'मला बंधूस भेटण्याकरितां जावयाचें असल्यामुळें ते पैसे, त्याकरितां मीं मुद्दाम ठेवले आहेत.' हें त्यांचें बोलणें ऐकून तेथें जमलेली मंडळी म्हणाली कीं, 'हा कितीतरी वर्षें असेंच सांगतो. पण एकदासुद्धां बंधूस भेटण्यास गेला नाहीं. तरी याचें न ऐकतां याच्या पैशांतून महापूजा करा.' पण या लोकांच्या म्हणण्यास वैजनाथनें दाद दिली नाहीं. महाराज मंडळींना म्हणाले कीं, 'तुम्हांला अद्यापि त्याच्या बोलण्याचा अर्थ समजला नाहीं. त्याला समंधाची बाधा म्हणजे त्या भगवंताचीच बाधा आहे. तो बंधूस भेटण्यास जाणार म्हणजे शरीर टाकून ब्रह्मस्वरूपांत लीन होणार. ते रुपये शरीराच्या शेवटच्या व्यवस्थेकरितां म्हणून त्यानें ठेवले आहेत. तों ब्रह्मनिष्ठ पुरुष आहे. त्याची खरी योग्यता तुम्हांला कळून येणार नाहीं.' याप्रमाणें महाराजांचें भाषण ऐकून सर्व मंडळी स्वस्थ बसली. शेवटीं गांडाबुवांचा विशेष आग्रह पाहून महाराजांनीं महापूजा करण्याबद्दल वैजनाथास सांगितलें. त्यानें महाराजांची आज्ञा लगेच मान्य केली. पण 'माझ्याकरितां आपणच महापूजेस बसावें. मला बसवणार नाहीं' असें त्यानें महाराजांना सांगितलें. महाराज म्हणाले कीं, 'तुम्ही सात रुपये महापूजेकरितां खर्च करा व एक रुपया शिल्लक ठेवा. तुम्ही आज त्या समंधास सांगितलें म्हणजे तो तुम्हांला त्या वेळीं सोडील.' असें सांगितल्यावर त्यानें तें कबूल केलें. नंतर मार्गशीर्ष शुद्ध द्वादशीस महापूजा करण्याचें ठरलें. त्या दिवशीं 'आपणही तिकडेच भिक्षा करणार व गांवांतीलही सर्व मंडळींनीं तिकडेच भोजनास यावें' असें महाराजांनीं सांगितलें. सात रुपयांत सर्व गांवप्रयोजन कसें होणार अशी लोकांना चिंता पडली. पण महाराजांच्या संकल्पशक्तीची त्यांना काय कल्पना ! वैजनाथांच्या सात रुपयांचें सामान आणलें गेलें. लगेच इतर सर्व मंडळींनींही भराभर आपल्या घरचें सामान आणून त्यांत टाकलें. एक हजार

ात्रांचा स्वयंपाक तयार झाला. प्रभूची महापूजा व नैवेद्य आटोपल्यावर ट्टयावर व रस्त्यांवर सुद्धां पात्रें मांडलीं. सर्व मंडळी बसल्यावर वैज- ाथास बरोबर घेऊन महाराज त्या पंक्तींतून एकदा सर्वत्र फिरून आले व ांतर भिक्षेकरितां बसले. अन्नावर महाराजांची छाटी झांकली होती. र्व मंडळी तें अन्न वाढीत होती. त्या दिवशीं दोन हजार मंडळींचें ोजन झालें. शेंकडों मंडळींनीं अन्न वाढून घरीं नेलें व शिवाय ुष्कळ अन्न शिल्लकही राहिलें. गुरुचरित्रांतील भास्कर ब्राह्मणाच्या ीन पात्रांच्या सामग्रींतून चार हजार पात्रें गाणगापुरांत जेवलीं ही ोष्ट त्या दिवशीं सर्वांच्या दृष्टीसमोर उभी राहिली. अन्नाची गोडीही त्या दिवशीं सर्वांना अवर्णनीय अशी वाटली. त्या वेळेपासून वैजनाथांचा खरा अधिकार लोकांना कळून आला.

महाराजांचें दिव्य सामर्थ्य प्रत्यक्ष पाहूनसुद्धां त्यांची अवहेलना करणारी दुर्जन मंडळी त्या वेळीं होती. त्यांनीं नेहमीं महाराजांची निंदा करावी. गाईच्या स्तनाजवळ राहणाऱ्या कृमींना जसें दूध मिळत नाहीं त्याप्रमाणेंच त्यांची अवस्था होती. महाराजांची परीक्षा घेण्याकरितां त्यांनीं एका ब्राह्मणाला पाठविलें. त्यानें आपल्या हाताला चिंध्या गुंडाळल्या व एकदां संध्याकाळीं महाराज स्नानास नदीवर गेले होते तेथें येऊन त्यानें महाराजांना नमस्कार करून विनंति केली कीं, ‘ माझा हात फार ठणकत आहे, तरी कृपा करून कांहीं तरी यावर उपाय सांगावा. ’ हें ब्राह्मणाचें बोलणें ऐकून महाराजांनीं कांहीं औषधाचा लेप हातावर घालण्यास त्या ब्राह्मणाला सांगितलें. तो ब्राह्मण आपल्या कंपूंत येऊन त्यानें महाराजांची यथेच्छ निंदा केली. यांना कांहीं कळत नाहीं, उगीच लोक नादीं लागतात वगैरे वगैरे. देवाला मात्र ही गोष्ट सहन झाली नाहीं. त्या ब्राह्मणानें जो हात बांधून महाराजांना दाखविला होता

तो हात खरोखरच सारखा ठणकूं लागला. त्याला कुष्ठ होऊन तो हात सडत चालला. ही व्यथा सुरू होतांच तो ब्राह्मण महाराजांना शरण आला. पण महाराज म्हणाले, ' आपणांला कांहींच समजत नाहीं. तूं देवाकडे जा. देव काय तें करतील.' शेवटीं तो रोग वाढून त्यांतच त्याचा अंत झाला. साधूंचा छळ केल्याचें हें प्रायश्चित्त !

रोज दुपारीं महाराज भिक्षेकरितां गांवांत जात असत. त्या वेळीं मध्यें कोणीं नमस्कार केला तर महाराजांनीं उपोषण करावें. त्यामुळें महाराज भिक्षेस निघाले असतां नमस्कार करूं नका असें सांगण्याकरितां कोणी-तरी बरोबर असे. दत्तजयंतीचें उपोषण महाराजांना होतें. दुसरे दिवशीं भिक्षेकरितां महाराज निघाले असतां एका यात्रेकरूनें मध्येंच अकस्मात् नमस्कार केला. झालें. त्या दिवशींही पुनः उपोषणच घडलें. पण नित्याच्या कार्यक्रमांत मात्र खंड केव्हांच पडला नाहीं. उपोषणाचे दिवशीं घेतलेंच तर थोडें ताक व एकादें फळ इतकेंच महाराज घेत असत.

नारायणशास्त्री एकसंबेकर म्हणून एक सदाचारसंपन्न विद्वान् ब्राह्मण महाराजांचे दर्शनाकरितां एकदां वाडीस आले. यांच्यावर महाराजांचें प्रेम होतें. कांहीं एखादा विशेष शास्त्रार्थ पाहण्याचा प्रसंग आल्यास यांच्याकडे जाण्यास महाराज लोकांना सांगत असत. हे शास्त्रीबुवा सांगलीस कृष्णातीरीं पाठ प्रवचन करून राहत होते. वाडींत आल्यावर त्यांनीं एक दोन वेळां महाराजांचा तो कार्यक्रम पाहिला आणि स्पष्टपणें महाराजांना विचारलें कीं, ' संन्यास घेतल्यावर लोकांना मंत्रतंत्र सांगणें या उपाधीची जरूर काय ? ' हें भाषण ऐकून महाराज त्या वेळीं कांहीं बोलले नाहींत. नंतर दुपारीं सहज बोलतां बोलतां महाराजांनीं शास्त्री-बुवांना विचारलें कीं, 'तुम्हांला आतां पाठीमागें कांहीं उपाधि नसतांना

संन्यास कां घेत नाहीं ? हा पाठप्रवचनाचा उपद्व्याप तुमच्यासारख्या शास्त्रज्ञाला कशाला पाहिजे ? ' हें ऐकून शास्त्रीबुवा म्हणाले, ' आमचें हें देहप्रारब्ध असें आहे त्याला इलाज नाहीं.' महाराज लगेच म्हणाले, 'तुम्हाला तेवढें देहप्रारब्ध आणि दुसऱ्याला तें नाहीं कीं काय ?' इतकेंच महाराज बोलले. पण त्यावरून आपण विचारलेल्या प्रश्नाचें हें उत्तर आहे अशी शास्त्रीबुवांची खात्री झाली.

श्रीमंत बाळासाहेब कुरुंदवाडकर यांनीं आपल्या मुलाच्या दुसऱ्या कुटुंबास मुलगा होण्याबद्दल महाराजांना उपाय विचारला. महाराजांनीं त्यांना वाडींत नारायण नागबळी करण्यास सांगितलें. पण त्यांनीं आपल्या उपाध्यायाकरितां तो विधि कुरुंदवाडचे घांटावरच केला. पुढें त्यांच्या मुलाला मुलगी झाली. दुसरे खेपेस महाराज आल्यावर बाळासाहेबांनीं असें संकल्पवैषम्य कां झालें म्हणून महाराजांना प्रश्न केला असतां तुम्ही वाडी सोडून दुसरीकडे तें कर्म केल्याचें हें फळ असें महाराज म्हणाले.

प्रोफेसर विजापूरकरांनीं एकदा महाराजांना विचारलें कीं, ' हिंदुस्थानला स्वराज्य मिळण्याची आज स्थिती आहे काय ? ' महाराज म्हणाले, 'स्वराज्य मिळण्यास अजून पुष्कळ अवधि आहे.' महाराजांनीं सांगितल्याप्रमाणें सर्व घडून आलें.

महाराजांना भेटण्याकरितां करवीरचे शंकराचार्य येणार होते. तें सुचविण्यास त्यांचा अधिकारी महाराजांचेकडे आला. त्याला महाराजांनीं स्पष्ट सांगितलें कीं, ' आपण कोणाला या अगर जा कांहींच सांगत नाहीं. शिवाय शंकराचार्यांची व्यवस्था येथें कशी होणार ? तुमच्या हद्दींत आम्ही आहोंत असें वाटत असेल तर आतां कुरुंदवाडच्या हद्दींत जाऊन

राहूं.' हें महाराजांचें निस्पृहतेचें भाषण ऐकून शेवटीं शंकराचार्यांनीं येण्याचें रहित केलें.

सरस्वतीबाई नांवाची एक वेश्या स्त्री विरक्त होऊन वाडीस देवसेवेकरितां राहिली होती. त्या बाई उत्तम गाणार असल्यानें दीक्षित स्वामींच्या आज्ञेनें त्या रोज करुणात्रिपदी म्हणत असत. एकदां त्यांनीं उत्तम तालसुरावर महाराजांचे पुढें करुणात्रिपदी म्हटली. त्यांची भक्ति पाहून महाराजांनीं त्यांना "भावें नमूं श्रीगुरुच्या पदासी' हें गुरुस्तोत्र लिहून दिलें व कांहीं ध्यानाभ्यासही सांगितले. त्याप्रमाणें सरस्वतीबाईनीं आमरण सद्गुरूंच्या आज्ञेप्रमाणें वागून मानव देहाचें सार्थक केलें.

महाराजांच्या पादुका भजनाच्या वेळीं असाव्यात म्हणून नृसिंहसरस्वती प्रभृति मंडळींनीं विनंति केली असतां आजपर्यंत कोणालाही पादुका दिल्या नसतांही मंडळींची भक्ती पाहून महाराजांनीं लांकडाच्या पादुका पायांत घालून दिल्या. त्या पादुकांची पूजा 'यथा देवे तथा गुरौ' या वचनाप्रमाणें नित्य करीत असत. ज्या वेळीं नृसिंहसरस्वती वाडीहून औरवाडला गेले त्या वेळीं त्या पादुकाही त्यांचेबरोबरच तिकडे गेल्या. त्या पादुका वाडीच्या पलीकडे अमरापूर (औरवाड) येथील श्रीअमरेश्वर मठांत सध्यां आहेत.

' यांप्रमाणें महाराजांच्या वात्सल्यामुळें दोन महिनेपर्यंत वाडींतील सर्व लोक आनंदांत होते. इतक्यांत महाराज मार्गशीर्ष कृष्ण सप्तमीस सकाळीं नित्याप्रमाणें श्रीदत्तपादुकांसमोर वंदन करण्याकरितां गेले असतां तेथेंच समाधि लागली व त्या अवस्थेंतच रामेश्वराकडे जाण्याची महाराजांना आज्ञा झाली. लोकांची गर्दी होऊन उगीच उपाधि होईल म्हणून दुपारीं भिक्षेपर्यंत ही वार्ता महाराजांनीं कोणालाच सांगितली नाहीं. दुपारीं भिक्षा झाल्याबरोबर महाराज खालीं श्रीदत्तपादुकांचें वंदन करण्यास

गेले. या वेळीं वंदनाची वेळ नसतां महाराज कसे आले असा लोक विचार करतात न करतात इतक्यांत महाराजांनीं सर्वांना सांगितलें कीं, 'आपणांस जाण्याबद्दल देवाची आज्ञा झाल्यामुळें आतांच आपण वाडी सोडून जाणार आहोंत.' ही बातमी अत्यंत वेगानें गांवांत पसरली. सर्व मंडळी घरेंदारें सोडून महाराजांच्या दर्शनाकरितां देवाकडे धांवत सुटली. देवाचा कट्टा माणसांनीं भरून गेला. प्रसाद घेण्याची फारच गर्दी झाली. संध्याकाळीं पांच वाजेपर्यंत प्रसाद देण्याचें काम चालूं होतें. नंतर बराच वेळ झाला असें पाहून महाराज जाण्याकरितां उठले. 'प्रभूची सेवा अनन्यभावानें करा. एकीनें राहून नित्य दिगंबराचें भजन करा, तुमचें कल्याण होईल' असें सांगून महाराज संगमाच्या रस्त्याकडे वळले. रस्त्यांत गांवांतील सर्व सुवासिनींनीं महाराजांना ओंवाळलें. श्रीदत्तप्रभूंचा, श्रीमहाराजांचा जयजयकार करींत व दिगंबराचें भजन करीत सर्व मंडळी चालली होती. संगमाचे घांटावर आल्यावर नृसिंह सरस्वती व आणखीही कांहीं संन्यासी यांनीं महाराजांना वंदन केलें. नंतर सर्व मंडळींनीं प्रार्थना केली कीं, 'रामेश्वराहून लवकरच परत येऊन या सर्व लेकरांना दर्शन देण्याची कृपा महाराजांनीं करावी.' याप्रमाणें अत्यंत गहिंवरून प्रेमाश्रु ढाळीत सर्व लोकांनीं प्रार्थना केली असतां महाराज म्हणाले कीं, 'आमचें येणें तुमच्या स्वाधीन आहे. तुम्ही भजन जितक्या उत्कट भावनेनें कराल तितकें लवकर येणें होईल.' असें सर्वांना आश्वासन देऊन महाराज नदीपार झाले. सर्व मंडळी हंबरडा फोडून रडूं लागली. 'महाराज! एक वेळ मागें वळून कृपादृष्टीनें आम्हांकडे पाहा तरी हो!' असा सर्वांचा आक्रोश चालू असतांच महाराज पुढें निघून गेले. नंतर बरीच मंडळी तेथून परत फिरली.

वाडीहून निघतांना संध्याकाळ होऊन गेली. म्हणून त्या दिवशीं महाराजांचा मुक्काम कुरुंदवाडचे घांटावरच झाला. तेथें श्रीदत्तदर्शन

करून महाराज घांटावर कांहीं वेळ बसले. बरोबर शें-दोनशें वाडींची मंडळी होतीच. इतक्यांत महाराज घाटावर येऊन उतरल्याची बातमी कुरुंदवाडला समजल्याबरोबर तेथील संस्थानिक व ग्रामस्थ मंडळी महाराजांचे दर्शनास घांटावर आली. नंतर नृसिंह सरस्वतींना वाडीस जाण्याची आज्ञा करून महाराज स्नान करण्याकरितां संगमावर आले. तेथें स्नानाच्या वेळीं सर्वांच्या विनंतीवरून महाराजांनीं आपल्या हातांनीं नदीचें पाणी सर्वांचे अंगावर शिंपडलें. सायंसंध्या करून महाराज कुरुंदवाडच्या घांटावरील दत्तमंदिरांत येऊन बसले. तेथें नित्याप्रमाणें भजन करून वाडीकर मंडळी बहुतेक आपापल्या घरीं परत आली; तरी पांच-पन्नास मंडळी तेथें राहिलीच.

महाराज वाडीस असतांना बाळासाहेब कुरुंदवाडकर रोज महाराजांचे दर्शनास येऊन घटकाभर बसून परत जात असत. महाराज ज्या दिवशीं वाडीहून निघाले त्या दिवशीं बाळासाहेब मिरजेस गेले होते. लगेच एक स्वार पाठवून त्यांना मिरजेहून बोलावून घेतलें. त्यांनीं रात्रींच घांटावर येऊन महाराजांचें दर्शन घेतलें व 'आपलें येणें आजच होणार हें ठाऊक नसल्यामुळें मी मिरजेस गेलों तरी अपराधाची क्षमा व्हावी.' अशी प्रार्थना बाळासाहेबांनीं केली. महाराज म्हणाले कीं, 'तुम्ही येथें नव्हता म्हणूनच आजचा मुक्काम येथें झाला.' हें ऐकून बाळासाहेबांना अत्यंत आनंद झाला. नंतर दुसरे दिवशीं भिक्षा येथेंच व्हावी अशी बाळासाहेबांनीं विनंति केली, ती महाराजांनीं मान्य केली. लगेच मोठ्या उत्साहानें स्वयंपाकाची तयारी सुरू झाली. वाडी व कुरुंदवाडांतील सर्व मंडळींना भोजनाचें निमंत्रण दिलें गेलें. बाळासाहेब, दाजीसाहेब व भाऊसाहेब त्रिवर्गांनीं निरनिराळे स्वयंपाक करून महाराजांना भिक्षा घातली. त्या दिवशीं हजार दीडहजार पान झालें. सर्व व्यवस्था उत्तम

होती. श्रीमंतांचेबरोबर महाराज स्वतः पंक्तींतून हिंडून आले व नंतर भिक्षेस बसले. बरोबर नृसिंहसरस्वती व इतर तीन चार स्वामी भिक्षेस होते. तो थाट अत्यंत प्रेक्षणीय होता.

भिक्षा झाल्याबरोबर महाराज पुढें जाण्यास निघाले. महाराजांना वाजत गाजत नेण्याची राजेसाहेबांची इच्छा होती, पण ती मान्य न करतां महाराज त्वरेनें निघाले. श्रीमंतही महाराजांचे बरोबर पायींच चालत निघाले. नंतर कुरुंदवाडांत प्रथम विष्णूचें व नंतर दत्ताचें दर्शन करून श्रीमंतांचे आग्रहावरून महाराज राजवाडयांत गेले. त्या राजवाडयाचे व राजपुरुषाचे महद्भाग्यामुळें महाराजांची पायधळ त्या वास्तूंत पडून ती पवित्र झाली. महाराज त्या वेळीं म्हणाले कीं, ' आजपर्यंत पुष्कळ राजधान्यांतून जाण्याचा प्रसंग आला पण राजवाडयांत जावयाचें नाहीं व राजकीय भिक्षा घ्यावयाची नाहीं असा आपला नियम असल्यामुळें तसा योग कोठेंच येऊं शकला नाहीं. पण आज बाळासाहेबांनीं मात्र आपल्या प्रेमबलानें आम्हांला तो नियम मोडावयाला लावला.' हें महाराजांचें बोलणें ऐकून बाळासाहेबांना धन्यता वाटली व सर्व मंडळींनाही बाळासाहेबांची गुरुभक्ति व खरी योग्यता कळून आली.

राजवाड्यांतून महाराज लवकरच बाहेर पडले. नंतर देवीचें दर्शन घेऊन महाराज गांवाबाहेर पडले. तेथपर्यंत श्रीमंतांच्या स्वाऱ्या बरोबरच होत्या. तेथूनच परत फिरण्यास महाराजांनीं त्यांना आज्ञा केली. राजेसाहेबांनींही तेथें रस्त्यांतच महाराजांना साष्टांग नमस्कार घातला व अशीच कृपादृष्टि अखंड राहण्याबद्दल प्रार्थना केली. त्या वेळीं त्यांचा कंठ दाटून येऊन डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागले. तें पाहून महाराजांनीं त्यांना सांगितलें कीं, 'गोब्राह्मणांचें संरक्षण करणें हा राजधर्म आहे. त्याचें परिपालन करून श्रीगणपतीची सेवा करीत

राहा, तुमचें पूर्ण कल्याण होईल.' असा आशीर्वाद देऊन महाराज पुढें निघून गेले. सर्व मंडळीही त्या दिशेला नमस्कार करून व महाराजांचें गुणवर्णन करीत आपापल्या स्थानीं परत आली.

कुरुंदवाडहून निघण्यासही संध्याकाळ झाली. तेथून जवळच कुरुंदवाडचे वाडींत श्रीदत्तप्रभूंची फुलबाग आहे. तेथेंच वाडींतील बटु पुजारी यांचा मळा आहे. त्या मळ्यांत त्या वेळीं रात्रीं महाराजांचा मुक्काम झाला. दुसरे दिवशीं त्या मळ्यांतच भिक्षा करून महाराज पुढें निघाले व तेरवाड येथील श्रीमुक्तेश्वरांचे मंदिरांत येऊन त्या दिवशीं मुक्काम केला. तेथें मुक्तेश्वरांचे वंशज बाळाबुवा तेरवाडकर यांच्या विनंतीप्रमाणें त्या दिवशीं तेरवाडास भिक्षा होऊन पुढें निघाले. त्या दिवशीं सायंकाळीं सदलगे या गांवांत विठ्ठलमंदिरांत महाराज येऊन पोंचले. रात्रीं तेथील मंडळींनीं महाराजांचेपुढें तालस्वरांत भजन सुरू केलें. त्या वेळीं एका गृहस्थांनीं 'नमूं आदिरूपा ओंकारस्वरूपा। विश्वाचिया रूपा पांडुरंगा' हा अभंग म्हटला. त्याचा शेवटचा चरण 'तुका म्हणे जेथें नाहीं मी तूं पण। स्तवावें तें कवणें कवणालागीं' हा ऐकत असतांनाच महाराजांचें देहभान नाहींसें होऊन त्यांना समाधि लागली. ही अवस्था तीन तासपर्यंत होती. नंतर समाधि उतरल्यावर सर्व मंडळींना प्रसाद दिला व 'नमूं आदिरूपा' हा अभंग म्हणणाऱ्यास नारळ प्रसाद देऊन महाराज म्हणाले कीं, 'तुकाराम साधूंची योग्यता मोठी आहे. ती त्यांची अभंगवाणी कानांवर पडतांच अनुभवास येते.' ही महाराजांची वाणी ऐकून महाराजांची गुणग्राहकता सर्वांना कळून आली. याप्रमाणें सदलग्याचा कार्यक्रम झाल्यावर दुसरे दिवशीं महाराज माळिकवाड येथें वेदगंगेच्या तीरावर आले. तेथपर्यंत बरीचशी वाडीची मंडळी बरोबर होती व बाळासाहेब कुरुंदवाडकरही प्रत्येक मुक्कामावर लागेल ती कमजास्त व्यवस्था

लावण्याकरितां स्वतः जातीनें हजर असत. वाडीला शतश्लोकी सांगण्यास सुरुवात केली होती, ती येथें वेदगंगातीरावर संपवून सर्व मंडळीस तेथून परत फिरण्यास महाराजांनीं आज्ञा केली. मग मात्र सर्व मंडळी तेथून परतली. जेथें जेथें महाराज जात तेथील देवाची, नदीची स्तुति करून पुढें जाण्याचा महाराजांचा नियम होता. हीं सर्व स्तोत्रें नवीन छापलेल्या महाराजांच्या स्तोत्रादि संग्रहांत दिलेलीं आहेत. तेथून पुढें हिरण्यकेशी नदीतीरावर संकेश्वर या आचार्यमठाचे गांवीं महाराज आले. तेथें स्नानादि आटोपून निघाले ते बेळगांवचे थोडे अलीकडे एका गांवांतील कालकुंद्रीकर यांचे मळ्यांत येऊन उतरले. दुसरे दिवशीं तेथें महाराजांची भिक्षा झाली. कालकुंद्रीकरांनीं त्या वेळीं अन्नसंतर्पण चांगलें केलें. बरीच मंडळी जेवली. तेथून दुसरे दिवशीं निघून शृंगपुरावरून महाराज केंगेरी या गांवीं आले. तेथें चिदंबरदीक्षित महाराज यांचें मोठें स्थान आहे. कर्नाटकांत पेशवाईचे काळांत चिदंबरदीक्षित म्हणून मोठे सत्पुरुष होऊन गेले. यांचे वडील मल्हार दीक्षित. त्यांनीं चिदंबर क्षेत्रांत जाऊन अनुष्टान केलें, तेव्हां त्यांना महादेवांचे प्रसादानें चिदंबर दीक्षित हे पुत्र झाले. जन्मतःच यांच्या कानावर बिल्वदळ व अक्षता होत्या. हे शंकरांचे अवतार होते. त्यांना दोन बायका असून नित्य हजारों मंडळी यांचे घरीं जेवत असत. एका तांब्यांतून लागेल तेवढा पैसा काढून हे खर्चाकरितां देत असत. गुर्लेहोसूर येथें यांनीं अनेक मोठमोठे यज्ञ केले. यज्ञांतील प्रसाद यांनीं शेवटचे बाजीराव यांना दिला होता. तो त्यांनीं घेऊन आपल्या आश्रितांचेजवळ दिला. त्यामुळें त्यांचें राज्यही तिकडेच गेलें. असो. महाराजांनीं येथें चिदंबरदीक्षितांचेवर संस्कृत व प्राकृतही स्तोत्र केलें आहे. येथें असलेले गोव्यांतील रामचंद्र कामत यांनीं भक्ति उत्पन्न होण्यास सुलभ उपाय महाराजांना विचारला असतां महाराजांनीं तो

उपाय नामस्मरण हाच असल्याचें सांगून त्याचें विधानही त्यांना सांगितलें.

तेथून निघून महाराज मलप्रभेचे तीरावर गुर्लेहोसूर या श्रीचिदंबर-दीक्षितांचे गांवीं येऊन पोंचले. तेथील मठांत चिदंबरभक्त मोठे अधिकारी असे कैवल्याश्रमस्वामी राहत होते. त्यांच्या आग्रहामुळें त्या ठिकाणीं महाराजांचा ८।१० दिवस मुक्काम झाला. तेथील मुक्कामांत कर्नाटकांतील एक ब्राह्मण पिशाचपीडेमुळें त्रस्त होऊन महाराजांचेकडे आला. तेव्हां त्याला महाराजांनीं मृत्युंजयाचा जप करण्यास सांगितलें. घरीं आल्यावर त्याच्या अंगांत पिशाचानें संचार करून सांगितलें कीं, 'हा ब्राह्मण आणखी सहा महिन्यांनीं मरणार आहे, मग मृत्युंजयाचा जप कशाला करतां?' हें पिशाचाचें बोलणें ऐकून त्याच्या घरची मंडळी घाबरून महाराजांचेकडे आली व त्यांनीं ती घडलेली हकीकत महाराजांचे कानांवर घातली; तेव्हां महाराजांनीं सांगितलें कीं, 'पिशाचानें सांगितलें तें खरें आहे. तो मृत्यु टळण्याकरितांच त्याला तो जप करण्यास सांगितलें आहे. तरी निष्ठेनें तो जप व्हावा, श्रीदत्तकृपेनें तो मृत्यु टळेल.' हें ऐकून ती मंडळी समाधानानें घरीं गेली.

गुर्लेहोसूर येथें बाबा गर्दे म्हणून प्रसिद्ध वेदान्ती राहत असत. त्यांनीं सिद्धारूढस्वामींबद्दल महाराजांचे पुढें गोष्ट काढली; तेव्हां महाराज रागावून म्हणाले कीं, 'शास्त्राविरुद्ध वर्तन करणाऱ्या या स्वामींना साधू कसें समजावें? भिंतीवर उपनिषदें लिहिणें शास्त्रांत कोठें सांगितलें आहे? असल्यांचें नांवसुद्धां आपल्यापुढें काढूं नका.' हें महाराजांचें रागाचें बोलणें ऐकून गर्दे स्वस्थ बसले.

गुर्लेहोसूरनजीक डोंगरावर यल्लम्मा म्हणून श्रीरेणुकामातेचें स्थान आहे. तेथें दर्शनास जाऊन महाराजांनीं देवीची स्तुति केली. महाराज आले म्हणून तेथील लिंगाईत पुजाऱ्यांनासुद्धां आनंद झाला व त्यांनीं

मोठया उत्सवाप्रमाणें त्या दिवशीं देवीची पूजा बांधून महाराजांचे विषयीं आदरभाव व्यक्त केला. तेथून निघून घटप्रभा, विश्वामित्री या नद्यांच्या तीरांवरून जातां जातां तुंगभद्रातीरावर हंपी क्षेत्रांत विद्यारण्यस्वामींच्या मठांत येऊन महाराज उतरले. तेथील विरूपाक्षाचें मंदिर फार भव्य असून तेथें मोठमोठीं अनेक गोपुरें आहेत. हेंच विजयनगरचें राज्य विद्यारण्यस्वामींनीं स्थापन केलें होतें. तेथून ऋष्यमूक पर्वत, पंपासरोवर, किष्किंधा इत्यादि ठिकाणीं स्नान, दर्शन, स्तुति करून महाराज शेषाचल पर्वतावर येऊन दाखल झाले. तेथें कार्तिकस्वामींचें दर्शन घेऊन स्तुति केली. ें स्तोत्र द्व्यर्थीषडानन स्तोत्र म्हणून स्तोत्रादिसंग्रहांत छापलें आहे. या ठिकाणींच कुमारशिक्षा हा ग्रंथ लिहिला. तेथून बाहुदा, करतोया या नद्यांच्या तीरांवरून भार्गवक्षेत्रांत आले. तेथून श्रीरंग, श्रीशैल्य मल्लिकार्जुन वगैरेंचें दर्शन करून व्यंकोबाचे गिरीवर महाराज येऊन पोंचले. तेथें देवाला प्रत्यक्ष स्पर्श कोणालाही करूं देत नाहींत. त्याकरितां तेथें महाराज मुद्दाम राहिले. पण नंतर व्यंकटेशांनीं पुजाऱ्यांना दृष्टांत दिल्याप्रमाणें त्यांनीं महाराजांचा शोध करून महाराजांना देवापर्यंत नेऊन दर्शन व स्पर्श करूं दिला. नंतर तेथून पुढें कालहस्ती, शिवकांची, विष्णुकांची, पक्षितीर्थ इत्यादि स्थानें पाहत पाहत महाराज पिनाकिनी नदीच्या तीरावर आले. तेथें त्या दिवशीं मुक्काम केला. दुसरे दिवशीं अधिक चैत्र पौर्णिमा क्षौराचा दिवस होता. क्षौर झाल्यावर नदींत बुडी मारण्याइतकेंही पाणी नसल्यामुळें स्नान कसें करावें याचा विचार महाराज करूं लागले; तेव्हां तेथील ब्राह्मणांनीं आम्ही तुम्हांला बुडी मारतां येण्यासारखा खळगा काढून देतों असें सांगितलें. नंतर दुसरे दिवशीं क्षौर झाल्यावर स्नानाकरितां महाराज नदींत उतरले त्या वेळीं नदीचें पाणी एकदम वाढूं लागलें. तें वाढतां वाढतां महाराजांच्या छातीइतकें झालें. नंतर उत्तम प्रकारें बुडी मारून

महाराजांचें स्नान झालें. त्यावेळीं तत्काल पिनाकिनी स्तुतिपर असा एक श्लोक महाराजांच्या मुखांतून बाहेर पडला तो असा—

याधिमासवशाच्चैत्र्यां कृतक्षौरस्य मेल्पका ।
स्नापनायक्षणात्वृद्धा साद्वा सेव्या पिनाकिनी ॥ १ ॥

क्षौर झालेल्या दिवशीं उपोषणच असल्यानें भिक्षा झाली नाहीं. तेथून चिदंबरक्षेत्रीं येऊन चिदंबरेश्वराची स्तुति केली. तेथें सुंदरशास्त्री म्हणून एक शास्त्री संस्कृत भाषेचा अभिमान बाळणारे होते. प्राकृत ग्रंथ लहान मुलांचेकारितां आहेत अशी त्यांची समजूत होती. त्यांनीं महाराजांना आग्रहानें ठेवून घेतलें. नंतर बोलतां बोलतां महाराज त्यांना म्हणाले कीं, 'शास्त्रज्ञत्वाचा अभिमान असेल तर भक्ति कधींच उत्पन्न होणार नाहीं. आणि भक्ति नाहीं तर देवाची कृपा नाहीं आणि मुक्तीही नाहीं. कारितां श्रीदत्तकृपा व्हावी म्हणून तुम्ही श्रीगुरुचरित्र वाचन करीत चला. व्यर्थ आयुष्य घालवूं नका' हें महाराजांचें म्हणणें मान्य करून त्यांनीं संस्कृताभिमान सोडून ते मराठी गुरुचरित्र वाचूं लागले.

याप्रमाणें महाराजांचा मुक्काम चिदंबरक्षेत्रांत असतां कोणीतरी दीड शहाण्यानें महाराज समाधिस्थ झाले अशी खोटीच बातमी उठविली. वाडीच्या मंडळींना ही बातमी ऐकून वाईट वाटलें व ती मंडळी नृसिंह-सरस्वतींची आज्ञा घेऊन महाराजांचा शोध करण्यास निघाली. ती मंडळी प्रथम थेट रामेश्वरास गेली. तेथें महाराजांचा शोध न लागल्यामुळें तंजावरास आली; पण तेथेंही जेव्हां कांहींच पत्ता लागेना तेव्हां ती बातमी खरी असावी असें त्यांना वाटूं लागलें. ही गोष्ट महाराजांना योगसामर्थ्यानें समजण्याबरोबर ते सुंदरशास्त्रींना सांगून तेथून निघाले आणि मायावरमूच्या बाजारांत वाडीच्या मंडळींना अकस्मात् भेटले. महाराज दिसल्याबरोबर त्या सर्व मंडळींना वर्णनातीत आनंद झाला.

नंतर महाराजांनीं विचारल्यावरून येण्याचें कारण त्या मंडळींनीं सांगितलें. तेव्हां महाराज म्हणाले कीं, 'यापुढें तुम्ही अशा खोट्या बातम्यांवर विश्वास ठेवूं नका. हें शरीर पडण्याची जागा सर्वांना अगोदर माहीत होईल.' असें सांगून त्या मंडळींसह कावेरीतीरावर येऊन मुक्काम केला. नंतर भिक्षा आटोपून वाडीकर मंडळींना वाडीस पाठवून दिलें. तेथून तंजावर येथें ज्येष्ठ शुद्ध एकादशीस येऊन व तेथें दोन दिवस राहून पुढें रामेश्वरीं जाण्याकरितां निघाले. तेथून श्वेतारण्य, कुंभकोण, मदुरामीनाक्षी इत्यादि क्षेत्रें पाहत पाहत रामेश्वरीं येऊन पोंचले. तेथें एक दिवस मुक्काम झाला. तेथें कांहीं तंजावरची मंडळी आली होती. त्यांच्या विनंतीप्रमाणें तंजावरास चातुर्मासाकरितां येण्याचें महाराजांनीं मान्य केलें. नंतर रामेश्वराहून आषाढशुद्ध द्वितीयेस निघाले ते दोन अडीचशें मैलांचा प्रवास १०।१२ दिवसांत करून आषाढ शुद्ध चतुर्दशीचे दिवशीं तंजावरास येऊन पोंचले. तंजावरास विमलांबा देवीचें रम्य स्थान पाहून महाराजांचें मन रमलें. तेथें कावेरी नदी असून जवळच संध्या मठ आहे. तेथें महाराज राहिले. कावेरी नदीचें नांव येथें वेणू नदी असें आहे. या वर्षीचा चातुर्मास तंजावर येथेंच झाला.

## चातुर्मास १७ तंजावर संध्यामंडप—शके १८२९

शके १८२९ आषाढ पौर्णिमेपासून तंजावर येथें महाराजांचा चातुर्मास सुरू झाला. महाराजांचें यथाशास्त्र आचरण व पूर्ण ज्ञान पाहून तेथील लोक त्यांना देवाप्रमाणें मानूं लागले. ब्रह्मावर्तास श्रीगुरुसंहिता म्हणजेच संस्कृत समश्लोकी गुरुचारित्र महाराजांनीं केलें होतें. त्या ग्रंथावर या ठिकाणीं चूर्णिका म्हणजे मूळ ग्रंथाचा गद्यात्मक गोषवारा लिहिण्याविषयीं देवाची आज्ञा झाल्यावरून ती चूर्णिका येथें लिहिली.

एकदां एक दिगंबर असे तेजस्वी साधु पुरुष महाराजांचेकडे आले.

रात्रभर त्यांचें व महाराजांचें बोलणें झालें. पहांट झाल्याबरोबर ते कोठें निघून गेले तें कांहीं समजलें नाहीं.

एकदां तेथीलच एका ब्राह्मणाची स्त्री महाराजांचे दर्शनास आली. तिला बरींच वर्षें दम्याचा विकार असल्यामुळें ती अत्यंत गांजून गेली होती. तिला गांडाबुवांनीं महाराजांचें चरणतीर्थ दिलें. तिनें तीर्थ घेतलें मात्र, एकदम जोरानें तिला वांति झाली. त्या वेळीं सर्व कफ आपोआप बाहेर पडला. नंतर हळूहळू ती त्या असाध्य रोगापासून मुक्त झाली.

तंजावर जवळच एका खेड्यांत एक ब्राह्मण राहत होता. त्याच्या भावाला दुष्टसंगति लागल्यामुळें तो घरांतील पैसे वाटेल तसें खर्च करूं लागला. कोणाचेंही ऐकेना. ही आपल्या भावाची अवस्था पाहून तो ब्राह्मण महाराजांना शरण आला व त्यानें भावाची दुःस्थिति महाराजांना सांगून त्याची सन्मार्गाकडे प्रवृत्ति होण्याकरितां कांहीं तरी उपाय सांगण्याविषयीं महाराजांना विनंति केली. महाराजांनीं त्याला एक यंत्र तयार करून देऊन त्याची रोज पूजा करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तो ब्राह्मण घरीं जाऊन नित्य त्या यंत्राची पूजा करूं लागतांच त्याचा भाऊ दुष्ट संगती सोडून देऊन महाराजांचा निस्सीम भक्त झाला.

तंजावरांत महाराज अवधूतराव यांचे घरीं भिक्षेस जात असत. त्यांचे बंधु कुप्पुस्वामी फार भाविक होते. त्यांना महाराज एके दिवशीं म्हणाले कीं, 'तुम्हाला काय मागणेचें तें मागून घ्या.' तेव्हां कुप्पूस्वामी म्हणाले, 'बाकी कोणतीच इच्छा नाहीं. फक्त आमचें आपणांस स्मरण नेहमीं असावें म्हणजे आमचा उद्धार होईल. इतकेंच आपल्या पायांजवळ मागणें आहे.' महाराज म्हणाले कीं, 'ज्याच्या घरचें अन्नाचें एक शीत जरी पोटांत गेलें तरी तो देखील अविस्मरणीय आहे. मग तुमचें तर अन्न

चातुर्मास आमचे पोटांत गेलें, तुमचें विस्मरण आम्हाला कसें होईल ?' कुप्पूस्वामी म्हणाले कीं, 'अनेक जीवांचें अन्न आपल्या उदरांत आहे पण त्या सर्वांपेक्षां आमचें विशेष स्मरण आपणांस राहिलें तरच आमचें पूर्ण कल्याण होईल.' याप्रमाणें त्यांची भक्ति पाहून 'तथास्तु' म्हणून महाराजांनीं त्यांना आशीर्वाद दिला. त्याप्रमाणेंच पुढें त्यांना वेळोवेळीं महाराजांचे दृष्टान्त होत असत. कुप्पूस्वामींचा रामू नांवाचा एक लहान मुलगा होता. तो रोज महाराजांचे दर्शनास येई व नमस्कार करून स्वतःच नारायण म्हणून तेथें उभा राही. रोज त्याला महाराज खडीसाखरेचा खडा देत असत. तो कर वसूल करूनच तो परत जात असे. असाच एकदां तो दर्शनास आला त्या वेळीं तेथें खडीसाखर नव्हती म्हणून महाराजांनीं त्याला गुळाचा खडा दिला. तो रामूनें घेऊन लगेच महाराजांच्या अंगावर फेंकला. तेव्हां 'रामनें आम्हांला मारलें मारलें' म्हणून थट्टेनें महाराज ओरडले. लगेच रामूचे वडील त्याला मारण्याकरितां धांवलेले पाहून महाराज त्यांना म्हणाले, 'नका नका' लेकराला मारूं नका; इतका मार देण्यासारखा त्यानें काय अपराध केला आहे ? सोडा त्याला' आणि याचें आयुष्य अवघे चारच महिने राहिलें आहे तरी याच्यावर राग करूं नका.' असें त्या वेळीं अत्यंत कनवाळूपणानें महाराज म्हणाले. पुढें तो मुलगा खरोखर चारच महिन्यांनीं देवाघरीं गेला.

या ठिकाणीं नरसोबावाडीहून पुजारी मंडळींचें महाराजांना एक पत्र आलें. वाडींत प्लेग सुरू झाल्यामुळें कांहीं उपाययोजना त्याच्या शांतीकरतां करण्याविषयीं त्या पत्रांत पुजाऱ्यांनीं विनंति केली होती. त्याप्रमाणें महाराजांनीं दत्तप्रभूंची प्रार्थना करतांच प्रभू म्हणाले कीं, 'गंगातीरावरून या लोकांना सन्मार्ग दाखविण्याकरितां तुम्ही दोन वेळां

वाडीस येऊनसुद्धां तेथील लोकांनीं आपलें आचरण सुधारलें नाहीं. सबब यांना यावेळीं चांगलीच शिक्षा आम्ही करणार आहोंत. तुम्ही आतां मध्यें पडण्याचें कारण नाहीं.' हा प्रभूंचा आदेश महाराजांनीं वाडीकर मंडळींना कळविला व 'या वेळीं बरीच मंडळी मृत्युमुखीं पड-तील; कांहीं दिवस वाडी सोडावी,' असें कळविलें. त्या वेळीं वाडीवर फार मोठीं संकटें आलीं. टांगेवाले व पुजारी यांचें भांडण इतकें विकोपाला गेलें कीं टांगेवाल्यांचा पुढारी परसू जोगळे यानें अनेक लोकां-बरोबर मारामारी केली, घरांना आगी लावल्या. त्याच्या भीतीनें पुष्कळ लोकांना गांव सोडण्याची देखील पाळी आली. महाराजांची टवाळी कर-णाऱ्या एका गृहस्थाला तर जीवाच्या भीतीनें पळूनच जावें लागलें. अशीं संकटें भोगूनही माणसाचें अंतस्तिमिर जात नाहीं हा दैवदुर्विला-सच म्हटला पाहिजे.

तंजावरलाच महाराजांनीं कृष्णालहरीवर संस्कृत टीका लिहिली. भाद्रपद पौर्णिमेस चातुर्मास संपल्यावर अवधूतरावांचे विनंतीवरून त्यांचे घरीं दुसरे दिवशीं भिक्षा करून महाराजांनीं तंजावर सोडलें. जातां जातां एका ब्राह्मणाला महामारीचा उपद्रव सुरू झालेला महाराजांनीं पाहिला. लगेच त्याला औषधानें बरा करून घरीं पाठविलें. नंतर सत्यमंगल, जंबुकेश्वर, कोटिलिंग इत्यादि क्षेत्रें पाहत पाहत कावेरीतीरावर श्रीरंग मुक्कामीं शृंगेरी मठाचे शंकराचार्य आहेत असें समजल्यावरून त्यांचे दर्शनार्थ महाराज श्रीरंगमुक्कामीं आले. तेथें गेल्यावर श्रीशंकरा-चार्यांच्या सन्निध जाऊन महाराजांनीं त्यांना वंदन केलें. महा-राजांना पाहिल्याबरोबर आचार्य म्हणाले कीं, 'आपल्या दर्शनाची पुष्कळ दिवसांची असलेली इच्छा ईश्वरानें आज पूर्ण केली. नंतर महाराजांनीं आचार्यांची व शारदाम्बेची स्तुति केली. परत

आचार्यांनींहीं महाराजांचे वर्णनपर स्तोत्र केलें व महाराजांच्या भिक्षेची व्यवस्था केली. भिक्षा वगैरे आटोपल्यावर आचार्यींनीं सर्व लोकांना उद्देशून महाराजांचेबद्दल चार शब्द सांगितले ते असे— ‘ शिष्यमंडळीहो ! तुम्ही आज येथें आलेल्या या महान् संन्याशांना ओळखलें नाहीं. करितां दोन शब्द त्यांचेबद्दल आम्ही सांगतों. हे प्रत्यक्ष दत्तप्रभूच मातापित्यांच्या अत्यंत पुण्याईनें त्यांच्या पोटीं आले. आद्य शंकराचार्यांच्याप्रमाणेंच हे धर्मसंस्थापनेचें कार्य करीत आहेत. वर्णाश्रमधर्माचें परिपालन कडकडीतपणानें हे करीत असून अनेक लोकांचा उद्धार यांचेकडून झालेला आहे. आसेतुहिमाचल पायानेंच सर्व यात्रा करून यांनीं कर्म, उपासना व ज्ञान यांचा अधिकारी जीवांना उपदेश करून त्यांना कृतार्थ केलें आहे. करितां यांना पूर्ण आयुष्य लाभून यांचे हातून धर्मस्थापनेचें कार्य नित्य घडो, एवढीच परमेश्वराजवळ आमची प्रार्थना आहे. ’ याप्रमाणें प्रत्यक्ष आचार्यांचें महाराजांचे गौरवपर भाषण ऐकल्याबरोबर सर्व मंडळींनीं महाराजांना साष्टांग नमस्कार घातले. नंतर महाराजांना आचार्य म्हणाले कीं, ‘आद्य शंकराचार्यांचें जमस्थान कालटी म्हणून आहे. तेथें त्यांच्या मूर्तीची स्थापना करण्याकारितां आपण जात आहोंत.’ याप्रमाणें आचार्यांचें भाषण ऐकून महाराज म्हणाले कीं, ‘ आपण वर्णन केल्याप्रमाणें आपली तितकी योग्यता नाहीं. आपल्यामुळेंच या आचार्यपीठास शोभा आली. आपला सत्यसंकल्प ईश्वर पूर्ण करील. ’ याप्रमाणें परस्परांचीं भाषणें ऐकून सर्व मंडळींनीं उभयतांचा जयजयकार केला व उभयतांना दंडवत नमस्कार घातले.

आचार्यांची परवानगी घेऊन महाराज सत्यमंगल गांवीं आले. तेथें देवाचें सांगणें झालें कीं, ‘कावेरी तीरावरच संचार करावा. पुढील भागांत

संगमावर महाराज कार्तिक शुद्धांत आले. तेथेंच कार्तिक मासांतील क्षौर होऊन १९।२० दिवस मुक्काम झाला. तेथें असतांना गुंटूर जिल्ह्यापैकीं अमरावती गांवांतील लक्ष्मणशास्त्री नांवाचे गृहस्थ आले. त्यांच्या मुलाच्या व मुलीच्या नाकांत व्रण झाल्यामुळें त्यांना अत्यंत त्रास होत होता. त्यावर कांहीं उपाययोजना व्हावी अशी लक्ष्मणशास्त्रींनीं महाराजांना विनंति केली. महाराजांनीं त्यांना आपल्याजवळचें वाकेरीचें भात देऊन तें उगाळून दोघांच्याही नाकांस लावण्यास सांगितलें. त्याप्रमाणें कांहीं दिवस करतांच त्या व्रणाच्या त्रासांतून तीं मुलें कायमचीं मुक्त झालीं.

भवानी गांवाहून महाराज कार्तिक मासाचे अखेरीस निघाले ते करूर स्टेशनपासून कावेरी तीरावर नेलोर या गांवीं श्री. सदाशिव ब्रह्मेंद्र-स्वामीमहाराजांची जिवंत समाधि आहे तेथें येऊन पोंचले. त्या समाधीस वंदन करून स्तोत्रही केलें. सदाशिव ब्रह्मेंद्रस्वामिमहाराजांचा अधिकार फार मोठा होता. 'परतो व्युत्थान' असणाऱ्या सहाव्या ज्ञानभूमिकेपर्यंत ते पोंचले होते. 'स्वानंदरसोन्मत्तः स्वांगं विस्मृत्य यो नरी नर्ति' इत्यादि कांहीं श्लोकांचें सदाशिवब्रह्मेंद्रस्तोत्र महाराजांनीं केलेलें आहे. शृंगेरीच्या शंकराचार्यांनींही यांचें स्तोत्र केलें आहे. यांनीं ब्रह्मसूत्रवृत्ति व योग-सुधाकर असे दोन ग्रंथ केलेले छापले आहेत. या ग्रंथांच्या प्रस्तावनांतून त्यांचें चरित्र दिलेलें आहे. एक दोन दिवस त्या स्थानांत मुक्काम करून महाराज तंजावरास परत आले. दत्तजयंतीचा उत्सव अवधूतराव यांचेकडे झाला. तेथून मार्गशीर्ष वद्यांत भवानी गांवीं भेटलेल्या लक्ष्मणशास्त्रींच्या गांवीं अमरावतीस आले. त्यांच्या मुलामुलींच्या नाकांतील व्रण तपासून त्यांना वाकेरीचें भात आणखी आणवून देणेची व्यवस्था केली.

तेथून फिरत फिरत चिदंबर क्षेत्रावरून त्रिपुरापुरास आले. नंतर कालहस्तीवरून श्रीशैल्यपर्वताच्या पायथ्याशीं कृष्णातीरीं येऊन नंतर

समुद्रतीरानें संचारास आरंभ झाला. तेथून फिरत फिरत कृष्णातीरावर एका गांवीं फाल्गुन शुद्ध चतुर्दशीस सायंकाळीं महाराज येऊन पोंचले. दुसरे दिवशीं पौर्णिमेस क्षौर होतें. गांवांत जाऊन कोठेंतरी राहण्याकरितां महाराज जागा शोधूं लागले. तेव्हां त्या गांवच्या लोकांनीं कांहींच साहाय्य न करतां 'संन्यास घेऊन दारोदार कशाला हिंडतां? तुम्ही राहणारे कोठले? तुमचे नांव सांगा' याप्रमाणें महाराजांची टिंगलच केली. महाराज कांहीं न बोलतां गांवाबाहेर कृष्णातीरीं एका झाडाखालीं येऊन राहिले. दुसरे दिवशीं क्षौर विधीची अद्यापि कांहींच तजवीज झाली नाहीं. लोक सरळ बोलायला देखील राजी होईनात. तें पाहून महाराजांनीं श्रीकृष्णामातेपुढेंच आपलें गाऱ्हाणें मांडलें. महाराज म्हणाले कीं, 'माते! आपल्याविषयीं आम्ही इतका अभिमान बाळगीत असतां आपणांस या देहाचा कांहींच अभिमान नाहीं काय? उद्यां या गांवांत जर क्षौराची तजवीज झाली नाहीं तर पुढें यावज्जीव आपण क्षौर करणार नाहीं व दंडत्याग करून इच्छेप्रमाणें आपण कोठेंही फिरत राहूं. आजपासून आपली आज्ञा पाळण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं.' याप्रमाणें प्रेमकलह करून महाराज प्रार्थना करून निजले. श्रीकृष्णामातेनें स्वप्नांत महाराजांना दर्शन देऊन सांगितलें कीं, 'उद्यां क्षौरविधीची सर्व व्यवस्था होईल. मला तुमच्याबद्दल पूर्ण अभिमान आहे.' हें मातेचें भाषण ऐकून महाराजांनीं स्तुति केली व नंतर श्रीकृष्णामाता गुप्त झाली. नंतर गांवांतील सर्व प्रमुख लोकांना एकाच वेळीं त्याच रात्रीं स्वप्न पडलें. स्वप्नांत कृष्णामातेनें त्यांना भयंकर स्वरूप दाखवून रागानें सांगितलें कीं, 'दुष्टांनो! मोठे तपस्वी संन्यासी तुमच्या गांवीं आले असतां तुम्ही त्यांना उतरण्याकरितां जागासुद्धां दिली नाहीं. उलट त्यांची निंदा केली. यामुळें तुमच्यावर लवकरच मोठें संकट येईल; करितां तुम्ही त्या स्वामींना

शरण जाऊन त्यांची कृपा संपादन करा व उद्यां त्यांच्या क्षौराची व्यवस्था करा म्हणजे तुमचें कल्याण होईल. असें न केल्यास सर्वांचा नाश होईल.' असें स्वप्न पडतांच सर्व लोक खडबडून जागे झाले व त्यांनीं एकमेकांना आपलें स्वप्न सांगितलें. सर्वांना एकदम एकसारखेंच स्वप्न पडलेलें पाहून सर्व मंडळी घाबरून गेली. सकाळीं थोडें दिसूं लागतांच ती सर्व मंडळी मिळून कृष्णातीरावर महाराजांचा शोध करीत आली. तेथें एका झाडाखालीं महाराज स्वस्थ बसलेले दृष्टीस पडतांच सर्व लोकांनीं साष्टांग नमस्कार करून विनंति केली कीं, 'आमचें पाप आड आल्यामुळें काल आपला आदरसत्कार न करतां आपली निंदा करण्याची दुर्बुद्धि आम्हांला झाली; तरी आमचे अपराध पोटांत घालून आमच्याकडून सेवा करवून घ्यावी.' या त्या सर्व मंडळींचा हा विशेष आग्रह पाहून महाराज उठून त्या गांवांत गेले. नंतर तेथें त्या दिवशीं क्षौरविधि यथाशास्त्र झाला. नंतर त्या गांवांत पंधरा दिवस मुक्काम झाला. सर्व लोकांनीं महाराजांची सेवा करून आपल्या अपराधाचें परिमार्जन केलें. तेथून महाराज कृष्णातीरानें फिरत फिरत मोगलाईत कोटिलिंग क्षेत्रांत आले. तेथें दहा दिवस वास्तव्य करून पुनः संचारास निघाले असत फिरत फिरत मुक्तीश्वरपुर म्हणजे मुक्त्याला या गांवीं येऊन पोंचले. मद्रास इलाख्यापैकीं कृष्णा जिल्ह्यांतील नंदीगड तालुक्यांत हा गांव कृष्णातीरावर आहे. येथें त्या वर्षी चातुर्मास करावा असें महाराजांनी ठरविलें.

## चातुर्मास १८ मुक्त्याला–शके १८३०

मुक्त्याला येथील ब्राह्मण सदाचारसंपन्न, विद्वान् आहेत हें पाहून महाराजांना तें स्थान पसंत पडलें. तेथें सर्व तेलंगी ब्राह्मण राहत असू

त्यांच्या स्त्रियासुद्धां उत्तम संस्कृतज्ञ आहेत. तेथील लोकांची भाषा जरी तेलगु व द्राविडी होती तरी संस्कृत भाषा पुष्कळ लोकांना येत अस-ल्यामुळें महाराजांना कांहीं अडचण भासली नाहीं. महाराजांचें अगाध ज्ञान पाहून तेथील सर्व मंडळींच्या मनांत त्यांच्याविषयीं आदर उत्पन्न झाला. तेथेंच शके १८३० आषाढ पौर्णिमेस महाराजांनीं व्यासपूजा करून चातुर्मास केला. तेथें विशेष कोणी मंडळींचें फारसें येणें नसल्यानें महाराजांना विश्रांतीही चांगली मिळाली. तेथील मुक्कामांतच युवशिक्षा, वृद्धशिक्षा व स्त्रीशिक्षा हे ग्रंथ महाराजांनीं केले. तेथून चातुर्मास संपल्यावर भाद्रपद वद्यांत निघाले ते ताडवाईवरून फिरत फिरत नागेश गांवीं आश्विन वद्यांत आले. तेथून निघून दिवाळीच्या अमा-वास्येस हंसलादेवीसन्निध आले. येथें कृष्णा नदी व समुद्र यांचा संगम झाला असून या स्थानास कृष्णासागर असें नांव आहे. तेथें तूळ-संक्रांतीनिमित्त स्नान करून महाराज पुढेंही ८।१० कोस गेले. तेव्हां सप्तगोदावरीकडे जाण्याविषयीं महाराजांना देवांचें सांगणें झालें. त्या आज्ञेप्रमाणें महाराज तेथून परतून नागेश क्षेत्रांत संन्याशाकरितां असलेल्या मठांत येऊन राहिले. तेथून निघून मच्छली बंदरासमीप कृष्णा-जिल्ह्यांतील पेडकल्लापल्ली या गांवीं येऊन दोन दिवस राहिले. नंतर सप्तगोदावरीकडे गेले. त्या प्रांतांत संन्याशांना फार मान आहे. लोकही मोठे श्रद्धाळू आहेत. गोदातीरीं येऊन स्नान उरकून गोदावरीची स्तुति केली. सात मुखांनीं समुद्रास गोदावरी मिळत असल्यानें या स्थानास सप्तगोदावरी असें नांव पडलें आहे. १ राजमहेंद्रीजवळ वासिष्ठ कोटिलिंगस्थान, २ कौशिका, ३ गौतमी, ४ वृद्ध गौतमी, ५ भारद्वाजा, ६ आत्रेया, ७ तुर्या अशीं त्या सप्त प्रवाहांचीं

नांवें आहेत.

कार्तिक वद्यांत महाराजांना देवांनीं सांगितलें कीं, 'आतां सरळ काश्मीरकडे चलावें.' हें ऐकून महाराजांनीं देवांना स्पष्टच सांगितलें कीं, 'आपण कांहीं काश्मीरकडे जाऊं इच्छीत नाहीं. देवाला वाटत असेल तर तंतुक किंवा गंगानुजाप्रमाणें हा देह कोठेंही नेऊन ठेवावा.' हें महाराजांचें बोलणें ऐकून देव म्हणाले कीं, 'काश्मीरमध्यें जाण्याचें तुम्ही कां टाळतां? तेथें सगळे गौड लोक राहतात म्हणून संकोच वाटतो कीं काय? आतां तुम्हांला वर्ण, आश्रम, जाति हा संकोच धरण्याचें कारण काय?' हें ऐकून महाराज कांहींच बोलले नाहींत. आणि काश्मीरकडे न जातां गोदातीरींच संचार करूं लागले. वेदवाड-पल्ली या गांवीं येऊन तेथेंच दुसरे दिवशीं दत्तजयंती केली. हें गांव राजमहेंद्रीजवळ आहे. तेथून हळूहळू कोगूर, पालर इत्यादि गांवांवरून राजमहेंद्रीस येऊन पोंचले. तेथें पौष पौर्णिमेचें क्षौर झालें. तेथून जवळच परमानंदस्वामी म्हणून उत्तम संन्यासी होते. त्यांनीं बोलावल्यामुळें नावेंतून त्यांच्या भेटीस जाऊन आले. ती नाव त्या दिवशीं ब्राह्मणच चालवीत होते. या वेळीं महाराजांच्या बरोबर ब्रम्हानंदसरस्वती होते. राजमहेंद्रीस येते वेळीं कोगूरगांवीं त्यांची भेट झाली होती. त्या वेळीं त्यांनीं महाराजांना विनंति केली कीं, 'आपली भेट व्हावी ही पुष्कळ दिवसांची इच्छा ईश्वरकृपेनें आज पूर्ण झाली. आतां आपण राजमहेंद्रीस येऊन पुढें जावें. तेथें आचार्य मठांत आपल्या हस्तेंच श्रीदत्तमूर्ति व पादुका यांची स्थापना करण्याची उत्कट इच्छा आहे. तरी आपली अनुमति असावी.' हें ब्रह्मानंदांचें बोलणें महाराजांनीं मान्य केल्यावर ब्रह्मानंद पुढें राजमहेंद्रीस निघून गेले.

महाराज नंतर पौष वद्यांत पीठापूर या गांवीं आले. तेथेंच श्रीपाद-श्रीवल्लभांचा जन्म झाला. तें जन्मस्थान महाराजांनींच तेथें गेल्यावर

लोकांना दाखवून दिलें. तोंपर्यंत त्या स्थानाची तेथील लोकांनाही माहिती नव्हती. त्या जन्मस्थानीं महाराजांनीं पादुकांची स्थापना केली. त्या गांवांत कांहीं ब्राह्मण श्रीपाद या आडनांवाचेच आहेत.

पीठापुराहून महाराज पौष अखेर निघाले ते कोकोनाडा येथें येऊन राहिले. दर्शस्नान तेथेंच झालें. या ठिकाणींच नरसोबावाडीची मंडळी महाराजांना भेटली. वाडीची पुजारी मंडळी महाराजांना आणण्याकरितां निघाली होती. ती कोकोनाड्यास येऊन रस्त्यानें 'दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा' असें भजन करीत महाराजांचा शोध करीत चालली होती. मधून मधून देवाचा व महाराजांचा जयजयकारही करीत होती. तो ओळखीचा आवाज ऐकून महाराज बाहेर एका झाडाखालीं येऊन उभे राहिले आणि 'नारायण नारायण' म्हणून मोठ्यानें म्हणूं लागले. तो आवाज ऐकून सर्व वाडीकर मंडळी तेथें येऊन पाहतात तों प्रत्यक्ष महाराजांची स्वारी उभी. आपल्या श्रमाचें चीज झालेलें पाहून सर्व मंडळींना अत्यंत आनंद वाटून त्यांनीं महाराजांना साष्टांग नमस्कार घातले. याप्रमाणें महाराजांचे दर्शनानें आनंदित होऊन वाडीकरमंडळी तेथें राहिली. एके दिवशीं महाराजांची समाधि लागली व दत्तप्रभू त्यांच्या द्वारां वाडीकरांना उद्देशून बोलूं लागले कीं, 'तुम्हांला आचरण सुधारण्या-बद्दल या स्वामींच्याकडून अनेक वेळां सांगितलें तरी तुम्ही आपला आचार सुधारीत नाहीं; तरी आतां या स्वामीस आम्ही काश्मीरला पाठवून देणार आहोंत.' हें भाषण पुजाऱ्यांनीं ऐकल्याबरोबर त्यांनीं नमस्कार करून प्रार्थना केली कीं, 'आम्ही आपलीं लेंकरें आहोंत. आमच्या अपराधांची क्षमा करून आमच्याकडून सेवा घ्यावी. आपल्या आज्ञेप्रमाणें आम्ही वागूं.' असें पुजाऱ्यांनीं सांगितल्यावर थोडया वेळानें महाराज देहभानावर आले. नंतर पुजाऱ्यांना चांगल्या वर्तनानें राहण्याबद्दल ताकीद करून त्यांना परत पाठवून दिलें.

शृंगेरी मठाचे शंकराचार्य महाराजांचा मोठा आदर ठेवीत असत. त्यांनीं महाराजांची भेट झाल्यावेळीं महाराजांनीं केलेले ग्रंथ कांहीं बरोबर असल्यास मागितले. तेव्हां बरोबर कांहींच ग्रंथ नव्हते म्हणून महाराजांनीं एक 'मंत्रगर्भ स्तोत्र' तेवढें आचार्यांना लिहून दिलें. तें पाहून अत्यंत संतोष होऊन, मागाहून पुस्तकें पाठविण्यास आचार्यांनीं महाराजांना सांगितलें. पुढें दत्तमाहात्म्य, गुरुचरित्र वगैरे ग्रंथ शृंगेरीस पाठविले. तसेंच एक स्तोत्र करून तें आचार्यांचेजवळ राहणारे ब्रह्मानंदसरस्वती यांचे जवळ दिलें व तें आचार्यांना वाचून दाखविण्यास सांगितलें.

ब्रह्मानंदसरस्वतींच्या विनंतीवरून पूर्वी कबूल केल्याप्रमाणें महाराज राजमहेंद्रीस आले. तेथें आचार्यांच्या मठांत मुक्काम झाला. ब्रह्मानंदसरस्वतींनीं त्या ठिकाणीं माघ पौर्णिमेच्या दिवशीं त्रिमुखी दत्तमूर्तीची व दत्तपादुकांची स्थापना महाराजांच्या हातानें करविली. महाराज त्या वेळीं म्हणाले कीं, 'आजपर्यंत एकमुखी दत्तमूर्तींच्याच स्थापना त्या त्या ठिकाणीं केल्या, पण आज मात्र ब्रह्मानंदांचे आग्रहानें त्रिमुखी दत्तमूर्तीची स्थापना केली. मूर्तीची स्थापना झाली त्या दिवशींच एक पिशाचग्रस्त बाई तेथें येऊन ओरडूं लागली. तिला महाराजांनीं मंत्र सांगितला; त्याचा जप करून ती त्रासांतून मुक्त झाली.

ब्रह्मानंदसरस्वती मूळ तेलंगण प्रांतांतील राहणारे. बेझवाडयाजवळ मंगळगिरी या गांवांत गोविंदराजू या घराण्यांत यांचा जन्म झाला. यांना पूर्वी रामचंद्र ऊर्फ रामाप्पा असें म्हणत असत. ते पूर्वाश्रमांत असतांना वाडीस येत. त्या वेळीं तेथें महाराजांची भेट पूर्वाश्रमांत असतांना झाली होती. पुढें संन्यास घेऊन त्यांनीं सर्व यात्रा केल्या. पुनः कोगूरगांवीं महाराजांची व ब्रह्मानंदांची भेट झाली. नंतर त्यांनीं मुद्दाम महाराजांच्या हस्तें राजमहेंद्रीस वरीलप्रमाणें स्थापना केली. भक्तवत्सल हें त्या दत्ताचें

नांव ठेवलें. महाराज कोगूर येथें असतांना गुरुमहाराज नारायणस्वामी समाधिस्थ झाल्याची वार्ता समजली. त्या वेळीं दंडस्नान इत्यादि विधि केला. राजमहेंद्रीस लोकांचा उपसर्ग महाराजांना फार होऊं लागल्यामुळें तेथून नदीच्या पलीकडे महाराज गेले. तेथून इच्छेश्वर, भीमेश्वर इत्यादिकांचें दर्शन करून पुढें निघून गेले. केव्हां केव्हां महाराजांनीं लोक पाठीमागें येऊं लागले म्हणजे दगड घेऊन लोकांना मारण्याचा आविर्भाव करावा. केव्हां केव्हां समाधि अवस्थेंतच चालूं लागावें. इतका लोकांचा त्रास महाराजांना होत असे. पुढें शेवटीं गरुडेश्वरीं महाराजांचे चातुर्मासांत ब्रह्मानंदसरस्वती राहिले होते.

कोगूर गांवांत श्रीपादआप्पाशास्त्री आय्यर यांची बहीण वारंवार बेशुद्ध पडे. डॉक्टरवैद्यांनीं वातविकाराचें निदान करून पुष्कळ प्रयत्न केला पण कांहींही गुण आला नाहीं; म्हणून तिला महाराजांचेकडे आणलें. महाराजांनीं तिला पाहिल्याबरोबर 'हिला पिशाचबाधा असल्यामुळें औषधानें गुण येणार नाहीं' असें स्पष्ट सांगितलें. तेव्हां ते शास्त्री म्हणाले कीं, 'पिशाचयोनि आहे हें मला मान्य आहे; पण त्यांचा मनुष्यांशीं संबंध येतो हें मात्र खरें वाटत नाहीं.' तेव्हां महाराज म्हणाले, 'तो संबंध असतो कीं नाहीं तें तुम्ही प्रत्यक्षच पाहा.' असें सांगून महाराजांनीं एका विटेवर मंत्र लिहून त्या मंत्राचा जप रोज एकवीस वेळ विटेपुढें धूप घालून करण्यास सांगितलें व एकवीस दिवसांनंतर तें पिशाच बोलूं लागेल असें सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं केल्याबरोबर ठरलेल्या दिवशीं त्या पिशाचानें येऊन आपणांस पिशाचयोनि प्राप्त होण्याचें व या बाईस पीडा देण्याचें कारणही सांगितलें. नंतर आपणांस जाण्याची इच्छा नसतांही महाराजांचा ताप सहन होत नसल्यामुळें आपण जाण्यास तयार आहोंत, पण माझ्याकरितां तुम्ही अमुक एक विशिष्ट कार्य करा,

असें त्या पिशाचानें सांगितलें. त्याच्या इच्छेप्रमाणें त्यानें सांगितलेलें कार्य करतांच तें पिशाच निघून गेलें व ती बाई पूर्ण बरी झाली. या अनुभवावरून पिशाचही माणसाला त्रास देऊं शकतें हें त्या शास्त्रीबुवांना पूर्णपणें पटलें.

या भागांत महाराज असतांना त्यांचा शोध करीत सीतारामबुवा तेथें येऊन पोंचले व आपणांस हरिहरला संन्यास घेण्याबद्दल दृष्टान्त झाल्याची गोष्ट त्यांनीं ब्रह्मानंदांचेकडून महाराजांचे कानांवर घातली. तेव्हां महाराजांनीं 'उद्धरेदात्मनात्मानं' हा श्लोक सीतारामबुवांना सांगण्यास ब्रह्मानंदांना सांगितलें. तो निरोप ऐकून आपणांस कांहीं महाराज संन्यास देत नाहींत असें सीतारामबुवांना समजून येऊन ते या कामीं निराश झाले. पुढें फाल्गुन पौर्णिमेस कृष्णातीरीं एका ठिकाणीं क्षौर करून महाराज बेझवाडयास येऊन पोंचले.

उत्तरोत्तर जनसंमर्द वाढून महाराजांना त्रास होऊं लागला. तेव्हां महाराजांनीं लोकवस्तीचा मार्ग सोडून अरण्यांतील मार्गांनींच जाण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें फिरत फिरत ते वैशाखारंभीं गोदावरीतीरीं मंथनकाळेश्वर येथें आले. तेथें पुनः पूर्वीप्रमाणें उत्तरेकडे जाण्याची देवाची आज्ञा महाराजांना झाली. पण ती जागा निरुपाधिक आहे असें पाहून तेथेंच चातुर्मास करावा या विचारानें महाराज तेथेंच राहिले. पण दत्तमहाराजांनीं पुनः दृष्टान्त देऊन सांगितलें कीं, 'अद्यापि चातुर्मासाला अवकाश आहे तरी पुढें चलावें, येथें राहूं नये.' हें ऐकून महाराज म्हणाले, 'पुढें गेल्यास लोकांची पीडा फार होईल म्हणून येथें जंगलांतच चातुर्मासाचें ठरविलें आहे.' देव म्हणाले, 'अशा अरण्यांतील अवघड जागीं चातुर्मास न करतां पुढें जाणें चांगलें.' याप्रमाणें देवांनीं पुष्कळ सांगितलें तरी महाराज तेथेंच राहिले. तें पाहून दत्तप्रभू साहेबाचा वेष

घेऊन व घोडयावर स्वार होऊन तेथें आले व रागानें हातांतील वेताची छडी महाराजांना दाखवून म्हणाले कीं, 'चल ऊठ, येथें राहण्याची काय जरूर आहे? येथून जर गेला नाहींस तर या छडीनें चोपून काढीन. जातोस कीं नाहीं सांग.' असें तें अत्यंत क्रोधाचें भाषण, ती उग्रमूर्ति, तो वेष वगैरे सर्व पाहून महाराजांनीं 'तव कोपा वंदूं रुद्रा। तव चापा वंदूं भद्रा' अशा अभंगानें प्रभूची स्तुति केली, तेव्हां तो राग शांत होऊन प्रभूची मुद्रा प्रसन्न दिसूं लागली. नंतर महाराज म्हणाले कीं, 'आपल्या इच्छेप्रमाणें पुढें निघण्याचें ठरवितों.' हें ऐकून श्रीदत्तभगवान् गुप्त झाले. असाच एकदां पूर्वीही महाराजांना प्रसंग आला होता. पूर्वी महाराजांना दक्षिणेकडे जाण्याची आज्ञा झाली असतां, मनांत तिकडे जावयाचें नसल्यानें त्यांनीं तिकडे दुर्लक्ष केलें. त्या वेळीं कानांत एकसारखा ठण्ठण् असा आवाज होऊं लागला. त्यामुळें अतिशय त्रस्त होऊन महाराज दक्षिणेकडे जाऊं लागले, तेव्हां तो शब्द आपोआप बंद झाला.

रस्त्यांत एका गांवीं ब्राह्मणाचें एकच घर असल्यामुळें तेथें भिक्षा कशी करावी असा महाराजांना विचार पडला. तेव्हां घरांतील बाईनें सांगितलें कीं, 'माझीं या गांवांत तीन घरें आहेत. मी तीन ठिकाणीं स्वयंपाक करतें, आपण भिक्षा घ्यावी.' तिच्या सांगण्याप्रमाणें महाराजांनीं तिच्या तीन घरांतून भिक्षा घेतल्यामुळें त्या बाईलाही आनंद झाला.

मंथनकाळेश्वराहून महाराज निघाले ते नागभीडतळोदी येथें आले. तेथें आन्हिक वगैरे आटोपून एका औदुंबराचे झाडाखालीं स्वस्थ बसले असतां तेथें एका ब्राह्मणाच्या बाईनें येऊन महाराजांना विचारलें कीं, 'येथील बालाजी मंदिरांत मूर्ति स्थापन करण्याची इच्छा आहे ती सफल होईल कीं नाहीं?' तें ऐकून महाराज म्हणाले, 'तुझ्या मुलाचें गांजाचें व्यसन सुटलें तर होईल.' या महाराजांच्या सांगण्याप्रमाणें

तिनें आपल्या मुलाला तें व्यसन सोडण्यास सांगितलें. तेव्हां तो मुलगा चिडून म्हणाला कीं, 'माझें तें व्यसन तर सुटणार नाहींच, पण तें सोड म्हणून कोणीं सांगितलेलेंही मला खपणार नाहीं.' ही आपल्या दिव्य मुलाची प्रतिज्ञा बाईनें महाराजांच्या कानांवर घातली. तेव्हां महाराज म्हणाले, 'तर मग तुमची इच्छा पूर्ण होणार नाहीं.' शेवटीं तसेंच घडलें.

त्या गांवांतील भागवतवार यांच्या आईस ब्रह्मसमंधाची पीडा होती; त्याबद्दल महाराजांचेकडे विचारणा केली असतां त्यांनीं सांगितलें कीं, 'या बाईची पीडा पूर्णपणें जाणार नाहीं, पण प्रयत्न केल्यास पीडा कमी होईल.' असें सांगून तिला एक मंत्र लिहून दिला. त्या मंत्राच्या जपानें त्या बाईची पीडा पुष्कळच कमी झाली.

याप्रमाणें मंथनकाळेश्वराहून महाराज निघाल्यानंतर हळूहळू प्रवास करीत करीत ज्येष्ठमासाच्या अखेरीस, वेनगंगाच्या तीरावर असणाऱ्या पवनी या गांवांत येऊन दाखल झाले. प्रथम तेथील लोक महाराजांना गांवांत राहूंसुद्धां देईनात. तेव्हां महाराज तेथील विठ्ठलमंदिरांत राहिले व गांडाबुवा मुरलीधराचे मंदिरांत राहिले.

## चातुर्मास १९ पवनी–शके १८३१

या वर्षीचा चातुर्मास पवनीसच करण्याचें महाराजांनीं ठरवून त्याप्रमाणें आषाढ पौर्णिमेस व्यासपूजा झाली. प्रथम महाराजांची योग्यता लक्षांत न आल्यामुळें तेथील मंडळींकडून महाराजांना त्रास झाला. उन्मत्तपणें वाटेल तसें महाराजांना बोलणें, भिक्षेचीसुद्धां व्यवस्था न करणें असे प्रकार तेथील मंडळींनीं आरंभीं केले. पण ते सर्व महाराजांनीं शांतपणानें सहन केले. पवनीस पद्मावती पुरी असें पुराणांतरीं नांव आहे. तेथें वेन-

गंगा नांवाची नदी आहे. महाराजांनीं वेनगंगेचें स्तोत्र केलें आहे. तें स्तोत्रादिसंग्रहांत छापलेलें आहे.

चातुर्मासाचे वेळीं महाराजांचा कमींत कमी दोन महिने तरी मुक्काम एका ठिकाणीं निश्चित असे व त्या वेळीं दर्शनार्थ दूरदूरची मंडळी तेथें येत असत. त्याप्रमाणें पवनीसही हजारों मंडळी महाराजांचे दर्शनास येऊं लागली. तेथील सर्वांची भोजनादि व्यवस्था करण्याचें काम सीतारामबुवांचेकडे सोंपविलें होतें. रोज त्या ठिकाणीं ब्राह्मणभोजनें होत असत. धर्माविरुद्ध वागणाऱ्या लोकांना पंक्तीमध्यें येण्यास मज्जाव होता. अशा लोकांना महाराज दर्शनसुद्धां देत नसत. याप्रमाणें ठिकठिकाणची मंडळी महाराजांचे दर्शनास येऊं लागलेली पाहून मग मात्र पवनीच्या मंडळींचे डोळे उघडले. नंतर त्यांनीं महाराजांची क्षमा मागितली व ते सर्व महाराजांचे पूर्ण भक्त बनले.

बाहेरून हजारों लोक पवनीस येऊं लागले. त्या वेळीं पवनीच्या आसपासच्या गांवांतून प्लेग जोरांत होता. दूषित हवेंतून मंडळी येतात त्यामुळें आपल्याही गांवांत हवा बिघडण्याची भीति आहे असें सर्वांना वाटूं लागलें. इतक्यांत गांडाबुवा राहत होते त्या मुरलीधराच्या देवळांत उंदीर पडल्याची वार्ता महाराजांचे कानांवर गेली. महाराजांनीं लगेच श्रीदत्तमहाराजांची प्रार्थना केली कीं, 'प्रभो ! आपल्या आज्ञेप्रमाणें येथें चातुर्मासास आरंभ झाला असून सर्व बालगोपाळ मंडळी येथें दर्शनाकरितां जमली आहेत. यांपैकीं कोणी मेला तर आपणांस न्यूनता येईल, म्हणून आपणांस चातुर्मास संपण्यापूर्वीच निघून जाणें भाग आहे.' हें ऐकून देवांनीं सांगितलें कीं, 'चातुर्मास संपेपर्यंत येथें कोणालाच त्रास होणार नाहीं. तरी चातुर्मास सोडून जाऊं नये' असें देवांचें आश्वासन मिळालें. तेव्हां महाराजांनीं सर्वांना सांगितलें की–' चातुर्मास

संपेपर्यंत येथें कोणतीच भीति नाहीं. तोंपर्यंत कोणीही कोठेंही राहण्यास हरकत नाहीं.' हें ऐकून सर्वांना धीर आला. तेथील येणाऱ्या लोकांची व्यवस्था नाना दशपुत्रे, विठ्ठलराव काळीकर इत्यादि मंडळी करीत होती.

महाराज पवनीस आले त्या वेळीं प्रथम वैजनाथाच्या देवळांत तीन दिवस राहिले. नंतर दशपुत्रे यांच्या विठ्ठलमंदिरांत राहण्यास गेले. पहिल्या दिवशीं नाइकांच्या घरीं भिक्षेस गेले, पण ते गुजराथी असल्याचें समजल्यामुळें भिक्षा तशीच ठेवली. दुसरे दिवशींही कांहीं कारणानें उपवास घडला. तिसरे दिवशीं भटांचे घरीं भिक्षेस गेले असतां त्यांनीं महाराजांची फारच चौकशी चालविली. तेव्हां महाराज त्यांना म्हणाले, 'आलेल्या अतिथीस भिक्षा घालणें एवढें गृहस्थाचें काम आहे. जास्ती विचारपूस करूं नये.' असें महाराज बोलत आहेत इतक्यांत भटांची उमरेड येथें दिलेली मुलगी उमाबाई बाहेर आली. तिनें महाराजांना ओळखून सर्व लोकांना त्यांची माहिती करून दिली. तिला ब्रह्मावर्त मुक्कामीं महाराजांचें दर्शन झालें होतें. नंतर ती स्वतः महाराज राहत होते त्या देवळांत जाऊन रोज झाडलोट करूं लागली. मग हळूहळू मंडळींची ये-जा सुरू झाली. महाराज राहत होते त्या मंदिरांत नानाशास्त्री दशपुत्रे पुराण सांगत होते. त्यांना एकदां पुराणांतील श्लोक अडलेला पाहून महाराजांनीं त्याचा सविस्तर अर्थ समजावून सांगितला. तसेंच आणखीही कांहीं श्लोकांचे दोन दोन तीन तीन अर्थ करून दाखविले व अशा अर्थांचें पुस्तक तुमच्या घरांतच आहे तें शोधून पाहा असें महाराजांनीं नानाशास्त्रींना सांगितलें. नानाशास्त्रींनीं घरीं जाऊन त्या पुस्तकाचा शोध करतांच तें सांपडलें. तेव्हांपासून त्यांच्या मनांत महाराजांच्याविषयीं आदरभाव निर्माण होऊन त्यांनीं तेथील सर्व मंडळींना महाराजांची खरी योग्यता फार मोठी असल्याचें सांगितलें. त्यामुळें तेथील सर्व लोक अनु-

यायी झाले. दशपुत्रे यांचा मुलगा बाळशास्त्री कीर्तन करीत असे. त्याला महाराजांनीं नवीन आख्यानें तयार करून दिलीं व कीर्तनांत प्रत्यक्ष श्रुतिवाक्य म्हणावयाचें नाहीं अशी त्याला ताकीद केली. एकदां बाळशास्त्रीचें कीर्तन महाराजांचे समोर चालूं असतां चुकून एक श्रुतिवाक्य त्यांनीं उच्चारलें. तें ऐकल्याबरोबर एकदम 'श्रीगुरुदेवदत्त' म्हणून महाराज जाण्याकरितां उठले. तें पाहून बाळशास्त्रीनीं लगेच महाराजांना नमस्कार करून चुकीची क्षमा मागितली व स्वतःच्या तोंडांत मारून घेतलें. तेव्हां पुनः अशी चूक न करण्याबद्दल ताकीद करून महाराज आपल्या जागेवर पुनः बसले.

गोविंदराव इनामदार नांवाचे एक गृहस्थ महाराजांचे दर्शनास आले होते. त्यांना ताप आल्यामुळें ते मुरलीधर मंदिरांतील एका खोलींत निजले असतां तेथें उंदीर पडला. तेव्हां तेथील कारकुनानें त्यांना दुसरीकडे नेण्याबद्दल महाराजांचे कानांवर घातलें व उंदीर पडल्याचेंही सांगितलें. तेव्हां त्याबद्दल महाराजांनीं देवांना विचारलें. तेव्हां देव म्हणाले कीं, 'भाद्रपद वद्य प्रतिपदेपर्यंत या गांवांत प्लेग येणार नाहीं, तरी तोंपर्यंत येथें राहण्यास हरकत नाहीं. नंतर मात्र राहूं नये.' ही गोष्ट महाराजांनीं सर्वांना कळविल्यामुळें सर्व लोक निश्चिंत झाले.

रोज लोक महाराजांना गंधाची उटी वगैरे लावून महाराजांची महापूजा करीत असत, व भोजनाचा भंडाराही बराच मोठा होत असे. सर्व जातींच्या लोकांना भरपूर अन्न मिळत असे.

एकदां एक आंधळा ब्राह्मण वेश्येला बरोबर घेऊन पवनीस आला व त्या बाईस बिऱ्हाडीं ठेवून महाराजांचे दर्शनास आला व आपले डोळे बरे होण्याकरितां उपाय सांगण्यास त्यानें महाराजांना विनंति केली. तेव्हां

महाराज त्याला एकदम बोलले कीं, 'त्या बाईला सोडून मग इकडे या म्हणजे पाहूं.' हें ऐकतांच तो ब्राह्मण खजील होऊन निघून गेला.

एका भक्तानें महाराजांचे जवळ येऊन 'मला भवसागरांतून तारा' अशी प्रार्थना केली. महाराज त्या वेळीं नदीवर स्नानास निघाले होते. त्याला नदीवर घेऊन गेले व आपण एकदम नदीच्या पात्रांत शिरून त्यालाही आपल्या पाठीमागून येण्याविषयीं महाराजांनीं सांगितलें आणि 'बुडण्याची भीति नको' असेंही सांगितलें. पण त्याला नदींत जाण्याचें धैर्य झालें नाहीं. नंतर वर येऊन महाराज त्याला म्हणाले कीं, 'गृहस्था! या साध्या नदींतून तरून जाण्याची जर तुझी छाती नाहीं तर तूं भव-सागर कसा तरशील? तुला तशी योग्यता येण्याकरितां श्रद्धेनें भग-वंताची उपासना केली पाहिजे.' असें सांगून महाराज देवळांत गेले.

पवनीस गांडाबुवांनीं एकदां महाराजांच्या सर्वांगास केशरी गंधाची उटी लावून महापूजा केली. तें पाहून थत्ते यांनींही तशीच महापूजा केली. तेव्हां 'तुम्ही मंडळी अशी उटी रोज लावूं लागला तर महाराजांना त्रास होईल.' याप्रमाणें गांडाबुवा थत्ते यांना त्या दिवशीं कांहीं रागानें बोलले. त्याच दिवशीं रात्रीं महाराज गांडा-बुवांच्या स्वप्नांत आले व त्यांच्या थोबाडींत मारून रागानें त्यांना म्हणाले कीं, 'तूं लोकांना रागानें कां बोलतोस? पुनः असें कोणाला बोलशील तर खबरदार.' असें स्वप्न गांडाबुवांना पडलें. सकाळीं उठून पाहतांच गांडाबुवांचा गाल बराच सुजलेला दिसला. नंतर त्यांनीं दुर्गा-भावशींच्या सांगण्याप्रमाणें महाराजांची क्षमा मागतांच तो गाल बरा झाला.

पवनी येथील एका बाईचा नवरा रागानें घरांतून निघून गेला होता. बारा वर्षें झालीं तरी त्याचा कांहीं पत्ता नव्हता. ती बाई अत्यंत दुःखांत

दिवस कंठीत होती. तिनें एकदां महाराजांचे दर्शनास येऊन आपलें दुःख सांगितलें. तिच्याकडे फक्त एकदां महाराजांनीं पाहिलें आणि तिला सांगितलें कीं ' बाई ! लवकरच तुमचा नवरा घरीं परत येईल. ' असें सांगून तिला एक मंत्र लिहून दिला व त्याचा रोज मानसिक जप करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तिनें श्रद्धेनें जप सुरू करतांच एक महिन्यांतच 'आपण लवकरच' येतों असें तिच्या नवऱ्याचें पत्र आलें व त्याप्रमाणें पुढें तो घरीं येऊन राहिला.

नर्मदातीरावरील मंडलामहापूर या गांवचे भैरवप्रसाद नांवाचे एक ब्राह्मण गृहस्थ एकदां महाराजांचेकडे येऊन त्यांनीं महाराजांना आपली दुःखद कर्मकहाणी सांगितली. ते म्हणाले कीं, ' आपणांस चार मुलें झालीं व तीं लगेच मृत झालीं. पांचवा मुलगाही तसाच जन्मल्याबरोबर मेला. त्याच वेळीं एक जटाधारी बुवा अकस्मात् तेथें आला व त्या मुलाचेंही प्रेत त्यानें उचलून नेलें व आपणही दिसेनासा झाला. पुष्कळ चौकशी करूनही त्या बुवाचा पत्ता कांहीं लागला नाहीं. अशा संकटांत मी असतां एकानें आपलें नांव सांगितल्यावरून मी आपणांस शरण आलों आहें. माझ्याकडे आपण दयादृष्टीनें पाहावें.' हें त्या ब्राह्मणाचें वृत्त ऐकून महाराज त्यांना म्हणाले कीं, ' तुमच्या वंशांत एक पिशाच झालेला असून त्यानेंच तुमच्या संततीचा नाश केला आहे. जटाधारी बुवाचें रूप घेऊन त्यानेंच मुलाचें प्रेतही नेलें. त्याची इच्छा पूर्ण करीपर्यंत तुमचा वंश वाढणार नाहीं. ' नंतर भैरवप्रसादानें विचारल्यावरून ती पिशाचपीडा दूर होण्याकरितां त्याला महाराजांनीं नारायणबली, विष्णुसहस्रनामाचे एक सहस्र पाठ व कांहीं प्रायश्चित्तें सांगून त्यांना एक यंत्र लिहून दिलें व घरीं पाठविलें.

एकदां महाराजांचे दर्शनास कांहीं मद्रासी बायका आल्या. त्या विधवा असून सकेशा होत्या. त्यांना पाहतांच महाराज तोंड फिरवून

बसले. तें पाहून त्या बायकांनीं याचें कारण विचारलें. तेव्हां महाराजांनीं सांगितलें कीं, 'शास्त्राविरुद्ध वागणाऱ्याचें तोंड आपण पाहणार नाहीं.' तेव्हां त्या बायका म्हणाल्या कीं, 'केश व कुंकूं कांहीं आम्हांला नवऱ्यापासून मिळालें नाहीं. केश तर जन्मापासूनच आहेत. कुंकूसुद्धा लहानपणापासूनच लावलें जातें. तरी नवरा गेल्यावर केश व कुंकू टाकण्याचें कारण काय ?' हें भाषण ऐकून महाराज म्हणाले, 'जन्मतः जसा लहान आकार असतो तसाच पुढेंही कां राहत नाहीं ? लहानपणाच्या व मोठेपणाच्या आकारांत, वागण्यांत, ज्ञानांत सर्व दृष्टीनें फरक कां दिसतो ? तुम्ही जन्मतः जसे होतां तसें होऊन या म्हणजे तुम्हांला दर्शन देतां येईल.' असें महाराजांचें स्पष्ट मुदेसूद भाषण ऐकतांच त्या बायकांच्या मनावर परिणाम होऊन दुसरे दिवशीं त्या केशवपन करून आल्या. नंतर त्यांना महाराजांचें दर्शन झालें.

उमरेडचे श्रीमान् गृहस्थ बळवंतराव नाईक यांनीं महाराजांचे दर्शनास आल्यावेळीं प्रार्थना करावी कीं, 'आपणांकडून कांहीं सेवा घ्यावी.' पण त्या वेळीं महाराज कांहींच बोलत नसत. पुढें कांहीं दिवसांनीं एका मध्यस्थाकडून आपली सेवेची इच्छा नाइकांनीं महाराजांना कळविली. त्या वेळीं त्यांची उत्कट इच्छा व भावना जाणून महाराजांनीं त्यांना सांगितलें कीं, 'येथें पाण्याची व्यवस्था करावी लागते, त्रास पडतो, तरी तें काम तुम्हीं करावें.' ही आज्ञा ऐकतांच नाइकांना आनंद वाटून लगेच ते स्वतः घागर घेऊन नदीवर पाणी आणण्यास गेले व आपल्या घरीं मुलांना, सुनांना सर्वांनाच ती सेवा करण्यास त्यांनीं सांगितलें. तेव्हां त्यांनींही महाराजांच्या दरबारांत श्रीमंत गरीब सर्व सारखेच अशा वृत्तीनें पाणी भरलें. याप्रमाणें नाइकांची निरभिमान वृत्ति पाहून महाराज संतुष्ट झाले. नंतर एके दिवशीं त्यांच्या महापूजेचा स्वीकार महाराजांनीं केला व

त्यांचे चिरंजीव लक्ष्मणराव नाईक यांना अनुग्रहहि दिला. 'त्या दिवशीं बळवंतराव नाइकांनीं मोठा भंडारा केला. पुढें देवास नमस्कार घालीत असतांना यांचें देहवसान झालें. हे मोठे पुण्यात्मे असून महाराजांचे ठिकाणीं यांची अत्यंत भक्ति होती.

एकदा एक बाई दर्शनास आली. तिनें महाराजांचे पुढें नारळ ठेवला व अधेलीच्या ऐवजीं एक गिनी तिनें चुकून पुढें ठेवली. पण गिनी ठेवली असें पाहून तिच्या मनाची चलबिचल झाली. पण ती परत कशी घेतां येईल या विचारानें तेथेंच स्वस्थ बसून राहिली. महाराजांनीं तिला ती गिनी परत घेण्यास सांगितलें असतां 'एकदां ठेवलेली परत घेणार नाहीं,' असें ती म्हणाली. नंतर महाराजांनीं तिला प्रसाद म्हणून नारळ दिला. त्या बाईनें घरीं येऊन तो नारळ फोडतांच त्यांतून ती गिनी बाहेर पडली. हें पाहतांच त्या बाईला अत्यंत आश्चर्य वाटलें.

कोल्हापुराकडील शंकरशास्त्री गुळवणी यांनीं दर्शनास येण्याची इच्छा असल्याबद्दल महाराजांना पत्र पाठविलें होतें. 'आपणच वाडीस येऊं तेव्हां दर्शन घडेल तरी या वेळीं इकडे येऊं नये' असें महाराजांनीं त्यांना कळविलें. पण त्यांना धीर न निघून ते पवनीस आले. तेथें येतांच त्यांना ताप येऊं लागला. वैद्यांनीं सांगितलें कीं हा ताप ४० दिवस जाणार नाहीं. तेव्हां घाबरून शंकरशास्त्री महाराजांचेकडे आले व आज्ञा मोडल्याबद्दल क्षमा मागून त्यांनीं कृपा करण्याबद्दल महाराजांची प्रार्थना केली. महाराजांनीं त्यांना 'घाबरूं नकोस' असें सांगून तीर्थअंगारा दिला आणि तीर्थ अंगाला लावतांच ताप उतरेल असें सांगितलें. त्याप्रमाणें करतांच रात्रीं घाम येऊन ताप उतरला. पुढें चातुर्मास संपेपर्यंत शंकरशास्त्री तेथें राहिले. तेथेंच त्यांनीं आपल्या मातोश्री, कनिष्ठ बंधु वामनराव व धाकटी बहीण गोदावरी यांना बोलावून घेऊन चातुर्मास समाप्तीचे पूर्व दिवशीं महाराजांचेकडून अनुग्रह देवविला.

नरसोबाचे वाडींतील पुजारी संकटानें त्रासून महाराजांचे दर्शनास पवनीस आले होते. एकदां पंक्ति जेवणास बसली असतां त्यांनीं सत्याग्रह केला. ते म्हणाले, 'आमचें संकट दूर करण्याकरितां आपण जर वाडीस येण्याचें वचन दिलें तरच आम्ही भोजन करूं. नाहींतर आम्ही भोजन न करतां व वाडीलाही न जातां वाट फुटेल तिकडे जाऊं.' हें ऐकून महाराजांनीं देवाजवळ प्रार्थना केली. देवांनीं सांगितलें, 'आतां चातुर्मास संपतांच उत्तरेकडे न जातां वाडीकडे जावें.' ही देवाची आज्ञा महाराजांनीं पुजाऱ्यांना कळवितांच त्यांचें समाधान झालें व नंतर सर्वांनीं आनंदानें भोजन केलें. त्याच दिवशीं भाष्यपाठ चालू असतां महाराजांचें देहभान नाहींसें झालें व आवेशानें त्यांचे मुखांतून उद्गार निघाले कीं, 'वाडीला येऊन काय बाजार मांडावयाचा आहे काय?' हें बोलतांना महाराजांची मुद्रा अतिशय उग्र दिसत असून अंगही लाल झालेलें दिसत होतें. दुपारीं भोजनाचे वेळीं मंडळींनीं असा त्रागा केला तें महाराजांना पसंत पडलें नाहीं.

महाराजांच्या द्विसाहस्री गुरुचरित्राचा स्वाहाकार करावा अशी इच्छा सावंतवाडीचे उकिडवे यांना झाली. त्याबद्दल त्यांना स्वप्न पडलें होतें. ती गोष्ट उकिडवे यांनीं तेथील न्यायाधीशांना सांगतांच त्यांनीं याकरितां लागेल ती मदत करण्याचें त्यांना आश्वासन दिलें. नंतर स्वाहाकार कसा करावा, त्याचें विधान कळविण्याबद्दल त्यांनीं पवनीस महाराजांना पत्र घातलें होतें. त्यांना महाराजांनीं कळविलें कीं, 'ऋषिप्रणीत ग्रंथाशिवाय अन्य ग्रंथांचा स्वाहाकार होऊं शकत नाहीं; तरी तुम्हांला कांहीं कर्तव्य असल्यास गुरुचरित्राचीं १० पारायणें करून ब्राह्मणभोजन घाला.' या आज्ञेप्रमाणें उकिडवे यांनीं सर्व केलें. त्या वेळचें महाराजांचें पत्र—

"श्रावण शु॥ ९ पवनी. मंत्रशास्त्रांत, मनुष्यांनीं केलेले अनार्ष ग्रंथ याचें

अनुष्ठान करूं नये असें आहे. मग त्याचा स्वाहाकार करण्याचा कोणीं सांगावा ? व हा ग्रंथ मीं केला असाही अभिमान. श्रीगुरूंची जशी इच्छा असेल तसें घडो. अनुमोदन द्यावें अशी प्रवृत्ति होत नाहीं. गुरुचरित्र स्वाहाकारासंबंधीं स्वतः निराधार. कांहींच सांगतां येत नाहीं. अतएव देवता, निर्वाप, हवनप्रकार वगैरे कामीं कांहीं अप्रामाणिक बोलतां येत नाहीं. नारायण. ''

पवनीचा कार्यक्रम इतर ठिकाणांप्रमाणेंच चालू होता. निरनिराळ्या ग्रंथांचे पाठ चालू होते. लघुरुद्र, महारुद्र, सहस्र भोजनें इत्यादि कार्यक्रमही सारखे चालू होते. हजारों भक्तमंडळी नित्य येत असल्यामुळें पैसा पुष्कळ जमत असे. त्याचा विनियोग वरीलप्रमाणें होत असे. शिवाय येणारे शास्त्री, प्रवचनकार, पुराणिक, हरिदास इत्यादि सर्व गुणी मंडळींना भरपूर संभावनाहि दिली जात असे. रोज पक्वान्नें खातां खातां लोकांना कंटाळा आला. इतका खर्च होत असूनहि पैसा शेवटीं बराच उरला. तेव्हां त्याच्यांतून सुवासिनींना लुगडीं-खण, ब्राह्मणांना धोतरें, दक्षिणा जातांना वांटली आणि शिवाय उरलेला पैसा वाडीच्या पुजाऱ्यांचे जवळ दिला. यांतून पुढें वाडीस स्वाहाकार झाला.

भाद्रपद पौर्णिमेपर्यंत याप्रमाणें नित्य आनंदोत्सव चालूं होता. त्या दिवशीं सायंकाळीं महाराज सीमोल्लंघनास निघाले. वैनगंगेंत उत्तम सजविलेल्या नावा तयार ठेवल्या होत्या. महाराजांच्या बरोबर वेदघोष करीत ब्राह्मण मंडळी चालली. सर्व सुवासिनींनीं महाराजांना आरत्या केल्या. एका फुलाच्या माळा घातलेल्या व दोन निशाणें लावलेल्या नावेंत महाराज बसले व नाव परतीराकडे जाऊं लागली. हजारों लोक जमले होते. लोकांनीं महाराजांचे वर पुष्पवृष्टि करून जयजयकार केला. संध्याकाळीं सात वाजतां नाव पलीकडच्या तीरावर पोंचली. दिगंबराचें

भजन सारखें सुरू होतें. पलीकडे गेल्यावर वाडीकर मंडळींनीं महाराजांची पूजा केली. नंतर महाराजांनीं भगवद्गीतेचा अकरावा अध्याय म्हटल्यावर सर्वांना प्रसाद वांटला. पुनः नौकेंत बसून महाराज अलीकडे येऊं लागले. प्रत्यक्ष दत्तप्रभूच येत असल्याचें लोकांना वाटलें. पंधरा हजारांचे वर जनसंमर्द होता. त्या वेळीं अनेक नावा बाजूनें चालत होत्या. एक नाव बुडण्याची पाळी आली होती. पण महाराजांनीं नुसता हात हालवून ती सुस्थितींत आणली. याप्रमाणें रात्रीं ११ वाजतां महाराज अलीकडील तीरावर येऊन पोंचले. नंतर काळीकर यांचे मुरलीधराचे मंदिरांत स्वारी आली. तेथें काळीकरांनीं सर्वहि मंडळींना प्रसाद वांटला व गायनाचा उत्तम कार्यक्रम करविला. तो झाल्यावर सर्व मंडळी महाराजांना नमस्कार करून घरीं गेली.

दुसरे दिवशीं विठ्ठलराव काळीकर यांनीं ब्राह्मणसमाराधना व महाराजांना भिक्षा केली. ती झाल्यावर सर्वांना प्रसाद, आशीर्वाद देऊन महाराज गांवाबाहेर पडले. महाराजांचें पाऊल बाहेर पडतांच आतांपर्यंत थांबविलेला प्लेग जोरानें गांवांत शिरून त्यानें पुष्कळ संहार केला.

पवनीहून निघून महाराज, गांडाबुवा व वाडीकर पुजारी मंडळी बोरी गांवांत मुक्कामास आली. सीतारामबुवा मागाहून एक दिवसांनीं त्यांचे मुक्कामीं आले. तेथून आज्ञा झाल्याप्रमाणें पुजारी वाडीस गेले. तेथें महाराज आले असें समजतांच तेथील पटवाऱ्याची बायको अत्यंत आर्त होऊन महाराजांचेकडे आली व तिनें सांगितलें कीं, ' कांहीं दिवसांपूर्वी मला एक मूल झालें. त्याला फक्त तोंडच होतें. बाकीचे अवयव कांहींच नव्हते. तें विचित्र मूल पाहून मला भीति वाटून मी आजारी पडलें; तरी आपण ही पीडा दूर करावी. ' तें ऐकून महाराज त्या बाईस म्हणाले कीं, ' तुमच्या वंशांत कोणी तरी पिशाच झाला असल्यामुळें अशी

संतति झाली.' असें सांगून तिला एक यंत्र करून दिलें. त्यामुळें ती त्या बाधेपासून मुक्त झाली.

तेथून पुढें गोदातटानें जाण्याची महाराजांची इच्छा होती, पण गांडा-बुवांच्या आग्रहानें माहूरवरून जाण्याचें ठरलें. माहूरच्या अलीकडे ७।८ कोसांवर शरभंग ऋषींचा आश्रम आहे. येथें उनकेश्वराचें स्थान असून एक ऊन पाण्याचें व दुसरें थंड पाण्याचें अशीं दोन कुंडें आहेत. शरभंग ऋषींचा कुष्ठरोग बरा व्हावा म्हणून श्रीरामचंद्रानीं बाणांनीं हीं दोन कुंडें निर्माण केलीं. त्यांत स्नान करून शरभंग ऋषि रोगमुक्त होऊन ब्रह्म-लोकास गेले. त्या ठिकाणीं दोन दिवस राहून महाराज पुढें निघाले.

उनकेश्वराहून महाराज माहूरला आले. तेथें मातृतीर्थांत स्नान करून सर्व मंडळी डोंगरावर गेली. तेथें रेणुकामाता, श्रीदत्त, अत्रि, अनसूया यांचें दर्शन करून मंडळी खालीं फुलसुंगी या गांवीं आली. गांडा-बुवांना मात्र कांहीं शारीरिक त्रासामुळें डोंगर चढतां न आल्यानें कोणतेंच दर्शन घडलें नाहीं.

वाटेंत एका ठिकाणीं महाराज भिक्षेस गेले असतां घरच्या बाईनें डाव्या हातांत भाकरीवर भात ठेवून व उजव्या हातांत आंबील असलेलें गाडगें घेऊन ती भिक्षा घालण्यास बाहेर आली. महाराज तिला म्हणाले, 'भात भाकरी पुरे झाली, आंबील ठेवून द्या.' ती बाई फारच काकुळ-तीस आलेली पाहून तिला आश्वासन देऊन महाराज आश्रमांत परत आले व सीतारामबुवांना पाठवून तें आंबिलीचें गाडगें आणवून प्रेमानें भिक्षा केली. भक्तवात्सल्याचें हें उदाहरण आहे.

याप्रमाणें प्रवास चालूं असतां महाराजांना देवांचें सांगणें झालें कीं, 'वाडीकडे न जातां मागें फिरावें.' पण महाराजांनीं तिकडे लक्ष न दिल्यामुळें महाराजांना संधिवात होऊन इतका त्रास झाला कीं उठतां

बसतांसुद्धां नीट येईना. तें पाहून महाराजांनीं देवांची प्रार्थना केली कीं, 'आपल्या आज्ञेनेंच वाडीकर पुजाऱ्यांना वाडीस येऊं असें वचन दिलें. मग परत जाऊन कसें चालेल ? तिकडे गेलेंच पाहिजे. मग कांहीं झालें तरी हरकत नाहीं. आपणांस हें मान्य नसेल तर हें शरीर आपल्या ताब्यांत आहे. आपण याचें वाटेल तें करूं शकतां. पण वचनभंग होणें बरें नाहीं,' अशी प्रार्थना करून देवाची स्तुति केली. आणि तशा कष्टमय स्थितींतच नित्य ७।८ कोस चालत प्रवास सुरू केला. २९ दिवसपर्यंत हा संधिवाताचा त्रास होता. महाराज ऐकत नाहींत असें पाहून देवांनीं महाराजांना भयंकर ज्वर उत्पन्न केला. तरीही वाडीच्या दिशेनेंच प्रवास चालू होता. तें पाहून देवांनीं दृष्टान्त देऊन सांगितलें कीं, 'तूं माझें ऐकत नाहींस तर गोदावरीच्या पलीकडे जातांना तुझ्यावर वॉरंट निघेल.' हें देवांचें सांगणें ऐकून महाराज पुढें निघाले. कार्तिक महिन्यांत हिंगोलीस मुक्काम आला. तेथील सर्व मंडळी भक्तच असल्यानें तेथें कांहीं दिवस वास्तव्य झालें. तेथून महाराज आजेगांवीं आले.

आजेगांवचे कृष्णराव देशमुख यांचीं इनामगांवें निजामसरकारनें खालसा केलीं. ती हकीकत त्यांनीं महाराजांचे चरणीं निवेदन करतांच 'दत्तमालामंत्रा'चें अनुष्ठान करण्यास महाराजांनीं त्यांना सांगितलें. त्यांनीं तें अनुष्ठान उत्तम ब्राह्मणांकडून करवितांच एका युरोपियन अधिकाऱ्यानें त्यांचीं तीं गांवें मोकळीं करून त्यांच्या ताब्यांत दिलीं.

कृष्णराव देशमुखांचे चिरंजीव शंकरराव हे क्षयानें आजारी पडले. वैद्यडॉक्टरांनीं तें दुखणें असाध्य म्हणून सांगितलें असतां त्यांनीं महाराजांचिकडे येऊन सर्व सांगितलें. तें ऐकून महाराज म्हणाले कीं, 'हा क्षय नसून फक्त त्याची थोडी भावना आहे.' असें सांगून शीतोपलाचूर्ण इत्यादि कांहीं औषधें सांगून धौती करण्यास सांगितलें. तें करतांच २।४ महिन्यांतच शंकररावांची प्रकृति उत्तम झाली.

महाराजांना भेटण्यासाठीं येतों असा उमरावतीच्या गुलाबराव महाराजांनीं एकदां निरोप पाठविला होता. तेव्हां महाराजांनीं त्यांना परत कळविलें कीं, 'तुमचें आमचें अंतरंगांत प्रेम आहेच. करितां प्रत्यक्ष भेटण्याची आवश्यकता नाहीं.' गुलाबराव हे सखीसंप्रदायांतील असून स्त्रीवेष घेत होते. तरी असें नटदर्शन महाराजांना नको होतें.

आजेगांव वगैरे गांवांहून महाराज रेणापुरास आले. तेथें दत्तजयंतीचा उत्सव मोठ्या थाटानें झाला. महाराज येणार म्हणून हजारों मंडळी वाट पाहत बसत. रस्त्यांतसुद्धां ७।८ शें पानांचा स्वयंपाक होत असे. रस्त्यांत पुढें पैसा पुष्कळ येई. मग त्यांतून पूर्वी वर्णन केल्याप्रमाणे अनेक सत्कार्यांत त्याचा विनियोग केला जात असे.

या भागांत महाराज असतांना नरसोबावाडीची कांहीं मंडळी ब्राह्मणेतरांच्या त्रासामुळें परागंदा होऊन महाराजांचे दर्शनास पुनः आली व आपलें संकट त्यांनीं निवेदन केलें. महाराजांनीं त्यांना एक मंत्र देऊन त्याचा जप श्रद्धेनें करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें करतांच त्या ब्राह्मणेतर मंडळींतच परस्पर वैमनस्य उत्पन्न होऊन त्यांची मारामारी झाली व त्यांच्या पुढाऱ्यांना पुढें मोठ्या शिक्षा झाल्या.

महाराज गोदातटाकीं गंगामसले या गांवीं आले. तेथें स्नानाकरितां नदीवर गेले असतां, महाराजांनीं ताकीद केली असूनही मंडळी स्नानास उतरली. त्यांत एक मनुष्य बुडाला. लगेच त्याला वर काढण्यांत आलें, पण तो गतप्राण झाला होता. महाराज म्हणाले, 'लोक सांगूनही ऐकत नाहींत. निष्कारण उपाधि देतात.' त्यावर गांडाबुवा म्हणाले, 'महाराजांची आज्ञा मोडल्याचें फळ याला मिळालें.' शेवटीं महाराजांना दया येऊन त्यांनीं कमंडलूंतील पाणी त्याच्या अंगावर शिंपडलें. त्याबरोबर त्या मनुष्याचा श्वास सुरू झाला व तो मनुष्य सावध होऊन

उठून बसला. तें पाहून सर्व मंडळी आश्चर्यचकित झाली. सर्वांनीं महाराजांची पूजा करून स्तुति केली. नंतर गांवांत येऊन मोठी ब्राह्मण समाराधना झाली.

पुढें देवांच्या सांगण्याप्रमाणें महाराजांच्यावर वारंट निघालें. म्हणजे शौचाचे वेळीं रक्त पडण्यास सुरुवात झाली. पण तशाहि स्थितींत प्रवास करीत महाराज बार्शीस आले. तेथें अंबरीषवरद श्रीभगवंतास वंदन करून मकरसंक्रांतीस पंढरपुरास आले. तेथें पर्वकाळांत चंद्रभागेचें स्नान करून पांडुरंगाचें दर्शन घेतलें. तेथून वाडीस येण्याकरितां महाराज निघाले. ही बातमी वाडीच्या मंडळींना अगोदरच समजल्यामुळें बरीच मंडळी वाडीहून अर्जुनवाड येथें दत्तमंदिरांत महाराजांना वाडीस नेण्याकरितां वाद्यें वगैरे घेऊन आली होती. दीक्षितस्वामीहि होतेच. तेथें महाराज आल्यावर सर्वांनीं वंदन केलें. नंतर स्नान, भोजन झाल्यावर वाजत गाजत महाराजांना बरोबर घेऊन सर्व मंडळी पौष शुद्ध १३ दिवशीं संध्याकाळीं वाडीस येऊन पोंचली. महाराज श्रीदत्तपादुकांना वंदन करून वर ब्रह्मानंदांचे मठांत आले. तेथें सर्वांनीं आरती करून साष्टांग नमस्कार घातले. महाराजांच्या येण्यानें सर्वांना अत्यंत आनंद वाटला. सीतारामबुवांनीं तीर्थविधि, श्राद्ध वगैरे केलें व मोठें ब्राह्मणसंतर्पण करून सुवासिनींना खण वांटले.

पूर्वीप्रमाणें पाठप्रवचन, चर्चा, आर्त लोकांना उपाय सांगणें, इत्यादि कामें सुरू झालीं. महाराज आल्यामुळें आनंद व्यक्त करण्याकरितां वाडींतील वैदिक मंडळींनीं महाराजांची आज्ञा घेऊन संहिता स्वाहाकार केला. पवनीचा उरलेला पैसा वाडीस पाठविला होता. त्यांतून हा स्वाहाकार दहा दिवस मोठ्या समारंभानें झाला. हजारों लोकांचीं जेवणें झालीं. सर्व वैदिक शास्त्री लोकांना दक्षिणाहि पुष्कळ वांटली. या वेळीं

गोव्यांतील प्रसिद्ध शास्त्रज्ञ वासुदेवशास्त्री धूपकर आले होते. त्यांनीं महाराजांच्या इच्छेप्रमाणें एके दिवशीं ऐन वेळीं उभे राहून 'दृष्टान्तो नैव दृष्टः' या आचार्यांचे श्लोकावर व 'सद्गुरूवांचोनी सांपडेना सोय' या अभंगावर उत्तम कीर्तन केलें. तें ऐकून महाराजांना समाधान वाटलें.

त्यावेळीं बडोद्याचे एक सरकारी कामगार अत्यंत आजारी पडून देवाचे दृष्टान्तांप्रमाणें वाडीस महाराजांचेकडे आले. यांना पूर्वी देवांनीं दृष्टान्तांत 'गांडाबुवांचेसह नाशिकची यात्रा कर' असें सांगितलें होतें. पण त्या वेळीं रजा न मिळाल्यामुळें तें घडलें नाहीं. त्यामुळें त्यांचें कुटुंब मरणें, नोकरी जाणें इत्यादि रूपानें देवांनीं त्यांना शिक्षा केली. शेवटीं त्यांना संग्रहणी होऊन रोज दोन दोन शेर कफ पडूं लागला. अगदीं आसन्नमरणस्थिति झाली. नंतर देवांचे सांगण्यावरून वाडीस येऊन त्यांनीं महाराजांना सर्व हकीकत सांगितली. ती ऐकून त्यांना महाराजांनीं श्रीदत्तपादुकांवर महारुद्राभिषेक करण्यास सांगितलें व त्यांना औषध देण्यास गांडाबुवांना सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं देवाजवळ प्रार्थना करून महारुद्रास आरंभ केला. गांडाबुवांनीं त्यांना चित्रकाचें मूळ रोज ताकांत उगाळून तें भातांत घालून खाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें करतांच सर्व रोगांतून बरे होऊन ते गृहस्थ पुनः पूर्ववत् आपल्या कामावर हजर झाले.

सावंतवाडीच्या भागांतील एक ब्राह्मण पिशाचपीडेमुळें त्रासून वाडीस येऊन राहिला होता. त्याच्या आजानें एका ब्राह्मणाची बागाईत जमीन हरण केली हाती. त्यामुळें तो ब्राह्मण पिशाच होऊन त्यानें त्याचें कुटुंब, मुलगा यांना मारलें व आतां या नातवालाही तो छळूं लागला. पवनीस महाराजांचे दर्शनास तो पिशाचत्रस्त ब्राह्मण गेला होता व तेथें महाराजांनीं सांगितल्याप्रमाणें त्यानें वाडीस येऊन अनुष्टान सुरू करण्या-

बरोबर पिशाचानें त्याचे अंगावर सूज उत्पन्न केली, त्यामुळें त्याला कांहीं अनुष्ठान करतां येईना. महाराज वाडीस आल्यानंतर त्यांनीं त्याला तीन लक्ष गायत्री जप व ४९ गुरुचरित्रसप्ताह करण्यास सांगितले. पिशाचानें त्याला पाऊण लाख जप सांगितला होता. पण ' कलौ चतुर्गुणं प्रोक्तं ' या वचनाप्रमाणें वरील संख्या महाराजांनीं सांगितली. पिशाच्याच्या इच्छेप्रमाणें महाराजांनीं त्याला तीर्थ दिल्यावर तें पिशाच तो देह सोडून गेलें. पुढें त्या ब्राह्मणानें महाराजांचे सांगण्याप्रमाणें सर्व अनुष्ठान पूर्ण केलें व पिशाचाच्या इच्छेप्रमाणें ब्राह्मणसमाराधना करून तो त्या पीडेंतून मुक्त झाला.

सातारा जिल्ह्यांत एका गांवांत एक कारकून महाराजांचा भक्त होता. चांगला मुलगा व्हावा म्हणून त्या दोघा पतिपत्नींनीं देवाची सेवा केली. नंतर त्यांना एक मुलगी झाली. तिचें नांव गोदू असें ठेवलें. तिला जननेंद्रिय नव्हतें. पुढें ती मोठी झाल्यावर तिचें लग्न झालें. पण पुढें आपण स्त्री नसून पुरुष आहोंत असें तिला वाटूं लागलें व ती स्वतःच मिरजेस दवाखान्यांत येऊन तिनें आपलें ऑपरेशन करवून घेतलें. तो खरोखरीच पुरुष आहे असें सिद्ध झालें. नंतर त्या मुलाला घेऊन आईबाप महाराजांचे दर्शनार्थ येऊन तेथें सर्व हकीकत त्यांनीं सांगितली व आपल्या कृपेनें मुलगा मिळाला असें सांगितलें. पुढें महाराजांचे आज्ञेनें त्या मुलाचे मौंजीपर्यंत मागील सर्व संस्कार करून मुंजही केली व कांहीं दिवसांनीं त्याचें लग्नही झालें.

बार्शीचे दत्तुशास्त्री साधले हे अक्कलकोटस्वामींचे शिष्य वाडीस महाराजांचे जवळ येऊन आपणांस येथें सोमयाग करून संन्यास घेणेचा आहे असें त्यांनीं महाराजांना कळविलें. त्यांना महाराज म्हणाले कीं, ' येथें श्रीदत्त संन्यासी वेषानें राहत असल्यानें पशुयाग करणें योग्य

नाहीं. अक्कलकोटचे महाराज साक्षात् दत्तावतार त्यांची परवानगी मिळवून वाटल्यास तुम्ही सोमयाग करा ' असें त्यांना सांगितलें. महाराज दर्शनास येणाऱ्या लोकांना अंगारा देत असत. तें पाहून बावडेकर बुवांनीं म्हणजे दत्तुशास्त्रींनीं 'या राखेनें काय होणार? लोक वेडे आहेत' असे उद्गार काढले. ते ऐकून महाराज म्हणाले, 'तुमच्यासारख्यांनीं असे उद्गार काढणें बरोबर नाहीं.' त्याच दिवशीं रात्रीं बावडेकरबुवांचे पोटांत भयंकर शूळ उत्पन्न झाला. त्यांना महाराजांचेकडे नेलें असतां 'अंगाऱ्याची चेष्टा केल्याचें हें फळ ! आतां पोटांत अंगारा घ्या म्हणजे शूळ थांबेल ' असें महाराजांनीं त्यांना सांगितलें. त्याप्रमाणें देवाची क्षमा मागून अंगारा पोटांत घेतांच त्यांची पोटदुखी थांबली.

बावडेकरबुवा अक्कलकोटला स्वामींच्या सेवेस होते. तेथें एकदां एक शृंगेरीकडील शास्त्री येऊन बावडेकरबुवांना म्हणाले कीं, 'तुम्ही या वेड्याजवळ न राहतां शृंगेरीस या, म्हणजे तुम्हांला शास्त्र शिकवूं.' हें ऐकून शृंगेरीस जाण्याचा विचार बावडेकरबुवांनीं केला. रात्रीं खोलींत कडी लावून ते निजले असतां अक्कलकोटचे महाराज तेथें आले. त्यांचा हात लागतांच दाराची कडी निघाली. लगेच बावडेकर जागे झाले. महाराजांची त्या वेळची तेजःपुंज मूर्ति पाहून बावडेकरांना तर त्यांच्याकडे पाहातां येईना. पुढें महाराज पंडिताप्रमाणें संस्कृत उत्तम बोलूं लागले व 'संस्कृत शिकण्यास केव्हां जाणार? या शास्त्री लोकांनीं कामादि विकार जिंकले आहेत काय?' इत्यादि बोलून गुप्त झाले. नंतर बावडेकरबुवांना पश्चात्ताप झाला. पुढें अक्कलकोटच्या महाराजांनीं आपलीं खेळणीं त्यांचेकडे पाठवून दिलीं. तीं त्यांनीं देवपूजेंत ठेवलीं होतीं.

या वेळीं आजरेकरबुवा आले होते, तसेच अमळनेरकरबुवाही सर्व मंडळींसह महाराजांचे दर्शनास आले होते. त्यांचें त्या दिवशीं उत्तम

भजन झालें. महाराजांनीं त्यांचा उत्तम मान राखून त्यांना प्रसाद म्हणून नारळही दिला.

महाराजांचे पूर्वाश्रमांतील भाचे हे महाराजांचेकडे येऊन त्यांनीं संततीला अडचण येत असल्याचें सांगितलें. तेव्हां तुझा चुलता पिशाच होऊन पीडा देतो असें महाराज म्हणाले व त्याला गति मिळण्याकरितां त्रिपिंडी श्राद्ध कर म्हणून महाराजांनीं सांगितलें. तेव्हां अस्तामुळें आपण त्रिपिंडी श्राद्ध आतां करीत नाहीं असें त्या भाचानें सांगतांच त्याला 'चालता हो' म्हणून महाराज रागानें म्हणाले. पुढें त्यानें मुलाचें टिपण दाखविलें. त्यांत कांहीं सुधारणा महाराजांनीं केली व त्याला घरीं जाण्यास सांगितलें. पुढें तीन चार वर्षें तें श्राद्ध झालें नाहीं. त्याची आई पुढें गरूडेश्वरीं गेली असतां तिलाही तें श्राद्ध मुलाकडून लवकर करविण्यास महाराजांनीं सांगितलें. नंतर तें श्राद्ध होतांच त्याचीं मुलें जगूं लागलीं. घरांतील पीडाही गेली.

पेडणें येथील एक गृहस्थ महाराजांचेकडे येऊन परसांत वानराचा फार त्रास होतो असें सांगूं लागले. तेव्हां महाराजांनीं त्यांना एक यंत्र करून दिलें व तें परसांत ठेवण्यास सांगितलें. त्याप्रमाणें करतांच तेथील वानरांचा त्रास आपोआप कमी झाला.

एक वैष्णव ब्राह्मण वाडीस आला. पण तेथें कोणी वैष्णव ब्राह्मण न मिळाल्यामुळें त्यानें श्राद्ध केलें नाहीं. रात्रीं त्याला विंचू चावून त्याची प्राणांतिक अवस्था झाली. तेव्हां तो महाराजांचेकडे आला असतां त्याला महाराजांनीं 'शिवनामोच्चारण कर व तीर्थश्राद्ध कर म्हणजे हा देवाचा कोप शांत होईल' असें सांगितलें. तेव्हां त्यानें त्याप्रमाणें केल्यावर त्याच्या वेदना कमी झाल्या.

कोल्हापूर प्रांतांतील वठार गांवांतील नरहरी दिवाण हे वाडीस महाराजांचे जवळ येऊन राहिले होते. त्यांच्या मातेकडून एकनाथ महाराज आठवे पुरुष होते. त्यांना महाराजांचे सहवासानें वैराग्य उत्पन्न होऊन ते परमार्थाकडे वळले. पंधरा वर्षांचें त्यांचें वय होतें. महाराज वाडीहून गेल्यावर ते गाणगापुरास गेले. तेथें स्वप्नांत त्यांना श्रीदत्तदर्शन झालें. नंतर पंढरपुरीं येऊन त्यांनीं हरिहर महाराजांचा अनुग्रह घेतला. हरिहर महाराजांनीं संन्यास घेतला. त्यांचें नांवही त्यांचे गुरूंनीं ‘ वासुदेवानंदसरस्वती ’ असें ठेवलें होतें. हे महाराजांचे गुरुबंधु असून चांगले अधिकारी होते. पुढें दिवाण हें गुरूंच्या आज्ञेप्रमाणें योगाभ्यास करण्याकरितां महाराजांचेकडे आले. त्यांना महाराजांनीं योगाची माहिती देऊन पैठणास जाऊन अभ्यास करण्यास सांगितलें. पैठणांत असतांना एका अग्निहोत्रीबुवांनीं यांना संस्कृत शिकण्याचा आग्रह केल्यामुळें ते त्यांचेचकडे संस्कृत शिकूं लागले. पुढें महाराजांचें दर्शन झालें. त्या वेळीं महाराज त्यांना म्हणाले कीं, ‘तुला संस्कृत शिकण्यास कोणीं सांगितलें ? सांगितल्याप्रमाणें अभ्यास करून मोक्षलाभ करून घे.’ हें ऐकून त्यांनीं तो नाद सोडून दिला. यानीं पायानेंच तीर्थयात्रा केल्या. महाराजांचें दत्तपुराण व दत्तमहात्म्य यांवर हे पुराण सांगत असत. हेच पुढें अष्ट्याचे दत्तमहाराज म्हणून प्रसिद्धीस आले. यांची समाधि सांगलीपासून जवळच अष्टे मुक्कामीं आहे.

वासुदेव मराठे नांवाच्या गृहस्थास कुष्टरोग झाला. सर्व अंग सडलें. डॉक्टरांनीं शेवटीं हात टेकले. कांहींच गुण आला नाहीं. तेव्हां मराठे महाराजांचेकडे येऊन त्यांचे बरोबर राहूं लागले. तंजावरला महाराज असतांना तेथें दर्शनास खूप गर्दी जमत असे. एकदा त्या गर्दीत एका बाईनें आपलें मेलेलें मल फडक्यांत गुंडाळून ठेवून दिलें व आपण दूर जाऊन उभी राहिली. पुढें मंडळी गेल्यावर तें पाहतांच त्यांत मेलेलें मूल

निघालें. महाराजांचे कानांवर ही गोष्ट जातांच महाराज म्हणाले कीं, 'तें मूल मेलेलें नाहीं. बायका निष्काळजी असतात. त्याला न पाजतां ती बाई कुठेंतरी गेली असेल. हें भस्म त्याच्या अंगाला चोळा' असें सांगून भस्म दिलें. तें चोळतांच तें मूल सावध होऊन रडूं लागलें. नंतर त्याची आई जवळ येऊन तिनें तें मूल घेतलें व 'आपलीं दोन मुलें पूर्वी गेल्यामुळें या वेळीं हा प्रयत्न केला. क्षमा करा.' असें ती म्हणाली. हें ऐकून सर्वांना आश्चर्य वाटलें. ही गोष्ट मराठ्यांनीं प्रत्यक्ष पाहिल्यामुळें ते महाराजांचे बरोबर राहूं लागले. पुढें वाडीस आल्यावर महाराजांनीं त्यांना सांगितलें कीं, 'तुम्ही कृष्णपंचगंगासंगमांतील वाळूनें अंग घासून स्नान करा.' याप्रमाणें त्यांनीं केल्यावर अंग बरें झालें. नंतर पुढें सहा महिन्यांनीं कृपादृष्टीनें त्यांचेकडे पाहतांच त्यांची सर्व बोटें पूर्ववत् झालीं. ही त्यांची प्रकृति उत्तम झालेली पाहून डॉक्टरलोकांनींसुद्धां तोंडांत बोट घातलें. 'आपण महाराजांच्या कृपेनें बरें झालों असें मराठ्यांनीं सर्वांना सांगावें. 'आपण याला बरा केला नसतांना हा लबाड बोलतो याला हांकलून द्या' असें महाराज विनोदानें म्हणत असत.

वाडीस रथसप्तमीपासून कृष्णाबाईचे उत्सवास आरंभ होत असतो. त्या दिवशीं सकाळीं गांवांतून कृष्णवेणीची मूर्ति वाजत देवाकडे आणली. तें ऐकून महाराज पाठ सांगतां सांगतांच उठून बाहेर आले. ती मूर्ति पाहिल्याबरोबर महाराजांचे डोळ्यांतून प्रेमाश्रु वाहूं लागले. पुस्तक हातां- तून गळून पडलें. कृष्णालहरीचा पहिला श्लोक म्हणण्यास सुरुवात केली; पण सारखे हुंदके येऊं लागल्यामुळें तो श्लोक कांहीं तडीस जाईना.

पंढरपूरची एक बाई संतति नसल्यामुळें वाडीस आली होती. तिनें महाराजांचे दर्शनास येऊन आपली हकीकत सांगितली कीं, 'पांडुरंगाची

सेवा पुष्कळ केली, संतानगोपालमंत्राचा जपही तीन वेळां केला, पण कांहीं उपयोग झाला नाहीं.' हें बाईचें म्हणणें ऐकून तिला महाराजांनीं पुनः संतानगोपालमंत्राचा जप करण्यास सांगितलें. शेवटीं इच्छा नसतांनाहि महाराजांची आज्ञा म्हणून तिनें तो जप केला. त्याबरोबर दुसरे वर्षीच तिला मुलगा झाला.

ब्रह्मानंदांचे माडीवर एकदां महाराज बसले असतांना खालीं धूप पडला. तें ऐकतांच महाराजांचें मन प्रेमानें भरून येऊन डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. मंडळींनीं याचें कारण विचारतांच महाराज म्हणाले कीं, 'प्रभूचें भक्तवात्सल्य आठवून आपली स्थिति अशी होते. गिरनार, माहूर अशा अवघड जागीं भक्तांना येण्यास त्रास पडेल म्हणून भक्तवत्सल परमात्मा या उघड्या मैदानावर येऊन बसला आहे.' हें ऐकून मंडळींना महाराजांच्या शुद्ध प्रेमाची कल्पना आली.

महाराजांचे मुक्कामांत तेथील विद्यार्थ्यांच्या पुराणचक्र्या, कीर्तन म्हणणें इत्यादि कार्यक्रम सारखे चालू असत. नारायणस्वामींच्या उत्सवांत महाराज स्वतःच नारायणस्वामींचे चरित्रावर पुराण सांगत असत. महाराजांचेजवळ भिक्षेचे वेळींसुद्धां पांच पन्नास मंडळी बसून राहत असत.

बेळगांवचे पुट्टोपंत कालकुंद्रीकर यांची बहीण मुचंडीकर कुलकर्णी यांचेकडे दिली होती. तिला वाडीस महाराजांचे दर्शनास न्यावें म्हणून तिच्या सासऱ्यास कालकुंद्रीकरांनीं विचारलें. तेव्हां त्यांनीं सांगितलें, 'आमचा कुलदेव येडूरचा विरूपाक्षेश्वर आहे, तेथें जात असल्यास सुनेस न्या' असें म्हणून कशीतरी परवानगी दिली. वाडीस कालकुंद्रीकर बहिणीला घेऊन आल्यावर महाराजांनीं कालकुंद्रीकरांना नारळ प्रसाद दिला, पण त्यांच्या बहिणीस मात्र दिला नाहीं आणि सांगितलें कीं,

'त्यांचा कुलदेव विरूपाक्ष आहे त्याचा प्रसाद घ्या. दत्त कांहीं कुल-स्वामी नाहीं.' शेवटीं कालकुंद्रीकरांच्या आग्रहावरून बहिणीला प्रसाद दिला.

वाडीस मधल्या खेपेस महाराज आले होते, तेव्हां त्यांना पुजारी म्हणाले कीं, 'तुम्ही, ते गुजराथी ब्राह्मण गांडाबुवा यांचे बरोबर भिक्षेस बसतां-करितां प्रायश्चित्त घेतल्यावांचून देवाला शिवूं नका.' तें ऐकून महाराज म्हणाले कीं, 'आपण यापुढें देवालाच शिवत नाहीं म्हणजे झालें.' असें म्हणून पुढें देवास शिवणेचेंच महाराजांनीं सोडलें. लांबून वंदन करून जात असत. पुढें तिसऱ्या खेपेस महाराज वाडीस आले त्या वेळीं कन्यागत असल्यामुळें महाराजांना देवाची महापूजा करण्याबद्दल पुजाऱ्यांनीं विनंति केली. महाराज म्हणाले, 'तुमच्याच सांगण्यावरून एकदा देवाला शिवणेचें सोडलें. आतां आपण पुनः शिवणार नाहीं.' असें म्हणून महाराज स्वस्थ राहिले. तेव्हां एका पुजाऱ्यानें तक्रार केली कीं, 'आपण देवास शिवत नसल्यामुळें देव येथें आहे कीं नाहीं अशी शंका सर्व लोकांना व आमच्या घरच्या बायकांनामुद्धां येते. त्यामुळें आमचें नुकसान होतें.' तें ऐकून महाराज रागावून म्हणाले कीं, 'आपण राहिल्यानें तुमचें नुकसान होत असेल तर आम्ही जाण्याकरितां देवावर संतत धार धरा. देवाच्या आज्ञेवांचून आपण जाणार नाहीं.' असें स्पष्ट सांगितलें.

कृष्णाबाईचें पाणी त्या वेळीं अगदींच कमी झालें आणि कन्या-गताच्या यात्रेमुळें पाण्यांत पिंड वगैरे टाकल्यानें तें पाणी नासून महा-मारीचा उपद्रव सुरू झाला. एक दोन मृत्यूही झाले. तें पाहून सर्व लोकांनीं महाराजांना विनंति केली असतां श्रीदत्तपादुकांवर अभिषेक करण्यास महाराजांनीं सांगितलें. तेव्हां लोकांनीं जिज्ञासेनें विचारलें कीं,

'अभिषेकानें महामारी कशी जाते? त्याचा काय संबंध?' तें ऐकून महाराजांनीं खुलासा केला कीं, 'मृत्युरूप परमेश्वराच्या महामारी इत्यादिक शक्ति आहेत. तरी मृत्युरूप परमेश्वरास अभिषेकानें शांत केलें म्हणजे त्या शक्तीही शांत होतात.' हें ऐकून नंतर सर्व मंडळींनीं महारुद्राभिषेक केला, त्यामुळें महामारी शांत झाली.

जमखिंडीचे जोगळेकर वैदिक उत्तम घनपाठी प्रसिद्ध होते. त्यांना कांहीं घनासंबंधीं संशय होता. महाराजांनीं लगेच प्रमाण दाखवून त्यांचा संशय दूर केला. तसेच कुंडांची माहिती आपल्याप्रमाणें इतरांना नाहीं असा अभिमान जोगळेकरांना होता व त्यांनीं महाराजांची परीक्षा पाहण्याकरितां त्यांना कांहीं प्रश्न विचारले. लगेच महाराजांनीं ग्रंथांतील श्लोक म्हणून दाखवून त्यांच्या प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें दिलीं. तें महाराजांचें अलौकिक बुद्धिसामर्थ्य पाहून जोगळेकर आश्चर्यचकित झाले व त्यांचा अभिमान तत्काल नाहींसा झाला.

सावंतवाडीचे अणावकर एकदां वाडीस महाराजांचे दर्शनास आले. पूर्वाश्रमांत त्यांचा व महाराजांचा उत्तम परिचय होता. कांहीं गोष्टी झाल्यावर महाराजांनीं त्यांना पूर्वीच्या समंधाविषयीं विचारलें असतां तो हल्लीं येत नसल्याचें अणावकरांनीं सांगितलें. पुढें थोड्याच वेळानें पाठ सुरू झाला असतां एकदम तो समंध अणावकरांचे अंगांत येऊन बोलूं लागला कीं, 'आज आपण पुष्कळ दिवसांनीं माझें स्मरण केल्यामुळें मी आलों. या अणावकरानें आपणांजवळ पुष्कळ गोष्टी खोटया सांगितल्या. असो, मी सध्यां शंकरांच्या पिशाचगणावरील मोठा अधिकारी आहें; तथापि माझें हें प्रारब्ध अजून संपलें नाहीं. बरें तर जातों. दत्तमहाराज इकडे येत आहेत. ते येण्यापूर्वी येथून गेलें पाहिजे.' इतकें बोलून तो समंध निघून गेला.

महाराज एकदा सकाळीं संगमावर स्नानास गेले. पाण्यांत बुडी मारली. बऱ्याच वेळानें वर आल्यावर सर्वांना हातांतून आणलेला कोरडा अंगारा दिला आणि 'काशीरामेश्वरच्या यात्रेला जाऊन येण्यास इतका वेळ लागला. हा अंगारा तेथलाच आहे' असें त्यांनीं सांगितलें.

एकदां एक साठी उलटलेला सामवेदी ब्राह्मण महाराजांकडे येऊन सामवेद म्हणण्याचा आग्रह धरून बसला. महाराजांनीं, 'खालीं दत्ताजवळ म्हणा' असें त्यास सांगितलें. तरी तो आग्रहानें बसला. त्या वेळीं त्याला कांहींच स्मरण होईना. एकदम सर्व ज्ञान नाहींसें झालेलें पाहून तो फारच घाबरला. त्यानें महाराजांना साष्टांग नमस्कार घालून त्यांची क्षमा मागितली. नंतर महाराजांनीं साममंत्र त्याला म्हणून दाखविला. तो ऐकून महाराज सर्वज्ञ असल्याबद्दल त्या ब्राह्मणाची खात्री झाली.

या वर्षी चैत्र मासांत श्रीनारायणस्वामींचा उत्सव, महाराजांचे सान्निध्यामुळें बऱ्याच मोठया प्रमाणांत झाला. त्या उत्सवांत महाराज माधुकरी आणीत असत. एकदा महाराज ध्यानस्थ असतां वाडींत महामारी सुरू होणार असें सांगणें झालें. महाराजांनीं पुजारी मंडळींना सांगितलें कीं, 'वाडीवर संकट येणार आहे. तरी श्रीपादुकांवर अतिरुद्राभिषेक करा.' याप्रमाणें करतांच त्या रोगाचा उद्भव झाला नाहीं.

वैशाख पौर्णिमेस महाराजांना देवांनीं विचारलें कीं, 'वाडींत अजून किती दिवस राहावयाचें आहे?' महाराज म्हणाले, 'आपली इच्छा नाहीं. आज्ञा झाली कीं निंघणें होईल.' पुढें दोन दिवसांनीं 'शृंगेरीस चलावें' अशी देवांची आज्ञा झाली. महाराजांनीं याबद्दल कोणासच कांहीं सांगितलें नाहीं. भिक्षा झाल्याबरोबर पुस्तकें गाडाबुवांजवळ देऊन दंड कमंडलु घेऊन खालीं देवदर्शनास गेले व उत्तरद्वारांतच वंदन करून

पंचगंगा ओलांडून पलीकडे निघूनही गेले व एकसंबे गांवांत जाऊन मुक्काम केला.

महाराज एकदम निघून गेले त्यामुळें सर्व मंडळी घाबरून पाठीमागें गेली. नृसिंहसरस्वतीही होतेच. या वेळीं न कळवितांच एकाएकीं निघणें झाल्यामुळें मंडळींना पूर्वीप्रमाणें वाजंत्री लावून मिरवणूक वगैरे कांहींच करणें झालें नाहीं. महाराजांचीही तशी इच्छा नव्हती. एकसंबे गांवांत सर्व मंडळी वाडीहून येऊन त्यांनीं नमस्कार करून प्रार्थना केली कीं, 'वाडीस चातुर्मास होईल असें वाटत होतें.' महाराज म्हणाले, 'देवांचे आज्ञेनें निघणें झालें, तुम्ही दुर्गुण टाकून एकनिष्ठतेनें प्रभूची सेवा करा म्हणजे आमचें पुनः येणें होईल.' याप्रमाणें सर्वांचें समाधान केलें. मंडळी तेथें एक दिवस राहून महाराजांचे आज्ञेनें परत आली. नंतर महाराज टाकळी, बेळगांव या गांवांवरून पुढें मलप्रभातीरानें प्रवास करीत करीत गुर्लेहोसूर येथें येऊन पोंचले. तेथें कैवल्याश्रमस्वामींच्या आग्रहावरून दशाहार संपेपर्यंत मुक्काम झाला. तेथें चिदंबरनाथांचे मंदिरांत वास्तव्य होतें. तेथें महाराजांचे दर्शनास वाडीकर मंडळी आली. त्यांच्या प्रार्थनेवरून सर्व रोगप्रशमनार्थ 'भूतप्रेतपिशाचाद्याः' इत्यादि श्रीदत्तात्रेयांचें स्तोत्र महाराजांनीं त्यांना करून दिलें, व 'या स्तोत्राचें शुचितेनें त्रिकाल पठण करावें म्हणजे कोणतीही रोगबाधा होणार नाहीं' असें सांगितलें.

गुर्लेहोसूर येथें महाराजांचे दर्शनास शेंकडों मंडळी सारखी येत होती. रोज ४।५ शें मंडळी भोजनाकरितां असत. रोज भजन, कीर्तन, पुराण इत्यादि कार्यक्रम सारखे सुरू होते. प्रसिद्ध वेदान्ति बाबा गर्दे महाराजांचा समागम व्हावा या हेतूनें मुद्दाम तेथें आले होते.

दशाहार संपतांच गुर्लेहोसूरहून महाराज निघाले व धारवाडास मद्-

हाळमध्यें दत्तमंदिरांत राहिले. तेथें गांडाबुवांना महाराजांनीं सांगितलें कीं, 'या जनसमंदींत श्रीदत्तांनीं सांगितलेला लक्ष गायत्रीजप तुझ्याकडून होणार नाहीं. तरी तूं भडोचला जाऊन जप, ब्राह्मणसंतर्पण कर. पुढें कळवूं तेथें यावें.' याप्रमाणें आज्ञा झाल्यावर महाराजांना भिक्षा करवून गांडाबुवा धारवाडहून परत गेले.

धारवाडला मदिहाळमध्यें महाराजांचा मुक्काम असतां वाडीचे धुंडिराजबुवा कवीश्वर हे दर्शनास आले होते. यांचा स्वभाव अत्यंत दाक्षिण्ययुक्त असल्यानें यांचेवर महाराजांचें विशेष प्रेम होतें. पिताजी निवर्तल्यावर वाडींतच शुक्लवृत्तीनें राहून प्रभूची सेवा करावी अशी यांची इच्छा होती. परंतु प्रपंचांत राहूनच परमार्थ साधावा असें महाराजांनीं त्यांना सांगितलें व कांहीं मंत्रानुष्ठान सांगितलें. तें त्यांनीं श्रद्धेनें केलें व महाराजांची आज्ञा म्हणून सर्वत्र पुराणप्रवचनादिद्वारां धर्मजागृतीचें कार्य यावच्छक्य चालूं ठेवलें. मदिहाळला आल्यावर, महाराजांना आपण भिक्षा वाढावी असें धुंडिराजबुवांचे मनांत फार होतें. पण त्या गर्दींत त्यांची दाद कशी लागणार? महाराज जाण्याचे दिवस आले तरी यांना अवसर मिळाला नाहीं. पण सर्वज्ञ गुरुमाउलीला प्रेमळ भक्ताचें निर्मळ अंतःकरण समजलें. दुसरे दिवशीं धुंडिराजबुवांना भिक्षेची तयारी करण्याची आज्ञा सद्‌गुरूंनीं केली. अत्यंत आनंदित होऊन बुवांनीं एका बाजूस पाक करून महाराजांना भिक्षा वाढली. त्यामुळें त्यांना कृतार्थता वाटली. यांची संतोषी, समाधानयुक्त वृत्ति पाहून महाराजांचें यांचेवर विशेष लक्ष होतें. गरुडेश्वरीं असतांना धुंडिराजबुवा महाराजांचे दर्शनास गेले होते. त्यांना तेथें महाराजांनीं बरेच दिवस ठेवून घेतलें. बुवांनीं गांवीं जाण्याचें ठरवावें. रोज कोणीतरी नवी मंडळी येतच असत, त्यांना महाराजांनीं म्हणावें कीं, 'कां हो! या पुराणिकबुवांचें पुराण तुम्ही कधीं ऐकलें आहे काय? फार चांगलें सांगतात.' हें ऐकून त्या नवीन मंडळींनीं

अर्थातच 'नाहीं' म्हणून सांगावें. मग महाराजांनीं बुवांना म्हणावें कीं, 'बुवा! आज तुम्ही पुराण सांगून या मंडळींची इच्छा पूर्ण करा. मग उद्यां चला.' ही आज्ञा कशी मोडतां येईल? अर्थात्‌च त्या दिवशीं बुवांचा मुक्काम झालाच. असें प्रेमानें बरेच दिवस त्यांना ठेवून घेऊन जातांना नारळ प्रसाद व एक छाटी देऊन पूर्ण आशीर्वाद दिला. धारवाडहून महाराज निघाले ते जातां जातां तुंगभद्रातीरावर हावनूर या गांवीं येऊन पोंचले. तेथें ब्राह्मणवस्ती बरीच असल्यानें तेथेंच चातुर्मास करण्याचें ठरविलें.

## चातुर्मास २० हावनूर—शके १८३२

महाराज हावनूर येथें त्रिपुरान्तकेश्वराच्या देवळांत राहिले होते. तेथें गेल्यावर त्रिपुरान्तकेश्वर व तुंगभद्रा यांची स्तुति केली. गुरुपौर्णिमेच्या दिवशीं महाराजांनीं यथाशास्त्र व्यासपूजा केलेली पाहून तेथील सर्व मंडळींचे मनांत महाराजांचे विषयीं पूर्ण आदर उत्पन्न झाला. सर्व मंडळी आपापल्या घरीं महाराजांना भिक्षेस बोलावूं लागली. वैष्णवांच्या घरीं मात्र महाराज भिक्षेस जात नसत. येथें आषाढ व॥ १३ स वामनरावजी गुळवणी महाराजांचा शोध करीत आले. ते येण्याबरोबर 'येथें चातुर्मास असल्याबद्दल कोणालाही पत्र पाठवावयाचें नाहीं.' असें महाराजांनीं त्यांना सांगितलें. नंतर तेथें ८।१० दिवस राहून ते आज्ञेनें परत गेले.

कानडी प्रांत असूनही महाराजांची कीर्ति हळूहळू सर्वत्र पसरूं लागली. त्यामुळें तेथेंही पुष्कळ लोक जमूं लागले. गोपाळबुवा राजाध्यक्ष महाराजांना शोधीत अखेर तेथें येऊन पोंचले. त्यांनीं रोज रात्रीं भजन सुरू केलें. त्या वेळीं बरीच दाटी जमूं लागली. कानडी मंडळींनासुद्धां तें भजन ऐकून आनंद होत असे. रात्रीं भजन संपून महाराजांची आरती होई. मग प्रसाद घेऊन मंडळी घरीं जात.

गोपाळबुवांनीं एकदां अखंड भजनसप्ताह केला व शेवटीं गांवांत भिक्षेस निघाले. आणखीही बरीच मंडळी वाद्यें वाजवीत निघाली. दिगंबराचें भजन करीत भिक्षा खूप जमली. सर्व ग्रामस्थ मंडळींना प्रसादास बोलावलें. सर्वांनीं मिळून स्वयंपाक केला. पांचशें पान त्या दिवशीं जेवलें. जेवतांना महाराजांनीं सर्वांना श्लोक म्हणावयास सांगितलें. त्यांतच एका मुक्या मुलालाही ' तूं श्लोक म्हणतोस काय ? म्हण. ' असें सांगतांच तो श्लोक म्हणूं लागला. सर्व आश्चर्यचकित झाले.

एकदां रात्रीं भजन सुरू असतां शेषगिरि नांवाचा एक वैष्णव ब्राह्मण आपल्या बहिणीस घेऊन येथें आला. बहिणीचें लग्न झाल्यावर कांहीं दिवसांनीं तिचे पाय अगदीं आंखडून गेल्यामुळें तिला चालतांही येत नव्हतें व अलीकडे ३।४ वर्षें दिसतही नव्हतें. त्यानें ती हकीकत महाराजांचे कानांवर घातली असतां भजन संपल्यावर तिला घेऊन येण्यास महाराजांनीं त्यांस सांगितलें. भजन संपल्यावर त्या बाईच्या अंगावर महाराजांनीं कमंडलूंतील पाणी शिंपडलें व तें तिच्या पायांस व डोक्यास लावण्यास सांगितलें. तसें करतांच तिच्या अंगांतील पिशाच एकदम ' जातों जातों ' असें ओरडलें. नंतर महाराजांनीं त्या पिशाचास त्याची इच्छा पाहून तुला सद्गति मिळेल असें सांगतांच तें पिशाच तत्काळ त्या बाईला सोडून गेलें. त्या बरोबर ती बाई एकदम उठून चालूं लागली व तिला उत्तम दिसूंही लागलें. तिला आणतांना उचलून आणलें होतें पण जातांना ती आपल्या पायानें चालत गेली; तें पाहून सर्व लोक आश्चर्यानें थक्क झाले. वैष्णव लोकही त्यामुळें महाराजांचे भजनीं लागले.

हावेरी स्टेशनपासून हावनूर २०।२२ मैल आहे. हावेरीचे स्टेशनमास्तर दक्षिणी ब्राह्मण असून ते महाराजांचेकडे येणाऱ्या यात्रेकरूंची व्यवस्था चांगली ठेवीत असत. त्यांनीं महाराजांचे दर्शनास येणेकरितां रजेचे दोन अर्ज केले पण रजा मिळाली नाहीं. शेवटीं चातुर्मास

समाप्तीचे आदले दिवशीं त्यांना रजा मिळून ते महाराजांचे दर्शनास आले. त्या वेळीं महाराज त्यांना म्हणाले कीं, ‘ तुम्ही अर्ज केला तेव्हांच रजा मिळाली असती तर येणाऱ्या यात्रेकरूंची व्यवस्था कशी झाली असती ? ही तुम्ही देवाचीच सेवा केली, ती देवास पोंचली. हा प्रसाद घ्या.’ असें सांगून त्यांना कोठींतून एक रेशमी वस्त्र व दहा रुपये देऊन नारळ प्रसाद दिला. तें महाराजांचें बोलणें ऐकून स्टेशनमास्तरांना धन्यता वाटली.

रट्टेहळीचे यज्ञेश्वर दीक्षित हे श्रीनारायणस्वामींचे कन्यावंशज आपल्या मामाच्या घरीं राणीबिन्नूर येथें लहानपणीं राहत होते. त्यांच्या मस्तकाला एक गळूं होऊन त्याला अनेक छिद्रें पडलीं व त्यांतून सारखा पूं वाहूं लागला. पुष्कळ औषधोपचार करूनही गुण आला नाहीं. शेवटीं त्यांचे मामा रामाप्पा नाईक यांनीं यज्ञेश्वर दीक्षितांना महाराजांचेकडे आणलें व ती आपल्या भाच्याची हकीकत त्यांना सांगितली. महाराजांनीं कृपादृष्टीनें पाहून सर्व तपासलें व आंतून एक लांब मुळी रामाप्पांना आणून दिली आणि लिंबाच्या रसांत उगाळून गळवाला लेप लावण्यास सांगितलें. त्याप्रमाणें करतांच दुसरेच दिवशीं पूं वाहण्याचें बंद होऊन आठ दिवसांत तें गळूं नाहींसें झालें.

तेथील शाळामास्तर गोविंदराव फाटक यांचे हातास कुष्टरोग झाल्यामुळें त्या हातानें त्यांना खातांही येत नव्हतें. त्यांची प्रार्थना ऐकून त्यांना महाराजांनीं कांहीं जपानुष्ठान सांगून वर औषधही लावण्यास दिलें. तें लावून जप करतांच त्यांचें कुष्ट जाऊन हात उत्तम झाला.

हिंगोली गांवांतील श्रीमंत मारवाडी यांच्या मातोश्रींना वस्त्रांचेंहि भान राहत नसे. त्यांना महाराजांनीं एक यंत्र करून दिलें होतें व त्याचा सर्व विधिहि सांगितला होता. त्याप्रमाणें केल्यावर त्या बाईची

पिशाचबाधा दूर होऊन त्यांची प्रकृति उत्तम झाली. त्यांना घेऊन हेमराज मारवाडी हावनूरला महाराजांचे दर्शनास आले होते.

हावनूरला एक वैष्णवसंप्रदायांतील बाई बरींच वर्षें अंथरुणावर पडूनच होती. तिला उठतां येत नव्हतें. पुष्कळ लोकांनीं तिला महाराजांकडे नेण्यास सांगूनहि महाराज स्मार्त म्हणून तिला तिच्या मंडळींनीं महाराजांकडे आणलें नाहीं. नुसते जाऊन तिची हकिकत महाराजांचे कानांवर घातली. 'त्या बाईला समक्ष पाहिलें पाहिजे' असें महाराज म्हणाले.' नाइलाजानें तिला महाराजांचे समोर उचलून आणलें. तिला पाहतांच महाराज म्हणाले कीं, ' हिला रोग नाहीं तर पिशाचबाधा आहे. ' नंतर तिच्या अंगावर पाणी मंत्रून टाकतांच तें पिशाच बोलूं लागलें. ' पूर्व जन्मीं या बाईनें आपणांस फार छळल्यामुळें मी पिशाच होऊन हिल पीडा देत आहें. आपल्या दर्शनानें मी पवित्र झालों. आपल्या आज्ञे प्रमाणें मी हिला सोडून जातों ' असें त्या पिशाचानें सांगितलें. नंतर त्या बाईस महाराजांनीं एक यंत्र करून देऊन कांहीं जपहि सांगितला तो जप पूर्ण होतांच ती बाई उत्तम बरी होऊन हिंडूं फिरूं लागली तें पाहून वैष्णव मंडळींचे मनांतहि महाराजांचेविषयीं पूज्य भावन निर्माण झाली.

चातुर्मास पूर्ण होतांच भाद्रपद पौर्णिमेस महाराजांनीं सीमोल्लंघ केलें. बरोबर गांवांतील मंडळी आली होती. सीमेचे पलीकडे गेल्याव गीतेचा अकारावा अध्याय महाराजांनीं म्हटला. नंतर प्रसाद वांटू भजन करीत सर्व मंडळी परत आली. लगेच महाराजांनीं जाण्याच तयारी केली. सर्व लोकांनीं आणखी कांहीं दिवस राहण्याची विनं केली. पण ती न ऐकतां महाराज तेथून पुढें निघाले. तुंगभद्रा तीराव गळगनाथ देवस्थानांत चिक्काप्पाशास्त्री म्हणून एक विद्वान् प्रेम

ाह्मण राहत होते. त्यांचे घरीं भिक्षा करून महाराज परत हावनूरला
ााले. त्याच सालीं तूळ राशीस गुरु आल्यामुळें तुंगभद्रेला गंगा येऊन
मेळते. त्या पर्वकालांत महाराजांनीं तेथें स्नान केलें व सुवासिनी स्त्रियांना
ळदी कुंकु देऊन खण दिले. शास्त्रीमंडळींना उपरणीं व लहान मुलांना
ााऊ दिला.

हावनूरहून निघून महाराज तुंगभद्रा-वर्धासंगमावरून आगठीस आले.
ेथून राणीबिन्नूरनजीक कुपेल्लूर येथें नवरात्र करून शिमोग्यावरून
ृंगेरीस आले. त्या वेळीं तेथें आचार्य नव्हते. नंतर मठांत गादीस वंदन
करून आचार्यांची स्तुति केली. तेथून हरिहर क्षेत्रास जाऊन शृंगेरीस
ुनः परत आले. तेथें तुंगभद्रेच्या परतीरावर नृसिंहवनांत महाराजांचा
ुक्काम १९ दिवस होता. तेथून एक मैलावर वैकुंठपुरी नांवाच्या गांवांत
भिक्षेस जात.

शृंगेरीहून निघून अरण्यमार्गानें कार्तिकांत बनवासी येथें येऊन
ाहिले. दत्तजयंती तेथेंच झाली. येथेंच षट्पंचाशिका नांवाचें वेदान्तपर
स्तोत्र तयार करून तेथील अधिकारी शिष्यांना दिलें. तेथील मधुके-
श्वराच्या मंदिरांत महाराजांचा मुक्काम दीड महिन्यापेक्षां अधिक होता.
ेथें मधुकेश्वर म्हणून एक शिवलिंग दीड पुरुष उंचीचें असून,
ंदिकेश्वरही दोन पुरुष उंचीचा आहे.

महाराज बनवासी येथें असतांना एका ब्राह्मणानें येऊन आपली
हकिकत त्यांना सांगितली ती अशी कीं, 'मीं नवीन घर बांधलें कीं,
एक पिशाच मला आधीं सूचना देऊन तें घर जाळून टाकतें. अशीं
यानें माझीं दहा घरें जाळलीं. तरी कृपा करून मला या त्रासांतून
सोडवा.' हें ऐकून महाराजांनीं त्या पिशाचाला बोलावून विचारलें
असतां त्यानें सांगितलें कीं, 'यानें मला पूर्व जन्मीं फार त्रास दिल्यामुळें

त्याचा हा सूड मी उगवून घेत आहें. ' नंतर त्यानें सांगितलें कीं, माझ्याकरितां कांहीं चांगलें कार्य करण्यास सांगून त्यामुळें माझी मुक्तता होत असल्यास मी आज्ञेप्रमाणें जाण्यास तयार आहें. ' हें ऐकून महाराजांनीं त्या ब्राह्मणास कांहीं अनुष्ठान सांगितलें. तें केल्यावर पिशाचपीडा दूर होऊन त्याचें घर टिकलें.

बनवासीहून महाराज निघाले. अरण्यांतून येत असतां समोरून हत्तींचा कळप येत असलेला दिसला. बरोबरची मंडळी घाबरली. महाराजांनीं देवाची प्रार्थना केली व तेथेंच जमिनीवर झाडाखालीं उभे राहिले. तो हत्तींचा कळप कांहींही न करतां दूर निघून गेला. नंतर पुढें शिरसीवरून सिद्धेश्वर येथें आले असतां तेथें त्यांना नेण्याकरितां गोकर्णाहून बळवंतराव भागवत व दैवरात गजानन शर्मा हे दोघे आले. त्यांच्या आग्रहावरून महाराज गोकर्णास गेले. तेथें अहिल्याबाईचे छत्रांत मुक्काम होता. तेथें ऋङ्मंत्रावर सकाळीं प्रवचन व सायंकाळीं वासुदेवमनन सुरू होतें. गोकर्णास दहाबारा दिवस राहून मकरसंक्रांतीच्या पर्वकालाचें स्नान करून महाराज निघाले. त्या वेळीं तेथील मंडळींनीं १। मणाचा तिळगूळ वांटला. तेथून पुढें कृष्णातीरीं कोटितीर्थावर पौष पौर्णिमेस क्षौर करून पुढें २।३ दिवसांनीं तेथून निघाले व गुर्लहोसुरास आले. नंतर तेथून गलगली या गांवीं आले.

महाराज गलगलीस दोन महिने होते. तेथील एका बाईचा मुलगा महाराजांना नवस केल्यानें आजारांतून बरा झाला. म्हणून त्या बाईनें महाराजांचे पुढें ११०० रुपये दक्षिणा म्हणून आणून ठेवले. महाराज म्हणाले, ' हे पैसे आम्हांला नकोत. तुम्ही परत न्या.' त्या बाईनीं सांगितलें कीं, ' मी हे पैसे परत नेणार नाहीं. नको असतील तर नदींत टाकून द्या.' हें ऐकून महाराजांनीं ते पैसे तेथील एका पुजाऱ्याकडे देऊन

त्यांतून कीर्तन, पुराण इत्यादि कार्य करविलें. त्या गांवांत वैष्णव ब्राह्मण फार असून ते स्मार्तांचा द्वेष करीत. समाराधनेसाठीं त्यांना भांडीं मागितलीं असतां तीं त्यांनीं न दिल्यामुळें दुसऱ्या गांवाहून स्वैपाकाचीं मोठीं भांडीं आणवावीं लागलीं. गलगली हें गालव मुनींचें क्षेत्र. सच्छील, प्रेमळ मंडळी, ब्राह्मण वस्तीही बरी, म्हणून महाराज तेथें राहिले. तो तेथें असा प्रकार. पुढें लवकरच वैष्णव लोक एकदम आजारी पडले. तेव्हां ते भीतीनें महाराजांना शरण आले असतां महाराज जास्तीच संतापून म्हणाले कीं, 'तुम्ही ब्राह्मण म्हणवितां आणि संतर्पणाला भांडीं देत नाहीं ? तर तुमच्यापेक्षां महार चांगले. तुम्ही तोंड दाखवूं नका, चालते व्हा.' हें रागाचें भाषण ऐकून सर्वांनीं क्षमा मागितली. तेव्हां त्यांना शिवाचा मंत्र देऊन त्याचा जप केला तरच ज्वरमुक्त व्हाल असें महाराजांनीं त्यांना सांगितलें. त्यांनीं नाइलाजानें प्रत्येकानें १२०० जप करतांच त्यांचा ज्वर नाहींसा झाला. महाराज गलगलीहून निघाले असतां मग त्यांना वैष्णव ब्राह्मण राहण्याचा आग्रह करूं लागले ! पण महाराजांनीं त्यांना स्वच्छ नाहीं असें सांगून ते निघाले. ती मंडळी त्यांचे पाठीमागें धांवूं लागली. तें पाहून महाराजांनीं रस्त्यांत एक रेषा काढली आणि सांगितलें कीं, 'जर ही रेषा ओलांडून याल तर तुमचा वंशक्षय होईल.' हें ऐकतांच मंडळी भीतीनें परत फिरली.

गलगलींत महाराजांचे मुक्कामांत तेथील ब्राह्मण मंडळींनीं सर्वांचे कल्याणार्थ, संहितेचे तीन, पवमानाचे सात व रुद्राचे दोन असे एकंदर बारा स्वाहाकार केले. हजारों मंडळी आली होती. सर्व विद्वज्जनांना उत्तम संभावना झाली. गांडाबुवांनाही महाराजांनीं मातेचें शिवरात्रीव्रताचें उद्यापन करण्यास सांगितलें. त्या आज्ञेप्रमाणें गांडाबुवांना लघुरुद्रस्वाहाकारपूर्वक त्या व्रताचें उद्यापन करून ते मातृऋणांतून मुक्त झाले.

एकदम गुप्त होणें, एकदम दूर जाणें इत्यादि कामासाठीं सिद्धींचा उपयोग आपण फक्त तीन वेळां केला असें महाराजांनीं एकदां सहज बोलतां बोलतां सांगितलें.

जमखंडीचे शाळामास्तर आपल्या मातोश्रींना घेऊन महाराजांचेकडे आले. त्यांच्या मातोश्रींचे सांधे जखडून गेल्यामुळें त्यांना चालतां येत नव्हतें. महाराजांनीं त्या बाईंना पिशाचबाधा असल्याचें सांगितलें. इतक्यांत त्या पिशाचानें अंगांत येऊन सांगितलें कीं, ' माझ्या जागेवर या बाईनें लघुशंका केल्यामुळें मी हिला पीडा देत आहें. आपलें दर्शन झालें, आतां मी हिला सोडतों ' असें सांगून तें पिशाच निघून गेलें. लगेच त्या बाई बेशुद्ध पडल्या. थोड्या वेळानें सावध होऊन त्या चालत घरीं गेल्या.

गलगलीहून निघून महाराज फाल्गुन अखेरीस जैनापूरला येऊन दत्तमंदिरांत उतरले. तेथें 'दत्तात्रेयं महात्मानं वरदंभक्तवत्सलं' हें स्तोत्र केलें. तेथें एक लिंगाइताची बाई दर महिन्यास शेवटीं तीन दिवस बेशुद्ध होऊन पडत असे. महाराजांनीं दत्तमंदिरांत किंवा औदुंबरास प्रदक्षिणा घालण्यास सांगितलें. त्याप्रमाणें तिनें प्रदक्षिणा सुरू करतांच हळूहळू ती पूर्णपणें बरी झाली.

तेथून कृष्णातीरानें प्रवास करीत महाराज मलप्रभाकृष्णासंगमावर चैत्र अमावास्येस येऊन पोंचले. तेथें नारायणस्वामींची पुण्यतिथि करून पुढें छायाभगवतीचे दर्शनास गेले. हें स्थान विश्वामित्रांचें तपस्थान असून अगदीं निर्जन डोंगरांत आहे. एकही झाड नाहीं. येथें अक्षय्य तृतीयेस फक्त यात्रा जमते. गायत्रीच्या पादुका व छायाभगवती यांची पूजा येथें होते. गलगलीसच गांडाबुवा महाराजांना येऊन भेटले. व आज्ञेप्रमाणें जप पूर्ण केल्याची हकिकत त्यांनीं महाराजांना सांगितली.

छायाभागवतीहून महाराज गांडाबुवांचेसह पुढें गेले. तेथून निघतांना महाराजांना पुढें व्याधि होणार असल्याबद्दल दृष्टान्त झाला. आणि पुढें कोपरगांवीं नरसिंहाचे स्थानांत येतांच महाराजांना ज्वर येऊं लागला. दोन दिवस थांबूनही ज्वर हटत नाहीं असें पाहून महाराज तसेंच पुढें निघाले. या प्रांतांत पैसे खर्च करूनही दहीं, दूध, ताक कांहींच मिळेना. गांडाबुवांचें धैर्य गळालें. वैष्णव वस्ती फार. आणि ते तर स्मार्तांचा द्वेष करणारे. या अडचणीमुळें महाराजांना ताकसुद्धां मिळेना. तरी प्रवास चालूच होता. कृष्णाभीमासंगमावर कडलूर गांवापासून एक-दीड कोसांवर एक गांव आहे. तेथें जोशांचे घरीं ताक मिळेल असें समजल्यावरून गांडाबुवा त्या घरीं गेले व 'बरोबरचे स्वामीमहाराज आजारी असून चार-पांच दिवस त्यांनीं भिक्षा केली नाहीं. तरी थोडें ताक आपण त्यांचेकरितां वाटल्यास किंमत घेऊन द्या,' अशी कळकळीनें गांडाबुवांनीं त्या घरच्या बाईस विनंति केली. पण घरचा मालक म्हणाला, 'चार-पांच दिवस भिक्षा नाहीं, स्वामी जिवंत कसा राहिला?' असें अद्वातद्वा बोलून त्यानें गांडाबुवांना घालवून दिलें. नंतर दोघे कोस-दीडकोस चालून कडलूर गांवीं आले. तेथें गांडाबुवांनीं गांवांत जाऊन ताकाचा तपास केला. तेव्हां 'अजून ताक होण्यास अवकाश आहे, तुम्ही थोडया वेळानें या' असें एका बाईनें सांगितलें. तेव्हां गांडाबुवा परत मुक्कामावर आले व महाराजांना ती वार्ता सांगून स्नानाकरितां गेले. वैशाख महिना, दुपारची वेळ, तहान फार लागली, त्यामुळें थोडया वेळानें महाराज स्वतःच उठून गांडाबुवा येण्याचे अगोदरच त्या बाईचे घरीं गेले व त्यांनीं ताक मागितलें. पण त्या वेळीं घरच्या मालकानें महाराजांचेवर वाटेल तसें तोंडसुख घेऊन त्यांना शेवटीं ताक न देतांच घालवून दिलें. महाराज आपले परत मुकाट्यानें आपल्या मुक्कामीं आले व गांडाबुवा आल्यावर तेथें ताक आणण्यास जाऊं नकोस असें सांगून घडलेली

हकिकतही सांगितली. ती ऐकून गांडाबुवांना वाईट वाटलें. जगद्वंद्य पुरुषाला ताकही न देणारा हा ब्राह्मण काय भाग्याचा आहे ही विचारणीय गोष्ट आहे !

नंतर पुढें प्रवास करीत महाराज श्रीपादश्रीवल्लभांचे स्थानीं कुरुगड्डी येथें वैशाख वद्य ६ रोजीं येऊन पोंचले. याच्या सर्व बाजूंनीं कृष्णेचा प्रवाह असून तेथें जंगलच आहे. त्यामुळें या बेटांत पूर्ण एकान्त आहे. सेंट्रल रेल्वेच्या रायचूर व कृष्णा स्टेशनहून हें स्थान १८।२० मैल आहे. तेथें तपश्चर्येला उपयुक्त अशी एक सुंदर गुहा आहे. तेथें नदींत खडक असल्यामुळें नाव चालत नाहीं. भोपळ्याच्या सांगडीवरून जावें लागतें.

'या स्थानीं चातुर्मास करावा म्हणजे पुष्कळ मंडळी येऊन हें स्थान प्रसिद्ध होईल' असें श्रीपादश्रीवल्लभांनीं महाराजांना सांगितल्यामुळें महाराज येथें आले. तसेंच तेथील वडील पुजारी भीमाण्णा यालाही एक महिना अगोदर देवांनीं दृष्टान्त देऊन सांगितलें कीं, 'एक महिन्यांनीं आमचे एक परमभक्त संन्यासी येथें येतील; त्यांची व्यवस्था उत्तम ठेव, नाहीं तर तुला शिक्षा होईल.' अशी व्यवस्था देवानें करून ठेवली होती.

## चातुर्मास २१ कुरुगड्डी–शके १८३३

कुरुगड्डी गांव म्हणजे कृष्णाप्रवाहांतील एक बेट आहे. यालाच कुरवपूर म्हणतात. येथेंच श्रीपाद श्रीवल्लभांचें तप होऊन ते आश्विन वद्य द्वादशीस येथें अदृश्य झाल्याची कथा गुरुचरित्रांत आलेली आहे. येथें तेलगू व कानडी भाषा आहे. दोन मैल रुंद कृष्णेच्या प्रवाहामध्यें हें बेट एक मैल लांब, अर्धा मैल रुंद असें आहे. एका टोंकास दत्तमंदिर व दुसऱ्या टोंकास गांव व मध्यें शेतें आहेत. मंदिरांत श्रीदत्तपादुका आहेत. बेटाच्या दुसऱ्या बाजूस असलेल्या प्रवाहाचे तीरावर एका दगडा-

वर श्रीपादश्रीवल्लभांच्या पावलांचे ठसे पुष्कळच उठलेले दिसतात. एका शरीरावर नमस्कार घातल्याप्रमाणें सर्व शरीराचा ठसा उठलेला आहे. या स्थानांत सेवेकरी थोडेच असतात. त्यांच्या कामाचा निर्णय येथें लवकर लागतो. गांवांत पुजारी व कुलकर्णी अशीं दोनच ब्राह्मणांचीं घरें होतीं. पुजारी तीन बंधु एकाच घरांत तीन खोल्यांतून राहत होते. कोणाचींही लग्नें झालेलीं नव्हतीं. महाराजांनींच धाकट्या भावाचें वल्लभाण्णाचें लग्न करून दिलें.

महाराज कुरुगड्डीस आल्यावर श्रीपादश्रीवल्लभांच्या पादुकांना वंदन करून तेथें राहिले. पहिले दिवशीं भिक्षा झाली. तेथें ब्राह्मणांचीं घरें दोनच असल्यानें दुसरे दिवशीं उपोषण घडलें. शिवाय तेथील पुजाऱ्यांचा तो शूद्रवत् आचार पाहून महाराजांना तेथें राहावेसें वाटेना. तेव्हां श्रीपादश्रीवल्लभानीं ब्रह्मचारी वेषानें महाराजांचेकडे येऊन त्यांना सांगितलें कीं, ‘ ही भूमि रजकभक्तानें मला दिली आहे. नैवेद्य-नंदादीप यांतून चालू आहे, तरी येथें भिक्षा घेण्यास हरकत नाहीं. या लोकांच्या आचारांचेकडे लक्ष देऊं नये. मुख्यतः द्रव्यशुद्धि व भावशुद्धि येथें असल्यामुळें त्यांचें आम्हांला चालतें; तर तुम्हांला कां चालू नये ? तुम्ही यापुढें कोणालाही पायाचें तीर्थ देऊं नये व अनधिकाऱ्यास मंत्रही देऊं नये. येथें येणाऱ्यांनीं गाणगापूर व वाडीप्रमाणें शुचितेनें वागावें.’ असें सर्व श्रीपादश्रीवल्लभांनीं महाराजांना सांगतांच तेथील पुजाऱ्यांचेकडे महाराज भिक्षा घेऊं लागले. येथें महाराज येण्यापूर्वी पाऊस अगदीं नव्हता. नंतर तेथें आलेल्या मंडळींकडून महाराजांनीं ऋष्यशृंग मंत्राचा जप करवितांच उत्तम पाऊस पडला.

महाराजांचा चातुर्मास तेथें सुरू झाला. हळूहळू ही वार्ता सर्वत्र समजून मंडळी दर्शनार्थ येऊं लागली. पावसाळ्यामुळें चारी बाजूंनीं नदीचा प्रवाह भरून चाललेला. सामानसुमान तेथें कांहींच मिळत नाहीं. प्रत्येक

वस्तु रायचूरहून सांगडीवरून आणावयाची. अशा स्थितींत मंडळींची ये-जा वाढली. तेव्हां गांडाबुवांनीं तेथें एक चांगली जागा तयार करून तेथें एकच स्वयंपाक करण्यास सुरुवात केली. प्रत्येकाला जागा, भांडीं निराळीं मिळणें अशक्य, म्हणून ही सोय त्यांनीं केली. रायचूरचे व्यापारी, सर्व अधिकारी मंडळी तेथें येऊन मदत करूं लागली. तुळजाराम पतंगे या व्यापाऱ्यांनीं दिवाळीपर्यंत सर्व सामान वेळोवेळीं आणून दिलें. अशा जंगलांतही रोज येणाऱ्या मंडळींना पक्वान्नांचें भोजन मिळत असे.

एकदां महाराज भिक्षा घेऊन आले. अद्यापि मंडळींचीं पात्रें वाढावयाचीं होतीं. तीं वाढून झाल्याबरोबर महाराज भिक्षेची झोळी घेऊन आले. झोळींत हात घालतांच जोरानें विंचू चावला. नंतर महाराजांनीं भिक्षा न करतां सर्वांना जेवण करण्यास सांगितलें. पण मंडळी ऐकेनात. नंतर नित्य पाठाचें एक स्तोत्र म्हणावयाचें गडगबडींत राहिलें होतें तें म्हणून महाराज तसेच भिक्षेस बसले. नंतर सर्व मंडळीही जेवूं लागली. 'त्या दिवशीं लक्ष्मणराव नाईक उमरेडकर यांना कांहीं यंत्र वगैरे देण्याच्या गडबडींत नित्याचें एक स्तोत्र म्हणण्याचें राहिलें, त्यामुळें विंचू चावला' असें महाराजांनीं त्याचें कारण सांगितलें आणि म्हणाले कीं, 'एक स्तोत्र म्हणावयाचें राहिलें तर देव रागावून आम्हांला विंचू चावतो, मग तुम्ही रोज किती तरी देवाचें कृत्य विसरतां, तुम्हांला देव किती शिक्षा करतील याचा विचार करा.'

एकदां महाराज समाधि-स्थितींत असतां त्यांच्या हातांत देवांनीं मृतचिमण्या, पक्ष्यांचीं अंडीं, विष्टा इत्यादि पदार्थ टाकले. ते पाहून महाराजांनीं ते फेकून दिले. तेव्हां देव म्हणाले, 'हे असे गलिच्छ पदार्थ रोज आमच्या अंगावर पडतात, ते आम्ही कसे सहन करीत

असतों, हें तुम्हांला कळण्याकारितां तुमच्या हातांत हे पदार्थ टाकले.' दुसरे दिवशीं महाराजांनीं प्रत्यक्ष वटवाघळांनीं मारलेली मृतचिमणी देवावर पडलेली पाहिली. लगेच ती काढून जागा स्वच्छ केली व देवळास दार लावून आंतीलही सर्व चिरा चुन्यानें मुजवून सर्व व्यवस्था केली.

आषाढ शु॥ ११ स कृष्णाबाईनें महाराजांचे स्वप्नांत शूद्र रूपानें जाऊन आपणांस डाळ तरी द्या असें सांगितलें. त्या वर्षी मलप्रभातीरीं महाराजांनीं दशाहार केला होता, त्यामुळें कृष्णाबाईना कांहीं मिळालें नव्हतें. नंतर आषाढी पौर्णिमेस महाराजांनीं व्यासपूजा केली व सायंकाळीं गांवांतील शूद्रांना बोलावलें. नंतर कृष्णामातेची उत्तम पूजा करून भिजलेल्या डाळीचा नैवेद्य दाखवून ती डाळ जमलेल्या शूद्र लोकांना भरपूर वांटली त्यामुळें ते तृप्त होऊन घरीं गेले. कृष्णाबाई तेथें शूद्र स्वरूपांत असल्यानें शूद्र स्त्रियांची ओटी भरून सर्वांना डाळ वांटली.

कुरुगड्डीस असलेल्या गुहेंत एक सर्प राहत होता. त्याला महाराजांनीं ती जागा सोडण्यास सांगितलें. तेव्हां तो त्या गुहेंतून निघून बाहेर एका अश्वत्थाच्या झाडावर जाऊन राहिला. पण रोज तेथून तो महाराजांचें दर्शन घेऊन जात असे. महाराजांचे आज्ञेप्रमाणें त्यानें कोणास पीडा दिली नाहीं व लोकांनींही त्याला दुखविलें नाहीं. ती गुहा स्वच्छ करून तेथें महाराज समाधीसाठीं बसूं लागले.

गांडाबुवा कुरुगड्डीस पादुकांवर पाणी घालीत. पण देवांचे सांगण्यावरून तें महाराजांनीं त्यांना बंद करण्यास सांगितलें. 'नरसोबाचेवाडीस जर पादुकांवर गांडाबुवा पाणी घालीत नाहींत तर येथें कां?' असें देव म्हणाले. नंतर गांडाबुवांनीं पाणी बंद करून देवाची क्षमा मागितली.

एकदां एक गृहस्थ आपली पैशाची पिशवी व कपडे ठेवून स्नाना-

करितां नदींत उतरले. तें पाहून एका बाईनें ती पैशाची पिशवी लांब-विली. ते गृहस्थ स्नान करून येऊन पाहतात तों पैशाची पिशवी नाहीं. त्यांनीं ती गोष्ट महाराजांना सांगतांच एका पिशाचाला त्या चोरीचा शोध करण्यास महाराजांनीं आज्ञा केली. त्यानें लगेच जाऊन त्या बाईस भीति दाखवितांच ती बाई महाराजांचेकडे येऊन तिनें ते सर्व पैसे दिले व अपराधांची क्षमा मागितली.

शेषो कारदगेकर यांच्या प्रार्थनेप्रमाणें महाराजांनीं त्यांना वेंकटरमणाचें पद करून दिलें व सर्वांचे कष्टनिवारणार्थ 'श्रीपादश्रीवल्लभ त्वं सदैव' हें स्तोत्र केलें. 'तेथें येणाऱ्या यात्रेकरूंना राहण्याकरितां धर्मशाळा बांधावी,' असें रायचूरकर मंडळींना महाराजांनीं सांगितलें होतें.

सोलापूरच्या एका ब्राह्मणाची बायको आजारी होती. तिला महाराजांनीं एक यंत्र हातांत बांधण्याकरितां तयार करून दिलें; त्यामुळें तिची प्रकृति बरी झाली. गांवीं गेल्यावर त्यांनीं पुनः डॉक्टरांचें औषध सुरू केलें. लगेच देवांनीं स्वप्नांत त्या बाईस सांगितलें कीं, 'तुझा विश्वास आमच्यावर नाहीं तर तें आमचें यंत्र परत दे.' असें सांगून तें यंत्र तिच्या हातांतून काढून जवळच टाकलें. ती बाई जागी होऊन पाहते तों हातांत यंत्र नाहीं. थोडें शोधतांच दूर जाऊन पडलेलें सांपडलें. नंतर ती सर्व हकीकत महाराजांना कळवून दुसरें यंत्र मागितलें. तेव्हां महाराजांनीं कळविलें कीं, 'देवांनीं ही गोष्ट नाकारल्यामुळें दुसरें यंत्र मिळणार नाहीं.' असें उत्तर आलें. ती बाई पुनः आजारी पडली. नंतर कुरुगड्डीस दर्शनार्थ पुनः जाऊन प्रार्थना करतांच महाराजांनीं देवाकडे क्षमा मागण्यास सांगून एक यंत्र व स्तोत्र तिला दिलें.

देवळाच्या आंत असेपर्यंत महाराजांना कोणीहि नमस्कार वगैरे करावयाचा नाहीं व त्यांची पूजा आरती करावयाची नाहीं अशी सर्वांना महाराजांची ताकीद होती. नरसोबावाडीसहि अशीच पद्धत ठेवली होती.

पुण्याचे रघुनाथ चिमणाजी थत्ते यांचे कुटुंबास पिशाचबाधा होती, म्हणून ते कुरुगड्डीस येऊन त्यांनीं त्याबद्दल प्रार्थना केली. महाराजांनीं देवांना विचारलें तेव्हां 'त्यांची व्यवस्था आपण नरसोबावाडीस करूं, तुम्हांला ती काळजी नको' असें देवांनीं महाराजांना सांगितलें. तें ऐकून थत्ते वाडीस सेवेकरितां बरेच दिवस जाऊन राहिले होते.

तेथील एक श्रीपाद नांवाचा ब्राह्मण आपल्या आईबापांचें श्राद्ध करीत नव्हता. त्याच्या बापानें पितृरूपानें महाराजांकडे येऊन ही हकिकत कळविली व आपल्या मुलास श्राद्ध करण्याची आज्ञा करण्यास सांगितलें. महाराजांनीं श्रीपादास बोलावून आणून श्राद्ध करण्याविषयीं सांगितलें; पण त्यानें तें न ऐकल्यानें त्याच्या बापानें त्याला पीडा देऊन त्याचा प्राण घेतला.

एकदां वऱ्हाडांतील हरदा गांवचा वामनराव नांवाचा एक म्हातारा ब्राह्मण महाराजांचेकडे आला व त्यानें विनंति केली कीं, 'चातुर्मास संपतांच महाराजांनीं उटी गांवीं येऊन माझ्याकडून स्वाहाकार करवावा.' ही त्याची विनंति त्याची श्रद्धा पाहून महाराजांनीं मान्य केली. इतक्यांत त्याच्या अंगावर एक मोठें चिंचेचें पोतें पडलें व तो ब्राह्मण खालीं पडून बेशुद्ध झाला. पण महाराजांनीं त्याचे अंगावर तीर्थ शिंपडतांच तो सावध झाला. नंतर महाराजांनीं उटी गांवीं जाऊन त्याच्या इच्छेप्रमाणें त्याचे-कडून रुद्रस्वाहाकार आपल्या समक्ष करविला.

कुरुगड्डीस जातांना भोपळ्याच्या सांगडीवरून किंवा भोपळे बांधलेल्या बाजेवर बसून जाण्याची पद्धत आहे. तेथें नाव घालीत नाहींत. पण तेथील मामलेदारांनीं तेथें पडलेल्या एका जुन्या नावेंतूनच जाण्याचा आग्रह धरला, त्यामुळें नावाड्यानें नाइलाजानें नाव घातली. मध्यें ती येतांच भोंवऱ्यांत सांपडून बुडण्याचा प्रसंग आला. आंत बायका मुलांसह

मामलेदार बसले होते. त्यांनीं देवाची प्रार्थना केली कीं, 'नाव सुखानें कडेला लावतांच आम्हीं बाजेवरून येऊन महापूजा करूं,' असा त्यांनीं नवस केला. नंतर ती नाव एकदांची अलीकडच्या तीरास लागली. नंतर बाजेवरून ते अधिकारी कुरुगड्डीस आले. देवदर्शन करून महाराजांचे दर्शनास सर्वजण आले. महाराजांनीं केस राखलेल्या मामलेदारांना पाहिल्याबरोबर तेथून उठून दुसरीकडे गमन केलें. त्या दिवशीं मामलेदारांना जेवणास परवानगी न मिळाल्यानें उपोषण घडलें. त्यांची सर्व मंडळी जेवली. दुसरे दिवशीं मामलेदारांनीं क्षौर वगैरे केलें. पण क्षौर केल्यामुळें त्या दिवशीं महाराजांची पूजा करतां आली नाहीं. पण त्या दिवशीं जेवणास परवानगी मिळाली. तिसरे दिवशीं त्यांनीं महाराजांची व देवाची महापूजा करून भंडारा केला. त्या दिवसापासून ते मामलेदार फार आस्तिक झाले.

कुरुगड्डीस जाणाऱ्या यात्रेकरूंकडून नावाडी लोक फार पैसे घेत. ही गोष्ट महाराजांना समजतांच त्यांनीं नावाड्यांना बोलावून आणून तसें न करण्याबद्दल ताकीद केली व एका माणसानें बाजेवरून जाणें असल्यास आठ आणे द्यावेत, स्वतंत्र भोपळयाच्या सांगडीवरून जाण्याकरितां प्रत्येकानें एक रुपया द्यावा व ओझ्याकरितां एका ओझ्याच्या राजणास आठ आणे अशी व्यवस्था करून दिली.

रायचूरचे कोमटी व्यापारी तुळजाराम पतंगे यांनीं या चातुर्मासांत नेहमीं सर्व सामान आणून द्यावें. त्यांच्या बायकोस व सुनेस पिशाच-बाधा होती. त्यांनीं महाराजांना जाण्याचे वेळीं त्याबद्दल विचारलें असतां महाराज कांहीं बोलले नाहींत. ते खिन्न झालेले पाहून महाराज निजत असलेलें पोतें गांडाबुवांनीं त्यांना दिलें आणि सांगितलें कीं, 'हें पोतें घरांत ठेवून याची नित्य पूजा करा व याच्या दशा भिजवून तें पाणी

पिशाच-पीडा असणाऱ्यांना द्या म्हणजे सर्व बरें होईल.' त्याप्रमाणें त्यानें करतांच त्यांच्या घरांतील पीडा दूर झाली.

तेथें महाराजांच्या मस्तकावर कावळ्यानें तीन वेळां चंचुप्रहार केला. 'ज्याला असा कावळा चंचुप्रहार करील त्याचें आयुष्य सहा महिन्यांपेक्षां अधिक नसतें' असें महाराज म्हणाले आणि 'या देहावर आतां कोणी प्रेम करूं नये' असें सांगितलें. या अरिष्टाच्या शांतीकरितां वेनगंगा संगमावर गोदावरीचें स्नान करण्यास श्रीदत्तप्रभूंनीं महाराजांना सांगितलें होतें.

एकदां एक संन्यासी योगाभ्यास शिकण्याकरितां महाराजांचेकडे आले. पण त्यांचा अधिकार नसल्यामुळें 'आपणांस कांहीं शिकवितां येत नाहीं' असें त्यांना महाराजांनीं सांगितलें. त्या वेळीं त्यानें रागावून महाराजांचेवर पुष्कळ तोंडसुख घेतलें आणि लगेच रागानें तेथून निघाले. नावाड्यांनीं त्यांचेकडून दुप्पट पैसे घेतले. पुढें रायचूरला जातांना गाडी उलटून त्यांना बरेंच लागलें, दंड मोडला, कमंडलु फुटला व शेवटीं सर्व लोकांनीं 'सत्पुरुषांच्यावर रागावण्याचें हें प्रायश्चित भोगा' म्हणून त्यांची खूप टिंगल केली.

चातुर्मास समाप्तीचे दिवशीं वाजत गाजत महाराजांना न्यावें अशी सर्व मंडळींची इच्छा होती. पण महाराजांनीं सकाळीं क्षौरविधि वगैरे आटोपून दुपारीं एका माणसाला बरोबर घेऊन नदींतून थोडें चालत जाऊन पलीकडे एका कोरड्या जागेवर महाराज गेले व तेथें गीतेचा विश्वरूपाध्याय म्हणून सीमोल्लंघन करून परत आले.

कोल्हापुरांत राहणारे शेषो कारदगेकर हे येथें महाराजांचे दर्शनास आले होते. त्यांना संतति नव्हती व कर्जही बरेंच होतें. महाराजांचे कानांवर त्यांनीं ही गोष्ट घातली. तेव्हां महाराजांनीं संतति होईल म्हणून

आशीर्वाद देऊन नारळ प्रसाद दिला. पुढें त्यांना एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन अपत्यें झालीं व कर्जही सर्व फिटलें.

रायचूरचे लक्ष्मणराव वैद्य यांना मुलें होऊन जात असत. लोकांच्या सांगण्यावरून एकदां ते मातोश्रीस व पत्नीस घेऊन महाराजांकडे आले व महाराजांनीं, 'कां आलां' म्हणून विचारलें तेव्हां 'उगीच आलों' असें म्हणाले. महाराज म्हणाले कीं, 'दुसऱ्याच्या आग्रहांनीं आलां आणि उगीच कां म्हणतां?' नंतर त्यांच्या मातोश्रींनीं सर्व हकीकत सांगितल्यावर महाराजांनीं त्यांना सांगितलें कीं, 'तुमच्या कुलांतील नागपूजेचा आचार बंद पडला आहे. तो तुम्ही सुरू करा. श्रावण महिन्यांत वारुळाची पूजा करून शेवटच्या दिवशीं सोन्याचा नाग दान करा. पांच पंचमींस वारूळ पूजा करा.' त्याप्रमाणें त्यांनीं एक महिनाभर वारुळाची पूजा केली. शेवटच्या दिवशीं प्रत्यक्ष नाग आला. ते भिऊन मागें परतणार इतक्यांत झाडींतून एका भिल्लानें येऊन भिऊं नका म्हणून धीर दिला व दोघांनीं मिळून त्या नागास दूध पाजतांच तो नाग व भिल्ल दोघेही गुप्त झाले. व्रत समाप्त झाल्यावर आतां तुम्हांला दीर्घायुषी मुलगा होईल म्हणून त्यांना स्वप्नांत महाराजांनीं सांगितलें. नंतर मुलगा झाल्यावर महाराजांनीं त्याच्या आईस व सुइणीस मुलगा आयुष्मान् आहे असें सांगून षष्ठीदेवीस त्याचे मस्तकावर चांगलें लिही असें सांगितलें. त्या मुलाचें नांव 'वासुदेव' असें ठेवलें.

महाराजांनीं कुरुगड्डीस गुरुद्वादशीपर्यंत मुक्काम केला. नंतर गुरुद्वादशी करून व तेथें सर्व लोकांना उपदेश करून महाराज तेथून निघाले. कृष्णातीरानेंच परळी वैजनाथाकडे येण्यास निघाले. प्रथम मलप्रभासंगमीं जावें असा विचार होता. पण देवांची आज्ञा झाल्याप्रमाणें कृष्णातीर सोडून गोदातीरानें प्रवास चालूं झाला. नंतर तुळजापुरीं

येऊन जगदंबेची स्तुति करून दर्शन घेतलें. तेथून वांजरातीरावर दत्त-जयंती करून गोदावरीतीरावर आले. पूर्वी कावळ्यानें मस्तकास स्पर्श केला होता त्याबद्दल आज्ञा झाल्याप्रमाणें गोदावरी संगमावर स्नान करून तेथें त्रिरात्र मुक्काम केला.

गोदावरी संगमावरून महाराज परळी वैजनाथाचे दर्शनास येऊन तेथें पांच दिवस राहिले. त्या वेळीं तेथील श्रीमंत नागरिक नानासाहेब देशपांडे यांनीं महारुद्रस्वाहाकार केला. त्या वेळीं खूप यात्रा जमली होती. परळीहून निघून महाराज गोदातीरावर राजूर या गांवीं पौषारंभीं येऊन पोंचले. तेथें संहितास्वाहाकार करण्याची इच्छा सीतारामबुवांनीं महाराजांचेजवळ व्यक्त केली असतां महाराज म्हणाले कीं, 'पैसा भरपूर आहे काय ?' तेव्हां 'नाहीं' असें सीतारामबुवा म्हणाले. 'बरें तर करा.' अशी महाराजांची अनुज्ञा घेऊन सीतारामबुवांनीं राजूरास संहितास्वाहाकार केला. तेथें फार मोठा जनसमुदाय जमला होता. महाराजांनीं बोलावलें आहे असें खोटेंच पत्र सीतारामबुवांनीं पाठविल्यामुळें वाडीहून नृसिंहसरस्वतीही आले होते. त्यांना पाहतांच 'वाडी कां सोडली ?' म्हणून महाराजांनीं रागानें विचारलें. तेव्हां सीतारामबुवांनीं खरी हकिकत सांगतांच महाराजांचा राग शांत झाला. या स्वाहाकाराचे वेळीं हंपी विरूपाक्ष मठाचे शंकराचार्य, टाकळीचे दाजीमहाराज, हैद्राबादचे भटजीबापू इत्यादि मोठमोठी मंडळी आली होती. परळीचे नानासाहेब देशपांडे यांनीं या यज्ञांत देखरेखीची मेहनत बरीच घेतली. तेथील मुसलमान तालुकदारही चार दिवस कचेरी बंद ठेवून बंदोबस्तासाठीं तेथें येऊन राहिले होते. वेदपादस्तुतीचीं पुस्तकें महाराजांनीं स्वतः आपल्या हातांनीं सर्व अधिकारी विद्वानांस वांटलीं. आठ दिवस सोहळा अप्रतिम झाला. एक लाखावर मंडळी येऊन गेली. नित्य हजारों मंडळी

भोजनाकरितां येत असत. शेवटीं महाराज स्वाहाकाराच्या मंडपांत एक प्रहरभरच जाऊन बसले. त्या वेळीं महाराजांचेपुढें पैशाचा पाऊस पडला. १९ वेळां मोठ्या पाटयांतून रुपये भरून नेले. एक भाटयाच दोन लाख रुपये देतों म्हणाला; पण महाराजांनीं ती गोष्ट मान्य केली नाहीं. एक लक्ष भोजन या वेळीं सहज झालें असेल. या वेळीं वझूरचे दामोदरस्वामीही आले होते. जातांना वझूरास मला दर्शन देऊन जावें अशी प्रार्थना करून दामोदरस्वामी गेले. स्वाहाकार पूर्ण झाल्यावर त्याच रात्रीं वझूरास निराळ्या रूपानें दामोदरस्वामींना दर्शन देऊन महाराज आले. सकाळीं वझूरास लोकांना ही गोष्ट कळली.

राजूराहून निघून महाराज पिंपरीवरून आवंढया नागनाथाचे दर्शनास गेले. हें बाराज्योतिर्लिङ्गांतील मुख्य स्थान आहे. तेथून पिंपरीवरून उटी गांवीं आले. तेथें वामनरावांच्या इच्छेप्रमाणें त्यांच्याकडून रुद्र-स्वाहाकार करविला. घरची मंडळी त्यांना वेडा म्हणत. पण त्यांची खरी श्रद्धा पाहून महाराजांनीं देवांच्या खजीन्यांतील दोन हजार रुपये देऊन त्यांच्याकडून स्वाहाकार करविला. त्यामुळें वामनरावांची कीर्ति सर्वत्र पसरली. या स्वाहाकारांतील एकंदर व्यवस्था पाहून महाराजांनाही संतोष झाला. या प्रांतांतील लोकांना वामनरावांचे निमित्तानें महाराजांचे दर्शनाचा लाभ झाला. या प्रांतांत त्या वेळीं निरनिराळ्या ठिकाणीं एकंदर वीस स्वाहाकार, अग्निहोत्र्यांचे दोन चातुर्मास्य याग व दोन ठिकाणीं श्रीदत्तपादुकांची स्थापना इतकीं धार्मिक कार्यें झालीं. पण सर्व कार्यांत वामनरावांचा स्वाहाकार श्रेष्ठ प्रतीचा ठरला. त्यांच्या श्रद्धेचें फल त्यांना मिळालें.

याप्रमाणें त्या प्रांतांत महाराजांचा संचार चालू असतां प्रत्येक गांवीं मोठाच समारंभ होत असे. एका गांवाहून निघतांना वाद्यें वाजवीत

मागील गांवच्या मंडळींनीं त्यांना पोंचवायचें व पुढील गांवच्या मंडळींनीं तसेंच त्यांना आपले गांवीं न्यावयाचें, असा क्रम सारखा सुरू होता. असेंच एकदां महाराज जिंतूरवरून पूर्णानदीचे तीरावर बामनी गांवीं जात असतां रस्त्यांत एका मारुतीचे देवळांत हनुमज्जयंती करून दुपारीं त्या गांवीं पोंचले. तेथें ग्रहण करून चार दिवस राहिले; नंतर पाथरीस आले. तेथील श्रीमान् गृहस्थ बाळेराव चौधरी यांचें एक मोठें शे॑त पडीत पडलें होतें. तें शेत कोणी करूं लागल्यास तो लगेच मृत होत असे. फक्त त्यांत जनावरांनीं चरावें. 'याबद्दल काय करावें' असा प्रश्न चौधरी यांनीं विचारला असतां महाराजांनीं सांगितलें कीं, 'या शेतांत एक फकीर मयत झाला असून तो जिंद झाला आहे. तो येथें कोणालाही पीक काढूं देत नाहीं. तरी त्याच्या शांतीकरतां तुम्ही पुष्कळसे फकीर येथें बोलावून त्यांचेकडून नमाज पढवा आणि त्यांना पोटभर भोजन द्या, म्हणजे तुम्हाला पीक मिळेल. असें प्रतिवर्षी करावें.' या सांगण्याप्रमाणें करतांच तें शेत लागवडीस आलें.

पाथरीहून हिंगोली वगैरे भागांत जाऊन महाराज गोदातीरीं गोंड या गांवीं आले. तेथें रेणुकामातेचें स्थान आहे. तेथें जाऊन वंदन केलें. त्या गांवीं आंबादास कायर या ब्राह्मणानें महाराजांच्या आज्ञेनें महारुद्रस्वाहाकार करणेचें ठरविलें होतें. महाराज तेथें येतांच आरंभ झाला. त्यांत चौधरीप्रभृति पाथरीकर मंडळी व्यवस्थापक होती. पूर्णाहुतीचे दिवशीं शामराव चौधरींचे घरची मंडळी दर्शनास आली होती. त्यांतच त्यांची दोन वर्षांची मुलगीही आली होती. तिला एकाएकीं मृत्यु आला. तेव्हां चौधरी मंडळी त्या प्रेताजवळच बसून राहिली. दक्षिणेचे पैसे त्यांचेकडे होते. त्यांचेकडे मनुष्य गेला असतां ते आले नाहींत. तेव्हां खरी गोष्ट समजतांच महाराज तेथें आले व कमंडलूंतील पाणी तिच्या अंगावर शिंपडलें. ताबडतोब तिचा श्वासोच्छ्वास सुरू झाला व ती सावध होऊन आईचें स्तनपान

करूं लागली. तें आश्चर्य पाहून सर्वांनीं महाराजांचे नांवाचा जयजयकार केला. नंतर पाथरीकरमंडळींनीं सर्वांना दक्षिणा दिल्यावर हा समारंभ पार पडला.

शामराव चौधरींनीं आपले पुरोहित आप्पादेव व आण्णादेव यांचीं अरणें म्हणण्याची इच्छा पूर्ण करण्याबद्दल महाराजांना विनंति केली. ती महाराजांनीं मान्य करून त्या दोघांना घेऊन महाराज गोपेगांवीं अरण्यांत गेले. तेथें एका कडूलिंबाच्या झाडाखालीं बसून १७ दिवस त्यांना अरणांची संथा सांगितली. नंतर जेथें संथा सांगितली ती जमीन गवत पसरून जाळून टाकली. याचें कारण महाराजांनीं सांगितलें कीं, 'या जागेवर कोणी गर्भिणी स्त्री, गाय, म्हैस आल्यास त्यांचा गर्भपात होईल म्हणून ही जमीन दग्ध केली आहे.' तो कडूलिंबाचा वृक्ष गोड झाला. लोक त्याचा पाला श्रद्धेनें औषध म्हणून घेतात आणि त्यानें त्यांचे रोगही कमी होतात. याला सर्व लोक 'दत्ताचा लिंब' असें म्हणतात व नवसही करतात. तेथेंच दत्तपादुका स्थापन करून गांडाबुवास तेथें ठेवावें असें महाराजांच्या मनांत प्रथम होतें. पण त्या शेताच्या मालकानें परवानगी न दिल्यामुळें तें घडून आलें नाहीं. नंतर गुंजगांवीं गांडाबुवांना राहाण्यास सांगितलें. ते संन्यास घेऊन तेथें येऊन राहिले. तेथेंच त्यांचें देहावसान झालें. तेथें पादुका स्थापन केल्या असून मोठें दत्तमंदिरहि बांधलें आहे. येथें मोठा उत्सव होत असतो.

देऊळगांवराजा येथील रंगनाथ पुराणिक यांना नाकांतून रक्त पडण्याचा त्रास फार दिवस होता. त्यांनीं मिरज वगैरे ठिकाणीं जाऊन पुष्कळ उपचार केले, पण कांहींच गुण न आल्यानें ते उदास झाले होते. पण दैवयोगानें त्या भागांत त्यांना महाराजांचें दर्शन झालें. त्यांची अवस्था ऐकून महाराजांनीं त्यांना गंगावती नांवाची वनस्पति दाखविली

व तिचा रस नाकांत घालण्यास सांगितलें. तीन दिवसांत त्या ब्राह्मणाचा तो दुर्धर रोग पूर्णपणें बरा झाला.

महाराज गोपेगांवाहून गोदावरीचें हृदयस्थान मंजिरथ या गांवीं आले. तेथें जमलेल्या सर्व वैदिक मंडळींनीं महाराजांना विचारलें कीं, 'जटा, घन, क्रम इत्यादि रूपानें वेद मंत्र कां म्हणावेत ?' तें ऐकून महाराज म्हणाले कीं, 'जसें गाण्यामध्यें, आलाप, ताना, एकाड, दुकाड वगैरे प्रकारांनीं मनोरंजन होतें तसेंच वेद मंत्राच्याही या निरनिराळ्या विकृतींच्या म्हणण्यानें ईश्वराला संतोष होऊन ऐकणाऱ्यासही आनंद वाटतो. सामवेद गायन देवाला प्रिय आहे.'

मंजीरथाहून उकडगांवीं वैशाख अखेरीस येऊन तेथें महाराजांनीं दशाहार केला. नंतर राक्षस भुवनाजवळ पांचाळेश्वरीं दर्शन करून महाराज पैठणास आले. तेथें नाथांच्या मठांतच भिक्षा झाली. तेथें नाथांनीं मंदिर बांधून मूर्तीची प्रतिष्ठा केली होती. पण त्या जागेवरून ती मूर्ति कोणीं हलविली होती त्यामुळें पुनः त्या मूर्तीची प्रतिष्ठा बारा वर्षें होऊनही झाली नाहीं. महाराजांनीं ती जागा स्वतः पाहिली व मूळ जागेंतच कांहींही फेरफार न करतां मूर्तीची प्रतिष्ठा करण्यास सांगितलें. तसें करतांच तें काम निर्विघ्न होऊन मूर्तीही स्थिर झाली. महाराजांनीं नाथमहाराजांचा अधिकार फार मोठा असल्याचें सांगितलें.

पैठणाहून महाराज दौलताबादला आले. तेथें जनार्दनस्वामींचें दर्शन करून वेरूळ येथील ज्योतिर्लिंग घृष्णेश्वराचें दर्शन केलें. तेथून कन्नड वगैरे ठिकाणीं फिरून खानदेशांत चाळीसगांवाजवळ आले व गांडाबुवांना आज्ञा केली कीं, 'अशा सारख्या फिरण्यांत ब्रह्मदेवाचें आयुष्य मिळालें तरी तें संपेल आणि शेवटीं पश्चात्ताप करावा लागेल. करिता तूं भडोच शहरीं राहून आत्मानात्मविवेकाचा अभ्यास कर. तूं गेलास

म्हणजे बाकीची मंडळी कंटाळून निघून जातील. तेथें उपाधि वाटल्यास अन्यत्र जा व एकान्तांत राहून वृत्ति शांत कर. आपण नर्मदातीरीं निवाऱ्याची जागा मिळाल्यास चातुर्मास करूं, नाहीं तर पुढें कोठेंतरी करूं.' असें सांगतांच गांडाबुवा महाराजांचे आज्ञेप्रमाणें महाराजांची प्रार्थना करून निघन गेले.

महाराज पुढें तापीचें स्नान करून खेडीघाटला आले. तेथील परिचित मंडळींनीं एक दिवस ठेवून घेतलें. तेथून चिखलद्यास जाण्यास निघाले. वाटेंत नर्मदातीरीं धर्मपुरीस बिल्वामृतेश्वराच्या देवळांत येऊन मुक्काम केला. तो दिवस आषाढ शुद्ध द्वादशी हा होता. तेथें रात्रीं अकरा वाजेपर्यंत मंडळीबरोबर महाराजांचें बोलणें झालें. नंतर सर्व मंडळी देवालय बंद करून घरीं गेली. महाराज एकटेच तेथें होते. दुसरे दिवशीं सकाळीं मंडळी मंदिराचे दरवाजे उघडून आंत आली, पण तेथें त्यांना महाराज दिसले नाहींत. दाराला लावलेलीं कुलपें तशींच असतां महाराज गेले कोठें म्हणून मंडळी शोध करीत असतां दुसरे दिवशीं बातमी समजली कीं, धर्मपुरीहून ९० मैलांवर चिखलदा या गांवीं महाराज दुसरे दिवशीं सकाळींच येऊन पोंचले आहेत. ही बातमी ऐकून सर्वांना आश्चर्य वाटलें. नंतर महाराजांनीं तो चातुर्मास चिखलदा मुक्कामीं केला.

## चातुर्मास २२ चिखलदा--शके १८३४

चिखलदा, हें गांव इंदूर संस्थानमध्यें आहे. नर्मदेच्या अलीकडे बडवाणी संस्थान आहे. तेथील राजे ठाकोरसाहेब महाराजांचे भक्त होते पूर्वी शके १८२२ चा चातुर्मास महाराजांचा चिखलदा येथें झाला होता तेथें महाराज येण्याबरोबर सर्व भक्तमंडळी जमली. पौर्णिमेस व्यासपूजा होऊन चातुर्मास सुरू झाला. तेथें नित्यक्रमाप्रमाणें रोज भाष्यपाठादि चालू होते. त्या प्रांतांत त्या वेळीं महामारीचा उपद्रव चालू होता, त्या

मुळें तिकडे लोकांना जाण्यास बंदी असल्यामुळें गर्दी कमी झाली. त्या-योगानें महाराजांना कांहीं विश्रांति मिळूं लागली.

चिखलद्यास गुरुपौर्णिमेचे दिवशीं लोकांच्या स्वयंपाकाकरितां म्हणून नर्मदेच्या पुजाऱ्यांचे जागेंत महाराजांनीं एक छप्पर बांधविलें. देवाच्या खजिन्यांतून त्याकरितां खर्च केला. महाराजांचे पुढें येणारा पैसा हा 'देवाचा खजीना' होता. महाराज त्याला केर मानत असल्यामुळें त्या पैशावर मालकी देवाचीच होती. छप्पर बांधल्यावर देवांनीं दृष्टान्त देऊन महाराजांना सांगितलें कीं, 'आमच्या पैशातून बांधलेल्या छपरांत पुजाऱ्यानें राहतां कामा नये. तरी तें तूं पाडून टाक.' महाराज म्हणाले कीं, 'आजचा दिवस जाऊं दे उद्यां पाडूं.' पण देवास तें न पटून त्यांनीं तें छपर रात्रींच पाडून टाकलें.

महाराज चिखलद्यास आहेत हें समजतांच सिद्धपुराहून धोंडोपंत कोपरकर यांना दर्शनास जावें असें वाटलें. त्यांनीं महाराजांना पत्रानें आज्ञा मागितली. पण 'येथें येण्याचे फार त्रास पडतील तरी येऊं नका' असें महाराजांनीं त्यांना कळविलें. तरी दर्शनाच्या उत्कट इच्छेनें धोंडो-पंत सहकुटुंब चिखलद्यास जाण्याकरितां निघाले. बरोबर आणखीही कांहीं मंडळी निघाली. इंदूरला सखारामशास्त्री टिल्लू भेटले. त्यांना हें वर्तमान समजतांच तेही निघाले. मोरटक्का स्टेशनवर उतरले व तेथून नावेनें तिसरे दिवशीं चिखलद्यास पोंचले. पण महामारीमुळें त्यांना गांवांत जाण्यास प्रतिबंध झाला. तेव्हां सर्व मंडळींना घांटावरच सोडून धोंडोपंत व सखारामशास्त्री गांवांत महाराजांचे दर्शनास आले. त्यांना पाहतांच महाराजांनीं रागावून विचारलें कीं, 'पत्र मिळालें कीं नाहीं?' धोंडोपंत म्हणाले कीं, 'पत्र मिळालें; पण दर्शनाची प्रबल इच्छा झाल्यामुळें आम्हीं आलों तरी क्षमा असावी.' महाराज म्हणाले, 'आतां

दर्शन झालें तर परत चला.' हें ऐकून सखारामशास्त्रींनीं नमस्कार करून सांगितलें कीं, 'आज चार दिवस प्रवासांत अन्न मिळालें नाहीं. आज प्रदोष, पुनः परत रस्त्यांत कोठें सोडावा?' हें ऐकून महाराज म्हणाले, 'बरें तर प्रदोष सोडून चला.' याप्रमाणें ती वेळ निघून गेली. नंतर सर्व मंडळींनीं प्रदोष सोडून विश्रांति घेतली. दुसरे दिवशीं त्यांनीं समाराधना केली. नंतर ती मंडळी कांहीं दिवस तेथें होती.

महामारी तेथें येऊन 'मला बळी पाहिजे; मी उपाशी आहें.' असें महाराजांना म्हणाली असतां महाराज म्हणाले कीं, 'तुला येथून गेलें पाहिजे. तुझ्याकरितां सप्तशतीचे पाठ व हवन केलें जाईल.' याप्रमाणें तें सुरू केल्यावर कोणासही महामारीचा त्रास झाला नाहीं.

एका माणसानें भक्ति उत्पन्न होण्याचा उपाय विचारला असतां महाराज म्हणाले, 'भक्तिमार्गाचे ग्रंथ—ज्ञानेश्वरी, भागवत, भक्तिविजय इत्यादि वाचल्यानें मनःशुद्धि होऊन ईश्वरभक्ति मनांत उत्पन्न होईल.'

महाराजांनीं एकदां तेलंगणांतील गोष्ट सांगितली. "एक विद्यार्थी दर्शनास आला व त्याला विचारलें असतां परीक्षेंत उत्तम यश मिळावें म्हणून मी दर्शनास आलों असें त्यानें सांगितलें. त्याच्या प्रथमा व मध्यमा अशा दोन परीक्षा झाल्या होत्या. त्यानें भगवद्गीतेवरील मध्वाचार्य व रामानुजाचार्य यांचीं भाष्यें वाचलीं असून आतां श्रीशंकराचार्यांचें वाचीत होता. त्याला आपण विचारलें कीं, 'या तीनही मतांत तुला कोणतें मत पटलें?' पण त्याला कांहीं उत्तर देतां आलें नाहीं. त्याला आपण एक गोष्ट सांगितली कीं, 'एका गुरूकडे दोघे शिष्य अभ्यास करीत असतांना त्यांना गुरूंनीं एके दिवशीं 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अर्थ करण्यास सांगितलें. तेव्हां एकानें 'तत् त्वं असि' म्हणजे 'तें ब्रह्मच तूं आहेस' असा अद्वैतपर अर्थ केला व दुसऱ्यानें

'तस्य त्वं असि '–'त्या देवाचा तूं (भक्त.) आहेस' असा द्वैतपर केला. हें ऐकून गुरूला आश्चर्य वाटलें. पुष्कळ ग्रंथ वाचूनही मनांतलें द्वैत कांहीं गेलें नाहीं. अंतःकरण शुद्ध नसेल तर अध्ययन फुकट आहे. अंतःकरणाची अशुद्धता कर्ममार्गानें घालविली म्हणजे खरें ज्ञान प्रकट होतें."

एकदां सकाळीं भाष्याचा पाठ चालू होता. त्या वेळीं बढवाणीचे राजे ठाकोरसाहेब दर्शनास आले. आंत नोकरानें येऊन सांगितलें. महाराजांनीं निरोप पाठविला कीं, 'आतां भाष्यपाठ चालू आहे. आतां दर्शन होणार नाहीं.' पूर्ण निस्पृहतेचें हें उदाहरण आहे.

एकदां कोठीच्या बाहेर एक मिरची दारांत पडली होती. ती लगेच उचलून कोठीवाल्याकडे देऊन त्याला सांगितलें कीं, 'ही दत्ताच्या कोठींतील मिरची वायां जाणें चांगलें नाहीं. व्यवहार व परमार्थ दोहोंतहि 'क्षणशःकणशश्चैव विद्यां वित्तंच साधयेत्' असें दक्षतेनें वागलें पाहिजे. या दृष्टीनें एका मिरचीचाही संग्रह केला पाहिजे.'

चातुर्मास संपल्यावर महामारीचा त्रासही कमी झाला व नर्मदेचें पाणीही कमी झालें, त्यामुळें बरीच मंडळी सारखी येऊं लागली. पुष्कळ पैसा जमला. त्यांतून लग्न, मुंज, व्रतोद्यापन अशीं लोकांचीं अनेक कार्यें सारखीं होत होतीं. रोज पक्वान्नभोजन चालू होतें. मंडळी एकंदर किती जेवली याची तर गणतीच नाहीं. बढवाणीचे ठाकोरसाहेब स्वतः तेथील सर्व व्यवस्था पाहत होते. तेथें एक ग्वाल्हेरची श्रीमंत सरदार घराण्यांतील बाई अगदीं निरभिमान वृत्तीनें महाराजांच्या सेवेंत निमग्न होती. त्या वेळीं महाराज म्हणाले कीं, 'अंगीं नम्रपणा असला तरच मोठेपणा मिळतो!'

चिखलद्यास ६।७ महिने महाराजांचें राहणें झालें. तेथून निघाल्या-

वर नर्मदाकिनारीं कातरखेडा या गांवीं महाराज जात असतां जितूरची अग्निहोत्रीबुवा वगैरे मंडळी रस्त्यांत भेटली. त्यांना पाहतांच महाराज म्हणाले कीं, 'अग्निहोत्रीबुवा ! तुमची इच्छा गायत्रीपुरश्चरण करण्याची असेल तर ती लवकर पूर्ण करा; पण अन्नसंतर्पणांत तुपाची कसर बिलकुल करूं नका.' हें ऐकून अग्निहोत्रीबुवा म्हणाले, 'आपणांजवळ पैसा नाहीं तर हें कसें घडावें ?' महाराज म्हणाले, 'पैशाची काळजी नको. ते आपोआप त्या वेळीं मिळतील; आणि देवाच्या कार्यासाठीं ऋण काढलें तरी हरकत नाहीं. त्याची जबाबदारी देवावर राहील.' हें ऐकून अग्निहोत्रीबुवा म्हणाले कीं, 'आपल्या कृपेनें अग्निनारायणाची सेवा निर्विघ्न चालू आहे. तसें हेंही कार्य पार पडेल; पण महाराजांनीं या कार्याचे वेळीं आलें पाहिजे.' तें ऐकून महाराज म्हणाले, 'येणें होईल. टाकळीकर दाजीबुवांना त्या वेळीं बोलवावें. आज येथेंच राहा. येथें डेहीसरकार येणार असल्याचें समजतें. त्यांचेकडून पैशाची मदत होईल.' तें ऐकून अग्निहोत्रीबुवा म्हणाले, 'आपली कृपादृष्टी असली म्हणजे पुरे. राजांचे पैसे घेऊन हें कार्य आपण करूं इच्छीत नाहीं व देवकार्याकरितां आजपर्यंत कोणाजवळ याचनाही केली नाहीं. तशी या वेळींही करणार नाहीं.' हें त्यांचें बोलणें ऐकून महाराज प्रसन्न झाले व त्यांना घरीं जाण्यास अनुज्ञा दिली.

अग्निहोत्रीबुवा घरीं येऊन दाजीबुवांना बोलावण्यास टाकळीस गेले व त्यांना महाराजांची आज्ञा सांगितली. त्या वेळीं त्यांच्यावर एका दुष्ट माणसानें मारणप्रयोग केला असल्यानें त्यांना रक्त पडत होतें. ते म्हणाले कीं, 'मला या दुखण्यांतून महाराजांनीं बरें केलें तर मी येईन.' अग्निहोत्रीबुवांनीं सांगितलें कीं, 'आपण दोघेही थोर पुरुष आहांत. आपलें हें संकट दूर होईल.' असें सांगून ते घरीं गेले.

पुढें चांगला मुहूर्त पाहून अग्निहोत्रीबुवांनीं गायत्रीपुरश्चरण सुरू केलें व तें संपल्यावर हवनास आरंभ केला. दाजीबुवांची प्रकृति उत्तम बरी झाली असूनही त्यांनीं जितूरास जाण्याकडे दुर्लक्ष केलें. तेव्हां ते स्नान संध्या करीत बसले असतांना एकदम त्यांचे दंडावर मार बसला व सांगणें झालें कीं, 'तुला असें केलें असतां जितूरास कां गेला नाहींस ?' हें ऐकतांच तेथूनच एका वस्त्रानेंच बावीस कोस पायीं चालत दाजीबुवा पर्णाहुतीचे दिवशीं जितूरास पोंचले. त्या वेळीं महाराज कातरखेड्याचे अरण्यांतून गरुडेश्वरास जात होते; पण दिलेलें वचन पूर्ण करण्याकरितां दुसऱ्या रूपानें जितूरासही आले होते. त्यांना नमस्कार करून घडलेली सर्व हकीकत दाजीबुवांनीं सांगितली. त्या वेळीं सर्व मंडळींनीं महाराजांचा जयजयकार केला. महाराजांचे आशीर्वादानें पैसा पुष्कळ मिळून तो समारंभ व्यवस्थित पार पडला. जितूरास दत्त पादुकांची स्थापना झाली आहे.

महाराज चिखलद्याहून निघाले ते कातरखेडा येथील शूलपाणीश्वरास वंदन करून अरण्यांतून गरुडेश्वराकडे निघाले. शूलपाणीश्वराचे जंगलांत अश्वत्थामा वास करतो. तें फारच घोर अरण्य असून धड पाऊलवाट सुद्धां नाहीं. तेथून जात असतां एकदा एका भिल्लानें येऊन महाराजांना विचारलें कीं, 'आपणांस कोठें जाणेचें आहे ?' तेव्हां महाराज म्हणाले कीं, 'गरुडेश्वरास.' तो म्हणाला, 'तर मग माझ्या पाठीमागून या,' असें सांगून तो चालूं लागला व महाराज त्याचे पाठीमागून निघाले. गरुडेश्वर आल्यावर त्यानें सांगितलें कीं, 'तें समोर मंदिर आहे तें चला,' असें सांगून तो निघाला. इतक्यांत महाराजांना कांहीं संशय येऊन त्यांनीं त्या भिल्लास विचारलें कीं, 'तूं कोण आहेस तें खरें सांग.' तेव्हां तो म्हणाला, 'मी अश्वत्थामा असून या जंगलांत राहतों.' अ

सांगून तो दिसेनासा झाला. नंतर महाराज गरुडेश्वराच्या देवळाच्या ओटयावर येऊन उतरले. तो दिवस चैत्र वद्य षष्ठी शनिवार होता.

## चातुर्मास २३ गरुडेश्वर–शके १८३५

गरुडेश्वर हा गांव नर्मदा किनाऱ्यावर असून तेथें भिल्ल जातीच्या लोकांचीच थोडीशी वस्ति आहे. नदींतून वाहत आलेलीं लांकडें धरणें, मांसे पकडणें हेच त्या लोकांचे उद्योग. एक दोन दुकानें आहेत. तिलकवाडा किंवा नांदोद येथून सर्व सामान आणावें लागतें. गरुडेश्वर, नारदेश्वर, करोटेश्वर अशीं लहान लहान मंदिरें येथें आहेत. येथें शंकरांचा प्रसाद होण्याकरितां गरुडानें तपश्चर्या केल्यामुळें या स्थानास गरुडेश्वर असें नांव पडलें. तेथें विष्णुपंत सोमण यांचें एक किराणा मालाचें दुकान होतें. येथें महाराज आले त्या वेळीं त्यांची राहण्याची सोय कांहींच नव्हती. एक मनुष्य आंत बसेल अशा नारदेश्वराच्या मंदिरांत बसून महाराज अनुष्ठान करीत असत व बाहेर एका दगडावर निजत असत. फक्त विष्णुपंत सोमण यांचेकडेच मधुकरीची सोय होती.

गरुडेश्वरीं महाराज आहेत ही बातमी लवकरच सर्वत्र पसरली व दर्शनाकरितां मंडळींची ये-जा सुरू झाली. तेथें फार ऊन होतें म्हणून मंडळींना बसण्याकरितां एक लहानसा मंडप घातला. रामशास्त्री प्रकाशकर वैशाख शु॥ ७।८ चे सुमारास दर्शनाकरितां आले. त्यांना महाराजांनीं सांगितलें कीं, ‘ येथून आतां आपलें कोठें जाणें होणार नाहीं. ’

विष्णुपंत सोमणांच्या घरीं जी भिक्षा मिळेल ती खावी आणि मंडपांत राहावें असा क्रम कांहीं दिवस चालला. नंतर तेथें वासुदेवशास्त्री फणसे आले व ते रोज महाराजांना मधुकरी आणून देऊं लागले. गुजराथी माणसांकडील फळांची वगैरे भिक्षा घेत असत.

धोंडोपंत कोपरकर कांहीं दिवसांनीं सहकुटुंब दर्शनास आले. त्यांनीं फणसपोळी, मोहाचे नारळ, फणसाचे वाळलेले गरे असे पदार्थ आणले होते. त्यांपैकीं फणसपोळी तेवढी भिक्षेचे वेळीं घेणेस ठेवून बाकी सर्व पदार्थ मंडळींना वांटून दिले. धोंडोपंत कांहीं दिवस तेथेंच राहिले. त्यांनीं महाराजांचेकरितां एक झोपडी बांधली. त्यांत अर्ध्या जागेंत महाराज बसत व अर्ध्या जागेंत सामान होतें व स्वयंपाकही तेथें होत असे. या झोपडीस पर्णकुटी असें म्हणत. या जागेवर असलेला कडुलिंब १८३९ चैत्र प्रतिपदेस प्रसाद म्हणून त्याचीं पानें घेतल्यावर तो गोड झाला. नवीन बांधलेल्या पर्णकुटीची वास्तुशांति वैशाख शुद्ध एकादशीस झाली.

मंडळी जास्ती येऊं लागली हें पाहून परशुरामभाई कुबेर इंजिनियर यांनीं स्वयंपाकाकरितां निराळी जागा बांधली. गरुडेश्वरीं एक साधु लिंबाचे झाडाखालीं राहात होते. कोठींतून जें कांहीं मिळे तेवढ्यांतच समाधान मानून राहत असत. महाराजांचे समाधिकालापर्यंत ते तेथें राहत होते. त्यांनीं कोणाकडेही याचना केली नाहीं. मंडळींना त्यांच्या अधिकाराप्रमाणें कोणाला गीताभाष्य, कोणाला दत्तभावसुधारस इत्यादि विषय समजून देण्याचा क्रम सुरू झाला. सकाळीं श्रीदत्तमूर्तीवर लघुरुद्राभिषेक वगैरे यथासंभव होत असे. तेथें राहण्याकरितां परगांवच्या एक दोन बायकाही आल्यामुळें महाराजांना तीन घरची भिक्षेचीही सोय झाली. महाराज फक्त वऱ्याची भाकरी, भात, ताक, भेंड्याची किंवा सुरणाची आळणी भाजी इतकेंच भिक्षेचे वेळीं घेत. फळाच्या पुष्कळ करंड्या रोज येत असूनही तिकडे महाराजांनीं ढुंकूनही पाहिलें नाहीं. संध्याकाळीं कांहीं विषय समजावून सांगत. रात्रीं महाराजांचे समोरच भजन होत होतें. भजन झाल्यावर सर्व मंडळींना हरभऱ्याच्या किंवा

मुगाच्या डाळीची पोटभर उसळ, सांजा, फळें वगैरे मिळत असे. तेथें रात्रीं स्वयंपाक नसल्यानें ही अशी व्यवस्था केली होती. तेथें सत्यदत्तपूजा पुष्कळ होत असत. त्याकरितां गुळाचा सांजा सवा मणाचा करण्याची पद्धति होती. बडोदा वगैरे ठिकाणची बरीच मंडळी येऊं लागली. तेव्हां एका बाजूस पत्रे टाकून ५।५० मंडळींस बसण्याकरितां निवाऱ्याची जागा केली.

तेथें जमणाऱ्या मंडळींनीं एकचित्तानें मानापमान सोडून सर्व कामें करावींत. कोणीं पाणी आणावें, कोणीं लांकडें जमवावींत, कोणीं पळसाचीं पानें आणून पत्रावळी कराव्यात, कोणी स्वयंपाक करावा. श्रीदत्तप्रभूचा नैवेद्य झाल्यावर सर्वांचें जेवण होत असे. स्वयंपाकाकरितां कढया असत. पुढें पुढें तर रोज ३।४ शें पान होऊं लागलें. पुढें येणाऱ्या पैशांतून सर्व खर्च चालत असे. रोज पोळ्या व कधीं तरी पक्वान्न करीत असत. ‘आज अमुक मंडळी येणार आहेत, अशा पद्धतीचा स्वयंपाक करा’ असें महाराज सकाळींच सांगत असत. मंडळी दुपारीं बारा एकच्या सुमारास येत असत.

शृंगेरीहून ब्रह्मानंदतीर्थ व नीलूर मठांतून ब्रह्मानंदसरस्वती गरुडेश्वरीं आले. त्या दोघांनींही तेथेंच महाराजांचे बरोबर चातुर्मास केला. ब्रह्मानंदतीर्थ अधिकारी होते. त्यांचा व महाराजांचा परिचय नव्हता. ब्रह्मानंदसरस्वतींचा परिचय पूर्वीच झालेला होता. त्यांना महाराजांनीं तुमचेबरोबर एकदां चातुर्मास करूं असें सांगितलें होतें, त्याप्रमाणें हा योग आला. ग्वाल्हेरचे बळवंतराव भागवत गोकर्णास नोकरीला होते. त्यांना ब्रह्मानंदतीर्थांचेकडून संन्यास देववून दंड देवविला. त्यांचें प्रद्युम्नानंदतीर्थ असें नांव ठेवलें.

पाऊस फार लागल्यामुळें नर्मदेचें पाणी फारच चढलें. त्यामुळें लोक चिंताक्रांत होऊन महाराजांचेकडे आले व हें संकट त्यांचे कानांवर

घातलें. तें ऐकल्याबरोबर महाराज दंड घेऊन नर्मदेवर आले व प्रार्थना केली कीं, 'माते ! आतां आपला पूर वर येऊं नये. नाहींतर आपल्या भक्तांना त्रास होईल.' असें बोलून नर्मदाजलास महाराजांनीं आपला दंड लावला. तो दंडस्पर्श होण्याबरोबर पाणी ओसरूं लागलें.

श्रावण महिन्यांत धोंडोपंत कोपरकर पुनः दर्शनास आले. नर्मदेला त्या वेळीं बराच मोठा पूर आला होता. चांदोदपासून तिलकवाड्यास येण्याकरितां ४०।५० मंडळी नावेंत चढली. पण पाण्याला जोर असल्यामुळें नाव चढेना. उलटते कीं काय अशी भीति वाटूं लागली. तेव्हां धोंडोपंतांनीं व सर्वांनीं महाराजांची प्रार्थना केल्याबरोबर नाव प्रवाहांतून वर चढून गरुडेश्वरास सुखरूप पोंचली. सर्व मंडळींनीं येऊन साष्टांग नमस्कार घातले. त्यांना पाहतांच महाराज म्हणाले कीं, 'नाव बुडते असें समजल्याबरोबर देवाची प्रार्थना केली होती.' धोंडोपंत म्हणाले कीं, 'नाव खालीं जाऊं लागतांच आपली प्रार्थना करून आपल्या नांवाचा जयघोष केला, त्यामुळें आजचा अपघात टळला.'

मुंबईच्या एका पारशाचा मुलगा वाईट संगतीनें बिघडून पैसा घालवूं लागला. पुढें पुढें त्याला देहाचीहि शुद्धि राहिली नाहीं. त्याचे आईबाप गरुडेश्वरीं येऊन त्यांनीं ही मुलाची गोष्ट महाराजांना सांगितली. महाराजांनीं एक यंत्र करून देऊन तें त्या मुलाचे हातांत बांधण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्यांनीं तें यंत्र मुलाचे हातांत बांधल्यावर तो हळूहळू सन्मार्गाला लागून व्यापारधंदा पाहूं लागला.

कांहीं मुसलमानहि रोगार्त होऊन महाराजांचेकडे आले असतां त्यांना औषध व कुराणांतील मंत्र सांगून महाराजांनीं बरे केले.

भडोचहून मणिभाई उमरेडकर यांचा एकुलता एक मुलगा गणपति

श्रमिष्ट होऊन गरुडेश्वरीं दर्शनाकरितां आला. महाराजांनीं त्याच्याकडे नुसते कृपादृष्टीनें पाहतांच तो उत्तम बरा होऊन घरीं गेला.

भडोच येथील एक भोळसट ब्राह्मण गुरुपौर्णिमेचे दिवशीं महाराजांचें दर्शन घेण्याकरितां निघाला. चांदोद येथें आल्यावर एका ब्राह्मणानें त्याला बोलण्यांत गुंतवून त्याची गरुडेश्वरीं जाण्याची नाव चुकविली. तेव्हां त्याला अतिशय वाईट वाटून तो खिन्न मनानें नदीवर आला. तेव्हां तेथें महाराजांनीं प्रकट होऊन त्याला दर्शन दिलें व त्याची पूजा घेऊन त्याला प्रसाद दिला. हेच महाराज असें मात्र त्यानें ओळखलें नाहीं. तो तेथूनच परत भडोचला गेला. त्यानें महाराजांचा फोटो पाहिला तेव्हां त्याची खात्री झाली कीं, आपण ज्यांची पूजा केली तेच महाराज. नंतर तो गरुडेश्वरीं आला. तेथें महाराजांना प्रत्यक्ष पाहिल्याबरोबर त्याला अतिशय आनंद झाला.

नवसरीचा एक पारशी तेथें येऊन त्यानें 'आपणांस एक जिंद अन्नाचा घाससुद्धां खाऊ देत नाहीं. काल मात्र आपलें दर्शन करून जेवणास बसतांच अन्न पोटांत गेलें. करितां मी आपणांस सोडीत नाहीं.' असें त्यानें सांगतांच महाराजांनीं त्याला एक यंत्र करून देऊन त्या पीडेंतून मुक्त केलें. तेथें पारसी लोक बरेच येत असत.

बडोद्याहून श्रीसिद्धनाथाचे मंदिरांतील महंत श्रीगणपतिबुवा मंडळींसह दर्शनार्थ आले होते. तेथें महाराजांना नमस्कार करून त्यांनीं आपल्या मनांत कांहीं विचार आणले. ते जाणून महाराज लगेच म्हणाले कीं, 'इकडे येतांना आपणांस अश्वत्थामा भेटला व त्याच्याबरोबर कांहीं संभाषणाचाही योग आला.' हें ऐकून गणपतिबुवा म्हणाले कीं, 'हीच गोष्ट मी आपणांस विचारणार होतों.' याप्रमाणें मनांतले विचार महाराजांनीं सांगितलेले पाहून सर्व लोकांना आश्चर्य वाटलें.

बडोदें येथील डॉक्टर चिंतामणराव गोळे यांची संतति वांचत नव्हती. पांच सहा मुलें गेलीं. शेवटीं एक मुलगा झाला. पण त्यालाही अपस्मारानें पछाडलें. पुष्कळ उपाय झाले पण गुण येईना. तेव्हां त्यांनीं गरुडेश्वरीं धोंडोपंतांना, महाराजांचा अंगारा पाठविण्यास लिहिलें. त्याप्रमाणें महाराजांनीं अंगारा अभिमंत्रण करून दिला. तो त्या मुलाला लावतांच तो मुलगा उत्तम बरा झाला.

एक बाई महाराजांचे दर्शनास आली. दर्शनाचे वेळीं पुढें नारळ ठेवून पायां पडत असतां तिची नथ खालीं पडली, पण त्यावेळीं तिला तें समजलें नाहीं. सायंकाळीं तिला नथेची एकदम आठवण झाली. पुष्कळ शोध करूनही कोठें सांपडेना. तेव्हां त्या बाईनें महाराजांचेकडे येऊन नथेची वार्ता सांगितली आणि प्रश्नतरी पाहा असें महाराजांना ती म्हणाली. महाराजांनीं सांगितलें, 'प्रसादाचा नारळ फोडला म्हणजे नथ मिळेल.' असें ऐकतांच तिनें घरीं येऊन तो नारळ फोडला तोंच त्या नारळांतून ती नथ बाहेर पडली. तें पाहून सर्वांना आश्चर्य वाटलें.

भाविक लोकांचेकरितां महाराजांनीं, आत्मानात्मविचार व चित्तसद्बोधनक्षत्रमाला हे प्राकृत ग्रंथ तयार केले. याप्रमाणें वागणारांस तीं पुस्तकें दिलीं जात. दत्तभावसुधारस म्हणून गुरुचरित्रांतील सर्व कथा घेऊन केलेलें स्तोत्र रोज म्हणण्यासाठीं दिलें जात असे.

सावंतवाडीचे रामभाऊ सबनीसांचे चिरंजीव बडोदा स्टेटमध्यें अधिकारी होते. ते श्रावणमासांत महाराजांचे दर्शनास आले. त्यांना आल्याबरोबर 'डोक्यावरचे केंस काढल्याशिवाय दर्शन होणार नाहीं.' असें कळविल्यामुळें ते केंस काढून शेंडी ठेवून दर्शनास आले. तेथें राहण्यास विशेष जागा नसल्यामुळें सकाळीं उठून परत जावें असें

मंडळींसह सबनीस निघाले. त्या वेळीं नारदेश्वरमंदिरांत नित्याप्रमाणें भाष्यपाठ चालू होता. सबनीसांच्या मंडळींना असें वाटलें कीं, जातांना आपण तीर्थप्रसाद घेऊन जावें. पण निघण्याची वेळ झाली होती. इतक्यांत महाराजांचेकडून एक मनुष्य तीर्थप्रसाद घेऊन आला व त्यानें सांगितलें कीं, 'पाठ सुरू असतांना महाराजांना एकदम आठवण झाली म्हणून त्यांनीं हा तीर्थप्रसाद पाठविला आहे.' तो तीर्थप्रसाद घेऊन सर्वांना गहिंवरून आलें.

मुंबईस आनंदराव रामकृष्णराव तालचेरकर यांची नात कुमारी इंदिराबाई यांचा साखरपुडा इंदूरचे महाराज श्रीमंत सवाई तुकोजीराव होळकर यांचेबरोबर शके १८३४ मध्यें इंदूरालाच झाला. पुढें इंदूरचे महाराज युरोपच्या सफरीस गेले, त्यामुळें लग्नाचें कांहीं निश्चित झालें नव्हतें. अशा स्थितींत दहा अकरा महिने गेले. त्या वेळीं वरील गृहस्थांच्या सूनबाई कृष्णाबाई तालचेरकर यांनीं आपली भाची कु. इंदिराबाई हिचें टिप्पण वाडीचे नारायण दत्तात्रेय पुजारी यांचेमार्फत महाराजांचेकडे पाठविलें. महाराजांनीं टिप्पण पाहून कळविलें कीं, 'यांत राजयोग दिसत नाहीं.' तेव्हां नारायण दत्तात्रेयांनीं लिहिलें कीं, 'मुलीचें टिप्पण गुरुमहाराजांचे हातांत गेलें म्हणजे हें लग्न होणारच अशी आमची भावना आहे. तरी कृपा व्हावी.' तेव्हां शेवटीं महाराजांनीं लिहिलें कीं, 'मुलीकडून निष्काम शिवाराधना व्हावी व 'देवेंद्राणि नमस्तुभ्यं' या मंत्राचा जप करवावा. मार्गशीर्ष मासांत कार्य होईल' असा आशीर्वाद दिला. त्याप्रमाणें इंदूरचे महाराज दोनतीन महिन्यांतच परदेशांतून येऊन मार्गशीर्ष शुद्ध दशमी सोमवारीं शके १८३९ या दिवशीं कु. इंदिराबाईबरोबर राजेसाहेबांनीं विवाह केला. नंतर यांचें नांव सौ. महाराणीसाहेब इंदिराबाई होळकर असें पडलें. महाराजांचे

ठिकाणीं यांची निष्ठा फार मोठी आहे. गरुडेश्वर येथें यांनीं नर्मदेस घाट बांधला आहे. माणगांव, कुरुगड्डी, कारंजा इत्यादि स्थानांतूनही अनेक देणग्या देऊन त्यांनीं गुरुमहाराजांची शुद्ध भावानें सेवा केलेली आहे.

रोज रात्रीं भजन संपल्यावर प्रसाद वांटला जाई. एकदा रात्रीं सबनीस तेथें होते. मंडळी ३।४ शें होती. प्रसादाचें भांडें लहान होतें. हा प्रसाद सर्वांना कसा पुरेल अशी शंका सबनीसांना आली. प्रसाद वांटण्याचें काम सुरू झालें. सर्वांना प्रसाद वांटून झाल्यावर तें भांडें महाराजांचे समोर आणून ठेवलें. तेव्हां महाराज म्हणाले, 'त्याचें झांकण काढा, पाहूं किती प्रसाद राहिला आहे ! आंत अद्यापि बायकांना वांटावयाचा आहे.' तें ऐकून त्या माणसानें प्रसादाच्या भांडयावरील झांकण काढलें. त्या वेळीं सबनीसांनीं त्या भांड्यांत पाहिलें तों तें अद्यापि अर्धें अधिक भरलेलें दिसून आलें.

कृष्णजयंतीस उत्सव करण्याकरितां जागा साफ करण्याचें काम सुरू झालें. महाराज स्वतः जाऊन जागा साफ करूं लागले. मग काय विचारावें ! सर्व मंडळी जमून त्यांनीं ती जागा अल्पकालांतच साफ करून बैठक घातली. दोन ग्यासच्या बत्त्या लावल्या. कीर्तन झाल्यावर भजन सुरू झालें. इतक्यांत नर्मदेच्या पलीकडे पाऊस पडूं लागल्याचें दिसलें. आतां हा पाऊस इकडेहि येऊन मध्येंच भजन थांबवावें लागणार असें वाटून सबनीस वगैरे मंडळी चिंतातुर झाली. महाराजांनीं सहज एकदां आकाशाकडे पाहिलें आणि सांगितलें कीं, 'पावसाची धास्ती नको, भजन चालूं द्या.' नंतर भजन संपवून मंडळी पर्णकुटींत आली आणि कृष्ण-जन्म झाला. इतक्यांत जोरांत पाऊस सुरू झाला. तेव्हां महाराज म्हणाले कीं, 'सबनीस ! हा घ्या मघांचा पाऊस' तें चरित्र पाहून सबनीस थक्क झाले.

एकदा एक ब्राह्मण महाराजांचे दर्शनास आला. ज्वरामुळें तो अशक्त झाला होता. कांहीं दिवसांनीं तो निघाला. तेव्हां महाराज त्याला म्हणाले कीं, 'तुम्हांला लांब जावयाचें आहे, तरी थोडे शाबुदाणे बरोबर घ्या, तुम्हांला सबनीस शाबुदाणे देतील.' बाहेर सबनीस बसले होते त्यांनीं हे शब्द ऐकले. तेव्हां त्यांना चिंता उत्पन्न झाली कीं, आतां या ब्राह्मणाला येथें शाबुदाणे कोठून द्यावेत? अशा काळजींत ते असतां गरुडेश्वर तालुक्याचे अव्वल कारकून त्यांना भेटण्याकरितां आले. ते बोलतां बोलतां सहज म्हणाले कीं, 'या कुग्रामांत महाराजांचें वास्तव्य झाल्यापासून सर्व जिन्नस आमच्या घरीं आम्हांला भरपूर मिळूं लागले. आतां एका मुंबईच्या गृहस्थानें जातांना शाबुदाणे ठेवून दिले.' हें वाक्य ऐकतांच सबनीसांना आश्चर्य वाटून त्यांनीं लगेच ते शाबुदाणे आणवून त्या ब्राह्मणास दिले.

बडोदा येथील विठ्ठल सोनारानें दत्तमूर्ति करून आणली. तिची प्रतिष्ठा रामचंद्रशास्त्री प्रकाशकर यांनीं चार ब्राह्मणांसह आश्विन शुद्ध ९ रोजीं धोंडोपंत कोपरकर यांचे हस्तें करविली. नंतर ब्राह्मणद्वारां पूजा अर्चा सुरू झाली. पर्णकुटींत लहानशा सिंहासनावर ती मूर्ति ठेवली होती. वाडीप्रमाणेंच त्रिकाल पूजा वगैरे सुरू झालें. तिचा संस्कार झाला नव्हता. म्हणून देवांच्या सांगण्यावरून यथाविधि अर्चा केली. देवापुढें येणारें विशिष्ट द्रव्य माणगांवप्रमाणेंच नरसोबाचे वाडीस पाठविलें जाई.

एकदां द्वादशीस भिक्षा आणून महाराज पारणा करण्यास बसले. इतक्यांत एका सुवासिनीनें महाराजांच्या पत्रावळीवर चटकन् लिंबाची फोड वाढली. तेव्हां लगेच महाराज उठून म्हणाले कीं, 'या मुलीला संन्याशांचे नियम माहीत नाहींत असें दिसतें. बरें असो.' नंतर हात पाय धुऊन आचमन करून आसनावर येऊन बसतांच मंडळींचीं प्रश्नोत्तरें

सुरू झाली. दोन दिवसांचा उपवास होऊनही मुद्रा निर्विकार होती. मंडळींच्या आग्रहामुळें एक लांकडी पेलाभर ताक तेवढें घेतलें.

एकदा दोघें पतिपत्नी महाराजांचे दर्शनास आलीं होतीं. त्यांपैकीं बाईस महाराजांचा उपदेश घ्यावा अशी इच्छा होऊन तिनें महाराजांना विनंति केली. तेव्हां महाराज थट्टेनें तिला म्हणाले कीं, ' तुम्हांला उपदेश देणें बरोबर नाहीं; कारण तुम्ही जप करतांना यजमान आले तर त्यांना सांगाल कीं चुलीवरचें अन्न वाढून घ्या. ' असें म्हणतांच तो नवराही म्हणाला कीं ही असाच मला त्रास देते. असो. असा महाराजांचा स्वभावही विनोदी होता. शेवटीं त्या बाईस उपदेश मिळाला नाहीं.

एके दिवशीं श्रीदत्तमूर्तीची स्थापना केलेल्या जागीं एक साप निघाला. तेव्हां महाराज सर्वांना म्हणाले कीं, ' तुम्ही सर्व बाहेर जाऊन झोपा. नाहीं तर रात्रीं मध्येंच आपणांला उठवून सर्पदंशावर उपाय करण्यास सांगाल. ' असें सांगून नंतर महाराजांनीं त्या सर्पावर तांदूळ मंत्रून टाकले व ' तूं येथें कोणाच्या दृष्टीस पडूं नयेस ' असें सांगितलें. तेथेंच सर्व निजले. दुसरे दिवशीं संध्याकाळीं गीताप्रवचन चालू असतां पुनः त्या सापाची गडबड सुरू झाली. तेव्हां त्याच्याजवळ जाऊन महाराज त्या सापाला म्हणाले कीं, 'अरे ! येथें तुझी गडबड नको. गीताप्रवचन सुरू आहे. तूं येथून निघून जा.' हें ऐकतांच त्या मंडळींच्या मधून तो साप बाहेर निघून गेला. बाहेर लोक त्याला मारण्याकरितां धांवले; पण महाराजांनीं सांगितले कीं, ' त्याला मारूं नका, वाटल्यास नर्मदेवर नेऊन सोडा. ' त्याप्रमाणें त्या सांपाला नर्मदाप्रवाहांत सोडून दिलें.

महाराजांच्यापुढें जमणारें द्रव्य तेथेंच एका डब्यांत घालून ठेवलेलें असे. त्यांतूनच सर्व सामान, धान्य वगैरे आणलें जात असे. महाराज

स्वतः द्रव्यास कधींच स्पर्श करीत नसत. एकदां धान्य पाठविणाऱ्या माणसास पैसे देऊन झाल्यावर त्या पेटींत तीनच रुपये राहिले. मंडळी तर रोज द्रोनशेंपर्यंत सहज असत. शेवटीं ती गोष्ट सबनीसांनीं महाराजांना सांगतांच ते म्हणाले कीं, 'देवाच्या इच्छेनें सर्व व्यवस्था होईल. काळजी कशाला? पैसा नाहींच आला तर नर्मदेचें पाणी तर भरपूर आहे ना?' हें ऐकून सबनीस स्वस्थ बसले. पुनः ८।१० दिवसांनीं 'त्या सामान पाठविणारास पैसे द्या.' असें महाराजांनीं सबनीसांना सांगतांच सबनीसांनीं ती पैशाची पेटी उघडली, तों आंत सबंध पेटीभर सोन्याच्या गिन्या पसरलेल्या आहेत असें त्यांना दिसून आलें. तें पाहून सबनीसांना आश्चर्य वाटलें. महाराज वऱ्हाड भागांत असतांना एकदा तिकडील अंबादास भाके या गृहस्थाच्या शेतांतून गेले. त्यामुळें त्याच्या शेतांत भरपूर उत्पन्न आलें. तें पाहून त्या नवराबायकोची भक्ति महाराजांचेवर बसली. ते त्या वेळीं गरुडेश्वरीं आले व एकदम तीन हजार रुपयांच्या गिन्या महाराजांचे पुढें ठेवून गेले. त्यांना महाराज 'मालीक' असें म्हणत. 'कागदावर रामनाम लिहून तो कागद पिठाच्या गोळींत घालावा, व अशा गोळ्या माशांना घालाव्यात.' असें त्यांना महाराजांनीं सांगितलें होतें. त्याप्रमाणें ते नित्य करीत असत.

एकदां एक इंग्रजी पद्धतीनें शिकलेले सुधारक विद्वान् गृहस्थ येऊन महाराजांना म्हणाले कीं, 'मी फार लांबून आलों आहें. मला कांहीं वेदान्तांत शंका असल्यानें त्यांच्या निरसनार्थ मी येथें आलों आहें.' तें ऐकून महाराज म्हणाले कीं, 'इतके लांब कशाला आलां? बाहेरून जरी तुम्ही सभ्य दिसत असला तरी आंतून पूर्ण नास्तिक आहांत. तुमचें जानवें तुटलेलें आहे हें सुद्धां तुम्हांला कळत नाहीं.' हें ऐकून त्यानें कपडे काढून पाहिलें तर खरोखरच जानवें

दोन ठिकाणीं तुटलेलें दिसलें. त्यानें लगेच आपली चूक कबूल करून महाराजांची क्षमा मागितली. महाराज त्यांना म्हणाले कीं, 'यथाविधि प्रायश्चित्त घेऊन धार्मिक आचरण पाळूं लागल्यावर इकडे या.' असें बोलून त्यांना प्रसाद दिला व जाण्यास सांगितलं.

एकदां एक गुजराथी ब्राह्मण आपल्या वीसबावीस वर्षांच्या मुलीला बेशुद्ध स्थितींत तेथें घेऊन आला व त्यानें सांगितलें कीं, 'आज तीन दिवस ही बेशुद्ध स्थितींत आहे, तरी या त्रासांतून हिची दया करून मुक्तता करा.' हें त्याचें बोलणें ऐकून महाराजांनीं चालू असलेलें प्रवचन बंद करून आपल्या कमंडलूंतील पाणी तिच्या अंगावर टाकलें. त्याबरोबर ती मुलगी उठून बसून बोलूं लागली. त्या पिशाचानें सर्व कारण सांगितलें. नंतर महाराज तिच्या बापाला म्हणाले कीं, 'तुम्ही हिला चांगल्या मांत्रिकाकडे घेऊन चला. हें काम सोडून आपणांस बरेच दिवस झाले व तशीं साधनेंही येथें आपल्या जवळ नाहींत. मांत्रिक लवकरच भेटेल. तोंपर्यंत या मुलीला कोणतीही भीति नाहीं. इतकी व्यवस्था केली आहे.' हें ऐकून तो मनुष्य मुलीला घेऊन निघून गेला.

गुरुद्वादशीचा उत्सव या ठिकाणीं फारच मोठया प्रमाणावर झाला. लघुरुद्र पुष्कळ झाले. हजारों मंडळी जेवली. श्रीमंताकडूनही अशी व्यवस्था होणार नाहीं. महाराज स्वतः पंक्तींत हिंडून सर्वांना 'स्वस्थपणें जेवा' असें सांगत होते. त्या दिवशीं सर्व भोजन करणाऱ्यांना दक्षिणा दिली.

एकदां सकाळीं भाष्यपाठ संपल्यावर महाराज म्हणाले कीं, 'आजपर्यंत जो प्रत्यक्ष उपदेश केला व ग्रंथ लिहिले त्या सर्वांचें सार आज सांगावयाचें आहे. मुक्तीचा लाभ करून घेणें हें मनुष्यजन्माचें मुख्य कर्तव्य आहे. त्याकरितां प्रथम मन स्थिर व्हावें या उद्देशानें वर्णाश्रम

विहित धर्माचें यथाशास्त्र आचरण झालें पाहिजे. वेदांताचें श्रवण, मनन व निदिध्यासन नित्य करावें. मुख्यत: श्रवणाकडे अधिक लक्ष द्यावें. त्यामुळें मनांतील आसक्ति कमी होईल. सात्विक प्रवृत्तीनेंच मानवांची उन्नति होते. सात्विक प्रवृत्ति होण्याकरितां आहार हा हित, मित, मेध्य म्हणजे पवित्र असण्याकडे लक्ष दिलें पाहिजे. आपली प्रकृति सात्विक झाली हें ओळखण्याची खूण अशी कीं, 'स्वधर्मावर दृढ श्रद्धा, स्नानसंध्या, देवपूजा, पंचमहायज्ञ वेळेवर करणें, अतिथिसत्कार, गोसेवा, कथा कीर्तन, भजन, पुराण यांचें श्रवण, सर्वांबरोबर गोड बोलणें, दुसऱ्याचें नुकसान होईल असें न वागणें, मातापितरांची सेवा करणें, स्त्रियांनींही सासरीं राहून सासूसासरा व इतरहि वडील माणसें यांच्या आज्ञेंत पतीची दृढनिष्ठेनें सेवा करणें इत्यादि गुण आपल्यामध्यें येणें म्हणजे आपली प्रकृति सात्विक बनल्याचीं चिन्हें आहेत. उदरनिर्वाहाकारितां व्यापार, शेती, नोकरी कोणताही धंदा केला तरी वेदविहित कर्म व गुर्वाज्ञा-पालन हें कधींही सोडूं नये. स्वकर्म केलें तरच अंत:करण शुद्ध होतें. अंत:करण शुद्ध झालें तर उपासना स्थिर होते; उपासना स्थिर झाली तर मनाला शांति मिळते, आणि मनाची गडबड थांबली म्हणजे आत्मज्ञान होऊन मोक्षाचा लाभ होतो.' याप्रमाणें उपदेश करून महाराजांनीं सात ज्ञानभूमिकाही सुंदर रीतीनें समजावून सांगितल्या आणि 'हें सर्व थोडक्यांत सांगितलें आहे, याप्रमाणें जो वागेल तो शेवटीं पूर्ण सुखी होईल' असें शेवटीं सांगितलें.

एकदां गडी भांडीं घासण्याकरितां नर्मदेवर गेला त्या वेळीं एक मोठें पातेलें त्याच्या हातांतून सुटून प्रवाहाबरोबर वाहात जाऊं लागलें. तें कळवितांच महाराज नदीतीरावर येऊन म्हणाले कीं, 'नर्मदामातेला हें पातेलें घेऊन काय करावयाचें आहे? बालगोपाळांच्या जेवणाचा

खोळंबा ती कशाला करील ? ' इतकें महाराज बोलत आहेत इतक्यांत तें पातेलें लाटांच्या धक्यानें हळूहळू महाराजांच्या पायांजवळ येऊन लागलें. नर्मदामातेनेंच तें आणून दिलें.

बडोदा येथील गणपति मंदिराचे महंत दर्शनास आले होते. ते परत निघाले त्या दिवशीं संकष्टी असल्यानें महाराज त्यांना म्हणाले कीं, ' तुम्ही रात्रीं संकष्टी सोडून जा, आतां दुपारींच जाऊं नका. हाल होतील.' हें ऐकूनही ते न थांबतां निघन गेले. त्यांना तिलकवाड्यास पोंहोचण्यासच रात्रीं दहा अकरा वाजले. त्याच दिवशीं सबनीसही दुपारीं निघणार होते, पण संकष्टीचें पारणें करून जाण्यास त्यांना सांगितल्यावरून ते राहिले. रात्रीं चंद्रोदयानंतर जेवण करून निघाले ते दहा अकरा वाजतां तिलकवाड्यास पोंहोचले. त्या वेळीं महंत नुकतेच पोहोंचून लांकडें गोळा करीत होते. त्यांनीं वाटेंत हाल झाल्याचें सांगितलें. सबनीस म्हणाले, 'महाराजांच्या वचनाचा अवमान केल्याचें हें फळ आहे.' नंतर सबनीसांना ताबडतोब पन्हई मिळून ते दुसरे दिवशीं कामावर हजरही झाले. महंतांना बडोद्यास पोंचण्यास तीन दिवस लागले.

गरुडेश्वरीं दिवाळीचा उत्सव मोठया थाटाचा झाला. नदीतीरावर मोठें भांडें ठेवून पाणी तापविलें. महाराजांना ऊन पाण्याचा त्रास होतो म्हणून सर्वांनीं अत्तराच्या कुप्या महाराजांच्या पायांवर ओतल्या व अगासही अत्तर लावलें. सर्व मंडळींना जोडप्यांनीं अभ्यंग स्नान घालावयास लावून महाराज तें कौतुक पाहत उभे राहिले. नंतर सर्व मंडळी नारदेश्वराचे दर्शनास गेली. तेथें आलेल्या पंधरा सुवासिनींना खण व लुगडीं देवविलीं. याप्रमाणें पांच दिवस दिवाळी थाटांत पार पडली.

बडोद्यास एका श्रीमंत बाईचा मुलगा आजारी पडला. तिला पूर्वी महाराजांनीं जप सांगितला होता. त्या बाईनें आपला नोकर पाठवून

मुलाची हकीकत कळविली असतां महाराजांनीं सांगितलें कीं, ‘ तिला पूर्वी सांगितलेला जपच तिनें करावा म्हणजे मुलास बरें वाटेल; पण जपास रुद्राक्षाची माळ न घेतां स्फटिकाची घ्यावी.’ हें महाराजांचें बोलणें त्या नोकरानें येऊन यजमानीण बाईस सांगितलें. आपण रुद्राक्षाची माळ जपास घेतों हें महाराजांना कसें समजलें असें तिला वाटलें. नंतर ती स्फटिकाच्या माळेनें जप करूं लागली. तो मुलगा बरा झाला.

दत्तजयंतीचा उत्सवही मोठया प्रमाणावर झाला. दोन तीन हजारांवर मंडळी जमली होती. याप्रमाणें रोज अनेक मंडळी दर्शनास येऊन महाराजांचे कृपेनें कृतकार्य होऊन जात होती. याप्रमाणें क्रम चालूं असतां शके १८३६ वैशाख महिन्यांत महाराजांच्या मूळच्या अतिसार रोगानें उचल खाल्ली व शरीर दिवसेंदिवस क्षीण होत चाललें. हें समजतांच महाराजांना आराम पडण्याकरितां नरसोबाचे वाडीस पुजाऱ्यांनीं देवावर संततधार अनुष्ठान सुरूं केलें; पण हें महाराजांना समजतांच त्यांनीं वाडीस कळविलं कीं, ‘ उगीच देवाला त्रास देऊं नका. हें शरीर अल्पावधींतच पडणार आहे.’

महाराजांनीं देवाला विचारलें कीं, ‘ येथील मूर्तीची व्यवस्था काय करावयाची ? ’ देवांनीं सांगितलें कीं, ‘ आम्हाला येथेंच राहावयाचें आहे. मूर्ति कोठेंही पाठवूं नये.’ अशी आज्ञा झाल्यापासून देवापुढें येणारा विषय वाडीस पाठविण्याचें बंद झालें. शेवटीं महिनाभर महाराज पडूनच होते. पत्रोत्तरेंही दुसऱ्याकडून लिहवीत. वैशाख आमावस्येस ळळीत नांवाचे उत्तम ज्योतिषी महाराजांचे दर्शनास आले होते. त्यांना विचारतांच त्यांनीं सांगितलें कीं, ‘ महाराजांना ज्येष्ठ महिना फार वाईट आहे. तो निभावला तर प्रकृतीस आराम पडेल. ’ रामशास्त्री प्रकाशकर, धोंडोपंत कोपरकर इत्यादि मंडळी सेवेसाठीं होती. महाराज नेहमीं

ध्यानांत निमग्न असत. सबंध दिवसांतून ५।१० वाक्येंच बोलत. केव्हां केव्हां पुष्कळ बोलत. त्या स्थानाची कांहींतरी व्यवस्था व्हावी या उद्देशानें ब्रह्मानंदस्वामींनीं तेथें एक पंचकमेटी नेमून दिली. यांत १ श्रीनृसिंहसरस्वती अध्यक्ष, २ रामचंद्र विठ्ठल अधिकारी उपाध्यक्ष, ३ परशुराम कुबेरराम भट, कोशाध्यक्ष, ४ अमृतराव पुरुषोत्तम सबनीस, ५ लक्ष्मीशंकर हरिगोविंददास ठाणेदार, ६ प्रद्युम्नानंदतीर्थ. हे तीन व्यवस्थापक. अशी मंडळी होती.

मंडळींनीं महाराजांना औषध घेण्याबद्दल विनंति केली, पण महाराज म्हणाले कीं, 'हा देह लवकरच सोडून जावयाचें आहे, करितां औषधाचें कारण नाहीं. शंकराचार्य बत्तीस वर्षेंच राहिले; त्या मानानें हें शरीर जास्ती टिकलें. या देहाला दोन वेळ सर्पदंश, तीन वेळ महामारी, एक वेळ सांनिपात, एक वेळ प्लेग, दोन वेळ महाव्याधि, दोन वेळ कोड इतके रोग उत्पन्न झाले. संग्रहणी तर कायमचीच आहे. त्या वेळीं कोणीं औषध दिलें ? जन्मापासून ज्या वैद्याला धरलें आहे तो वैद्य या वेळींही आहेच. त्याची इच्छा जशी असेल तसें होईल.' असें सांगून भीष्माचार्यांनीं शेवटीं म्हटलेले श्लोक सर्वांना म्हणून दाखविले.

प्रथम महाराजांचा निर्याणाचा समय ज्येष्ठ वद्य ८ हा होता. पण त्या दिवशीं जाण्याची महाराजांची इच्छा नव्हती. म्हणून अष्टमी केव्हां लागणार तें विचारून, दुसऱ्याच्या साहाय्यानें महाराज उठून समाधि लावून तीन तास बसले. नंतर देहभानावर आल्यावर महाराजांनीं सांगितलें कीं, 'आजचा निर्याणाचा प्रसंग होता, पण तो टळला.' दिवसेंदिवस क्षीणता वाढत चालली. वेदना फार होत. शरीरांत उष्णता इतकी वाढली कीं, शरीरावर सारखें थंडगार पाणी शिंपडावें लागे. तरी मुखानें दत्त दत्त म्हणत व इतरांनाही दत्तनाम घेण्यास सांगत.

ज्येष्ठ वद्य १४ स धोंडोपंतांना बोलावून सांगितलें कीं, 'उपदिष्ट मंत्राचा जप रोज १२०० करीत जा. गुरुद्वादशी, दत्तजयंती व गुरुप्रतिपदा हे उत्सव करून यथाशक्ति ब्राह्मणभोजन घालावें. त्या योगानें अंतःकरणशुद्धि होऊन कैवल्यपद मिळेल,' असें सांगून आपल्या अंगावरची छाटी काढून त्यांना दिली. धोंडोपंतांनीं सद्गदित अंतःकरणानें चरणीं मस्तक ठेवून तो प्रसाद घेतला.

ज्येष्ठ वद्य अमावास्येस फारच क्षीणता आली. नरसोबावाडीचे पुजारी आप्पाशास्त्री जेरे यांना जवळ बोलावून 'पूर्वी गृहस्थाश्रमांत आपल्यावर आभिचारिक प्रयोग केल्याचें सांगितलें व आपणांस त्याचा प्रतिकार करण्याची इच्छा नाहीं' असेंही सांगितलें. त्या शेवटच्या दिवशींसुद्धां नित्यकर्म करण्याचा प्रयत्न महाराजांनीं केला. पण आचमनाचें पाणीच हातांत राहीना. तें पाहून देवाची इच्छा असें म्हणून स्वस्थ राहिले.

आज अमावास्या संपल्यावर हा स्थूल देह सोडावयाचा आहे, असें सांगितलें होतें. अमावास्या संपून प्रतिपदा लागतांच सिद्धासन घालून बसले. प्रथम पूर्वाभिमुख बसले होते, पण देवाकडे पाठ होते म्हणून पश्चिमेकडे देवासमोर मुख केलें. देवाकडे पाहून त्राटक केलें व श्वास निरोध करून दीर्घ प्रणवोच्चार करीत देहाचें विसर्जन केलें आणि महाराज ब्रह्मस्वरूपीं लीन झाले. त्या वेळीं आषाढ शुद्ध प्रतिपदा, मंगळवार, आर्द्रा नक्षत्र, उत्तरायण होतें. रात्रीं सुमारें अकरा वाजण्याचा समय होता. सर्वांना गुरुमाउलीच्या चिरवियोगानें अत्यंत दुःख झालें. दुसरे दिवशीं सकाळीं महाराजांच्या देहावर सर्वांनीं पवमान, पुरुषसूक्त, रुद्र इत्यादि मंत्रांनीं अभिषेक केला. षोडशोपचारें पूजा केली. बेल, तुळशी, फुलें इत्यादिकांच्या माळा गळयांत घातल्या व पुष्पासनावर बसवून वाजत गाजत नर्मदातीरावर नेलें. तेथेंही पूजा करून नैवेद्य, फल, तांबूल

दक्षिणा समर्पण केली. दंडाचे तीन तुकडे करून मांडीवर ठेवले. कमंडलूस मध्यें भोंक पाडून तो कमरेस बांधला. दोरांनीं घट्ट बांधून कलेवर वर येऊं नये म्हणून दगड बांधले आणि तें परमपवित्र मंगल शरीर शेवटीं नर्मदामातेच्या जलांत सोडून दिलें. नंतर सर्व मंडळी श्रीगुरुस्मरण करीत परत आली. याप्रमाणें श्रीगुरुदेवांचें चरित्र साररूपानें संकलित केलेलें श्रीगुरुचरणीं समर्पित होवो, हीच प्रार्थना !

त्वयि भक्तिं मे वर्धय दुर्वृत्तम ईश नाशयाशेषम् ।
यच्च तवेष्टं तत् कुरु मयि भोः सर्वज्ञ वक्तुमसमर्थः ॥ १ ॥

श्रीगुरुचरणारविंदार्पणमस्तु !
श्रीगुरुदेवदत्त !!

---

# वेदनिर्वेदस्तोत्रम् ।

श्रीगणेशाय नमः । अथ कश्चित्कविर्नरसिंहसरस्वतीस्तोत्रमिषेण परतत्त्वप्रापकमुपदेशमारभमाणो नमस्क्रियात्मकमंगलेनादौ गन्तव्यं पदं निर्दिशति–विजयते इति ।

**विजय तेऽज यते जयते यतेरिह तमो हतमोहतमो नमः।**
**हृदि कदाय पदाय सदा यदा तदुदयो न दयोनवियोनयः॥१॥**

अत्र विजयशब्दो देवतावाचकत्वान्मंगलार्थः । यदुक्तम्– "देवतावाचकाः शब्दा ये च भद्रादिवाचकाः । सर्वे ते नैव निंद्याः स्युर्लिपितो गणतोऽपि वा ॥ " इति । विशेषेण जयतीति विजयः तत्संबुद्धौ हे विजय 'सत्यमेव जयति नानृतम्' इति मुंडकश्रुतेः ( मुं. ३-१-६ ) 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' इति तैत्तिरीयाच्च ब्रह्मणः सत्यत्वं तस्यैव विजयत्वं च । अत्रोपन्यस्तवाक्येऽनंतादिशब्ददर्शनाद्ब्रह्मणो देशकालवस्त्वनवच्छिन्नत्वात् तत्र वाणीप्रवेशासंभवाव्द्यर्थोऽयं स्तोत्रारंभोद्यम इत्याशंक्याह संबुद्ध्यात्मकैर्विशेषणैः । न जायत इत्यजः तत्संबुद्धौ हे अज । उपलक्षणमेतत् इतरविकारव्यावर्तकम् । षड्भावविकारशून्येत्यर्थः । हे यते स्वेच्छोपात्तसंन्यासिरूप। एतेनास्मदादिवत्कर्मोपात्तपारतंत्र्यदेहवान्नायमिति सूचितम् । यदुक्तं भाष्यकृता– " अजोऽपि सन्नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वरूपोऽप्यव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि च सन् मायया देहवानिव जात इव च संलक्ष्यते भक्तानुग्रहार्थमेव" इति अतोऽस्य सगुणत्वाद्वाणीप्रवेशसंभवः । पुनश्च–हते मोहतमसी स्वभक्तानां येन सः तत्संबुद्धौ हे हतमोहतमः । इदमेवावतारप्रयोजनमिति सूचितम् । ईदृश हे नरसिंहसरस्वति । यतेः यतनशीलस्य निर्जि-

तेन्द्रियग्रामस्य । ' ये निर्जितेन्द्रियग्रामा यतिनो यतयश्च त' इत्यमरात् । हृदि विद्यमानं तमोऽज्ञानं जयतीति जयत् तस्मै । एतेन भगवत्प्रसादात् हार्दतमोजयः सुकर इति सूचितम् । तज्जयरूपविक्षेपावरणशक्तिमायानिरासोत्तरमव्यवहितकाल एव कं निरतिशयसुखं स्वरूपं " सुखमस्यात्मनो रूपम् " इति भागवतोक्तेः तद्ददातीति कदं तस्मै कदाय, ते तव पदाय (सदा) नमः प्रव्हीभावोऽस्तु । प्रव्हीभावो नाम स्वात्मनः परमात्मैकत्वसमर्थनम् । " सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति । यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योम् " इति काठकोक्तेः, " गच्छंत्यमूढाः पदमव्ययं तत् " इति स्मृतेश्च पदशब्दवेद्यं स्वरूपं ज्ञेयम् । अत्र षष्ठयर्थो राहोः शिर इतिवदौपचारिकभेदोऽवगन्तव्यः । तर्हि किमिति सर्वे न मुच्यन्ते तेन पदेनेत्यत आह-यदा दैवयोगात् यतिहृदये तदुदयः तस्य पदस्य उदयोऽहं ब्रह्मेत्यपरोक्षानुभवो भवतीति शेषः । तदा " भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः । क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन् दृष्टे परावर " इति श्रुतेः "तदधिगम उत्तरपूर्वाघयोरश्लेषविनाशौ तद्व्यपदेशात्" " इतरस्याप्येवमसंश्लेषः पाते तु " इत्युत्तरमीमांसासूत्राभ्यां च तत्त्वज्ञानोत्तरं भाविजन्मप्रदकर्माभावात् दयया ऊनाः न्यूना या विविधयोनयः ताः दयोनवियोनयः न भवन्तीत्यर्थः। अन्यथा भवन्त्येव । यदुक्तं काठके- " इह चेदशकद्बोद्धुं प्राक्शरीरस्य विस्रसः । ततः सर्गेषु लोकेषु शरीरत्वाय कल्पत " इति । स्मृतावपि- " तानहं द्विषतः क्रूरान् संसारेषु नराधमान् । क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु " इति । द्रुतविलंबितवृत्तमिदम् । नभौ भरौ इति लक्षणात् ॥१॥

एवं पदशब्दवेद्यं देहत्रयातीतं ज्योतिर्मयं ब्रह्म यतयो हृदये उद्गतं पश्यन्तीति मुंडकश्रुत्युक्ततात्पर्यमुक्तम् । तथाहि मुंडके " अंतः

शरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्रो यं पश्यन्ति यतयः क्षीणदोषाः " इत्यादि । अथ यतिहृदये तत्पदोदयोऽपि कामनिरासेन भवतीत्याह–उदयते इति ।

उदयतेऽनयतेर्न यतेर्यदा मनसि कामनिकामगतिस्तदा ।
पदुदयो हृदयौकसि ते सिते भवति योऽवति योगिवराऽवरान्॥२

निर्गुणयोगोऽस्ति येषां ते योगिनः तेषां मध्ये यो वरः श्रेष्ठः तत्संबुद्धौ हे योगिवर। अयतिः शिथिलाभ्यासी तथा न भवतीत्यनयतिः तस्य दृढाभ्यासिनः यतेः संन्यासिनो मनसि शुद्धान्तःकरणे। कामनिकामगतिः "अहंकारचिदात्मानावेकीकृत्याविवेकतः। इदं मे स्यादिदं मे स्यादितीच्छाः कामशब्दिताः ॥" इत्युक्तलक्षणा ये कामास्तेषां निकामगतिर्यथेष्टविलासो (यदा) नोदयते न भवति तदा कामगत्यभावात् सिते सत्त्वप्रभावे हृदयरूपगृहे त्वद्भक्तस्य यतेरिति शेषः। पदुदयः पूर्वोक्तलक्षणपदप्राकट्यं भवति। पूर्वं विद्यमानस्यापि पदस्य विस्मृतकण्ठचामीकरन्यायेनोदयरूपप्राप्तिर्बोध्या। अन्यथा तस्योदयास्तसत्त्वे घटादिवदनित्यत्वं स्यात्। अत्र श्रुतिः–" यदा सर्वे प्रमुच्यंते कामा येऽस्य हृदि श्रिताः। अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ॥ " इति। एवं च कामसत्त्वे ईप्सितकामलोकगतिः। कामाभावे च ब्रह्मप्राप्तिरित्यर्थात् सिद्धम्। उक्तं चाथर्वणिके "कामान् यः कामयते मन्यमानस्स कामभिर्जायते तत्र तत्र। पर्याप्तकामस्य कृतात्मनस्तु इहैव सर्वे प्रविलीयन्ति कामाः॥"(मुं.३-२-२) इति। स पदुदयः कथंभूत इति चेत्तदुच्यते। यः पदुदयः अवरान् मध्यमाधिकारिणो यतीन् अवति अविद्याकामकर्मादिभ्यो रक्षति। " तेषामेवानुकंपार्थमहमज्ञानजं तमः। नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता " इति ॥ २ ॥

भवति भावभवोऽवभवो यदा भवति कामनिकामहतिस्तदा।
भवति मानवमानवदुत्तमे भवतिरोधिरतो विरतोत्तमे ॥ ३ ॥

कामजयोऽपि त्वद्भक्त्यैव भवतीति स्तुवन्नाह भो नरसिंहसरस्वति भवति त्वयि विषये यदा भावभवः ( भावः ) सात्विकाष्टभावलक्षणभक्तिः तस्य भवः उद्भवः, भवति साधौ । " भवद्युष्मत्सतोस्त्रिषु" इति त्रिकांडशेषात् । भवति उदेति । स कथंभूतः–अवमतः भवो जन्ममरणरूपसंसारो यस्मिन् सः अवभवः । तदा मानवेषु सामान्यमनुष्येषु ये मानवंतः श्रेष्ठाःब्राह्मणाः तेषां मध्ये यः उत्तमो ब्रह्मवादी तस्मिन् मानवमानवदुत्तमे । यदुक्तं गारुडे–" भूतानां प्राणिनः श्रेष्ठास्तेभ्यो बुद्ध्युपजीविनः। बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठा नरेषु ब्राह्मणाः स्मृताः।। ब्राह्मणेषु च विद्वांसो विद्वत्सु कृतबुद्धयः । कृतबुद्धिषु कर्तारः कर्तृषु ब्रह्मवादिनः ॥" इति । ईदृशे मनुष्यश्रेष्ठे त्वद्भक्ते कामनिकामहतिः–कामानां पूर्वोक्तलक्षणानां निकामहतिः–अत्यंतनाशो भवति । अतः–ऊर्ध्वं कामवासनानाशोत्तरं विरतोत्तमे तृणीकृतब्रह्मलोके । यदुक्तम्–" ब्रह्मलोकतृणीकारो वैराग्यस्यावधिर्मतः" इति । ईदृशे त्वद्भक्ते चातुर्थिकीभक्तिसंपन्ने । भवतिरोधिः जन्ममरणसंसारतिरोधानं नाश इति यावत् भवति मिथ्याभूताहंममादिलक्षणप्रपंचो नश्यतीत्यर्थः । एवं च परंपरया भक्त्यैव पदप्राप्तिः नान्यथा । यदुक्तं काठके– " नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन । यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम् ॥" इति । स्मृतावपि " पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया " इति । विज्ञानोत्तरभाविनी अहैतुकी प्रेमलक्षणा भक्तिश्चातुर्थिकीति " विमुच्य निर्ममः शांतो ब्रह्मभूयाय कल्पते " इत्यारभ्य " मद्भक्तिं लभते पराम् " इत्यन्तेषु ग्रंथेषु भाष्ये च स्पष्टमेवोक्तं भाष्यकृद्भिरिति ॥ ३ ॥

**तव सतां वसतां मनसाऽनसा प्रपदयोः पदयोरजसांजसा ।**
**सुसहितः स हितस्तव तावता यदवतारवता जनताविता ॥४॥**

भक्तिरपि सत्संगाद्भवतीति स्तुवन्नाह—भो नरसिंहसरस्वति अनसा वेगवत्तरशकटरूपेणापि मनसा तव प्रपदयोः—चरणयोः निवसतां-नितरां वासं कुर्वतां सताम्—साधूनाम् सद्गुरूणां पद्योः संबन्धिना रजसा सुसहितः—सुतरां युक्तः यः कोऽपीति अनेन तारतम्यं वर्जितं। स लब्धपदरजाः तावता तव हितः प्रियः भक्तिमानित्यर्थः। यदुक्तं भागवते "सत्संगलब्धया भक्त्या मयि मां य उपासिता। स वै मे दर्शितं सद्भि-रंजसा विंदते पदम्॥" अपि च " न तथा मे प्रियतम आत्मयोनिर्न शंकरः। न च संकर्षणो न श्रीर्नैवात्मा च यथा भवान्" इति। प्रिय-त्वमुपपादयति यत्—यस्मात्कारणात् अवताराः मत्स्याद्याः विद्यन्ते यस्य स अवतारवान् तेनावतारवता त्वया जनता—सज्जनता अविता—रक्षिता। एतेन सज्जनरक्षणार्थमेव भगवदवतार (इति) प्रयोजनं सूचितं। सत्पदरजोलाभेनैव भक्तिलाभद्वारा परंपरया मोक्षदर्शनात् स्वबुद्ध्यभ्यू-हेन कृतोऽपि ब्रह्मविचारो न फलतीति सूचितम्। " आचार्यवान् पुरु-षो वेद " " तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत् समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् " "यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ। तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः " इति। "नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्ता-न्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ" इत्यादिश्रुतिशतेभ्यः। " तद्विद्धि प्रणिपातेन " " गुरुं विना न श्रवणं भवेद्यस्यापि कस्यचित् " इति। " रहूगणैतत्तपसा न याति " इत्यादिपुराणस्मृतिभ्यश्च ॥४॥

" असंगो ह्ययं पुरुषः " "असंगो न हि सज्जत " इत्यादिश्रुतिभ्य आत्मनोऽसंगत्वमुक्तम्। तथापि निर्विकारैकसद्रूपात्मनः संबन्धित्वं बला-दागतम्। ते च संबन्धास्त्रिविधाः— १ समवायसंबन्धः २ संयोग-संबन्धः ३ अध्याससंबन्धः। अवयवावयविनोर्गुणगुणिनोः क्रियाक्रियाव-तोर्जातिव्यक्त्योर्विशेषनित्यद्रव्ययोश्च संबन्धः समवायः। आत्मनः शरी-रादेश्चावयवावयविष्वपरिगणनान्न समवायसंबन्धः। भिन्नद्रव्ययोः

परस्परमीलनं संयोगसंबन्धः भेरीदण्डादिसंयोगवत् सोऽप्यत्र न संभवति । आत्मनो द्रव्यत्वानंगीकारात् । कैश्चित् आकाशवद्द्रव्यमात्मा शब्दवत्तद्गुणश्चितिरित्युक्तम् । तदसत् । आत्मनो नित्यत्वाद्विभुत्वादविकारत्वाच्च । रज्जुसर्पयोः शुक्तिरजतयोः स्थाणुपुरुषयोराकाशवर्णयोरिवात्मनः शरीरादेश्चाध्याससंबन्धः । अध्यासो नाम यदन्यदन्यत्र भ्रमाद्विभाव्यतेऽसावध्यासः । अयमध्याससंबन्ध एकतराध्यासोऽन्योन्याध्यास इति चेत् । अहंकारस्यात्मनश्च मिलित्वैकप्रत्ययविषयत्वादन्योन्याध्याससंबन्ध एवात्मनः शरीरादेरिति । अयमध्यासः निष्कामतया स्ववर्णाश्रमविहितनित्यनैमित्तिककर्मानुष्ठानपूर्वकशमदमादिसाधनसंपन्नतया तत्त्वमस्यादिवाक्यविचारजन्यज्ञानेनैवापयातीति सिद्धान्तः । उक्तं चोत्तरमीमांसायाम्– "शमदमाद्युपेतः स्यात्तथापि तु तद्विधेस्तदंगतया तेषामवश्यानुष्ठेयत्वात्" इति "अग्निहोत्रादि तु तत्कार्यायैव तद्दर्शनात्" इति "मंत्रेषु कर्माणि कवयो यान्यपश्यंस्तानि त्रेतायां बहुधा संततानि तान्याचरथ नियतं सत्यकामा एष वः पंथाः सुकृतस्य लोके" मुं. १-२-१ "यस्याग्निहोत्रमदर्शमपौर्णमासमचातुर्मास्यमनाग्रयणमतिथिवर्जितं च अहुतमवैश्वदेवमविधिना हुतमासप्तमांस्तस्य लोकान् हिनस्ति" (मुं. १-२-३) इति । तथा चाभियुक्तोक्तिः– "अहं ब्रह्मेति वाक्यार्थबोधो यावद्दृढीभवेत् । शमादिसहितस्तावदभ्यसेच्छ्रवणादिकम्" ॥ तत्रतावच्छमादीन्युच्यंते । नित्यानित्यवस्तुविवेकः १ इहामुत्रार्थफलभोगविरागः २ शमादिषट्कम् ३ मुमुक्षुत्वं चेति । ब्रह्मैव सत्यं जगदसत्यमिति श्रुतिस्मृतिपुराणादिना स्वयमेव जायमानं ज्ञानं नित्यानित्यवस्तुविवेकः । इह स्रक्चंदनादिविषयभोगः, परत्र अप्सरःस्त्रीविषयभोगामृतपानगंधर्वगानश्रवणादिः उभयमप्यनित्यमिति श्ववान्ताशनमूत्रपुरीषादिवत्तत्र वैरस्यमिहामुत्रार्थफलभोगविरागः २ शमदमोपरतितितिक्षाश्रद्धासमाधानानि शमादिषट्कम् ३ । शमो नाम श्रवणादिव्यति-

रिक्तेभ्यो निवर्त्यात्मन्येव श्रवणादिविषये मनःस्थापनम् १ दमो नाम ज्ञानकर्मेन्द्रियनिग्रहः २ उपरतिर्नाम–प्रथमं निष्कामकर्मानुष्ठानं पश्चाद्व्यवहारलोपः पश्चाद्विधिवत्संन्यास इति ३ तितिक्षा नाम-प्रारब्धागतशीतोष्णदुःखसुखादिसहनम् ४ श्रद्धा नाम गुरुवेदान्तवाक्यविश्वासः ५ समाधानं नाम–श्रवणाद्यनुकूलविषये मनःसमाधिरिति ६ गृहे दह्यमाने तत्रस्थदह्यमानः पुरुषः कलत्रपुत्रादिकं परित्यज्य स्वतापोपशमनार्थमेव बहिर्गत्वा तापोपशमनं कर्तुमिच्छति एवं सांसारिकतापशमनार्थं त्यक्तसर्वैषणस्य तीव्रेच्छा मोक्षो मे भूयादित्येवंरूपा मुमुक्षा ४। लोके केषांचिन्नित्यानित्यवस्तुविवेके सत्यपि वैराग्यस्यादर्शनादिहामुत्रार्थफलभोगविरागेण भवितव्यम्। तदुभये सत्यपि केषांचिदृषीश्वराणां मोक्षप्रतिबन्धरूपकोपतापादिदर्शनाच्छमादिनापि भवितव्यम्। तत्त्रये सत्यपि केषांचित् भक्त्या ईश्वरोपासकानां ज्ञानाधिकारादर्शनान्मुमुक्षुत्वेनापि भवितव्यमित्युक्तम्। एवं साधनचतुष्टयसंपन्नस्य तत्त्वज्ञानेऽधिकारः। साधनचतुष्टयप्राप्तिस्तु निष्कामकर्मानुष्ठानद्वारा संप्राप्तसत्संगाद्भवतीति वदन् स्तौति–कृतफलमिति।

**कृतफलं तु विहाय विहायसा सममजं भजतामज तामसात्।**
**मिलति तारकमत्र कमत्रसत्पदरजो श्रमहारि महारि सत् ॥५॥**

कृतस्य कर्मणःफलं विहाय त्यक्त्वा नित्यं नैमित्तिकं च कर्म फलाभिसंधिं त्यक्त्वा शमादिसाधनपूर्वकं चित्तशुद्धिपर्यंतमनुष्ठेयम्। "ते ह स्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति" इति श्रुतेः 'नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति' इति स्मृतेश्च। ततः संन्यासः। उपात्तदुरितक्षयार्थमनुष्ठेयत्वस्मरणात् "वीरहा वा एष देवानां योऽग्निमुत्सादयते" इत्यादिश्रुतेः प्रत्यवायश्रवणाच्च नित्यं नैमित्तिकं च कर्मानुष्ठेयम्। तुशब्दोऽत्र काम्यनिषिद्धव्यावर्तकः। यदुक्तं मुंडके–

"प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म । एतच्छ्रेयो येऽभिनन्दन्ति मढा जरामृत्युं ते पुनरेवापियन्ति" (मुं. १-२-७) ऐतरेयब्राह्मणेऽपि "यथैव च्छिन्ना नौर्बंधनात्तीरं तीरमृच्छंती प्लवेत एवमेव ते सत्रिणस्तीरं तीरमृच्छंतः प्लवेरन्" इति । तस्मान्मुमुक्षुणे-श्वराराधनबुद्ध्या नित्यं नैमित्तिकं च कर्मानुष्ठेयम् । तेन बन्धाभावात् चित्त-शुद्धिसंभवाच्च सद्गतिः। "कुर्वन्नेवेह कर्माणि" "त्यक्त्वा कर्मफलासंगं' "नियतं कुरु कर्म त्वं" "तस्मादसक्तः सततम्" "कर्मणैव हि-संसिद्धिम्" "ब्रह्मण्याधाय कर्माणि" "स्वे स्वे कर्मण्यभिरतः" "कायेन मनसा बुद्ध्या" "यः शास्त्रविधिमुत्सृज्य" "तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते" "न बुद्धिभेदं जनयेत्" इत्यादिश्रुतिस्मृतिशतेभ्यः । भो अज नरसिंहसरस्वति निष्कामकर्मानुष्ठानपूर्वकं विहायसा समं व्यापकं "आकाशवत्सर्वगतश्च सूक्ष्म" इति श्रुतेः एतादृशं अजं निर्विकारं त्वां भजतां स्वधर्माचरणेन सेविनां जनानां तामसात् तमोरूपात् संसारात् तारकं साधनचतुष्टयप्राप्तिद्वारा हितकर्तृकं निरतिशयसुखरूपं अत्र-सतां-अविद्याकामकर्मभिः त्रसंति ते त्रसन्तः तथा न भवंति ते अत्रसंतः स्थितप्रज्ञा इति यावत् । यदुक्तं श्रीभगवता—"दुःखेष्वनु-द्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः" "यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभा-शुभं । नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता" इति । ईदृशानां स्थितप्रज्ञानां जीवन्मुक्तानां सतां पदरजो मिलति उपलभ्यते। तत्कथंभूतं भ्रमहारि—भ्रमो विवर्तभ्रमः तद्धरतीति तथा । विवर्तो नामोपादानविषम-सत्ताककार्यापत्तिः । पुनश्च महारि—महतां अविद्याकामकर्मादीनां अरिभूतं सत् प्रशस्तं च 'सत्ये साधौ विद्यमाने प्रशस्तेऽभ्यर्हिते च सत्' इत्यमरात् । एवं च निष्कामकर्मानुष्ठानेन सत्पदरजःप्राप्तिद्वारा साधनचतुष्टयलाभः पूर्वोक्तक्रमेण ततो मोक्षश्चेति ॥ ५ ॥

एवं च पंचमश्लोकेन निष्कामकर्मानुष्ठानद्वारा सत्पदरजोलाभः, चतुर्थ-तृतीयाभ्यां सत्संगतो भक्तिस्ततः कामनाशश्च, द्वितीयेन तटस्थलक्षणब्रह्म-प्राप्तिः, प्रथमेन पदशब्दवेद्यस्वरूपलक्षणप्राप्तिश्चोक्ता । अथ पुनर्द्वाभ्यां तटस्थस्वरूपलक्षणब्रह्म दर्शयन् स्तौति— तदजरेति ।

**तदजरामर कोशविलक्षणं सदज धीगुणवेत्तृ कलक्षणम् ।**
**भुवनहेत्वघहृत्त्रिपुराधिकं तव न जातु पदं कुपुराधिकम् ॥ ६ ॥**

अजाजरामरेति संबुद्ध्या निर्विकारत्वमुक्तं तत् तटस्थलक्षणं। कोशेभ्योऽन्नमयादिभ्यो विलक्षणं सत् एकरूपं, धियो गुणाः जाग्रत्स्वप्नसुषुप्त्याख्या गुणाः बुद्धेर्न चात्मन इति तद्वेत्तृ निर्विकारतया तत्साक्षिकं, यदुक्तमभियुक्तैः—"त्रिषु धामसु यद्भोग्यं भोक्ता भोगश्च यद्भवेत् । तेभ्यो विलक्षणः साक्षी चिन्मात्रोऽसौ सदाशिवः॥इति। अत्रान्वय्येवानुमानं न व्यतिरेकीति, योऽहं स्वप्नानद्राक्षं ततो न किंचिदवेदिषं स इदानीं जागर्मीति सर्वेषामनुभवात् । पुनश्च कं सुखं लक्षणं अस्य तत् कलक्षणं। भुवनानां सर्वलोकानां हेतुभूतं। अघं पापं हरतीति अघहारि, भजतां पापहारकं। पूर्यंते धातुभिरिति पुराणि देहाः त्रीणि च तानि पुराणि च तदतीतं तेभ्योऽप्यधिकं। ईदृशं तव पदं स्वरूपं। जातु कदाचिदपि, कुपुराधिकं—कुत्सितानि असज्जडदुःखस्वरूपाणि यानि पुराणि देहाः तेषु ये आधयः ज्वराः यदुक्तम् "व्याधयो धातुवैषम्ये स्थूलदेहे स्थिता ज्वराः। कामक्रोधादयः सूक्ष्मे द्वयोर्बीजं तु कारणम्" इति। ते आधयः संत्यस्येति कुपुराधिकं, तद्वदर्थेत्रकन्। ईदृशं न भवति शुद्धस्वरूपत्वात्। एवं तटस्थलक्षणब्रह्मस्वरूपमुक्तम्। अत्रैव गायत्र्यर्थो दर्श्यते—कोशविलक्षणं निरुपाधिकं तदिति तत्पदार्थः भुवनहेत्विति सर्गस्थितिप्रलयोपलक्षणं सर्वप्रपंचोत्पादकत्वलक्षणाशेषद्वैतभ्रमाधिष्ठानज्ञापकसवितृपदार्थः २ कं लक्षणमस्येति सूक्ष्मबुद्धिग्राह्यनिरतिशयात्मकसुखं वरेण्यपदार्थः ३ अघहृदित्यविद्याकाम-

कर्मादिदोषभर्जकत्यक्ताशेषानर्थात्मकभर्गेत्रः पदार्थः ४ त्रिपुराधिकमिति व्यापकोक्त्याऽखंडचिदेकरसात्मकदेवपदार्थः ५ कुपुराधिकं जातु नेति देहत्रयगतज्वरास्पृष्टत्वेन निर्गुणनिर्विकारचिंतनरूपध्यानपदार्थः ६ पदमिति यदर्थः ७ अकारो वासुदेवस्तस्माज्जाता अजा जीवा इत्य-स्मत्पदार्थः ८ अजानां धीगुणा इति धीपदार्थः ९ तद्वेत्तृ इति चोदन-क्रियार्थः १० एवं च सर्वसाक्षिकं सर्वद्वैतभ्रमाधिष्ठानं परमानंदरूपं निरस्तसमस्तानर्थं सर्वप्रकाशं सर्वप्रेरकं स्वप्रकाशचिद्रूपं ब्रह्म चिन्त्यमिति-समुच्चयार्थः । एवं च सति ब्रह्मणः स्वविवर्तजडप्रपंचस्य रज्जुसर्पन्याये-नाध्यारोपापवादाभ्यां समानाधिकरण(त्व)रूपमेकत्वमुक्तं भवतीति ॥ ६॥

**विविधभेदपरं सम दृश्यते त्रिविधवेदपरं कमदृश्य ते ।**
**यदमिदं सदु चिद्घनमुद्धियासदनिदं प्रजहात्यघनुद्धिया ॥ ७ ॥**

अथ स्वरूपलक्षणमुच्यते—विविधभेदेति । हे सम शत्रुमित्रोदासीन-भाववर्जित 'निर्दोषं हि समं ब्रह्म' इति स्मृतेः। अदृश्य—द्रष्टुं योग्यः दृश्यः न दृश्यः अदृश्यः तत्संबुद्धौ हे अदृश्य प्रमाणागोचर । नन्वात्मा प्रमाणागोचरश्चेत् "आत्मा वारे द्रष्टव्यः श्रोतव्यो मंतव्यो निदिध्या-सितव्य" इत्यादिश्रुतेः का गतिरिति चेत् । तत्र तावत्प्रमाणानि चत्वारि प्रत्यक्षानुमानोपमानशब्दानि। तत्रेंद्रियैर्जायमानं ज्ञानं प्रत्यक्षं प्रमाणं तच्चात्मनि न संभवति इन्द्रियागोचरत्वात् । "न तत्र चक्षुर्गच्छति न वाग्गच्छति नो मन" इत्यादिश्रुतेः । धूमादिलिंगेन जायमानमनुमानं प्रमाणम् । पर्वतो धूमवानित्यादिज्ञानेनाग्न्यादिज्ञानवत् । तदप्यत्र न संभवति आत्मनो निरंशत्वात् "आकाशवत्सर्वगतश्च सूक्ष्म" इति वचनात् । सादृश्येन जायमानमुपमानं प्रमाणम् । तदप्यत्र न संभवति आत्मनोऽद्वितीयत्वात् "एकमेवाद्वितीयं ब्रह्म" इति श्रुतेः । "यदेतदिति मन्यन्तेऽनिर्देश्यं परमं सुखम्" इति । "तत्त्वमसि"

इति "अयमात्मा ब्रह्म" इत्यादिश्रुतेः आत्मनि शाब्दं प्रमाणं। शाब्दं नामाप्तवाक्यम्। आप्तो नाम यथार्थवक्ता भ्रमप्रमादादिरहितः। ईदृश ईश्वर एव। यदुक्तं पातंजलशास्त्रे क्लेश-कर्म-विपाका-शयैरपरामृष्टः पुरुषविशेष ईश्वर इति। क्लेशाश्च अविद्याऽस्मितारागद्वेषाभिनिवेशाः पञ्च क्लेशाः। कर्माणि तु अनिष्टेष्टमिश्राणि वाङ्मनःकायजानि। सति मूले तद्विपाको जात्यायुर्भोगा इति विपाकाः तद्युक्ताशयैरन्तः-करणैरपरामृष्टः ईश्वर इत्यर्थात्सिद्धम्। तस्य वाक्यं निःश्वासभूतं वेदः। 'यस्य निःश्वसितं वेदा' इति। "अरेऽस्य महतो भूतस्य निःश्वसितमेतद्यत् ऋग्वेदो यजुर्वेदः सामवेदोऽथर्वांगिरस" इत्यादिश्रुतेः आत्मा शब्द-प्रमाणगोचर एव। कृतश्रवणस्य प्रथमं शब्दान्निर्विचिकित्सं परोक्षज्ञान-नमेवोत्पद्यते। शब्दस्य परोक्षज्ञानजननस्वाभाव्यात्। क्लृप्तसामर्थ्या-नतिलंघनात्। पश्चात्तु कृतमनननिदिध्यासनस्य सहकार्य (रि) विशेष-संपन्नतया तत एवापरोक्षं ज्ञानं जायते। यदुक्तं भारतीतीर्थैः-"परोक्षा चापरोक्षा च विद्या द्वेधा विचारजा। तत्रापरोक्षविद्यायां बोधः परि-समाप्यते।" अत एवोक्तम्—हे अदृश्य शाब्दातिरिक्तप्रमाणागोचर भो नरसिंहसरस्वति। विविधभेदपरं-विविधाः सजातीयविजातीय-स्वगताः ये भेदाः, तल्लक्षणं तु-"वृक्षस्य स्वगतो भेदः पत्रपुष्पफलादिभिः। वृक्षान्तरात्सजातियो विजातीयः शिलादितः" इति। तत्परं विविधभेद-शून्यं। त्रिविधाः क्रियोपास्तिज्ञानरूपा ये वेदाः तत्परं त्रिविधवेदप्राति-पाद्यमिति यावत्। सर्ववेदानां ब्रह्मण्येव तात्पर्यावधारणेन पर्यवसानात्। इदम्-स्वप्रकाशापरोक्षरूपम्। "इदमस्तु संनिकृष्टे तदिति परोक्षे विजानीयात्" इति वचनात्। "स्वप्रकाशापरोक्षत्वमयामित्युक्तितो मतम्" इति विद्यारण्यमुनिभिरुक्तत्वात्। ईदृश आत्मैव स एव ब्रह्मेत्युत्त-रेण संबध्यते। अत्रार्थे मांडूक्यप्रमितिः (तस्या ?) "अयमात्मा-ब्रह्म" इति। महावाक्यार्थबोधकोऽयं श्लोकः। कं निरतिशयानंदरूपम्।

सत् सत्यं कालत्रयाबाधम् । " सत्यत्वं बाधराहित्यं जगद्बाधैकसाक्षिणः इत्युक्तेः । चिद्घनं-चिदेकरसम् । एतेन " सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म " इति वाक्यार्थोऽपि दर्शितः ईदृशं ते तव पदं । अघनुत्-अघं नुदतीत्यघनुत् पापपुण्यात्मकबंधहर्त्री । यदुक्तं भगवता- " बुध्यायुक्तो यया पार्थ कर्मबंधं प्रहास्यसि " बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते " इति । मुमुक्षोः पापं ( इव ) पुण्यमपि मोक्षप्रतिबन्धकम् । " त्यज धर्ममधर्मं च " इत्युक्तेः । मोक्षप्रतिबंधरूपापायनुत् ईदृशी या असत् देहादिजडं अनिदं आत्मवै ( वि ) लक्षणं मिथ्यात्वेन प्रजहाति निराकरोति तया बुद्धया दृश्यते । यदुक्तं काठके- " एष सर्वेषु भूतेषु गूढोऽत्मा न प्रकाशते । दृश्यते त्वग्र्यया बुद्धया सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः " ॥ इति । अग्र्यया-शास्त्राचार्योपदेशसंस्कृतया । सूक्ष्मया-सात्त्विकयेति । तस्मिन् दृष्टे सर्वं दृष्टं भवति इत्यर्थात्सिद्धं । उक्तं बार्हदारण्ये-" आत्मा वारे द्रष्टव्य " इत्यत्र श्रवणमनननिदिध्यासनरूपं सोऽहंभावात्मकमुदरमंतरवर्जितं च अन्यथा भयदर्शनात् । " अस्मिन्नुदरमंतरं कुरुते अथ तस्य भयं भवति" "द्वितीयाद्वै भयं भवति" इत्यादिश्रुतेः । तद्दर्शनेन सर्वानर्थनिवृत्तिरपि मुंडके श्वेताश्वतरे चोक्ता- " भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः " " ज्ञात्वा देवं सर्वपाशापहानिः क्षीणैः क्लेशैर्जन्ममृत्युप्रहाणिः " इति ॥७॥

एवं सच्चिदानंदात्मनः सकाशाज्जातानां संसरतां जीवानां ब्रम्हरूपत्वात्पूर्वोक्तप्रकारेण तत्त्वज्ञानेन पदशब्दवेद्यब्रह्मप्राप्तिस्ततोऽनर्थनाशश्चेत्युक्तं भवति । " ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति " " ब्रह्मविद् ब्रह्मैव भवति " " तरति शोकं तरति पाप्मानं गुहाग्रंथिभ्यो विमुक्तोऽमृतो भवति " इत्यादिश्रुतिभ्यः । नन्वात्मनः सकाशाज्जगज्जातं तर्ह्यात्मा जगदारंभकस्त तद्‌वाकारपरिणामी वा । नाद्यः चिदेकरसस्यात्मनः बाह्यद्रव्ययोग-

संयोगिकुंभकर्तृकुलालादिवत् कर्तृत्वाद्यभावात् । "निष्कलं निष्क्रियं शांतं" "प्रपंचोपशमं शांतं शिवम्" इत्यादिश्रुतेः । नाप्यन्त्यः पक्षः निर्विकारैक्चिद्रूपत्वात् आत्मनः परिणामाभावात् । "आकाशवत्सर्वगतं च सूक्ष्मम्" इत्यादिश्रुतेः । तर्हि नित्याश्चतुर्विधपरमाणवो जगदारंभका इति चेत् ॥ सृष्टेः पूर्वं तेषामप्यभावात् । सर्वात्मना संयोगे तेषां प्राथिमानुपपत्तेश्च "आत्मा वा इदमेक एवाग्र आसीन्नान्यत्किंचन मिषत्'इति श्रुतेः । तर्हि प्रधानमेव जगत्कारणमिति चेत् । न । जडस्य तस्य कार्योत्पादने सामर्थ्याभावात् । तर्हि कथं जगज्जातमिति चेत् लोके रथादेरचेतनस्य स्वकार्योत्पादनसामर्थ्याभावाच्चेतनाधिष्ठितस्यैव तस्य कार्योत्पत्तिदर्शनात् यथा तथैवेक्षणवशात्परमात्मनो जडादपि प्रधानाद्विवर्तन्यायेन जलबुद्बुदवज्जगदुत्पत्तिः श्रूयते जगतश्चेतनाचेतनात्मकत्वात् । "मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरं । स मायी सृजति (अस्मान् मायी सृजते) इत्याहुः श्वेताश्वतरशाखिन इति । "तदैक्षत बहु स्यां प्रजायेय" इति "यतो वा इमानि भूतानि जायंते" "जन्माद्यस्य यतः" "मयाध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरं" इत्यादिश्रुतिसूत्रस्मृतिभ्यः । एवं विवर्तन्यायेनोत्पन्नस्य संसरतो जीवस्य मुक्त्यर्थमुपपादितस्तोत्रार्थतात्पर्यमवधार्यन्मुक्तपदप्राप्त्यर्थमभीष्टदेवतां प्रार्थयन् सफलं स्तोत्रमुपसंहरति–अजेति.

अजनमोहनमोह नमो ह नः प्रिय नियोजय तेन यतेन ते ।
य इह वेदनिवेदनि वेद वेत्त्यजपदं जपदंतपदं पदम् ॥ ८ ॥

भो अज स्वेच्छोपात्तविग्रह । जनान् मोहयतीति जनमोहनः स चासौ मोहश्च स न विद्यते यस्य स अजनमोहनमोहः तत्संबुद्धौ हे अजनमोहनमोह सर्वज्ञत्वात् "यः सर्वज्ञः सर्ववित् यस्यैष महिमा भुवि" "यः सर्वज्ञः सर्वविद्यस्य ज्ञानमयं तपः" "ज्ञोऽत एव" इति श्रुतिसूत्रेभ्यः । प्रिय हे सखिन् तथा च श्रुतिः "द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्व-

जाते। तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्त्यनश्नन्नन्योऽभिचाकशीति" इति। पुनश्च यतेन यतानां संयमितानां मनआदीनां इनः स्वामी "मनोमयः प्राणशरीरनेता" इत्यादिश्रुतेः ईदृश भो नरसिंहसरस्वति। ते—तव, तेन—पूर्वोक्तेन पदेन नोऽस्मान् नियोजय नितरां योजयेति विदेहकैवल्यमपि याचितम्। अज नस्तेन नियोजयेत्यत्रापि तत्त्वंपदार्थः न इति युष्मदर्थः अज तेनेति तत्पदार्थः नियोजयेत्यसिपदार्थः। एवमसंभावनादितिरस्कारेण षड्विधलिंगैस्तात्पर्यावधारणरूपश्रवणादिना तत्त्वंपदार्थशोधनपूर्वकविजातीयप्रत्ययनिराकरणेन सजातीयप्रत्ययप्रवाहीकरणरूपतत्त्वंपदलक्ष्यार्थावधारणेनाखंडैकरसं मां कुर्विति प्रार्थना। तत्रतावत् संशयभावना—असंभावना—विपरीतभावनेति प्रतिबंधत्रयम्। तथाहि ऋगादिशाखासूपदिश्यमानमुपनयनादिकर्मानेकत्वं यथा तथा ऋगादिशाखासूपदिश्यमानात्मतत्त्वमप्यनेकप्रकारं वेति वासना संशयभावना। सा सकलवेदान्ततात्पर्यावधारणरूपश्रवणेन नश्यति। सत्यत्वेन प्रतीयमानेषु जीवेश्वरजगत्सु परस्परं भिन्नेषु सत्सु सदैव भिन्नत्वं तेषामिति बुद्धिरसंभावना। सा स्वप्नदृष्टान्तादियुक्त्यात्मकमननेन नश्यति। श्रवणे मनने कृतेऽपि अनाद्यविद्यावासनया सर्वस्यापि जगतो यथापूर्वं सत्यत्वप्रतीतिर्विपरीतभावना। सापि ब्रह्मैकाकारप्रत्ययप्रवाहरूपनिदिध्यासनेन नश्यति। एवं प्रतिबन्धत्रये नष्टे षड्विधलिंगतात्पर्यावधारणरूपवाक्यार्थज्ञानेन मुक्तिः। तथाहि— "उपक्रमोपसंहाराबभ्यासोऽपूर्वता फलम्। अर्थवादोपपत्ती च लिंगं तात्पर्यनिर्णये" तत्र छांदोग्ये—"सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयं" इत्युपक्रम्य "ऐतदात्म्यमिदं सर्वं तत्सत्यं स आत्मा" इत्यखंडैकरस एवोपसंहृतः १ "तत्त्वमसि" इति नवकृत्वस्तथैव तस्याभ्यासः २ अखंडैकरसस्य प्रत्यक्षादिप्रमाणान्तराविषयत्वमपूर्वता ३ "तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्ये" इत्यखंडैकरसज्ञानस्य प्रारब्धभोगानंतर-

वेदेहकैवल्यरूपफलवचनम् "यथा सौम्येकेन मृत्पिंडेन सर्वं मृन्मयं विज्ञात ५ स्यात्" "वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम्" इत्यादिना दृष्टान्तकथनम् सृष्टि-स्थिति-प्रलय-प्रवेश-संयमन-पदार्थ-परिशोधनफलप्रतिपादकाः सप्तपदार्थाः। तत्र "तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूत" इत्याद्याः अर्थवादाः सृष्ट्यर्थप्रतिपादिकाः श्रुतयः आकाशादेर्ब्रह्मण एवोत्पत्तेस्तस्मिन्नेवावस्थानात् पुनस्तत्रैव लयाच्च मृदुत्पत्तिस्थितिलयात्मकस्य घटादेर्मृदभेदवत्कारणब्रह्ममात्रतामवगमयंत्यो महावाक्योक्तं ब्रह्माद्वितीयत्वं संभावयामासुः। "एतमेव सीमानं विदार्यैतया द्वारा प्रापद्यत" "तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्" इति "अनेन जीवेनात्मनानुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि" इत्याद्याः श्रुतयः ब्रह्मण एव जीवरूपेण पंचीकृतभूतोत्थस्थूलदेहसहितसूक्ष्मदेहे प्रवेशं ब्रुवंत्यो जीवब्रह्मणोरभेदं महावाक्यार्थं संभावयामासुः। प्रवेशस्त्वत्र घटाकाशादिवदवच्छेदपक्षेण जलचंद्रादिवत्प्रतिबिंबपक्षेण वा-ग्राह्यः। अन्यथा बहिःस्थित्वान्तर्गृहे प्रविष्टदेवदत्तादिवत्प्रतीत्या ब्रह्मणो विभुत्वाभावापत्तेः। श्रुतिश्च "अग्निर्यथैको भुवनं प्रविष्टो रूपं रूपं प्रतिरूपो बभूव। एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च" इति "इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते" इति। उत्तरमीमांसायां च "अतएव चोपमा सूर्यकादिवत्" इति। पंचीकरणं चेत्थम्—"पृथिव्यादीनि भूतानि प्रत्येकं विभजेद्द्विधा। एकैकं भागमादाय चतुर्धा विभजेत्पुनः॥ एकैकं भागं स्वान्यस्मिन्भूते संवेशयेत् क्रमात्। पंचीकरणमेतत्स्यादित्याहुस्तत्त्ववेदिनः॥" इति। ज्ञानकर्मेंद्रियैः प्राणपंचकैर्मनसा धिया। शरीरं सप्तदशभिः सूक्ष्मं तल्लिंगमुच्यते॥" इति स्थूलं सूक्ष्मं च शरीरं ज्ञातव्यम्। "यः पृथिव्यां तिष्ठन् पृथिव्या अन्तरो यं पृथिवी न वेद यस्य पृथिवी शरीरम्" इत्यादिसंयमनश्रुतिश्च अत्यंताभेदेन नियम्यनियामकभावानुपपत्तेस्तयोरभेदं संभावयति (?) "स वा-

एष पुरुषोऽन्नरसमयः " " यदग्ने रोहित ९ रूपम् " इत्याद्याः तत्त्वंपदार्थपरिशोधनरूपाः जीवेश्वरोभयगतविरुद्धधर्मनिरसनद्वारा तयोरैक्यमेव संभावयंति । " ब्रह्मविदाप्नोति परं " "सर्वान् कामानाप्त्वाऽमृतः समभवत् " इत्याद्याः श्रुतयोऽभेदज्ञानस्य निरतिशयफलप्रदर्शनेनाभेदस्य विवक्षितत्वं ज्ञापयन्ति । इदं पंचमम् । एवमुपक्रमादिभिः तात्पर्यावधारणरूपश्रवणादिना " तत्त्वमसि " इति वाक्यस्याखंडज्ञानं लक्षणावृत्त्या ज्ञाप्यते । तथाहि—पदयोः सामानाधिकरण्यसंबन्धः पदार्थयोर्विशेषणविशेष्यभावसंबन्धः, पदार्थाभ्यां सह प्रत्यगात्मनो लक्ष्यलक्षणभावसंबन्धः। सोऽयं देवदत्त इत्यत्र स इतिशब्दस्य अयमितिशब्दस्य चैकास्मिन् देवदत्तपिंडे सामानाधिकरण्यवत् तत्त्वंपदयोः सामानाधिकरण्यसंबन्धोऽस्ति। तत्कालतद्देशविशिष्टदेवदत्तवाचकतच्छब्दार्थस्य एतत्कालैतद्देशविशिष्टदेवदत्तवाचकैतच्छब्दार्थस्यान्योन्यभेदव्यावर्तकत्वेनान्योन्यं विशेषणविशेष्यभावसंबन्धो यथा तथा सर्वज्ञत्वपरोक्षत्वादिविशिष्टचैतन्यवाचकतत्पदार्थस्य किंचिज्ज्ञत्वापरोक्षत्वादिविशिष्टचैतन्यवाचकत्वंपदार्थस्य चान्योन्यभेदव्यावर्तकत्वेनान्योन्यं विशेषणविशेष्यभावसंबन्धोस्ति । एवं सोऽयंपदयोः पदार्थयोर्वाऽखंडार्थदेवदत्तपिंडमात्रग्रहणे विरुद्धांशं विहायाविरुद्धांशदेवदत्तमात्रलक्षकत्वेन लक्ष्यलक्षणभावसंबन्ध इव तत्त्वंपदयोः पदार्थयोर्वाऽखंडसच्चिदानन्दमात्रग्रहणे विरुद्धांशं विहायाविरुद्धांशभूतचैतन्यमात्रलक्षकत्वेन लक्ष्यलक्षणभावसंबंधोऽस्ति । शास्त्रवाक्यार्थग्रहणे राजा गच्छतीति मुख्या वृत्तिः नीलमुत्पलमिति गौणी वृत्तिः (?) सोऽयं देवदत्त इत्यादिवत् लक्षणावृत्तिरिति त्रिविधा वृत्तिः । प्रकृते लक्षणावृत्तेरेव ग्राह्यत्वमुक्तमभियुक्तैः—प्रत्यक्परोक्षतैकस्य सद्वितीयत्वपूर्णता । विरुध्यते यतस्तस्माल्लक्षणा संप्रवर्तते ।। मानान्तरविरोधे तु मुख्यार्थस्य परिग्रहे । मुख्यार्थेनाविनाभूतप्रतीतिर्लक्षणोच्यते ।। इति । लक्षणा तु त्रिधा-

जहल्लक्षणा गंगायां घोष इतिवत्, अजहल्लक्षणा काकेभ्यो दधि रक्ष्यतामितिवत् अनयोर्द्वयोः प्रकृतेऽग्राह्यत्वात् भागत्यागलक्षणैवात्र योज्या । उक्तं च भाष्यकृद्भिः– " तत्त्वमस्यादिवाक्येषु लक्षणा भागलक्षणा । सोऽयमित्यादिवाक्यस्थपदयोरिव नापरा " इति । अत्र माया मायाप्रतिबिंबः मायाधिष्ठानब्रह्म च त्रयमप्येकीभूय तत्पदवाच्यार्थः । ब्रह्ममात्रं तत्पदलक्ष्यार्थः । अविद्या अविद्याप्रतिबिंबः अविद्याधिष्ठानसाक्षिचैतन्यं त्रयमेकीभूय त्वंपदवाच्यार्थः । साक्षिकूटस्थब्रह्मचैतन्यमात्रं त्वंपदलक्ष्यार्थः । अनयोरविरुद्धलक्ष्यार्थयोरैक्यादैक्यमेव महावाक्येन लक्ष्यते माधुर्यद्रवत्वशैत्यगुणविशिष्टतडागजलघटजलाभेदवत् लोहितोष्णप्रकाशरूपदीपिकादीपवदखंडार्थो लक्ष्यः । एवं विरुद्धांशपरित्यागेनाविरुद्धांशवाक्यार्थग्रहणरूपश्रवणमनननिदिध्यासनसमाधिभिः तव पूर्वोक्तेन पदेन तदाख्येन त्वंपदाख्यं मां नियोजयेति प्रार्थना । नियोजनमपि त्वदधीनमिति भावः । " नायमात्मा प्रवचनेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन " इत्यादिश्रुतेः । अथ फलमाह यः कोऽपि साधनचतुष्टयसंपन्नो यतिः वेदनिवेदनं–उपनिषत्प्रतिपाद्यं तत्त्वं अस्यास्तीति वेदनिवेदनि स्तोत्रमिदं वेद निचाय्य जानाति स जपतां तत्त्वमस्यादिवाक्यार्थं जपतां अंते पदं स्थानं यस्य तत् जपदंतपदं शुद्धान्तःकरण एव तस्योपलभ्यमानत्वात् ईदृशं पदं पद्यते योगिभिर्गम्यते ज्ञायते इति पदं योगिनिवासभूतं ईदृशं अजपदं निर्विकारस्यात्मनः पदं वेत्ति जानाति इति स्वकृतस्तोत्रविवृतिः । प्रीयतामनेन सच्चिदानन्दरूपो दत्तात्रेयो गुरुः हरिः ॐ ॥ श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यश्रीमद्वासुदेवानन्दसरस्वतीयोगींद्रयतिराजविरचितं नरसिंहसरस्वतीस्तोत्रं स्वकृतटीकासहितं संपूर्णम् ।

---

# वेदनिवेदनिस्तोत्रभाषांतर ।

( भाषांतरकार—पं. विनायकशास्त्री टिल्लू, इंदूर )

॥ श्रीगुरुः शरणम् ॥

श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यवर्यश्रीमत्सद्गुरुवासुदेवानन्दसरस्वतीस्वामिविरचितं श्रीनृसिंहसरस्वती ( वेदनिवेदनि ) स्तोत्रम् ।

**विजय तेऽज यते जयते यतेरिह तमो हतमोहतमो नमः ।**
**हृदि कदाय पदाय सदा यदा तदुदयो न दयोनवियोनयः ॥१॥**

**अन्वयः**—हे विजय अज हतमोहतमः यते ! इह यतेः तमः जयते ते नमः । कदाय ते पदाय सदा नमः । यदा यतेः हृदि तदुदयः (तदा) दयोनवियोनयः न (भवन्ति) ॥ १ ॥

**अर्थः**—हे सर्वोत्कृष्टा जन्मादिविकारातीता आणि मोह व अज्ञान यांचा निरास करणाऱ्या यतिवर्या श्रीनृसिंहसरस्वतीगुरुवर्या ! या जगांत जितेन्द्रिय भक्तांच्या अज्ञानाला जिंकणाऱ्या तुम्हाला नमस्कार असो । सुखदायक अशा तुमच्या चरणांस सर्वदा नमस्कार असो । जेव्हां जितेन्द्रिय अशा भक्तांच्या हृदयांत त्यांचा प्रादुर्भाव होतो तेव्हां ईशकृपेला अपात्र असलेल्या नानायोनी प्राप्त होत नाहींत ॥

**सारांशः**—या श्लोकांत साधनचतुष्टयसम्पन्न श्रेष्ठ अधिकाऱ्याला ज्या भगवच्चरणांच्या कृपेनें ' अहं ब्रह्मास्मि ' असा अपरोक्ष साक्षात्कार होऊन अज्ञानादिदुःखनिवृत्तिपूर्वक निरतिशयसुखाची प्राप्ति होते व जन्ममरण परंपरेपासून सुटका होते त्यांना वन्दन करण्यांत आलें आहे ॥ १ ॥

॥ श्रीगणेशाय नमः ॥ ज्यांची लीला वर्णनातीत आहे असे श्रीसद्गुरुवासुदेवानन्दसरस्वती महाराज ! दत्तात्रेयावतार श्रीमत्सद्गुरु श्रीनरसिंहसरस्वतीस्वामिमहाराजांच्या या स्तुतीच्या रूपानें संसारी जीवांना परमपद-

प्राप्तीसाठीं तत्त्वोपदेश आरंभ करितांना नमनात्मक मंगलश्लोकाच्या द्वारें त्या परमपदाचा निर्देश करितात.

**टीकेचा अनुवादः**—विजय शब्द विशेषरूपानें सर्वातिशायी अशा परमात्म्याचा वाचक असल्यानें त्याचा प्रयोग मंगलासाठीं केला आहे. कारण देवता आणि मंगलद्रव्यवाचक किंवा मंगलार्थक शब्द लेखनांत आणि वृत्तांतील ज गणासारख्या अमंगल गणांत आले तरी निन्द्य नाहींत असें सांगितलें आहे.

'सत्याचाच जय होतो, असत्याचा केव्हांही होत नाहीं' या मुण्डक-श्रुतीवरून तसेंच 'सत्यं ज्ञानमनन्तं' या तैत्तिरीय श्रुतीवरून परब्रह्म हेंच वास्तविक परमार्थसत्यतत्त्व असल्यानें त्याचा येथील 'विजय' शब्दानें निर्देश केला आहे.

वरील 'सत्यं' इ. वाक्यांतील अनन्तादि शब्दावरून देश काल आणि वस्तु या तिन्ही परिच्छेदानें शून्य असें ब्रह्मतत्त्व वाणीला विषयच होऊं शकत नसल्यामुळें या स्तुतीच्या व्यर्थत्वाची शंका परिहार करण्यासाठीं या पद्यांत ब्रह्माला अज, यते इ. सम्बोधनान्त विशेषणें लावलीं आहेत. जन्म नसलेल्या हे अजा! येथें जन्म हें इतर विकारांचेंहि दिग्दर्शक असल्यानें जन्मादि सहा भावविकारांनीं वर्जित असा अर्थ जाणावा. आपल्या इच्छेनें संन्यासिरूप धारण करणाऱ्या यतीन्द्रा! या विशेषणानें आम्हां संसारी जीवांप्रमाणें कर्मपरतंत्र देह धारण केलेला नाहीं हें सूचित केलें आहे. भगवान् भाष्यकार म्हणतात:—'अखिल जगाचा स्वामी परमात्मा हा नित्य शुद्ध बुद्ध मुक्त अज आणि अविनाशी असूनही भक्तानुग्रहासाठीं आपल्या मायाशक्तीच्या योगानें देह धारण करणाऱ्याप्रमाणें दिसतो, अशा भक्तानुग्रहार्थ धारण केलेल्या सगुण स्वरू-पाच्या ठिकाणीं वाणीला प्रवेश मिळूं शकतो, भक्तांचें अज्ञान आणि मोह नाश करणाऱ्या! या विशेषणानें भक्तांचें अज्ञान नाहींसें करणें

हाच भगवदवतारांतील हेतु आहे हें सुचविलें जातें. एवंगुणविशिष्ट सद्गुरु महाराज! जितेन्द्रिय भक्तांच्या हृदयांतील अज्ञानान्धकार दूर करणाऱ्या! भगवत्कृपेनेंच अज्ञानपरिहार होतो हेंच यानें सुचविलें आहे.

विक्षेप आणि आवरणरूप अज्ञाननिरास होतां क्षणींच 'आनंद हेंच भगवत्स्वरूप आहे' या भागवतोक्तीप्रमाणें आपलें आनंदमय स्वरूप भक्ताधीन करणाऱ्या अशा तुमच्या चरणांना माझा नमस्कार असो! नमनानें सुचविलेला प्रव्हीभाव म्हणजे जीवाचें शिवाशीं असलेल्या ऐक्याचा साक्षात्कारच होय. कारण, 'सर्वे वेदा' या कठश्रुतीवरून आणि 'गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत्' या गीतोक्तीवरून 'पद' शब्दानें तें भगवत्स्वरूपच ज्ञेय आहे असें जाणावें. येथील 'तुमचें पद' हा षष्ठी-प्रयोगही 'राहूचें शिर' याप्रमाणें केवळ गौण जाणावा. असें असतांना सर्वच जीव मुक्त कां होत नाहींत यावर सांगतातः—ज्या वेळेस दैव-योगानें यतीच्या हृदयांत श्रीचरणाचा उदयरूप 'अहं ब्रह्मास्मि' असा अपरोक्षानुभव होतो त्यावेळेस 'भिद्यते हृदयग्रन्थिः' या श्रुतीप्रमाणें आणि 'तदधिगमे उत्तरपूर्वाधयोरश्लेषविनाशौ तद्व्यपदेशात्' या व्याससूत्रा-नुसारें ज्ञानप्राप्तीनंतर भावी जन्माचें कारण असलेल्या धर्मांचा अभाव झाल्यामुळें भगवत्कृपेनें रहित अशा नाना योनींतून भ्रमण करावें लागत नाहीं. अर्थात् भगवत्साक्षात्कार होईपर्यंत जीवाला नाना योनींतून भ्रमण करावेंच लागतें. कारण—'इह चेदवेदीत्' या काठकोपनिषद्वाक्यांत आणि 'तानहं द्विषतः क्रूरान्' या गीतावाक्यांत हेंच दर्शविलें आहे.

या स्तोत्रांत 'न भ भ र' या गणांनीं युक्त असें द्रुतविलंबित वृत्त आहे ॥ १ ॥

याप्रमाणें वरील श्लोकांतील पद शब्दानें 'जितेन्द्रिय साधकगण देह-त्रयातीत आणि ज्योतिर्मय अशा ब्रह्मस्वरूपाचा हृदयांत साक्षात्कार करून

घेतात ' या मुण्डकश्रुतीचें तात्पर्य वर्णन केलें. ' अन्तः शरीरे' इ. मुण्डकांतील वचन हाच अर्थ दाखवीत आहे.

आतां यतिहृदयांत भगवत्साक्षात्कार उदित होण्यासही तो वासनानिरासानेंच होतो असें या श्लोकांत सांगतातः—

**उदयतेऽनयतेर्न यतेर्यदा मनसि कामनिकामगतिस्तदा ।**
**पदुदयो हृदयौकसि ते सिते भवति योऽवति योगिवराऽवरान् ॥ २**

**अन्वयः**—हे योगिवर यदा अनयतेः यतेः मनसि कामनिकामगतिः न उदयते, तदा सिते ( तस्य ) हृदयौकसि ते पदुदयः भवति यः अवरान् अवति ॥

**अर्थः**—हे योगिराज! दृढ अभ्यासी यतीच्या हृदयांत वासनांचा स्वैर विलास होणार नाहीं तेव्हांच त्या शुद्ध हृदयमन्दिरांत तुमच्या चरणांचा उदय होतो, जो अज्ञानी भक्तांचेंही रक्षण करितो ॥

दीर्घ, निरन्तर आणि आदरयुक्त प्रयत्नानें सर्व वासना धुऊन शुद्ध झालेल्या अन्तःकरणांतच भगवत्साक्षात्काराची पात्रता येते ॥ २ ॥

**टीकार्थः**—योगी जनांत श्रेष्ठ असणाऱ्या देवा! येथें योगी या शब्दानें निर्गुणोपासक घेतलेले आहेत. अनयति म्हणजे जो अयति अर्थात् शिथिलाभ्यासी नसून दृढाभ्यासी आहे अशा यतीच्या शुद्ध अन्तःकरणांत, अहंकार आणि चैतन्यस्वरूप यांच्या अविवेकामुळें उत्पन्न होणाऱ्या वासनांचा स्वैर नाच होणें बंद होतें तेव्हांच तुझ्या भक्तांच्या सत्त्वमय अशा हृदयमंदिरांत तुझ्या चरणांची प्राप्ति होते. जरी साक्षात्कारापूर्वीही भगवत्स्वरूप सर्वत्र विद्यमान असतेंच, तरी गळ्यांतील गळसरीप्रमाणें त्याची प्राप्ति जाणावी. कारण जर चरणांचा उदय आणि अस्त होतो असें मानिलें तर त्यांनाही घटादिपटादीप्रमाणें अनित्यत्व येऊं लागेल.

' यदा सर्वे प्रमुच्यन्ते ' हें श्रुतिवाक्य येथें प्रमाण आहे. अर्थात् वास-

नांच्या अस्तित्वानें तदनुसारें अभीष्टलोकप्राप्ति होते आणि वासनांच्या अभावींच ब्रह्मप्राप्ति होते हें सिद्ध जाणावें.

वेदांतील मुण्डकोपनिषदांतील ' कामान्यः कामयते ' या वाक्यांत हेंच सांगितलें आहे.

भगवच्चरणोदयाचें वर्णन करितात–तो, मध्यमाधिकारी भक्तांचें अविद्यादिकांपासून रक्षण करितो. ' तेषामेवानुकम्पार्थं ' या गीतावचनांत हेंच दर्शविलें आहे. ॥ २ ॥

वासनांवर जय मिळविण्यासाठीं देवा तुमच्या भक्तीचीच आवश्यकता आहे असें सांगतात.—

**भवति भावभवोऽवभवो यदा भवति कामनिकामहतिस्तदा ।**
**भवति मानवमानवदुत्तमे भवतिरोधिरतो विरतोत्तमे ॥ ३ ॥**

**अन्वयः**—यदा भवति अवभवः भावभवः भवति तदा कामनिकामहतिः भवति। अतः ( ऊर्ध्वं ) विरत्तोत्तमे मानवमानवदुत्तमे भवतिरोधिः भवति॥

**अर्थः**—जेव्हां भवपीडेला तुच्छ समजणाऱ्या तुमच्या भक्तीचा उदय होतो तेव्हांच वासनांचा समूळ नाश होत असतो । आणि मानवांमध्यें मान्यतम अशा उत्तमोत्तम सौख्याविषयींही विरक्त असलेल्या त्या थोर पुरुषाचा संसारही लय पावतो ॥

**सारांशः**—भगवद्भक्तीच्या योगानेंच वासनाक्षय होतो आणि वैराग्य होऊन कृतकृत्यता प्राप्त होते ॥ ३ ॥

**टीकार्थः**—श्रीगुरुमहाराज ! ज्या वेळेस, ज्याच्या योगें जन्ममरणपरंपरारूप संसारच नाश पावतो, अशा तुमच्याविषयीं अष्ट सात्विकभावलक्षण दृढ भक्तीचा उदय होतो. त्या वेळेस मानवांत श्रेष्ठ अशा ब्राह्मणांतही गरुड पुराणांतील [मनु.]. भूतानां प्राणिनः श्रेष्ठा...कर्तृषु ब्रह्मवादिनः' या वाक्यांप्रमाणें सर्वश्रेष्ठ असलेल्या ब्रह्मनिष्ठ भगवद्भक्त महापुरुषाच्या अन्तः-

करणांतील वासनांचा आत्यंतिक विनाश होतो. याप्रमाणें वासनानाश होऊन ब्रह्मलोकांत उत्तम सुखांविषयींही विरक्त असलेल्या आपल्या भक्ताच्या अन्तःकरणांत शुद्ध ज्ञानोत्तर चतुर्थ भक्तीचा उदय होतो आणि त्यानंतरच जन्ममरणरूप संसार निवृत्त होतो. अर्थात् मिथ्या अशा अहं-ममताभिमानापासून प्रादुर्भूत होणाऱ्यास संसारच उरत नाहीं. याप्रमाणें परंपरेनें आपल्या भक्तीनेंच परमपदप्राप्ति होते. हेंच 'नायमात्मा' या कठोपनिषदांतील वचनांत सांगितलें आहे. 'पुरुषः स परः पार्थ' या गीतावचनांतही हेंच वर्णिलें आहे. अर्थात् ज्ञानोत्तर होणारी हेतुरहित निस्सीम प्रेमस्वरूप भक्तीच येथें चातुर्थिकी भक्ति जाणावी असें 'विमुच्य निर्ममः शान्तो' इथपासून 'मद्भक्तिं लभते पराम्' इथपर्यंत गीतेच्या भाष्यांत भाष्यकारांनीं स्पष्ट दाखविलें आहे. ॥ ३ ॥

अशा शुद्ध भक्तीचा उदय होण्यासाठीं सत्संगाची आवश्यकता आहे हें पुढील पद्यांत सांगतातः—

**तव सतां वसतां मनसाऽनसा प्रपद्योः पदयोरजसांजसा ।**
**सुसहितः स हितस्तव तावता यदवतारवता जनताविता ॥४॥**

**अन्वयः**—अनसा मनसा तव प्रपदयोः वसतां सतां पदयोः रजसा सुसहितः अञ्जसा स तव हितः । यद् अवतारवता (भवता) जनता अविता (अस्ति) ॥

**अर्थः**—रथाप्रमाणें वेगशाली अशा मनानें तुझ्या चरणीं लीन असणाऱ्या संतांच्या पादरजाचा आश्रय करणारा तो भक्त शीघ्रच तुम्हाला प्रिय होतो; कारण, अनेक अवतार घेऊन तुम्हीं भक्तजनांचें रक्षण केलें आहे ॥

**सारांशः**—भगवद्भक्त अशा सन्तांच्या कृपेनेंच भगवद्भक्तीचा लाभ होऊन भगवत्प्रीति सम्पादन करितां येते ॥ ४ ॥

**टीकार्थः**—श्रीसद्गुरुमहाराज ! वेगशाली शकटाप्रमाणें चंचल अशा मनानेंही तुमच्या चरणाग्राच्या ठिकाणीं निरंतर वास करणाऱ्या संतांच्या चरणरजानें युक्त असलेला कुणीही भाग्यशाली मानव तुम्हाला अत्यंत प्रिय असतो. असें भागवतांतील 'सत्संगलब्धया भक्त्या' या आणि 'न तथा मे प्रियतम' या श्लोकांत सांगितलें आहे. या भगवत्प्रिय-त्वाची उपपत्ती दर्शवितात–'ज्या कारणास्तव मत्स्यादि अवतार धारण करून आपण सज्जनांचें रक्षण केलें आहे'—अर्थात् सज्जनांचें रक्षण हें भगवदवताराचें प्रयोजन सुचविलें आहे. सत्पुरुषांच्या चरणरजोलाभा-नेंच भक्तीचा लाभ होतो व परंपरेनें मुक्ति प्राप्त होते. त्यावरून केवळ आपल्या बुद्धीच्या जोरावर केलेला ब्रह्मविचार फळत नाहीं हें दर्शविलें आहे.

'आचार्यवान्' 'तद्विज्ञानार्थं' 'यस्य देवे' 'नैषा मतिः' या शेंकडो श्रुतिवचनांवरून हें सिद्ध आहे. 'तद्विद्धि प्रणिपातेन' गुरुं विना न श्रवणं' 'रहूगणैतत्तपसा' इत्यादि स्मृतिपुराणवचनांवरूनही हेंच सिद्ध होतें ॥ ४ ॥

'असंगो ह्ययं पुरुषः' इत्यादि वचनांनीं विकारातीत अद्वितीय आणि सद्रूप आत्म्याचें असंगत्व सांगितलेलें असलें तरी पुढीलप्रमाणें त्यालाही सम्बन्धित्व येतें. कारण समवाय, संयोग आणि तिसरा अध्यासमूलक असे तीन प्रकारचे संबंध असतात. त्यांपैकीं अवयव आणि अवयवी, गुणगुणी, क्रियाक्रियावान्, जातिव्यक्ति आणि नित्यद्रव्यविशेष यांचा संबंध समवाय असतो. अर्थात् आत्म्याचा शरीरादिकाशीं अवयवावयवि-भावादिमूलक समवाय संबंध होऊं शकत नाहीं. परस्परांहून भिन्न अस-लेल्या दोन द्रव्यांचा परस्परांशीं संयोग-संबंध होतो. जसें नगारा आणि दण्डाचा संयोग. पण सिद्धांतांत आत्म्याचें द्रव्यत्व मानिलें नसल्यामुळें

त्याच्या ठिकाणीं संयोगसंबंधही संभवत नाहीं. जरी कांहीं नैयायिक आदींनीं ' आत्मा हा आकाशाप्रमाणें रूपरहित द्रव्य असून त्यावरील शब्दाप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणीं चैतन्य हा गुण ' असें मानिलें असलें तरी तें योग्य नाहीं. कारण आत्मा हा नित्य, विभु आणि विकारातीत आहे. ( आकाश हें सुद्धां सिद्धान्तिमतांत अनित्य आहे, ) आतां रज्जु-सर्प, शुक्तिरजत, स्थाणुपुरुष अथवा आकाश आणि नीलवर्ण यांचा जसा काल्पनिक संबंध असतो तसा आत्म्याचा आणि देहेन्द्रियांचा अध्यास-मूलक संबंध मात्र संभवतो. अध्यास म्हणजे ' एका वस्तूचा अन्य वस्तू-वर भ्रमानें होणारा आभास.'

जड अहंकार आणि चेतन आत्मा यांना संमिलित अशा एका 'मी' इत्याकारक प्रत्ययांत विषयत्व दिसतें, त्या अर्थी आत्मा आणि देहेन्द्रिया-दिकांचा अन्योन्याध्यासमूलक सम्बन्ध होय. आणि या अध्यासाचा निरास वर्णाश्रमविहित नित्यनैमित्तिककर्मांच्या निष्काम अनुष्ठानानें चित्तशुद्धिपूर्वक साधनचतुष्टय प्राप्त होऊन महावाक्यांच्या विचारापासून झालेल्या तत्त्वज्ञानानेंच होतो असा सिद्धान्त आहे. ' शमाद्युपेतः स्यात् ' आणि ' अग्निहोत्रादि ' या सूत्रांत हाच सिद्धान्त स्पष्ट केला आहे.

' मंत्रेषु कर्माणि ' आणि ' यस्याग्निहोत्रं ' या मुंडकश्रुतींवरूनही निष्काम कर्माची चित्तशुद्धीसाठीं आवश्यकता स्पष्ट दिसून येते. अभि-युक्त आचार्यांनींही " जोंपर्यंत ' अहं ब्रह्म ' हें वाक्यार्थज्ञान दृढ होत नाहीं तोंपर्यंत साधनचतुष्टयसंपन्न होऊन साधकानें श्रवणादिकांचा अभ्यास केला पाहिजे " असें म्हटलें आहे.

आतां साधनचतुष्टयाचें निरूपण करूं:- नित्य आणि अनित्य वस्तूंचा विवेक, ऐहिक आणि पारलौकिक फलभोगाविषयीं वैराग्य, शमादि सहा साधनें आणि मोक्षाची तीव्र तळमळ हीं तीं चार साधनें

होत. अर्थात् – श्रुतिस्मृतिपुराणादिकांवरून ब्रह्म हेंच खरें असून जगत् असत्य आहे असें निरपेक्ष ज्ञान म्हणजे नित्यानित्यवस्तुविवेक. इहलोकांतील स्रक्चंदनादिविषयभोग आणि स्वर्गीतील अप्सरांसह दिव्यसुखांचा उपभोग या दोहोंविषयीं अत्यन्त घृणा म्हणजेच इहामुत्रार्थफलभोगविराग होय. शम दम तितिक्षा श्रद्धा आणि समाधान ही शमादि षट्क सम्पत्ति होय. शम म्हणजे श्रवणादिकाव्यतिरिक्त क्रियापासून मनाला निवृत्त करून आत्मविषयक श्रवणादिकांमध्येंच लावणें. ज्ञानेन्द्रियें आणि कर्मेन्द्रियें यांचा निग्रह म्हणजे दम. प्रथम निष्कामकर्माचरण करून सान्या व्यवहाराचा लोप झाल्यावर विधिपूर्वक संन्यास करणें म्हणजेच उपरति.

प्रारब्धानें प्राप्त होणान्या सुखदुःखांचे आघात सहन करणें हीच तितिक्षा. आचार्य आणि वेदान्तवाक्याच्या ठिकाणीं विश्वास म्हणजे श्रद्धा. श्रवणादि अनुकूल विषयांच्या ठिकाणीं चित्ताची एकाग्रता म्हणजेच समाधान.

घराला आग लागून स्वतःवर जळण्याची पाळी आली असतां स्त्रीपुत्रादिकांचा विचारही मनांत न आणतां ज्याप्रमाणें तेथून निसटण्याच्या विषयांत तळमळ लागते तशी संसारिक ताप मिटविण्याकरितां सर्व एषणांचा त्याग करणाराला जी मोक्षाविषयीं तीव्र इच्छा तीच मुमुक्षा होय.

जगांत असें दिसतें कीं, विवेक असून सुद्धां वैराग्य पूर्ण झालें नसतें. कुठें कुठेंतर हीं दोन्हीं असूनही मोक्षाच्या आड येणान्या क्रोधादिकांचें वास्तव्य असतें, यासाठीं शमादि हे आवश्यक आहेत. कुठेंकुठें तर ही तिन्ही साधनें असूनसुद्धां भेदभावनेनें उपासना करणारांना ज्ञानाधिकार दिसत नाहीं त्याअर्थी मुमुक्षेचीही अत्यन्त आवश्यकता आहे. याप्रमाणें साधनचतुष्टयानें संपन्न असलेल्या जीवालाच तत्त्वज्ञानांत अधिकार प्राप्त होतो.

चार प्रकार सांगितले आहेत, त्यांपैकीं ही स्त्री मृतवन्ध्या होती. या वन्ध्य स्त्रियेनें कृष्णेमध्यें स्नान केल्यामुळें पापनिवृत्ति होऊन दीर्घायु अशा सुपु त्राची प्राप्ति झाली. याचा पूर्व इतिहास असा आहे कीं, श्रीक्षेत्र नरसोबा वाडीस येतानां वाटेमध्यें लागणारें 'शिरोळ, नांवाचें गांव आहे. त्य ठिकाणीं राहत असलेल्या विद्वान् अशा गंगाधर नांवाच्या ब्राह्मणाची ह स्त्री होती. या स्त्रियेस पांच पुत्र होऊन मृत झाले, त्यामुळें पुत्रशोका दुःखित होऊन कर्मविपाकज्ञ अशा ब्राह्मणास पुत्रशोकद असें पूर्वक समजण्याकरितां प्रश्न केला असतां त्या ब्राह्मणानें प्रथम पुत्रशोक उत्प होण्याचीं कारणें सांगितलीं.

गर्भपातं प्रकुरुते तामसो यो नराधमः ॥
जन्मांतरे तु तद्दोषान्मृतपुत्रो भवेन्नरः ॥
अश्वहंता च गोहन्ता वन्ध्यात्वं प्रतिपद्यते ॥
परद्रव्याऽपहर्ताऽपि मृतपुत्रो भवेन्नरः ॥

अशीं पुत्रशोकाचीं कारणें सांगून तूं पूर्व जन्मामध्यें कोणी एक शौनकगोत्रीय ब्राह्मणाच्या शतद्रव्याचा ( शंभर रुपयांचा ) अपहार केला त्यामुळें द्रव्यलोभानें त्या ब्राह्मणानें आत्महत्या केली. आत्महत्या हा महा दोष असल्यामुळें त्या योगानें तो पिशाचयोनीस जाऊन गर्भपात क लागला आहे.

लोहाश्मदारुचूर्णानि प्रयत्नाज्जरयेत्पुमान् ॥
ब्रह्मस्वं त्रिषु लोकेषु कः कथं जरयिष्यति ॥

लोखंड, दगड, लाकूड यांचीं चूर्णे प्रयत्नानें एखादा मनुष्य जिरवूं शके ( परंतु ) ब्रह्मस्व हें त्रैलोक्यामध्यें कोणता मनुष्य कोणत्या रीतीनें जिर शकेल ? (ब्रह्मस्व जिरविण्यास कोणीही समर्थ नाहीं. याविषयीं श्रीमद्भाग वतामध्यें भगवंतांनीं पुत्रांना उत्कृष्ट असा उपदेश केला आहे. 'प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः' प्रारब्ध कर्मांचा भोगानेंच क्षय हो याकरितां तुला हें भोगलें पाहिजे. असें ऐकून दुःखित झालेल्या त्य स्त्रियेनें पापांतून मुक्त होण्याकरितां ब्राह्मणाची प्रार्थना केली असतां त्यांनीं सांगितलें कीं—

और्ध्वदेहिकं कर्म प्रायश्चित्तपुरःसरं ।
कारयित्वांग भर्त्रा त्वं मासमात्रं व्रतं चर ॥

कृष्णापंचनदीयोगे स्नात्वा श्रीगुरुपादुकां ।
उदुंबरं चाष्टतीर्थस्नानपूर्वं समर्चय ॥

ब्राह्मणान्भोजयित्वाऽथ शतद्रव्यं द्विजातये ।
देहि शौनकगोत्राय शुद्धिस्तेनैव ते सति ॥

हा ब्रह्महत्येचा दोष तुला लागलेला आहे, याकरितां प्रायश्चित्त ( नारायणबलि ) पूर्वक त्याचें और्ध्वदेहिक कर्म आपल्या पतीकडून करवून मासपर्यंत तूं उपवास कर, कृष्णा-पंचनदीसंगमामध्यें यथाविधि स्नान करून पुनः अष्टतीर्थामध्यें स्नानपूर्वक गुरुपादुका व औदुंबरावर अभिषेक करून पूजन कर. असें एक महिना करून ब्राह्मणभोजन घालून नंतर शौनकगोत्रीय ब्राह्मणास शतद्रव्य ( शंभर रुपये) दे, (म्हणजे प्रेतास गति मिळून) त्यानेंच तुझी शुद्धि होईल. हें ऐकून आपल्याजवळ शतद्रव्य नसल्यामुळें उपवासपूर्वक कृष्णा-पंचगंगासंगम व अष्टतीर्थांचें स्नान करून गुरुपादुका व औदुंबरावर अभिषेक करून पूजनरूप मासव्रत करितें. तो हरीच माझें रक्षण करील, असा निश्चय करून उपवासादि व्रताचरण केलें असतां संगमादि स्नानानें व गुरुकृपेनें पापापासून मुक्त होऊन दीर्घायु अशा सुपुत्राची प्राप्ती झाली. हा इतिहास यापुढेंही बराच मोठा आहे. परंतु यांतील सारांश इतकाच घ्यावयाचा आहे कीं, कृष्णा-पंचगंगासंगमाच्या व अष्टतीर्थांच्या स्नानानें तिचा मृतवंध्यात्वदोष निवृत्त होऊन दीर्घायु अशा सुपुत्राची प्राप्ती झाली. याविषयीं श्रीगुरुचरित्रावरून अशी शंका उत्पन्न होणेचा संभव आहे कीं—हा इतिहास औदुंबराचें व श्रीसद्‌गुरु भगवान् दत्तात्रेयाचें माहात्म्य वर्णन करणारा आहे कीं कृष्णास्नानाचें माहात्म्य वर्णन करणारा आहे ? परंतु सूक्ष्म दृष्टीनें विचार केला असतां या इतिहासावरूनच या शंकेचें समाधान होणारें आहे. कारण पूर्व जन्मांतल्या दोषांमुळें या जन्मामध्यें प्रेतपीडेच्या निमित्तानें उत्पन्न झालेलें जें वंध्यात्व तें दूर होऊन सुपुत्रावाप्ति होण्याकरितां आरंभीं तिला कृष्णापंचगंगा-

संगमाचें व अष्टतीर्थांचें स्नानच सांगितलें आहे. उदाहरणार्थ, ज्याप्रमाणें घनप्रहारानें लोखंड वांकविलें जातें परंतु तें वांकण्यास प्रथम अग्नीनें तापवावें लागतें, त्यावांचून केवळ घनानें पाहिजे तसें वांकविलें जात नाहीं. म्हणजे लोखंड वांकण्यास जसें अग्नि हेंच प्रथम कारण आहे, त्याचप्रमाणें दोषनिवृत्ति होऊन सुपुत्रावाप्ति होण्यास कृष्णास्नान हेंच प्रथम कारण आहे. कृष्णा ही कोणत्या पापापासून मुक्त करण्यास समर्थ नाहीं?

सर्वस्य पापजातस्य नरश्चेदिच्छते हृतिं ।
निष्कृतिर्न त्वशक्या सा कृष्णवेण्यां च विद्यते ॥ ( कृ. मा. )

जितकीं म्हणून पापें आहेत त्या सर्व पापांचा नाश व्हावा अशी मनुष्य इच्छा करील तर त्यांची निष्कृति करणें कृष्णवेणीचे ठिकाणीं अशक्य नाहीं असें यास प्रमाण आहे. यावरून सर्व दोषांपासून मुक्त करून सुपुत्रावाप्ति करून देण्यास कृष्णा ही समर्थ असल्यामुळेंच 'सुतं लेभे वंध्या असें मूळ श्लोकामध्यें कृष्णेचें वर्णन केलें आहे.

---

# श्रीकृष्णालहरीभाषांतरप्रारंभः

( लेखकः—पं. बापूशास्त्री कोडणीकर, नरसोबावाडी )

श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णावेणीभ्यां नमः । श्रीमद्दत्तात्रेयो विजयते ।

श्रीकृष्णामजरूपां स्तौति श्रीवासुदेवयतिसम्राट् ।
मन्ये तत्परिवृत्तिं ह्युद्वाहुर्वामनः फलाकांक्षी ॥ १ ॥

तथापि तेषाञ्चरणारविन्दे ।
निधाय सम्यक् हृदयारविन्दे ॥
कुर्वे यथाबुद्धि तदीक्षणेन ।
भाषान्तरं दत्तदयाक्षणेन ॥ २ ॥

बालस्य मुग्धं वचनं निशम्य ।
मातुर्यथा प्रोल्लसतीव चेतः ॥
तथा समीक्ष्यैव सदन्तराणि ।
भवन्तु याचे महदन्तराणि ॥ ३ ॥

अतिशय दुःख देणारें आत्मस्वरूपाचें अज्ञान व त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या ज्या अनेक वासना त्यांनीं प्रेरित होऊन जीव अनेक कर्मे करतो व त्यायोगें जीवाला नाना प्रकारचीं बंधनें प्राप्त होतात. त्या बंधनांपासून मुक्त होण्याकरतां आत्मज्ञानाचीच आवश्यकता आहे. त्याशिवाय केव्हांही नाश न पावणारें, कोणतीही उपाधि नसणारें, जगांत ज्यापेक्षां श्रेष्ठ सुखच नाहीं असें निरतिशय सौख्य मिळणें अत्यंत अशक्य आहे. पण तें आत्मज्ञान प्राप्त होण्यास पातकांचा प्रतिबंध असतो म्हणून त्या पापनाशास्तव सर्वपापपरिहार करण्यास समर्थ अशा श्रीकृष्णेचें स्तवन करण्यास आरंभ करतात.

पण वेदामध्यें प्रसिद्ध अशा पुष्कळ गंगादि नद्या पापनाश करण्यास समर्थ आहेत असें वर्णन केलें आहे. मग त्यांचें स्तवन न करतां श्री-

कृष्णेचीच स्तुति कां करतां ? असें कोणी म्हणेल तर गंगादि नद्या श्री-विष्णूच्या अवयवांपासून झाल्या आहेत, आणि कृष्णा ही प्रत्यक्ष विष्णु-स्वरूपिणी आहे. म्हणून कृष्णाच स्तवन करण्यास योग्य होय.

ब्राह्मणांनीं उपनिषद्विचारानें यज्ञ करून, नानाविध दानें देऊन किंवा तपश्चर्या उपोषणादि उपायांनीं आत्मस्वरूपाची प्राप्ति करून घ्यावी असें वेदांत सांगितलें आहे. अशी नदीस्तवन व तीर्थाटनादि साधनें त्यांना सांगितलीं नाहींत. म्हणून श्रीकृष्णास्तवन व्यर्थ आहे, असें कोणी म्हणेल तर नदी-स्तवन आणि तीर्थयात्रादि करणें हासुद्धां भौमयज्ञच आहे असें स्मृत्यादि ग्रंथांत असलेनें श्रीकृष्णेची स्तुतिरूप सेवा करणें हेंच योग्य होय.

तत्रायं मङ्गलार्थं प्रथमश्लोकः—

अर्थः——श्रीकृष्णालहरीच्या आरंभीं मंगलाकरतां लिहिलेला हा पहिला श्लोक ध्यानमंगल श्रीकृष्णास्वरूपवर्णनाचा आहे.

( १ )

अन्वयः—चतुर्बाहुः श्रीमत्सजलजलदश्यामलतनुः प्रकाशद्वक्त्रेन्दुः सदु-डुगणमुक्तावलिः तडिद्वासा भास्वत्सुतिलकलसन्मौलिः अपि अघहृत् स्वहित-कृत् क्षमाध्रस्य ( सह्याचलस्य ) सूनुः ( श्रीकृष्णा ) जयति ॥ १ ॥

अर्थः— जिला चार बाहु—हात असून, जिची मूर्ति—देहलता जलपूर्ण मेघाप्रमाणें सुंदर नीलवर्णविशिष्ट आहे, जिचें मुखकमल पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें प्रसन्न व तेजोमय आहे, आणि चमकणाऱ्या तारागणांसारखा सुरेख मौक्तिकाचा हार जिच्या कंठांत शोभतो आहे, विजेप्रमाणें तेजोमय रेशमी पिवळें—पीतवस्त्र जिनें परिधान केलें आहे, व जिच्या भालदेशीं तेजस्वी केशरमिश्रित कस्तुरीतिलक शोभून दिसतो, अशी आपल्या भक्तांच्या कामादि शत्रूंचा नाश करून त्यांचें सर्व पाप हरण करणारी सह्य-पर्वताची कन्या श्रीकृष्णावेणी सर्वोत्कर्षांनीं शोभते आहे.

दत्तात्रेयपक्षे— ज्यांना चार बाहू आहेत, आणि सजल मेघाप्रमाणें ज्यांचा श्यामवर्ण आहे, प्रकाशित चंद्राप्रमाणें ज्यांचें मुखकमल आहे, व नक्षत्रासारखा तेजस्वी मोत्यांचा हार ज्यांनीं कंठांत घातला आहे, विजेप्रमाणें

अत्यंत चमकणारें वस्त्र ज्यांनीं धारण केलें आहे, व केशरीतिलक ज्यांना शोभत आहे, असे क्षमाशील अत्रिऋषीचे पुत्र दत्तात्रेय स्वभक्तांच्या कामादि शत्रूंचा नाश करून त्यांची इच्छा पूर्ण करण्याविषयीं उत्कर्ष पावत आहेत.

विष्णुपक्षे अर्थः—ज्याला चार हात आहेत व ते शंख, चक्र, गदादि आयुधांनीं शोभतात, जलपूर्ण-उदकानें भरलेल्या मेघाप्रमाणें ज्याची काया श्यामवर्ण आहे, ज्याचें वदन चंद्राप्रमाणें तेजस्वी व प्रसन्न आहे, नक्षत्राप्रमाणें प्रकाशमय हार ज्याच्या कंठांत शोभत आहे, विजेसारखा पीतांबर ज्यानें परिधान केला आहे, आणि सूर्याप्रमाणें कस्तुरी टिळा ज्याच्या भालप्रदेशीं आहे, असा भक्तांच्या पातकांचा नाश करून कल्याण करणारा व दुष्ट दैत्यांचा संहार करणारा इन्द्राचा मित्र उपेन्द्र जो विष्णु तो सर्व प्रकारें उत्कर्ष पावत आहे.

आकाशपक्षे अर्थः—वर्तुळ आकाशाचे चार भाग—तीन राशींचा एक भाग असे बारा राशींचे चार भाग हे ज्याचे बाहु आहेत, पाण्यानें भरलेल्या मेघाप्रमाणें ज्याचा नीलवर्ण आहे, अत्यंत तेजःसंपन्न चंद्र हा ज्याचें मुख आहे, तेजःपुंज नारायण हाच कोणी ज्यांनीं मोत्यांचा हार धारण केला आहे, चमकणारी वीज हें ज्याचें सुंदर पीतवस्त्र आहे, आणि प्रकाशित सूर्य ज्याचा तिलक आहे, आपल्या भक्तांचें पातक नाहींसें करून त्यांना सद्गती देण्याकरितां जो निर्गुण असून मायेच्या आश्रयानें दया, क्षमा इत्यादि गुणानें युक्त झाला त्या परमात्म्याचा पुत्र आकाश सर्वोत्कर्षानें उत्कर्ष पावत आहे.

एवं काल्यादिपक्षेऽप्यूह्यम् ।

अर्थः—याप्रमाणें कालिकादि देवतांकडेहि हा श्लोक लावतां येतो.

नन्ववाङ्मनसगम्यमाहात्म्यायाः श्रीकृष्णायाः स्तवने कथं प्रवृत्तिरित्यत आह-

अर्थः—अहो सर्व नद्यांमध्यें श्रेष्ठ अशी ही श्रीकृष्णा आहे, व तिचें माहात्म्य तर वाणी आणि मन या दोहोंना अगोचर आहे. मग स्तवन करणें कसें शक्य आहे ? तें सांगतात.

(२)

अन्वयः— हे कृष्णे ! ते महिमपरपारं कः व्रजति अपि ! शेषः अपि अशेषास्यैः कथयितुं प्रभवति वा ! अतः इह ह्रीतः वाचः शुचये इदं अल्पकं वच्मि । हे श्रीकृष्णे ! गुरुमते शमिततृष्णे ! जय । ते नमः ॥२॥

अर्थः— हे जननी श्रीकृष्णे ! तुझ्या माहात्म्यरूप सागराचें कोण उल्लंघन करील ? साक्षात् ब्रह्मदेवसुद्धां करूं शकणार नाहीं. फार कशाला ? शेष देखील आपल्या सर्व मुखांनीं तुझें वर्णन करण्यास समर्थ नाहीं, म्हणून तुझ्या स्तवनाविषयीं लज्जित असा मी, वाणीच्या शुद्धीसाठीं हें अगदीं थोडेंसें यथाशक्ति स्तवन करतों. श्रीदत्तात्रेयांना मान्य अशी तूं आपल्या भक्तांना नरक दाखविणारी दीर्घ आशा नाहींशी कर आणि उत्कर्ष प्रकट कर. तुला माझें नमन असो. ॥ २ ॥

(३)

ननु श्रीकृष्णायाः अलक्ष्यरूपस्य वाङ्मनसमार्गातिगत्वाल्लक्ष्यस्यापि गुणानन्त्यात्कथं स्तोत्रप्रवृत्तिरित्यत आह ।

अर्थः— परन्तु श्रीकृष्णेचें जें स्वरूप न दिसणारें आहे, तेथें वाणी व मन यांची गति कुंठित होते. आणि दिसणाऱ्या सगुण स्वरूपाचें वर्णन करावें म्हटलें तर त्याचे गुण अनंत आहेत, म्हणून अंत लागत नाहीं, तर स्तुति कशी करावयाची तें सांगतात.

अन्वयः— हे वरदे श्रीकृष्णे ! ते अलक्ष्यं रूपं वचनहृदयाध्वातिगम् (अस्ति) । अतः अहं नतः । च ते लक्ष्यं (रूपम्) कथं अपि विज्ञाय ते वरमुदे स्वमतिगतितः त्वां स्तोतुं प्रवृत्तः (अस्मि) हे गुरुमते शमित-तृष्णे जय । ते नमः ॥ ३ ॥

अर्थः— हे वरदात्रि श्रीकृष्णे ! प्रत्यक्षादि प्रमाणांनीं न दिसणारें तुझें रूप वाणी आणि मन यांची गति कुंठित करतें. म्हणून तुझ्या चरणीं नम्र राहून हे माते ! तुझें दिसणारें सगुण स्वरूप तेंसुद्धां सद्गुरुपासून मोठ्या कष्टानें किंचित् जाणून तुला आनंद व्हावा म्हणून यथामति तुझें स्तवन करण्याकरतां प्रवृत्त झालों आहें. हे भगवति ! तुला माझा नम-

स्कार असो ! श्रीदत्तमान्ये श्रीकृष्णे, भक्तांच्या तृष्णा नष्ट करून तूं उत्कर्षसंपन्न हो. ॥ ३ ॥

( ४ )

ननु एतेन स्तोत्रेण कथं मम तोष इत्याह—

**अर्थः**—जें तूं स्तवन करीत आहेस त्यानें मला आनंद कसा होईल असें म्हणशील तर सांगतात.

**अन्वयः**—साहित्यज्ञैः अपि सुगुणसम्पत्सुललिता मितार्था अस्तानर्था सा अपि कविता तव मुदे समर्था न च ( अभूत् ) अथ अपि ( हे मातः ) त्वं मुदा शिशुवचनवत् मे ( वचः ) शृणु । हे शमिततृष्णे गुरुमते जय । ते नमः ॥ ४ ॥

**अर्थः**—अनेक अनुष्टुभादि छंद, अनुप्रासादि शब्दालंकार, उपमा, उत्प्रेक्षादि अर्थालंकार व न्याय व्याकरणादि सहा शास्त्रें यांमध्यें प्रवीण अशा श्रीव्यास, श्रीशंकराचार्य इत्यादि मोठमोठ्या पंडित कविवर्यांनीं निरर्थक शब्दप्रयोग न करतां अर्थान्तरन्यासादि अलंकार, अर्थगांभीर्य, प्रसाद, परिमितार्थता इत्यादि गुणांनीं युक्त अशा रसाळ काव्यांनीं केलेली स्तुति तुझ्या संतोषाला समर्थ झाली नाहीं. तथापि लहान बालकाचे बोबडे बोल ऐकून त्या प्रेमळ मातेला जसा आनंद होतो, त्याप्रमाणें मीं केलेलें स्तवन ऐकून संतुष्ट हो. हे कृष्णे ! तुला माझें नमन असो, हे दत्तमान्ये ! भक्तांच्या तृष्णा नाहींशा करून उत्कर्ष प्रकट कर. ॥ ४ ॥

( ५ )

ननु त्वं दत्तात्रेयभक्तोऽपि सन् कथं मां स्तौषीत्यत आह—

**अर्थः**—बरें पण, तूं श्रीदत्तात्रेयाचा परमभक्त आहेस, तरी त्यांचें स्तवन न करतां माझी स्तुति काय म्हणून करतोस ? जो ज्याचा भक्त असेल त्यानें त्याचेंच स्तवन करावें, असें म्हणशील तर सांगतो.

**अन्वयः**—मुनिनमितदत्तात्रिजपदे मे रसज्ञा दत्ता ( अस्ति ) तस्य अपि मुदे इयं साधुलहरी न प्रभवति किम् । यतः हरीशात्मा इयं कृष्णा दत्तदयिता अभूत् । हे गुरुमते शमिततृष्णे जय । हे कृष्णे ते नमः ॥ ५ ॥

**अर्थ:**—सनकादिमुनी ज्यांच्या चरणकमलीं नम्र आहेत, अशा श्रीदत्तचरणीं माझी जिव्हा अर्पण केली आहे, ही गोष्ट खरी; तरी पण या सुंदर अशा कृष्णालहरीनें श्रीदत्तांना आनंद होणार नाहीं काय ? अवश्य होईल. कारण वेणीनामक नदीसह असणाऱ्या हरिहरस्वरूपिणी कृष्णेच्या तीरावर प्रेमानें वास केल्यामुळें ती त्यांना आवडणारी झाली. मुलाचा गौरव जसा मातेला आनंददायक होतो, त्याप्रमाणें श्रीदत्तांना प्रिय अशा श्रीकृष्णेचें स्तवनही त्यांना आवडेलच आवडेल. आपल्या स्तुतीनें तितका आनंद होत नाहीं पण आपल्याला जें प्रिय आहे त्याच्या स्तवनानें जास्त आनंद होतो. हे दत्तमान्ये भजकतृष्णाहारिणी तुझा जयजयकार असो ! हे कृष्णे, तुला माझा नमस्कार असो ! ॥ ५ ॥

( ६ )

स्तुत्या किं याचसे इत्यत आह–

**अर्थ:**—तूं म्हणतोस तें सर्व खरें आहे. पण स्तुती करून तरी तुला असा कोणता वर मागावयाचा आहे असें म्हणशील तर सांगतों.

**अन्वय**—प्राज्यं राज्यं न मम अभिमतम्। (अस्ति) च विबुधपूज्यं सुरपदं न। पूष्णः पदं न। च जिष्णोः पदं न। विष्णोः अपि (पदम्) न (अभिमतं किन्तु) दत्तात्रेयप्रपदपरिपूतं तव तटं मतम्। (विद्यते) हे कृष्णे ते नमः। हे गुरुमते शमिततृष्णे जय ॥ ६ ॥

**अर्थ:**—या स्तवनानें तुझ्यापासून मला हत्ती, घोडे इत्यादि संपत्तींनीं शोभणारें असें मोठेंसें राज्य नको, आणि देवांना पूज्य असे अग्न्यादि देवांचें स्थानही पण नको, व आपल्या प्रकाशानें विश्वाचें पोषण करणाऱ्या सूर्याचें देखील स्थान नको, अप्सरादि उपभोग घेण्यास योग्य अशा विषयांनीं युक्त आणि अपूर्व संपत्तीनें संपन्न असें इन्द्रपदही नको; जेथें गेलें असतां मनुष्य जन्ममरणरूप संसारापासून मुक्त होतो, असें वैकुंठपदसुद्धां मी इच्छित नाहीं. मग तुला पाहिजे तरी काय ? असें विचारशील तर सांगतों. हे माते श्रीदत्तात्रेयांच्या संचारानें अतिपवित्र व देवांनाही दुर्लभ अशा तुझ्या तीरावर मला वास दे. हे दत्तमान्ये, तूं भक्ततृष्णा दूर करून विजयी हो. हे श्रीकृष्णे, तुला माझा नमस्कार असो. ॥ ६ ॥

(७)

यतो दत्तात्रेयप्रपदपरिपूतं तव तटं, ततो अन्यतिरस्कारपूर्वकं तव तट-निवासमेवाभिलषामीत्याह—

**अर्थः**—ज्यास्तव श्रीदत्तात्रेयांच्या संचारानें पवित्र असें तुझें तीर आहे, त्यास्तव दुसऱ्या कशाचीही इच्छा न करतां तुझ्या तीरावरच नेहमीं वास व्हावा असें इच्छितों, असें प्रतिपादन करतात.

**अन्वयः**—मे मनः भोगं न लषति। च योगं न। दुरितभङ्गं न। अरोगं न। गाङ्गं जलं अपि न (लषति) सांगं श्रुतिगणं न। यागं न। स्वर्गं न। (किन्तु) तव सततयोगं लषति। हे श्रीकृष्णे ते नमः। हे गुरुमते शमिततृष्णे! जय ॥ ७ ॥

**अर्थः**—मला सुंदर स्त्रियादि विषयांचा उपभोग नको. यमनियमादि आठ अंगें असलेला तो योग व त्याचें फळही नको. माझ्या पातकांचा नाश व्हावा असेंही मला वाटत नाहीं. शरीरारोग्य तेंही नको. चारशें कोसांवरून ज्या गंगेचें नांव घेतांच जी जीवांना पापनाश करून मोक्ष देते, आणि जी साक्षात् श्रीविष्णूच्या पायांपासून जन्मली, त्या गंगेचें अतिपवित्र उदकही नको. व्याकरणादि सहा अंगांसह वेदाध्ययनाची मला गरज नाहीं. वैदिकमंत्रांनीं होणाऱ्या दर्शपौर्णमास, आग्रयण, चातुर्मास्य-रूप अग्निहोत्रादियागाची आणि त्यापासून मिळणाऱ्या स्वर्गसुखाची मला इच्छा नाहीं, तर तुझ्या पवित्र तीरावर नेहमीं आनंदानें राहावयास मिळावें एवढीच इच्छा आहे. कारण एवढ्यानेंच चारही पुरुषार्थ मला निश्चयानें मिळतील. हे कृष्णावेणी! तुला माझा नमस्कार असो. हे दत्त-मान्ये माते! भक्ताच्या इच्छा पूर्ण करून तूं उत्कर्षसंपन्न हो. ॥ ७ ॥

(८)

यत एवमतः—

**अर्थः**—ज्यापेक्षां मला सर्वार्थ देणाऱ्या तुझ्या तीराशिवाय कांहीं नको आहे. त्यापेक्षां:—

अन्वयः---हे श्रीकृष्णे इह कलौ भवती मलौघघ्नी (च) ईतिघ्नी भवति इति सुविश्वस्तम् (अतः) जगति साधनचयात् स्रस्तं मे मनः हे गतिदे ! क्व अपि न प्रसरति ! हे कृष्णे, ते नमः। हे गुरुमते शमिततृष्णे ! जय ॥ ८ ॥

अर्थः---हे कृष्णे, या भूलोकीं विशेषतः कलियुगांत सर्व पातकांचा व सर्व अरिष्टांचा नाश करण्यास तूंच समर्थ आहेस, असा पूर्ण विश्वास असल्यामुळें सर्वपुरुषार्थप्राप्तीच्या साधनांचा त्याग करून तुझ्याच ठिकाणीं पूर्ण स्थिर झालेलें माझें मन तुला सोडून कुठेंहि जाण्यास तयार नाहीं. हे कृष्णे, तुला माझा नमस्कार असो. श्रीदत्तात्रेयांना मान्य अशी तूं भक्तांचा उद्धार कर आणि विजयी हो. ॥ ८ ॥

(९)

न गाङ्गं जलमप्यभिलषामीत्यत्र हेतुमाह---

अर्थः---मागील सातव्या श्लोकांत अत्यंत पवित्र गंगोदक देखील मला नको असें म्हटलें आहे. त्याचें कारण तीन श्लोकांनीं सांगतात.

अन्वयः--- विमता महाभङ्गा दुरितभङ्गा यदि गंगा अत्र कथिता (अस्ति) तथा इह मता अपि त्वत्तः अधिकतां कथं एति। सा (गङ्गा) हरेः अंघ्र्युद्भूता त्वं इव ननु मूर्ता हरितनुः (न भवति) हे कृष्णे ते नमः। गुरुमते शमिततृष्णे जय ॥ ९ ॥

अर्थ--- वेदांना व मोठमोठ्या लोकांना मान्य, प्रचंड लाटा असलेली गंगा जरी भूलोकीं निखिलपापें नष्ट करणारी आहे, असें सूज्ञ लोक वर्णन करतात, व सर्वांना हें मान्यही आहे, तरी ती गंगा तुझ्यापेक्षां श्रेष्ठ केव्हांही होणार नाहीं. कारण गंगा भगवंताच्या पायांपासून झाली आहे आणि तूं तर प्रत्यक्ष भगवत्स्वरूपिणी आहेस. मग तुझ्या समान कशी होईल ? हे कृष्णे, तुला माझा नमस्कार असो. हे दत्तप्रिये ! भक्त-तृष्णा दूर करणाऱ्या तुझा जयजयकार असो ! ॥ ९ ॥

(१०)

ननु 'अभिनवबिसवल्ली पादपद्मस्य विष्णोर्मदनमथनमौलेर्मालतीपुष्प-

माला ॥ जयति जयपताका काप्यसौ मोक्षलक्ष्म्याः क्षपितकलिकलङ्का जान्हवी नः पुनातु' इति वाल्मीकिना स्तुतत्वात्कुतो नाधिकेत्याह ।

**अर्थः**—श्रीवाल्मिकीमुनींनीं श्रीशंकराच्या मस्तकावर शोभणारी व प्रत्यक्ष श्रीविष्णूच्या चरणांपासून निघालेली भागीरथी ही आपल्या भक्तांना सर्वपापांचें क्षालन करून मोक्षलक्ष्मी मिळवून देणारी विजयध्वजा आहे असें वर्णिलें असल्यामुळें गंगेला श्रेष्ठ म्हणतां येणार नाहीं काय ? असें कोणी म्हणेल तर त्याविषयीं सांगतों.

**अन्वयः**—गङ्गा हरेः अंघ्र्यब्जाभिनवबिसवल्ली भवतु । वा स्रक् इव ईट्‌शीर्षे अधितिष्ठतु । च सुतरां प्रकामं मुक्तेः पताका इव (भवतु) (तथापि) त्वं इव श्रीहरितनुः न भवति । हे कृष्णे ते नमः । गुरुमते ! हे शमित-तृष्णे ! जय ॥ १० ॥

**अर्थः**—भगवती श्रीगंगा श्रीविष्णूच्या चरणकमलापासून निघालेली बिसांकुररूप वेली असो, किंवा मदनाला जाळून टाकणाऱ्या श्रीशंकराच्या मस्तकावर मालतीपुष्पमालेप्रमाणें शोभणारी असो, फार कशाला ती गंगा प्रत्यक्ष मोक्षाला दाखविणारी विजयपताकाही असेल. कांहींही असो. हे कृष्णवेणी ! तुझ्याप्रमाणें गंगा ही साक्षात् विष्णुस्वरूपी होणें केव्हांही शक्य नाहीं. हे माते ! तुझ्यामध्यें आणि श्रीगंगेमध्यें महदन्तर आहे. गंगा श्रीविष्णूच्या पायांपासून निघाली आणि तूं प्रत्यक्ष विष्णु-स्वरूपिणी आहेस. हे कृष्णे, तुला माझा नमस्कार असो ! हे दत्तमान्ये, तूं आपल्या भक्तांचा उद्धार करून उत्कर्ष प्रकट कर ॥ १० ॥

( ११ )

**अन्वयः**—हे जननि ! जीवे कन्यां गते (सति) इह सह्ये शिखरिणि जगति बहुमान्यां धन्यां त्वां भगिनी इव अमरसरित् ( गङ्गा ) समागत्य अपि अब्दं मुदा परमनियमात् तिष्ठति । हे कृष्णे ते नमः । गुरुमते शमित तृष्णे जय ॥ ११ ॥

**अर्थः**—हे जगन्माते ! श्रीकृष्णावेणी ! बृहस्पती कन्याराशीला गेला असतां एथें सह्यपर्वतावर बसणाऱ्या आणि जगांत सर्वमान्य व कृतार्थ अशा

तुला, गंगानदी पातकी लोकांच्या स्नानपानादिसंपर्कानें सांचलेलें सर्व पाप नष्ट होण्यासाठीं प्रिय भगिनीप्रमाणें तुझ्या दर्शनाच्या निमित्तानें एक वर्षपर्यंत कोठेंहि दुसरीकडे जावयाचें नाहीं असा नियम करून तुला येऊन भेटते व मोठ्या आनंदानें एक वर्षपर्यंत राहते. अद्यापि सह्याद्रीवर असलेल्या गंगाकुंडांतून बृहस्पति कन्याराशीला गेला असतांनाच गंगा प्रगट होते. इतर वेळीं गंगाकुंडांत प्रवाह दिसत नाहीं. ही साक्ष सर्वांना पटण्यासारखी आहे, म्हणून तूं त्या पवित्र भागीरथीपेक्षां श्रेष्ठ आहेस हें सिद्ध होतें. ॥ ११ ॥

(१२)

तदा न केवलं गङ्गैवागच्छत्यपि तु सर्वाणि तीर्थानीत्यत आह—

**अर्थः**—देवगुरु कन्याराशीला गेला असतां गंगाच केवळ भेटण्यासाठीं येते असें नाहीं तर जम्बुद्वीपांतील सर्वच तीर्थें येतात असें सांगतात.

**अन्वयः**—हे वरदे ! परदे ! महाजम्बुद्वीपे ( यानि ) वृजिनहरतीर्थानि ( तानि ) त्वां तु समायान्ति । हे त्रिविधमलदे ! तदा त्वत्स्नानादेः फलं वक्तुं अजः अपि न प्रभुः ( अस्ति ) हे कृष्णे ते नमः । हे गुरुमते हे शमिततृष्णे जय ॥ १२ ॥

**अर्थः**—तूं आपल्या भक्तांच्या सर्व इच्छा पूर्ण करून मोक्ष देणारी आणि त्या मोक्षाला प्रतिबंधक अशा कायिक, वाचिक, मानसिकादि सर्व पातकांचा नाश करणारी असल्यानें गंगाच तुझ्या दर्शनाला येते असें नाहीं, तर या प्रशस्त जम्बुद्वीपांतील साडेतीन कोटी तीर्थेंहि तुझ्या भेटीला येतात. तूं मात्र कोठेंहि जात नाहींस. ज्या वेळीं गंगा तुला येऊन भेटते त्या वेळीं तुझ्या उदकांत स्नान, तुझें जलपान व तीरावर केलेलीं दानें व श्राद्धादि यांचें पुण्य किती प्राप्त होतें, त्याचें वर्णन ब्रह्मदेवसुद्धां करूं शकणार नाहीं, तर इतरांची कथा काय ? हे कृष्णावेणी तुला माझा नमस्कार असो ! हे दत्तप्रिये, दुष्ट तृष्णा नाश करणाऱ्या तुझा जयजयकार असो. ॥ १२ ॥

( १३ )

हे गतिद इत्येतदुपपादयति ।

**अर्थः**—श्रीकृष्णा मोक्षाला देणारी आहे. असें पूर्वी वर्णन केलें आहे, तेंच विस्तारानें सांगतात–

**अन्वयः**—अये द्रुतरये ! मनुष्यः पितॄन् उद्दिश्य त्वयि निवापाञ्जलिं वितरति । हे अम्ये ! अस्य सकलपितरः गतिं यान्ति । ( च ) श्राद्धात् अपि पुनरावृत्तिरहितां ( गतिं यान्ति ) । हे कृष्णे ते नमः । हे गुरुमते शमिततृष्णे जय । ॥ १३ ॥

**अर्थः**—हे वेगवती श्रीकृष्णे ! तुझ्या ठिकाणीं कोणी एकाद्या मनुष्यानें आपल्या पितरांना उद्देशून तिलाञ्जली दिली तर त्याचे सर्व पितृगण जन्ममरणरूपी संसारांतून मुक्त होतात. आणि जे तुझ्या तीरावर श्राद्ध करतात त्यांचेही सर्व पितर उत्तम गतीला जातात. हे श्रीकृष्णे, तुला माझा नमस्कार असो ! हे दत्तप्रिये भक्तोद्धारिणी, तुझा जयजयकार असो. ॥ १३ ॥

( १४ )

अपि च—

**अर्थः**—आणखीही

**अन्वयः**—महापापी यदि आकल्पं विधिवशात् दुर्गतिं गतः । सः अपि इह वृषोत्सर्गात् (च) नारायणबलेः द्रुतं दुर्लभतरां गतिं व्रजति.वा त्रिपिंडीश्राद्धात् ( गतिं व्रजति ) हे कृष्णे ते नमः । हे गुरुमते शमिततृष्णे जय १४

**अर्थः**—सुवर्णचोर, मद्यपी, गुरुतल्पग व ब्रह्महत्यारी हे चार महापातकी व यांचा संसर्गी तो पांचवा. हीं महापातकें करणारा एखादा पुरुष जर दुर्दैवानें कल्पपर्यंत घोर नरकाला गेला असला तरी जेव्हां त्याच्या वंशांतील कोणीतरी तुझ्या तीरावर वृषोत्सर्ग किंवा नारायणबलि केला असतां तो देखील दुर्लभ मोक्षाला जातो, किंवा त्रिपिंडीश्राद्ध केलें तरीहि परमगतीला जातो. हे कृष्णे, दत्तमान्ये, भक्तभवहारिणी, तुला माझा नमस्कार असो. तूं सर्वदा उत्कर्षवती हो. ॥ १४ ॥

( १५ )

त्वमेव सर्वफलप्रदेत्याह–

अर्थः—हे कृष्णावेणी ! तूं केवळ मोक्षच देतेस असें नाहीं, तर ऐहिक धनपुत्रादि सर्व विषय देणारी आहेस. असें सांगतात–

अन्वय—वन्ध्या सुतं लेभे । च ऋणी ऋणहृतिम् । दुःखी अपि सुखं ( लेभे ) यः यः नरः यं यं कामं हृदि स्मरति । सः सः तं अवाप । इति ज्ञात्वा हे जननि ! अद्य ते पुरतः पतितः (अस्मि) हे कृष्णे ते नमः । हे गुरुमते शमिततृष्णे जय ॥ १५ ॥

अर्थः—ज्या स्त्रीला मुळींच संतती होत नाहीं ती जातिवंध्या, जिला संतती होऊन जगत नाहीं ती मृतवंध्या आणि जिला एकच संतती होते व पुनः होत नाहीं ती काकवंध्या होय. अशा वंध्यासुद्धां तुझ्या सेवेनें पुत्रवती झाल्या आहेत. लौकिक ऋण–दुसऱ्याचें देणें–कर्ज आणि शास्त्रीय ऋण, देव, ऋषि व पितर यांचे या सर्वही ऋणापासून तुझी सेवा करणारा भक्त ऋणमुक्त झाला. कशाही प्रकारचा दुःखी असो तो त्यापासून मुक्त होऊन परमगतीला गेला. फार कशाला ? जो जो मनुष्य जी जी इच्छा करील ती ती इच्छा तुझ्या सेवेनें पूर्ण झाली असें जाणून हे जगन्माते ! आज मी तुझ्यापुढें अनन्यशरण होऊन पडलों आहें. हे कृष्णे ! तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमान्ये भक्तोद्धार करून तूं आपला प्रभाव प्रकट कर आणि विजयी हो. ॥ १५ ॥

( १६ )

ननु ममोभयतटतीर्थाटनात्पापक्षयस्ततोऽभीष्टार्थावाप्तिरिति चेत्त्वाष्टतीर्थाटनाच्चवद्गताखिलतीर्थाटनफलम् । तान्यष्टतीर्थानि नरसिंहपुरे सन्ति तत्सेवकाय मेऽभीष्टफलं देहीत्याशयेन स्तौति ।

अर्थः— हे माते ! कदाचित् तूं म्हणशील कीं हे भक्ता, माझ्या दोनी तीरांवर असणाऱ्या तीर्थसेवनानें संपूर्ण पातकांचा नाश होईल आणि तुझ्या सर्व इच्छा पूर्ण होतील. तर तूं असें म्हणूं नकोस, कारण तुझ्या ठिकाणीं जी शुक्लतीर्थादि आठ तीर्थें आहेत त्यांच्या सेवनानें

तुझ्या तारावराल सर्व तीर्थांचें सेवन—स्नान पानादि केल्याचें फळ सहजच प्राप्त होतें. मग तीर्थाटनाचे आयास कशाला ! तीं तीर्थें कोठें आहेत म्हणून विचारशील तर नरसिंहवाडी या क्षेत्रांत आहेत. त्यांचें सेवन करणाऱ्या माझी इच्छा तूं पूर्ण कर, अशा अभिप्रायानें वर्णन करतात.

**अन्वयः**—अहो (श्रीकृष्णे) ते माहात्म्यं शुकजनकः आह । अत्र हि महाबलेशात् आसिन्धोः उभयतटसंस्थेषु बहुषु महातीर्थेषु (अपि) नृहरिपुरि इदं तीर्थाष्टकं अग्न्यम् (वरीवर्ति)हे कृष्णे ते नमः । हे गुरुमते, शमिततृष्णे जय ॥ १६ ॥

**अर्थः**—हे श्रीकृष्णे ! तुझें माहात्म्य श्रीवेदव्यासांनीं वर्णिलें आहे. त्यामध्यें महाबळेश्वरापासून तो पूर्वसमुद्रापर्यंत तुझ्या दोन्हीही तीरांवर असलेल्या पुष्कळच तीर्थांचें वर्णन आहे. पण त्यांच्यामध्यें नरसिंहवाडी या पुण्यतम क्षेत्रांत असणारी पुराणप्रसिद्ध, जेथें कृष्णा पश्चिमेकडे वाहते तें शुक्लतीर्थ, त्यानंतर औदुम्बरवृक्षासन्निध पापविनाशी, काम्य, आणि सिद्ध अशीं तीन तीर्थें क्रमानें आहेत व अमरेश्वराजवळ अमरतीर्थ आहे. त्यापुढें कोटितीर्थ व त्याच्यापुढें शक्तितीर्थ आणि त्यापुढें प्रयागतीर्थ अशीं आठ तीर्थें अतिशय श्रेष्ठतम वर्णिलीं आहेत. कारण त्यांच्या स्नानपानादि सेवनांनीं संपूर्ण तीर्थाटनांचें फळ मिळतें. हे कृष्णे ! तुला माझा नमस्कार असो. हे दत्तमनोहारिणी, भक्तोद्धार करून तूं विजयी हो. ॥ १६ ॥

( १७ )

**अन्वयः**—हे कृष्णे ! सह्यस्य अधः ते मुखं (विद्यते) नरहरेः पुरे ते सदयं हृदयं (वरीवर्ति) अपि आन्ध्रे (ते) नाभिः (वर्तते) । प्राच्यविषये (ते) प्रपदयुगलं (समुल्लसति) हे मुनिमते अये ! अदः (तव) रूपं इह प्रथितम् । (अस्ति) हे कृष्णे ! ते नमः हे गुरुमते शमिततृष्णे जय ॥ १७ ॥

**अर्थः**—हे श्रीकृष्णे ! सह्यपर्वताच्या अधःप्रदेशीं "वाई" नामक क्षेत्रांत जें उगमस्थान तें तुझें मुख आहे. पुष्कळ ब्राह्मणांची वसति असल्यामुळें तें मुख होय. नरसिंहवाडीमध्यें श्रीदत्ताच्या मनोहरपादुकारूपी तुझें सदय हृदय आहे. म्हणून तेथें तुझी सेवा करणारा ऐहिक व पार-

मार्थिक दोनी सुखें मिळवितो. हे माते ! आन्ध्र देशांत "कुरुगड्डी" नांवाच्या क्षेत्रांत तुझें नाभिस्थान म्हणजे मध्यदेश आहे. आणि पूर्वदेशीं पूर्वसमुद्राला मिळते वेळीं दोन प्रवाह होऊन मिळाल्यामुळें ते दोन प्रवाहरूपी तुझे चरण तेथें आहेत. असें तुझें स्वरूप या लोकीं प्रसिद्ध आहे. तें नेहमीं माझ्या अंतःकरणांत स्थिर राहो ! हे कृष्णे ! तुला माझा नमस्कार असो. हे दत्तात्रेयमान्ये ! भक्ततृष्णा दूर करणाऱ्या तुझा जयजयकार असो. ॥ १७ ॥

(१८)

आस्तान्तावत्ते स्वरूपं ध्यानमङ्गलम् । नाममाहात्म्यमप्यत्युत्तममित्याह—

अर्थः—तुझें स्वरूप ध्यान करणाऱ्यांना मङ्गलकारक आहेच! तें असो, तुझ्या नामस्मरणाचा महिमाहि अतिशय श्रेष्ठ आहे असें सांगतों.

अन्वयः—हे श्रीकृष्णे ! ( यः ) नरः सुदूरस्थः अपि अस्वस्थः अपि सुलभं अथ अमृतस्पर्धि ( अतएव ) मधुरं वरं ते नाम कथं अपि ब्रूयात् । सः ( नरः ) निःश्रेयसं इयात् । ( अथ च ) यः साक्षात् ( त्वाम् ) भजति । ( सः निःश्रेयसं इयात् इति ) किमुत । ( अपि तु यायादेव ) हे कृष्णे ते नमः । हे गुरुमते शमिततृष्णे जय ॥ १८ ॥

अर्थः—हजारों कोस दूर राहून किंवा रोगादिदुःखानें व्यग्रचित्त असतांही "हे श्रीकृष्णे" असें सहज म्हणतां येणारें अमृतापेक्षां अत्यंत गोड म्हणूनच अतिश्रेष्ठ असें तुझें नाम थट्टेनें अथवा तिरस्कारानें कसें जरी उच्चारलें तरी तो मनुष्य मोक्षाला जातो. आणि मग जो प्रत्यक्ष तुझी सेवा करतो तो सद्गति मिळवील हें निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं. तो परम गतीला जातोच. हे कृष्णावेणी तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमान्ये ! तुझा जयजयकार असो. ॥ १८ ॥

(१९)

एवंभूताया अपि तव दर्शनं न सुलभं सर्वेषाम् । किन्तु महापुण्यवतामेवेत्याशयेनाह ।

**अर्थः**—अशी जरी तूं सर्वसुलभ आहेस, तरी तुझें दर्शन सर्वांना सहज होण्यासारखें नाहीं; तर जे महापुण्यवान् असतील त्यांनाच घडेल, अशा अभिप्रायानें सांगतात.

**अन्वयः**—हे कृष्णे! पुरा ( येन ) इष्टम् । वा दत्तं विहितम् । अपि च पूर्तं ( कृतम् ) च सुकृतं ( विहितम् ) वा स्वधीतम् । ( च जप्तम् । अजस्य यशः खलु श्रुतं ( भवेत् तर्हि ) भवभीहृत् भवद्दृष्टिः नृणां भवति हि । हे श्रीकृष्णे ते नमः । हे गुरुमते शमिततृष्णे जय ॥ १९ ॥

**अर्थः**—हे कृष्णे ! पूर्वजन्मीं जर कांहीं याग केले असतील किंवा दानें दिलीं असतील, अथवा वाटसरूंना विश्रांति घेण्याकरितां बगीचे व पाणी पिण्याकरितां विहिरी वगैरे खणल्या असतील व यथाविधि श्रौत-स्मार्त कर्में केलीं असतील, अथवा वेदाध्ययन केलें असेल किंवा गायत्री पुरश्चरणादि जप विधिपूर्वक केला असेल, अथवा श्रीविष्णु किंवा शंकर यांची लीला भक्तीनें श्रवण केली असेल, तरच संसारापासून मुक्त करणारें तुझें दर्शन त्या मनुष्याला घडेल; अन्यथा घडणार नाहीं. हे श्रीकृष्णे, तुला माझा नमस्कार असो. श्रीदत्तमान्ये शमिततृष्णे ! तुझा जयजयकार असो. ॥ १९ ॥

( २० )

नन्वजस्येत्यत्र शंकरस्येति कथं व्याख्यायत इति चेत् हरिहरयोरैक्या-दिति वदन् तद्रूपां कृष्णां स्तौति—

**अर्थः**—मागील श्लोकांत अजशब्दाचा अर्थ विष्णु असा असता शंकर असा केला आहे. त्याचें कारण हरि व हर यांच्यामध्यें थोडासुद्धां भेद नाहीं. याकरतां हरिहरस्वरूपी श्रीकृष्णेचें स्तवन करतात.—

**अन्वयः**—हरिहरयोः प्रकृत्या ऐक्यम् । भिन्नं न ( भवति ) । प्रत्यय-वशात् पृथग्वत् भाति इति प्रथयितुं अहो भगवति ! शंभुवपुषा वेण्या युता अपि त्वं पृथक्त्वं न भजसे । हे श्रीकृष्णे ते नमः । गुरुमते शमित-तृष्णे ! जय ॥ २० ॥

**अर्थः**— हरि आणि हर दोनीही शब्दांची प्रकृति म्हणजे मूळ धातु हृ हा एकच आहे; पण कृत्प्रत्यय निरनिराळे लागले असल्यामुळें हरि व हर हे सात्विक व तामस स्वभावाचे भासतात. एक सजल मेघाप्रमाणें श्याम तर दुसरा श्रीशंकर कापुराप्रमाणें गौर, असे भिन्न भासतात. हें सर्व लोकांना समजण्याकरतां तूं वेणीनामक शिवस्वरूपिणी जी नदी तिनें युक्त आहेस; तरी विष्णुरूपिणी तूं असतां चिद्रूपानें ऐक्य दाखवितेस. हे श्रीकृष्णे, तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमते, शमिततृष्णे जय ॥२०॥

(२१)

अत एव त्वमेव मे शरणमिति स्तौति—

**अर्थः**— म्हणून हरिहररूपिणी तूंच मला रक्षण करणारी आहेस, असें सांगतात.—

**अन्वयः**— अये योगिध्येये ! निगमगणगेये अब्धिनिलये अनपाये दत्ताये हे कलुषविलये सह्यतनये ( श्रीकृष्णे ) त्वदन्यं सुलभशरणं लीढ-मरणं नो वीक्षे । हे श्रीकृष्णे ते नमः । गुरुमते शमिततृष्णे जय ॥ २१ ॥

**अर्थः**— यम-नियम-आसन-प्राणायाम-प्रत्याहार-ध्यान-धारणा व समाधि अशीं आठ अंगें असलेल्या योगांत पारंगत अशा योग्यांनीं जिचें ध्यान केलें आहे, आणि वेद जिचें स्तवन करतात, पूर्वसमुद्रांत जिचा निवास आहे, व भूत, भविष्य, वर्तमान या त्रिकालीं जिचा केव्हांही नाश होत नाहीं, आणि जी आपल्या भक्तांचीं पातकें नष्ट करून उद्धार करते. सह्यपर्वत जिची जन्मभूमि आहे, व जिनें मृत्यूलाही खाऊन टाकलें आहे, अशा श्रीकृष्णेवांचून त्रैलोक्यांत शरणागतांचें रक्षण करणारा कोणीही दिसत नाहीं. यासाठीं हे श्रीकृष्णे, तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमते शमिततृष्णे माझें रक्षण करून तूं विजयसंपन्न हो ॥ २१ ॥

(२२)

सुलभशरणत्वमाह—

**अर्थः**—श्रीकृष्णा मातेप्रमाणें रक्षण करते असें सांगतात.

**अन्वय**—हे भगवति ! ( मया ) देशाः परिक्रान्ताः । अपि च चतस्रः दिशाः ( परिक्रान्ताः तथापि ) दुष्टाशा न शान्ता ( अभूत् ) । ( एवं ) मे वपुषः अन्तिमदशा अजनि । ( परम् ) तव दर्शिवशात् एव अद्य मे आशा प्रशान्ता । ( च ) सुदशा आस । हे कृष्णे ते नमः ! हे गुरुमते शमिततृष्णे जय ॥ २२ ॥

**अर्थः**—हे माते ! षड्गुण आणि ऐश्वर्यसंपन्न श्रीकृष्णे ! दुराशेला बळी पडून मी पुष्कळच देश फिरलों व चारीही दिशा धुंडाळल्या, परन्तु माझी दुष्ट आशा शांत झाली नाहीं. पण फिरतां फिरतां मरणावस्था मात्र माझ्या-जवळ आली. परन्तु आज मात्र तुझें दर्शन होतांच ती दुष्टाशा शांत होऊन सुखमय अवस्था प्राप्त झाली आहे. यावरून तूं आपल्या भक्तांचें रक्षण किती प्रेमळ व सहज रितीनें करतेस हें सिद्ध होतें. हे कृष्णे, तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमते शमिततृष्णे, तूं आपल्या भक्ताच्या दुष्ट आशा शांत करून उत्कर्ष प्रकट कर ॥ २२ ॥

( २३ )

त्वमेव सर्वोद्धर्त्रीति स्तौति–

**अर्थः**—तूंच सर्व जीवांना सद्गति देणारी आहेस असें स्तुतिरूपानें वर्णन करतात.

**अन्वयः**—हे ईशे ! त्वदीये सत्तोये ये जलचरगणाः (च) वयांसि अन्ये पशुमृगगणाः वा कीटकगणाः अपि गतभयाः स्नाताः कथं अपि पीताः ततः ते दिवं इताः । हे कृष्णे ते नमः । हे गुरुमते शमिततृष्णे जय ।। २३ ।।

**अर्थः**—तुझ्या अतिशय पवित्र उदकांत असणारे मत्स्यकूर्मादि प्राणी आणि आकाशांत फिरणारे पक्षी व दुसरे हरिणादि स्थलचर प्राणी आणि तुझ्या तीरावर अथवा जलांत असणारे कृमिकीटकादि सर्व प्राणी कसें तरी स्नान व जलपान घडलें असतां ते निर्भय होऊन सद्गतीला गेले. अशा सर्वोद्धारक कृष्णे । तुला माझा नमस्कार असो ! हे दत्तप्रिये, भक्तांच्या सर्व इच्छा पूर्ण करून व त्यांना शुभ गति देऊन तूं आपला विजय प्रकट कर. २३

(२४)

अपि च ।

अर्थः—आणखीही तूं सर्व शास्त्रांना मान्य असून सर्व पापीजनांचा उद्धार करणारी आहेस असें सांगतात.

अन्वयः—क्रूरः जारः च चोरः वनचरः अपि ते वरोदे कथं अपि स्नानात् ( दिवं गतः पुनः ) । यः श्रुतपरः नरः सः हे श्रुतमते ! ते स्नानात् गतिं न व्रजति किम् । (अपि तु व्रजत्येव ) हे कृष्णे ते नमः । गुरुमते शमिततृष्णे जय ॥ २४ ॥

अर्थः—हे शास्त्रमान्ये, माते श्रीकृष्णे ! निर्दय, सुवर्णादि वस्तूंचा अपहार करणारा, परस्त्रियांचे ठिकाणीं आसक्त असणारा, आणि नेहमीं रानावनांत भटकणाऱ्या भिल्लादि हीन जातींत जन्मलेला असेहि पुरुष केवळ तुझ्या श्रेष्ठ जलांत स्नान केल्यानें सद्गतीला गेले. मग जो यथाविधि स्नान करतो तो मनुष्य सद्गतीला जाणार नाहीं काय ? तर निश्चयानें जाईलच जाईल. हे कृष्णे, तुला माझा नमस्कार असो ! हे दत्तमान्ये शमिततृष्णे ! तुझा जयजयकार असो ! ॥ २४ ॥

(२५)

अपि च—

अर्थः—आणखीही.

अन्वयः—हे सुगते मातः ( श्रीकृष्णे ! ) येन तव अम्बु विधिवत् स्नातम् । ( तेन ) सकलं अपि तीर्थं स्नातं खलु । इह ( तेन च ) अखिलं दैवतं अर्चितम् । ( तेन ) सर्वं दत्तम् । च हुतम् । तेन पूर्तं कृतं खलु । हे कृष्णे ! ते नमः । हे गुरुमते शमिततृष्णे जय ॥ २५ ॥

अर्थः—हे सद्गति आणि ज्ञान देणाऱ्या माते श्रीकृष्णे ! ज्यानें तुझ्या पवित्र जलांत स्नान केलें, त्यानें खरोखर गंगा, पुष्करादि सर्व तीर्थांत स्नान केल्याचें पुण्य मिळविलें. त्याप्रमाणें त्यानें विष्णु, शंकर इ. सर्व देवांचें पूजन केल्याचें फळ सहजच हस्तगत केलें आणि तुलापुरुषदानादि सर्व दानें दिल्याचें दुर्लभ सुपुण्य त्याच्या पदरीं पडलें आणि त्यानें

परोपकारास्तव बगीचे, विहिरी निर्माण केल्यासारखेंच झालें. असें माहात्म्य असणाऱ्या श्रीकृष्णे तुला माझा नमस्कार असो ! हे दत्तमान्ये शमिततृष्णे तुझा जयजयकार असो. ॥ २५ ॥

( २६ )

**अन्वयः**—हे देवि सरिते ! ( श्रीकृष्णे ) त्वत्सामर्थ्यादरभरवशात् मे सकलं तीर्थं अवमतम् । देवाः अपि अवमताः । ( मे ) किं अपि न दत्तम् । ( तथा मे ) किमपि इष्टं न मतम् । च पूर्तं न श्रितम् । ( अस्ति ) हे श्रीकृष्णे ते नमः । गुरुमते शमिततृष्णे जय ॥ २६ ॥

**अर्थः**—हे तेजोमय श्रीकृष्णावेणी ! तुझ्या सामर्थ्यावर माझा दृढ-विश्वास आहे म्हणून मीं सर्व तीर्थांचा तिरस्कार केला आणि सर्व देवांचाही अवमान केला. कसलेंही दान दिलें नाहीं, कोणताही याग केला नाहीं व परोपकारार्थ बगीचे, विहिरी इत्यादि कर्में देखील केलीं नाहींत. यासाठीं अनन्यगतिक असा मी तुझा भक्त आहें; तरी माझा उद्धार करून तूं विजयी हो. हे कृष्णे, तुला माझा नमस्कार असो. ॥ २६ ॥

( २७ )

यत एवमतः—

**अर्थः**—ज्यापेक्षां सर्व तीर्थादिकांचा अवमान मीं केला आहे, त्या अर्थी—

**अन्वयः**—हे अभवे ( अहम् ) कस्यापि पुरतः क्षणं अपि स्थातुं न क्षमः ( अस्मि ) किन्तु ऊर्ध्वास्यः भवेयम् । इह हि हास्यास्पदं अभवम् । अतः अयि तव इयं लज्जा आस्ताम् । हे हिते सपदि मां समुद्धर । हे कृष्णे ते नमः । हे गुरुमते शमिततृष्णे जय ॥ २७ ॥

**अर्थः**—हे जन्ममरणापासून मुक्त करणाऱ्या श्रीकृष्णे ! तुझ्या सामर्थ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. म्हणून सर्व तीर्थादिकांचा मीं तिरस्कार केला. यासाठीं माझा उद्धार करा. मला कोणाच्याही पुढें एक क्षणभर सुद्धां उभें राहतां येणार नाहीं. तर केवळ माझा उद्धार कोणी करील काय, म्हणून वर तोंड करून फिरावें लागेल. आणि या लोकीं सर्व

तीर्थांचा त्याग केल्यामुळें सर्वांना हास्यास्पद होईन. याची लाज तुलाच असो, म्हणून हे हितकारिणी ! तात्काळ तूं माझा उद्धार कर. हे कृष्णे, तुला माझा नमस्कार असो ! हे गुरुमान्ये शमिततृष्णे तुझा जयजयकार असो ।। २७

( २८ )

प्रत्याख्याने चाहं व्यर्थं मरिष्ये इत्यत आह ।

**अर्थः**—तूं माझा त्याग करशील तर मी विनाकारण मरून जाईन असें म्हणतात.

**अन्वयः**—हे अभवे ! यदि अयं त्वया प्रत्याख्यातः ( अतएव ) भीतः भवति । (तर्हि) अज्ञस्य अस्य त्रिजगदुदरे किन्नु शरणं भवेत्! तत् हे महिते ! इह उच्चैः रणन् मरणं थामि । हे कृष्णे ते नमः । गुरुमते शमिततृष्णे जय ।।२८।।

**अर्थः**—हे जन्मादिविकारशून्ये श्रीकृष्णावेणी ! जर " मी तुझा उद्धार करणार नाहीं " असें म्हणून या तुझ्या भक्ताचा तूं तिरस्कार केलास तर भीतिग्रस्त व अज्ञानी अशा माझें त्रैलोक्यांत कोण रक्षण करणार ? कोणीही करणार नाहीं. म्हणून मोठ्या संकटांत सांपडून अतिशय भ्यालेल्या मला शंखध्वनिसारखे मोठमोठ्यानें ओरडत मरणाशिवाय कोणती गती आहे. हे श्रीकृष्णे ! तुला माझा नमस्कार असो ! हे गुरुमान्ये शमिततृष्णे, माझा उद्धार करून उत्कर्षसंपन्न हो ।। २८ ।।

( २९ )

मरणे का वा हानिरिति चेत्त्वद्विरुदहानिरित्याह—

**अर्थः**—हे भगवति श्रीकृष्णावेणी ! कदाचित् तूं म्हणशील कीं " मरण पावलास तर माझें काय नुकसान " तर माझें कसेंही होवो. पण तुझ्या ब्रीदाला मात्र कलंक लागेल. यापेक्षां मोठें नुकसान तें कोणतें ? असें सांगतों.

**अन्वयः**—हे अहोपाये ! महापापं तापं गतं ( अतएव ) अकम्पं अपि गतकृपं मां लोकः सशापं हसतु । तं तापं उ न गणये । ( किन्तु ) हे

भगनुते ! ( श्रीकृष्णे ) तव बिरुदभङ्गात् बिभेमि । हे श्रीकृष्णे ते नमः । गुरुमते शमिततृष्णे ! जय ॥ २९ ॥

अर्थः—मोठमोठ्या पातकांचा नाश करणाऱ्या हे श्रीकृष्णावेणी ! मीं अगणित पातकें केलीं आहेत. त्या पापांचें फळ म्हणून आधिदैविकादि त्रिताप मी भोगतों आहे. दुःख सहन न झाल्यामुळें माझा देह कांपूं लागला आहे. अशा अवस्थेंत मी पापी असल्यानें कोणाला माझ्याविषयीं दयाही येणार नाहीं. उलट शिव्या देऊन लोक हंसूं लागतील. या दुःखाची मला कांहींच किंमत वाटत नाहीं; पण माझा उद्धार न झाल्यानें तुझी ब्रीदावळी मात्र नाश पावेल याचें मला भय वाटतें. हे कृष्णे, तुला माझें नमन असो ! हे गुरुमते शमिततृष्णे, तुझा जयजयकार असो ! ॥२९॥

अतः प्रार्थये–

अर्थः – म्हणून प्रार्थना करतों.

( ३० )

अन्वयः—( हे मातः ) त्रितापघ्नी ईतिघ्नी विविधवरदात्री ऋणहरा त्रिपापघ्नी भीघ्नी भुवि पतितपावनी अघहरा सिंधुषु वरा एतद्बिरुदनिचयः चिरं जीवतु । हे कृष्णे ते नमः । गुरुमते शमिततृष्णे जय ॥ ३० ॥

अर्थः—हे माते कृष्णावेणी ! तूं आधिदैविकादि त्रितापांचा नाश करणारी आहेस; आणि अतिवृष्टि, अनावृष्टि इत्यादि सातहि अरिष्टांचा नाश करतेस, व आपल्या भक्तांना नानाविध वर देणारी, देव ऋषि, पितृ-गण, यांच्या ऋणांतून मुक्त करणारी आहेस. आणि कायिक, वाचिक व मानसिक अशा तीनीहि पापांचा नाश करण्यास तूं समर्थ आहेस. आणखी ब्रह्महत्यादि पंचमहापापें करून पतित झालेल्यांना तूं पवित्र करणारी आहेस. सर्व संकटांचा नाश करणारी व गंगादि सर्व नद्यांमध्यें तूं श्रेष्ठ आहेस. अशी वर वर्णिलेली बिरुदावली चिरकाल राहो. माझा उद्धार जर केला नाहींस तर तुझीहि ब्रिदावळी अस्ताला जाईल. म्हणून माझा उद्धार कर. आणि अमूल्य अशी आपली बिरुदमाला अमर राहील असें कर. हे श्रीकृष्णे ! तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमते शमिततृष्णे !

ाझ्या उद्धारानें मिळणारें उज्ज्वल यश प्रगट कर. हे माते तुझा जय-
ायकार असो. ।। ३० ।।

मदग्रे त्वं पापी कियानिति चेत्तत्राह—

अर्थः—किती तरी महापापी मीं उद्धरून सद्गतीला नेले, मग माझ्या-
ढें तुझ्या पापांची कथा काय ? असा कसला तूं पापी आहेस ? तुझा
हज उद्धार करीन, तर असें म्हणूं नकोस. मी फारच मोठा पातकी
ाहें. असें सांगतात.

( ३१ )

अन्वयः—हे सरिते ! इह त्वं यदा आविर्भूता (आसीः) ततः
आरभ्य पतिताः अपि विशोध्य (त्वया) उन्नीताः। एभ्यः अधिकतमः
अस्मि ) अतः यदा इमं उद्धर्तुं शक्ता असि ततः उत्तिष्ठ। हे कृष्णे ते
मः। हे गुरुमते शमिततृष्णे जय ।। ३१ ।।

अर्थः—हे कृष्णावेणी ! या भूलोकीं ज्या वेळीं तूं जलरूपानें प्रगट
ालीस, तेव्हांपासून आजपर्यंत जेवढे पातकी उद्धरून सद्गतीला पोंच-
वलेंस, त्या सर्वांपेक्षां मी अतिशय पापी आहें. असा पातकी तूं पाहिलाच
सशील, म्हणून जर निर्दोष ब्रह्मपदाला पोंचविण्यास तूं समर्थ असशील
रच ऊठ. आणि तिथें पोंचवून मला भेदरहित कर. हे श्रीकृष्णे ! तुला
ाझा नमस्कार असो. हे गुरुमते, शमिततृष्णे, माझा उद्धार करून तूं
जयी हो. ।। ३१ ।।

मदुद्धरणकाले सावधानतयोत्तिष्ठेत्याह—

अर्थः—माझ्या उद्धारसमयीं तूं फारच सावधानपणानें ऊठ. गडबड
रून भागणार नाहीं. म्हणून सावधानतेनेंच उठलें पाहिजे असें सांगतात.

( ३२ )

अन्वयः—अयं सामान्यः अस्ति इति मनसि अपि मा स्थापय। हे
ननि ! (ये) समस्ताघौघाः ते मयि सुचिरं तिष्ठन्ति। अतः हे ईश्वरि !
वं परिकरं दृढं बध्वा उत्तिष्ठ। हे कृष्णे, ते नमः। हे गुरुमते, शमित-
ृष्णे ! जय ।। ३२ ।।

अर्थः—हा तुझ्यापुढें निराधार होऊन जो पातकी पडला आहे, तो सामान्य सर्व पातक्यांसारखा आहे असें मनांत देखील आणूं नकोस. कारण हे माते! कायिक, वाचिक मानसिकादि समस्त पातकांचे समुदाय माझ्या ठिकाणीं पुष्कळ जन्मांपासून स्थिर होऊन राहिले आहेत. म्हणून सर्व जगाचें नियमन करणारी तूं माझा उद्धार करण्यासाठीं कमर बांधून आणि सर्व अलंकार सावरून मगच उठ. त्याशिवाय या महापातक्याचा उद्धार करणें शक्य नाहीं. हे श्रीकृष्णे! तुला माझा नमस्कार असो. हे दत्तमान्ये, शमिततृष्णे! माझ्या उद्धारानें तूं विजयी हो. ॥ ३२ ॥

एवमुद्धारणे को लाभः इत्यत आह—

अर्थः—एवढा प्रयत्न करून तुझा उद्धार करण्यांत मला असा कोणता लाभ होणार आहे? तरी हे माते, असें म्हणूं नकोस. माझ्या उद्धारानें तुला फार मोठाच लाभ होणार आहे, असें सांगतात.

( ३३ )

अन्वयः—हे असिते! मम उद्धारेण अद्य त्रिजगति ते सुकीर्तिः भवतु। हे विमले! खलु अतीते काले ईदृक् प्रसङ्गः न अभवत्। ततः अहं असङ्गः ( सन् ) उपरि अभयपदं यास्ये। हे श्रीकृष्णे! ते नमः। हे गुरुमते, शमिततृष्णे! जय ॥ ३३ ॥

अर्थः—हे निर्मलोदके! श्रीकृष्णे! माझ्यासारखा अतिशय पातकी, कायिकादि सर्व पातकें करणारा तूं पाहिलाच नसशील. यासाठीं माझा उद्धार केल्यानें आज तुझी सत्कीर्ति स्वर्ग, मृत्यु, पाताळ तिन्ही लोकांत गाजल्याशिवाय रहाणार नाहीं. तूं सर्व पाप नाश करणारी जरी असलीस, तरी खरोखर पूर्वी माझ्यासारख्या पातक्याचा उद्धार करण्याचा प्रसंग तुला कधींच आला नसेल. यासाठीं मोठाच प्रयत्न करणें तुला भाग पडेल. नंतर मी सर्वसंगरहित होऊन अभयपद—मोक्षपदाला जाईन. मला सद्गति देऊन तूं सद्यश मिळव. हे श्रीकृष्णे! तुला माझा नमस्कार असो. हे शमिततृष्णे, गुरुमते! माझ्या उद्धारानें तुझा जयजयकार होवो. ॥ ३३ ॥

यत एवमतः ।—

अर्थः—असें आहे यासाठीं.

( ३४ )

अन्वयः—अतः हे सकलमलहन्त्रि ! श्रीकृष्णे इह सहसा परमनिजरूपेण प्रादुर्भूत्वा सहसा मम अघाद्रीन् भित्वा हे उशति ! अङ्के मां धृत्वा सहसा मे कृपाक्षीरं देहि । हे कृष्णे, ते नमः । गुरुमते, शमिततृष्णे । जय ।। ३४ ।।

अर्थः—म्हणून सकल पापांचा नाश करणारी तूं एकदम माझ्यापुढें सर्वसुंदर ( " चतुर्बाहु " या पहिल्या मंगल श्लोकांत वर्णिलेल्या ) स्वरूपानें प्रकट हो, आणि वेगानें पातकरूपी पर्वतांचा चुराडा करून हे आई ! मला आपल्या मांडीवर घे. आणि हंसतमुखानें तुझें कृपारूप दुग्ध पाज. हे कृष्णावेणी, तुला माझें नमन असो. हे गुरुमते, शमिततृष्णे, जय ! तुझा उत्कर्ष असो ॥ ३४ ॥

( ३५ )

अन्वयः—( हे मातः ) एतावत् दुरितं त्वयि कुतः आगतम् । इति ( ते ) शंका न अस्तु । यतः अन्यथा सन्तं आत्मानं इतरथा वेद्मि । हि ततः निजात्मस्तेनेन ( मया ) प्रतिपदं अघं किं न विहितम् । ( अपि तु सर्वमेव विहितं अस्ति) हे श्रीकृष्णे ! ते नमः हे गुरुमते, शमिततृष्णे ! जय ।। ३५ ।।

अर्थः—हे भक्ता, एवढीं पातकें तुझ्या ठिकाणीं कोठून आलीं ? हे आई ! अशी शंका मनांत आणूं नकोस. कारण आत्मा त्रिकालाबाधित, मायासंपर्करहित, ज्ञानस्वरूप, अविद्याबंधनरहित, शुद्धस्वरूप, सर्वव्यापी, अकर्ता, अभोक्ता असा असतां याच्या उलट मी कर्ता, मी भोक्ता, असा मी आहें असें मी समजतों. म्हणजे आत्मस्वरूपाच्या विरुद्ध धर्म मानणारा—आत्मस्वरूप चोरणारा मी आहें. मग ज्यानें आत्मस्वरूपाची चोरी केली त्यानें प्रत्येक क्षणीं कोणतें पातक केलें नाहीं ? तर सर्वच पातकें केलीं असें होतें. म्हणूनच सर्व पापें माझ्या ठिकाणीं आहेत. यासाठीं हे

कृष्णे ! त्या सर्वांचा तूं नाश कर. तुला माझें नमन असो. हे गुरुमते, शमिततृष्णे ! तुझा जयजयकार असो. ॥ ३५ ॥

मत्कथनादेव त्वं वेत्सीति न । तथापि सर्वज्ञायास्तेऽग्रे लोकानुसारेण वच्मीत्याह—

**अर्थः**—हे माते ! सर्वज्ञ अशा तुला मी पापी आहें हें सांगण्याचें कारण नाहीं. तथापि लौकिक रीतीनें सांगतों.

( ३६ )

**अन्वयः**—हे अखिलहृदयस्थे ! भगवति ! त्वं साक्षात् समं पश्यसि । ( अतः ) हे श्रीकृष्णे ! त्वदग्रे न हि न हि वक्तव्यं (अस्ति)। तथापि इह प्रभोः अग्रे लोकः वदति । ( अतः ) तदनुसरणं मे शरणं अस्तु । हे गुरुमते शमिततृष्णे जय । ते नमः ॥ ३६ ॥

**अर्थः**—सर्व जीवांच्या हृदयांत वास करणाऱ्या श्रीकृष्णे ! तूं समस्त विश्वाकडे समदृष्टीनें प्रत्यक्ष पाहतेस. म्हणून हे माते ! तुझ्यापुढें खरोखर कांहींच सांगावयास नको. कारण, तूं सर्व जाणतेसच. तरी पण जगांत जसे सामान्य लोक श्रेष्ठ लोकांना आपलें सुखदुःख सांगतात, तसें मीहि तुझ्यापुढें सांगतों. त्याशिवाय गति नाहीं. हे श्रीकृष्णे ! तुला माझें नमन असो. हे गुरुमते, शमिततृष्णे, तुझा जयजयकार असो. ॥ ३६ ॥

ननु जगज्जन्मादिहेतुरात्मा साक्षी नाहमित्यत आह—

**अर्थः**—अहो पण जगाच्या उत्पत्ति, स्थिति आणि लय यांना कारण आत्मा साक्षी आहे. मी कारण नाहीं असें म्हणशील तर तूंच सर्वकारण आहेस, असें सांगतात.

( ३७ )

**अन्वयः**—हे मङ्गलगते ! श्रीकृष्णे ! स्वभूरूपेण त्वं ( विश्वं ) सृजसि। ( च ) हरिधाम्ना अवसि । हरात्मना हंसि । स्वकलया इन्द्राद्याः विभूतीः विसृजसि । लयान्ते सकलं ते कुक्षिं विशति । हे गुरुमते, शमिततृष्णे, जय । ते नमः ॥ ३७ )

अर्थः—हे सुगति देणाऱ्या श्रीकृष्णे! ब्रह्मदेवरूपानें चराचर संपूर्ण-जगत् तूं निर्माण करतेस. आणि विष्णुरूपानें त्या विश्वाचें पालन करतेस व शिवरूपानें त्याचा संहार करतेस आणि आपल्या अंशानें इन्द्रादि देवांनाहि तूंच उत्पन्न करतेस. व त्याचप्रमाणें प्रलयकालीं सर्व विश्व नाम-रूपरहित होऊन तुझ्याच उदरीं लीन होतें. यासाठीं सर्वांना कारण तूंच आत्मा साक्षी आहेस. हे श्रीकृष्णे! तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमते! सर्व वासनांचा नाश करून जीवांना सद्गति देणाऱ्या तुझा जयजयकार असो! ॥ ३७ ॥

(३८)

अन्वयः—हे आभूः स्वतन्त्रे, सन्मन्त्रे, (श्रीकृष्णे!) इह अपि त्वं पापिप्रच्चयमलसंक्षालनपटूदकात्मा अभूः। तदा शापमिषतः सुरगणाः सरितः भूत्वा तव गताः (सन्ति) हे कृष्णे ते नमः। गुरुमते शमिततृष्णे जय ॥ ३८ ॥

अर्थः—हे श्रीकृष्णे! तूं सच्चिदानंदरूप आहेस, म्हणून तुला परतंत्रता, पराधीनता नाहीं. आणि सर्वांना उत्तम गति देणारा प्रभावशाली मंत्रहि तुझ्याजवळ आहे. या लोकीं जेव्हां तूं पापीजनांच्या पातकांचा नाश करणाऱ्या पवित्र उदकरूपानें प्रकट झालीस, तेव्हां ब्रह्मदेवाच्या ज्येष्ठ पत्नीच्या शापाचें निमित्त करून सर्व ब्रह्मादि देव निरनिराळ्या नद्यांचीं रूपें घेऊन तुला येऊन मिळाले. जर ब्रह्मादि देव कोयना, वेणी, इत्यादि नदीरूपानें तुझ्या अति पवित्र जलांत लीन झाले, तर प्रलयकाळीं सर्व विश्व तुझ्या स्वरूपांत लीन होतें, हें सांगण्याची गरजच नाहीं. हे श्रीकृष्णे! तुला माझा नमस्कार असो! हे गुरुमते, शमिततृष्णे! तुझा जयजयकार असो! ॥ ३८ ॥

(३९)

अन्वयः—हे भवति! ते भासा जगति तमोनुत् भास्वान् भवति खलु। हे स्वयंज्योतिः। भं तपनं इव त्वां सः न भासयते इत्। अये! (श्रीकृष्णे!) भातां त्वा अनु द्युमाणिसहितं सकलं (जगत्) भाति। हे श्रीकृष्णे, ते नमः। हे गुरुमते, शमिततृष्णे, जय ॥ ३९ ॥

अर्थः—हे श्रीकृष्णे ! तुझ्याच कांतीनें चंद्र, सूर्य व अग्नि हे प्रकाशित होतात. हे तेजस्विनी माते ! सूर्य जसा नक्षत्रांना प्रकाशित करतो, तसे हे चंद्र, सूर्य व अग्नि हे मात्र तुला प्रकाश देऊं शकत नाहींत. कारण त्यांना तुझ्यापासूनच प्रकाश मिळतो. म्हणून ते सूर्यादि सर्व विश्व प्रकाशित करतात. हे तेजोमय जगन्माते, श्रीकृष्णे, तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमते शमिततृष्णे ! तूं जयशालिनी हो ॥ ३९ ॥

“ सरित इह भूत्वा तव गता ” इति यदुक्तं तदेवोपपादयति ।

अर्थः—ब्रह्मादि देव नद्यांचीं रूपें घेऊन तुला येऊन मिळाले असें जें पूर्वी ३८ श्लोकामध्यें वर्णन केलें, तेंच प्रतिपादन करतात.

( ४० )

अन्वयः—भुवनजयिनः कुसुमगोः ( मदनस्य ) मदोद्धृत्यै यद्दृक् अलम् । गोवाहः गणी असुरसुरवाराद्दतपदः सः ( शिवः ) अपि वेणी भूत्वा परमसालिवत् त्वां सङ्गतः उत ॥ हे श्रीकृष्णे ते नमः । हे गुरुमते शमिततृष्णे जय ॥ ४० ॥

अर्थः—स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तीनहि लोकीं विजयी असलेला पुष्पधन्वा जो मदन त्याचा गर्व दूर करण्यासाठीं ज्याची एकच दृष्टि पुरे झाली, तो वृषभवाहन प्रमथादि गणांसह असणारा आणि ज्याच्या चरणीं देवदैत्य नम्र आहेत असा शंकर वेणीनामक नदीचें रूप घेऊन प्रेमळ मैत्रिणीप्रमाणें तुला येऊन भेटला. मग इतर देव येऊन भेटतील यांत काय आश्चर्य आहे ? हे श्रीकृष्णे ! तुला माझें नमन असो. हे गुरुमते, शमिततृष्णे ! तुझा जयजयकार असो. ॥ ४० ॥

( ४१ )

अन्वयः—हे श्रीकृष्णे ! भुवनरचनाभिज्ञधिषणः स्वयंभूः अयं ब्रह्मा असौ ककुद्मत्याख्या सरित् इह भूत्वा अपि हि सुतवत् सम्मुखं करहाटाख्य-विषये त्वां उ समायातः । हे श्रीकृष्णे ते नमः । गुरुमते, शमिततृष्णे जय ॥ ४१ ॥

अर्थः—हे जगन्माते ! ईश्वरानें ब्रह्मदेवाला निर्माण करून त्याला सृष्टि करण्याविषयीं आज्ञा केली. तो चराचर भौतिक सृष्टि निर्माण

करण्याविषयीं कुशल ब्रह्मदेव देखील " कोयना " नामक नदीरूपानें पुत्र असा आपल्या पित्याला सामोरा येऊन मोठ्या प्रेमानें आलिंगन देतो त्याप्रमाणें कऱ्हाड क्षेत्रीं तुला येऊन भेटला. श्रीकृष्णा व वेणी यांच्या मीलनासारखाच हा प्रीतिसमागम आहे. हे जगदम्ब, श्रीकृष्णे ! तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमते, शमिततृष्णे, माते, तुझा विजय असो ! ॥ ४१ ॥

अतस्तव महिमात्यद्भुत इति स्तुवन्नाह—

**अर्थः**—या साठीं तुझें माहात्म्य अति आश्चर्यकारक आहे. असें स्तुति रूपानें प्रतिपादन करतात.

( ४२ )

**अन्वयः**—हे सति श्रीकृष्णे ! फलदृशः द्विजाः काले काले शुचिषु चतुर्भिः ( अध्वर्युक्तैः ) चतुर्भिः ( आग्नीध्रोक्तैः ) द्वाभ्यां (अध्वर्यूक्ताभ्यां ) पञ्चभिः ( होत्रुक्तैः ) पुनः द्वाभ्यां ( होत्रुक्ताभ्याम् ) जुह्वति । त्वं अखिलं स्नानात् अपि नाकं नयसि । हे श्रीकृष्णे, ते नमः । गुरुमते, शमिततृष्णे ! जय ॥ ४२ ॥

**अर्थः**—हे श्रीकृष्णे ! स्वर्गप्राप्त्यर्थं यजन करावें अशा अर्थवाद-श्रुतींना अनुसरून स्वर्गफलाची इच्छा करणारे ब्राह्मण याग करण्यास योग्यकालीं दक्षिणाग्नि, गार्हपत्य आणि आहवनीय अशा तीन अग्नींमध्यें " ओ ३ श्रावय " अशा अध्वर्यूनें उच्चारलेल्या चार अक्षरांनीं " अस्तु श्रौ ३ षट् " अशा आग्नीध्रानें उच्चारलेल्या चार अक्षरांनीं आणि पुनः " यज " अशा अध्वर्यूनें उच्चारलेल्या दोन अक्षरांनीं व " ये ३ यजामहे " अशा होत्यानें उच्चारलेल्या पांच अक्षरांनीं हवन करतात आणि त्या योगें स्वर्ग मिळवितात. पण यज्ञाला देश, काल, वय, आणि धन इत्यादि साधनापेक्षा आहे. अति प्रयत्न करून सर्व साधनें मिळविलीं आणि याग केले तरीही पुष्कळच दोष निर्माण होतात असें अतिशय कष्टाचें तें काम आहे. पण माते ! तुझ्या पवित्र उदकांत एकवार स्नान करतांच तो स्वर्ग सहजच मिळतो. यासाठीं यज्ञापेक्षां तुझी योग्यता फार मोठी

आहे. हे श्रीकृष्णे, तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमते, शमिततृष्णे, तुझा जयजयकार असो! ॥ ४२ ॥

त्वं साक्षात् ब्रह्मेत्याह—

अर्थः—तूं प्रत्यक्ष परब्रह्म आहेस, असें प्रतिपादन करतात.

( ४३ )

अन्वयः—हे मनोल्हादे ! श्रीकृष्णे ! तव प्रभावः ईदृक् ( वर्तते तेन ) दहनः दहति । पवनः वाति । तपनः भीतः तपति । मृतिः ( मृत्युः ) धावति । वृषा ( भीतः सन् ) वर्षति । ( ये , अन्ये देवाः ते अपि इह नियतं बलिं उज्झन्ति । ते नमः । हे गुरुमते, शमिततृष्णे, जय ॥ ४३ ॥

अर्थः—मनाला आनंद देणाऱ्या हे श्रीकृष्णे ! तुझी शक्ति अशी विलक्षण आहे कीं जीमुळें अग्नि भीतिग्रस्त होऊनच दाह्यपदार्थ जाळतो. वायूही भीतीनेंच वाहतो. भ्यालेला सूर्य आकाशांत तळपतो आणि मृत्युसुद्धां भयानेंच मरणार्ह प्राण्यांना मारतो. देवांचा राजा इन्द्रही भीतियुक्त होऊनच वर्षाव करतो. फार कशाला ! बाकीचे वस्वादि देव देखील सर्वांप्रमाणेंच वेळच्यावेळीं आपआपलीं कार्यें भीतीनेंच करतात. आणि तुझ्या आज्ञा पालन करणें हाच कोणी बली तो तुला अर्पण करतात. हे माते, तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमते, शमिततृष्णे ! तुझा सर्वत्र जयजयकार असो ! ॥ ४३ ॥

अतस्त्वं पापहरणक्षमेत्याह ।

अर्थः—तुझा इतका मोठा प्रभाव आहे यासाठीं तूंच सर्व पातकांचा नाश करण्यास समर्थ आहेस असें सांगतात.

( ४४ )

अन्वयः—हे अनन्ते ! विविधकुकृताद्रिप्रहरणक्षमा ते शक्तिः क । ( च ) त्रिविधं सामान्यं मे पापं क नु । वन्ह्यग्रे विरसबहुशष्पाद्रिवत् ( मम पापं ) हे श्रीकृष्णे, तव अग्रे कियत् । हे गुरुमते शमिततृष्णे, जय । ते नमः ॥ ४४ ॥

**अर्थः**—हे ब्रह्मस्वरूपिणी श्रीकृष्णे ! नानाविध पातकरूप पर्वतांचा नाश करणारे तुझें सामर्थ्य कोणीकडे आणि सामान्य कायिकादि त्रिविध पापें कोणीकडे ? हे माते ! अग्नीपुढें जशी वाळलेल्या तृणांची गंजी तशी माझीं पातकें तुझ्यापुढें कितीशीं टिकून राहतील ! हे जगज्जननि ! माझ्या सर्व पापांचा नाश कर. हे गुरुमते, शमिततृष्णे,तुझा उत्कर्ष असो, तुला माझा नमस्कार असो ! ॥ ४४ ॥

अपि च—

**अर्थः**—आणखीही श्रीकृष्णेचा प्रभाव वर्णन करतात.

( ४५ )

**अन्वयः**—यदघहरणाय कृच्छ्राद्याः अपि शक्ताः न ( बभूवुः ) च बहुशः हवनजपनाद्यं प्रायश्चित्तं क्षमं न अभूत् । हे कृष्णे ! सः ( पापी ) त्वत्स्नानात् सुशुचिः सन् दिवं व्रजति । अहो श्रीकृष्णे, ते नमः । हे गुरुमते, शमिततृष्णे जय ॥ ४५ ॥

**अर्थः**— हे श्रीकृष्णे ! ज्याचीं पातकें प्राजापत्यादि कृच्छ्रें, चान्द्रायणादि व्रतें, नानाप्रकारचे तिलादिहोम, गायत्र्यादिजप, गंगा, पुष्करादि तीर्थ-स्नानें हीं देखील नाश करूं शकत नाहींत, तो पातकी एक वेळच तुझ्या स्नानानें पापमुक्त होऊन सद्गतीला जातो. हे कृष्णे, तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमते, शमिततृष्णे ! तुझा जयजयकार असो ! ॥ ४५ ॥

( ४६ )

**अन्वयः**—हे कृष्णे ! कुसङ्गान्यार्त्यर्थापहरणमुखं कायिकं ( मम ) अघं हर ( च ) इज्यार्योन्निन्दाकदशनमुखं वाचिकं ( मम ) अघं ( हर च ) कुचिन्तान्यानर्थस्मरणमुखरं मानसं ( मम ) अघं ( हर ) । हे गुरुमते शमिततृष्णे ! जय । ते नमः ॥ ४६ ॥

**अर्थः**—हे कृष्णावेणी ! दुष्टसंगति, दुसऱ्याला दुःख देणें, लोकांचें द्रव्य चोरणें इत्यादि देहानें केलेलें माझें पाप तूं दूर कर. आणि पूज्य जे देवादि व सज्जन यांची निंदा, दोषी अन्न सेवन करणें इत्यादि वाणीनें केलेलें माझें पाप तूं दूर कर, आणि वाईट विषयांचें चिंतन व दुसऱ्याचें

वामांगो वृषजूकभो गृहचरः स्याद्वर्तमानोऽस्य व-
र्देवस्तत्पुरुषो ह्युदानपवनः पृष्ठांगकः कुक्कुटः ॥ ७ ॥

अन्वयः—कुक्कुटः वातोदक्स्थविरासितांघ्रिजसुरेट् पंचर्क्षकाकारियुक्, पक्षीजीवशिफान्वितश्च, मिथुनी, रिक्तान्वितः शुक्रयुक्, वामांगो, वृषजूकभो, गृहचरः अस्य वैः वर्तमानकालः देवस्तत्पुरुषो, ह्युदानपवनः; पृष्ठांगकः कुक्कुटः ॥

अर्थः—४ कुक्कुट पक्ष्याचे वायु हें तत्त्व आहे. उत्तर व ईशान्य ह्या दिशा, वृद्ध ( ४१–७० वर्षें ) ही अवस्था; काळा हा रंग; शूद्र हा वर्ण; ज्येष्ठा, मूल, पूर्वाषाढ, उत्तराषाढा व श्रवण हीं नक्षत्रें; श्येनपक्षी पिंगलपक्षी व मयूरपक्षी हे मित्र; काकपक्षी हा शत्रु; पक्षी ही जाति; जीव ही मूलचिंता; पुरुष व स्त्री हीं लिंगें; चतुर्थी, नवमी व चतुर्दशी ह्या तिथि; शुक्रवार हा वार; डावी बाजू हें अंग; वृषभ व तूळ हीं लग्नें; गृहामध्यें संचार; सांप्रतची स्थिति दाखविणें हा काल; तत्पुरुषाय विद्महे हा मंत्र; उदान हा वायु; पृष्ठभाग हा अवयव आहे.

मयूरस्य शिखरिण्याऽऽह—

मयूरपक्ष्याचे गुण शिखरिणीवृत्तानें सांगतात.

खमध्यस्थः प्रेतोऽधमकुलधवश्चित्रिततनुः ।
द्विषच्छ्येनारिष्टो वसुमुखभयुक् क्लीबशनियुक् ॥
समूलोदृग्व्यंघ्रिः स्यान्मृगघटभपूर्णो पदबली ।
समानी वामांगी गतसमयवित्सेश्वर शिखी ॥ ८ ॥

अन्वयः—शिखी खमध्यस्थः, प्रेतः अधमकुलभवश्चित्रिततनुः द्विषच्छ्येनारिष्टः, वसुमुखभयुक् क्लीबशनियुक् समूलो दृग्व्यंघ्रिः स्यान्मृग घटभपूर्णोः, पदबली, समानी वामांगी गतसमयवित्सेश्वरः ॥ ८ ॥

अर्थः—मयूरपक्ष्याचें आकाश हें तत्त्व आहे. शरीराचा मध्यभाग हा अवयव; मरण ही अवस्था; संकर हा वर्ण; चित्रविचित्र कांति; पिंगल पक्षी व कुक्कुटपक्षी हे मित्र; श्येन पक्षी व काक पक्षी हे शत्रु; धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा व रेवती हीं नक्षत्रें; नपुंसक हें

लिंग; शनिवार हा वार; मूल ही चिंता; द्विपाद ही जाति; मकर व कुंभ हीं लग्नें, पंचमी, दशमी, पौर्णिमा व अमावास्या ह्या तिथि, नाभीच्या खालचा भाग बळकट; समान हा वायु; डावी बाजू हें अंग; मागील स्थिति दाखवणें हा काल; ईशानः सर्वविद्यानां हा मंत्र. ।। ८ ।।

याप्रमाणें संज्ञाध्याय समाप्त झाला.

## अध्याय दुसरा

अथ बलानयनाध्यायो व्याख्यायते । तावद् बलसाधनं स्रग्धरयाऽऽह–

पञ्चाप्तैकोत्तराङ्का शिखिनिशिचरताम्राद्यकाकौज–
आद्यं । त्र्यंशार्ध्याऽर्यादि दिग्जं तिथिदिनभमजं–
स्वादिचेष्टासु यद्वत् ।। स्वाद्यङ्गेऽप्येवमेव दृश इह
हरिवत्स्वस्तृतीये दृगाद्येऽन्ह्यन्त्ये । रात्रावकाद्या–
विङ्ञण लघवोऽन्यत्र दीर्घा घपूर्वे ।। ९ ।।

अन्वयः––पंचाप्तैकोत्तराङ्काः आद्यं शिखिनिशिचरताम्राद्यकाकौजः, १ त्र्यंशार्ध्या अर्यादि दिग्जं (बलं) २ त्र्यंशार्ध्या तिथिदिनभमजं ( काकबलं) ३ तद्वत् चेष्टासु ( बलं ) ४ स्वाद्यंगेऽपि एवं ( बलं ) ( ५ ) इह हरिवत् स्वस्तृतीये दृक् दृशः ( बलं ) ६ आद्ये ( शुक्लपक्षे ) अन्हि, अंत्ये (कृष्ण पक्षे ) रात्रौ विङ्ञणः लघवः, अन्यत्र घपूर्वे दीर्घाः ।। ९ ।।

अर्थः—१, २, ३, ४, ५ या आंकड्यांना ५ नें भागावें आणि जो भागाकार येईल, त्या प्रमाणांत मयूर कुक्कुट, श्येन, पिंगल आणि काक यांचे अनुक्रमानें नैसर्गिक बल असतें. आर्धी पक्षी, मित्र पक्षी आणि स्वतः यांचें दिग्बल अनुक्रमानें १।३, २।३, आणि १ असें असतें. तिथि, वार, नक्षत्र, लग्न यांच्यावरून कालबल बघतात. शत्रूच्या तिथि, वार, नक्षत्र, लग्नाचें कालबल १।३. मित्राच्या तिथ्यादींचें बल २।३ आणि स्वतःच्या तिथ्यादींचें बल संपूर्ण. त्याच्या चेष्टाबलाविषयीं असेंच समजावें, आणि या शास्त्रामध्यें दृष्टिफल याप्रमाणेंच समजावें. तसेंच अंगाविषयींहि याप्रमाणेंच समजावें. पण ती दृष्टि सिंहाप्रमाणें आपल्या मागच्या तिसऱ्या पक्षावर असते. शुक्लपक्षामध्यें दिवसां आणि कृष्णपक्षामध्यें रात्रीं अपासूनचे स्वर

आणि ञ, ङ, ण सोडून क पासून ह पर्यंतची व्यंजनें लघु स्वरयुक्त क्रमानें श्येनादिपक्ष्यांची असतात. आणि इतर वेळीं घ पासून ह पर्यंतचीं व्यंजनें दीर्घस्वरयुक्त असतात.

एतत्खगेहया नानाफलं तन्न बलं विना ॥
य: स्वात्मनि बलं युञ्ज्यात् स पूज्यः सर्वविद्भवेत् ॥ १० ॥

टीप---स्पष्टार्थमनुष्टुप् पद्यम्। इति बलाध्यायो द्वितीयः ॥

अन्वयः—एतत् खगेहया नानाफलं तत् बलं विना न (अतः) यः स्वात्मनि बलं युञ्ज्यात् स पूज्यः सर्वविच्च भवेत् ॥ १० ॥

अर्थ:---हें श्येनादिपक्ष्यांच्या इच्छेनें प्राप्त होणारें नानाप्रकारचें फल बलवान् पक्ष्याच्या स्वाधीन आहे. याकरितां जो प्रश्नवेत्ता प्रश्नगत बलाचा विचार करून फल सांगेल, तो लोकांमध्यें पूज्य होऊन सर्वज्ञ होईल. हा श्लोक अनुष्टुप् वृत्ताचा आहे. ॥ १० ॥

## अध्याय तिसरा

### अंशानयन

अंश कसा आणावा तें शिखरिणी वृत्तानें सांगतात.

अथांशनयनाध्यायो विचार्यते। अंशनयनं तावच्छिखरिण्याऽऽह--

स्वरार्णांशाङ्गर्क्षान्यतमजतिथिव्यन्यतरसं-
भवव्योर्यः शूरो भवति हृदवस्थोदितफलम् ॥
भुजिर्यात्राराज्यं शयनमरणेऽन्हः शरलवे
सितेऽन्ह्यन्त्ये रात्रौ सममितरथाऽन्यत्र गदितम् ॥ ११ ॥

अन्वयः–स्वरार्णांशांगर्क्षान्यतमजतिथिव्यन्यतरसंभवव्योः यः शूरः भवति तदवस्थोदितफलं (वाच्यं) सिते अन्हि अंत्ये रात्रौ च अन्हः शरलवे भुजिः यात्रा राज्यं शयनमरणे समं गदितम्। अन्यत्र इतरथा गदितं ॥ ११ ॥

अर्थ:—पूर्वी स्वर अथवा वर्ण यांच्यावरून प्रश्नपक्षी ठरवावा असें सांगितलें आहे. परंतु कांहीं कारणानें जर स्वर किंवा वर्ण यांचें ज्ञान झालें नाहीं तर दिक्पक्षी घ्यावा. कदाचित् दिशेचेंही जर सम्यक् ज्ञान

झालें नाहीं तर लग्नपक्षी घ्यावा. पण त्याचाही संशय असेल तर नक्षत्र-पक्षी घेऊन प्रश्नपक्षी निश्चित करावा.

तदनंतर तात्कालिक तिथीचा पक्षी घ्यावा. याप्रमाणें जे दोन पक्षी सिद्ध झाले, त्या दोघांची पूर्वी सांगितलेल्या रीतीप्रमाणें निसर्गादि सहा बलें पाहून त्यांत जो बलवान् पक्षी असेल त्याच्या अवस्थेवरून फल सांगावें असें सम्प्रदायवेत्त्यांनीं सांगितलें आहे.

दिनमानाचे ५ भाग करावे.

शुक्ल पक्षामध्यें दिवसास व कृष्ण पक्षामध्यें रात्रौ पहिल्या पंचमांशांत भोजनावस्था, दुसऱ्या पंचमांशांत गमनावस्था, तिसऱ्या पंचमांशांत राज्यावस्था व चौथ्या पंचमांशांत निद्रावस्था व पांचव्या पंचमांशांत मरणावस्था अशा अनुक्रमें श्येन, पिंगल, कावळा, कोंबडा व मोर या पक्ष्यांच्या अवस्था असतात.

याप्रमाणें दिनमानानुरोधानें रोजच्या रोज पक्ष्यांच्या अवस्था जाणून त्या त्या अवस्थेप्रमाणें फल सांगावें ।। ११

| शुक्ल पक्षांत दिवसाच्या व कृष्ण पक्षांत रात्रीच्या अवस्था | कृष्ण पक्षांत दिवसाच्या व शुक्ल पक्षांत रात्रीच्या अवस्था |
|---|---|
| घ. ० ते ६ पर्यंत भोजन | घ. ० ते ६ पर्यंत मरण |
| ,, ६ ते १२ पर्यंत यात्रा | ,, ६ ते १२ पर्यंत शयन |
| ,, १२ ते १८ पर्यंत राज्यं | ,, १२ ते १८ ,, राज्यं |
| ,, १८ ते २४ ,, शयनं | ,, १८ ते २४ ,, यात्रा |
| ,, २४ ते ३० पर्यंत मरण | ,, २४ ते ३० पर्यंत भोजन |

रव्यादिवारेषु अंशक्रममाह स्रग्धरया—

स्वांशे प्राक्पंचभक्ते स्वफलमितरवेः स्यात्क्रमाच्छयेनपिंगौ ।
काकस्ताम्रः शिखी स्वाग्रत इतर लवेज्ञेयमेवं पुनश्च ।
सूर्यारे चंद्रसौम्ये गुरुकविशनिषु ताम्रकाकौ च पिंगः
श्येनः केकी च चन्द्रार्कजफलसमता प्राग्वदन्यच्च कृष्णे ।।१२।।

अन्वय—पंचभक्ते स्वांशे प्राक् स्वफलं, ततः इतरवेः क्रमात् ( फलं ) स्यात् (क्रमस्तु) श्येनापिंगौ, काकः, ताम्रः, शिखी (च) पुनः इतरलवे एव- ज्ञेयं सूर्यारे चंद्रसौम्ये गुरुकविशनिषु (शुक्ले दिवा कृष्णे रात्रौ च.) श्येनादि- क्रमः ज्ञेयः (कृष्णे दिवा शुक्ले रात्रौ च) सूर्यारे ताम्रः, सौम्ये काकः गुरु- कविशनिषु चंद्रे पिंगः श्येनः केकी च कृष्णे चंद्रार्कजफलसमत्ता अन्यत- प्राग्वत ।। १२ ।।

इत्यंशानयनाध्यायस्तृतीयः ।।

अर्थः—पूर्वीच्या श्लोकांत सर्व पक्ष्यांच्या साधारण अवस्था सांगित- लेल्या आहेत. परंतु त्याचा वारानुरोधानें व अंशानुरोधानें क्रम सांगितलेला नाहीं. सबब तो क्रम येथें सांगतात.

दिनमानाच्या पंचमांशाचे पुनः ५ भाग करावे, आणि त्यामध्यें वाराच्या अनुरोधानें क्रमाक्रमानें सर्व पक्ष्यांच्या स्थिति जाणाव्या.

रविवारीं श्येनापासून, सोमवारीं पिंगलेपासून व मंगळवारीं श्येनापासून, बुधवारीं पिंगलेपासून, गुरुवारीं कावळ्यापासून, शुक्रवारीं कुक्कुटापासून व शनिवारीं मयूरापासून प्रारंभ शुक्लपक्षांत दिवसाचा व कृष्णपक्षांत रात्रीचा आहे. श्येन, पिंगल, काक, कुक्कुट आणि मयूर असा पक्षांचा क्रम आहे. करितां प्रारंभीं जो पक्षी आहे त्याच्या पुढील पक्षी क्रमानें समजावें. कृष्ण पक्षांत दिवसाचा व शूक्ल पक्षांत रात्रींचा रविवारीं व मंगळवारीं कुक्कुटा- पासून, बुधवारीं कावळ्यापासून, गुरुवारीं पिंगलेपासून, शुक्रवारीं श्येना- पासून व सोमवारीं आणि शनिवारीं मयुरापासून प्रारंभ होतो. ।। १२ ।।

## अध्याय चौथा

अथ फलाध्यायो व्याख्यायते

श्रीराज्यस्वर्घनष्टाप्तिजयहितसमृदद्धयर्थलाभप्रसादा-
रोग्येक्षासिद्धिमोक्षोपशमशिव सुवृष्टिर्भुजीत्योस्तदन्यत् ।।
भीनष्टाज्यागमेतिक्षयगद कपटाद्यन्नसुप्तौ मृतौ च
व्यस्तंप्राप्तिर्गतौ चापि च युवतिसुखं स्थैर्यमल्वांबुराज्ये ।।१३।।

अन्वयः—भुजीत्योः श्रीराज्यस्वर्घनष्टाप्तीजयहितसमृद्धयर्थलाभ प्रसादा- रोग्येक्षासिद्धिमोक्षोपशमशिवसुवृष्टिः ( स्यात् ) तदन्यत भीनष्टा

ज्यागमेतिक्षयगदकपटाद्यं न ( स्यात् ) सुप्तौ मृतौ च व्यस्तं गतौ प्राप्तिः।
राज्ये युवतिसुखं स्थैर्यं अल्पांबु च ॥ १३ ॥

**अर्थः**—ज्या बलवान् पक्ष्यावरून फल सांगावयाचें तो पक्षी जर भोजनावस्थेंत किंवा गमनावस्थेंत असेल तर संपत्ति, राज्य किंवा अधिकार धान्यादिकांची समर्घता ( सवंगाई ), नष्ट झालेल्या वस्तूचा लाभ, चालू असलेल्या वादांत किंवा कलहांत जय, सुरू असलेल्या औषधानें गुण येणें, धनधान्याची समृद्धि होणें, अभिलाष केलेल्या अर्थाची प्राप्ति, आराधन केलेल्या अधिकाऱ्याचा अथवा देवाचा प्रसाद, उत्पन्न झालेल्या रोगांचा नाश, दूर असलेल्या पतिपुत्रादिकांची भेट, हातीं घेतलेलें कार्य सिद्ध होणें, कारागृहांतून अथवा संसारांतून मुक्तता, गांवांत अथवा शहरांत उद्भवलेल्या सांथीच्या रोगाची शांति, सुखाचे दिवस येणें किंवा मांगलिक कर्म होणें, शेतकरी लोकांना आनंद देणारी वृष्टि होणें, अशीं फलें प्राप्त होतील. याबांचून अन्य प्रकारचे प्रश्न असून जर भोजनावस्थेंत किंवा गमनावस्थेंत पक्षी असेल, तर फलप्राप्ति होणार नाहीं. व भय, नष्ट वस्तू, कलह, दूर देशीं असलेला येणें, ग्रामांतरीं गमन, हानि, रोगांची उत्पत्ति, कपट कर्म, जारण, मारण हींही होणार नाहींत. याप्रमाणें भोजनावस्थेंत किंवा गमनावस्थेंत असलेल्या पक्ष्याचें फल आहे. तो पक्षी जर मृतावस्थेंत किंवा निद्रावस्थेंत असेल तर संपत्त्यादि सर्व फलें विपरीत होतील.

दूरदेशीं असलेल्याच्या येण्यासंबंधीं प्रश्न असून पक्षी गमनावस्थेंत असेल तर मात्र तो किंवा त्याची वार्ता लवकर येईल हें विशेष लक्षांत ठेवा.

जेव्हां राज्यावस्थेंत पक्षी असतो, तेव्हां विवाहयोग, स्त्रीसौख्य धान्यादि पदार्थांचे दर स्थिर राहणें व कुठें कुठें पर्जन्यवृष्टि होईल आणि इतर संपत्त्यादि फलें गमनावस्थेंतील फलाप्रमाणें राज्यावस्थेंतही जाणावीं.

अथ भोजनादौ श्येनादीनामवस्थां स्रग्धरयाऽऽह—

भोजनादिविषयीं श्येनादि पक्ष्यांच्या अवस्था स्रग्धरावृत्तानें सांगतात.

भुक्त्याद्येऽभासनेतिस्थितिशयनलय ग्रामिकाको वनेऽन्ये।
ताम्रो गेही नृवत्स्त्री सुतयुतशिखिताम्रो च काकोऽप्रजः स्वा ॥

स्वाणांशैक्ये सुभोज्यं स्वहित इतरथा सद्गमाद्यूह्यमेवं ।
स्वाणांत्यौ तोकदौ स्तोन करट इतरो यत्नतो लिंगमंशात् ॥१४॥

अन्वय—अत्र भुक्त्याद्ये आसनेतिस्थितिशयनलयाः, ग्रामिकाकः ताम्रः गेही, अन्ये वने, नृवत्स्त्री, सुतयुतशिखिताम्रौ, अप्रजः काकः स्वाणांशैक्ये स्वा. स्वहिते सुभोज्यं, इतरथा असत्. एवं गमादि ऊह्यं. स्वाणांत्यौ तोकदौ स्तः करटः न इतरो यत्नतः अंशात् लिंगं ॥१४॥

अर्थः—अमुक गृहस्थ या वेळीं काय करीत आहे ? असा प्रश्न असतां पक्षी भोजनावस्थेंत असेल तर बसलेला आहे, गमनावस्थेंत असेल तर फिरत आहे, राज्यावस्थेंत असेल तर अधिकारावर आहे, शयनावस्थेंत असेल तर शय्येवर किंवा गादीवर बसलेला आहे. आणि तो पक्षी मृतावस्थेंत असेल तर तो गृहस्थ निद्रासुखांत मग्न आहे असें समजावें.

काकपक्षी गांवांत, कोंबडा घरांत, व श्येन, पिंगल आणि मोर हे पक्षी नेहमीं अरण्यांत राहतात. याचा उपयोग चोरादिकांच्या ज्ञानाकरितां आहे.

चोरी करणाऱ्या पुरुषाच्या व स्त्रियांच्या वयादिकांचें ज्ञान, चोरीबद्दलचा प्रश्न श्येनपक्ष्याच्या अंशावर झाला असेल, तर कुमारावस्था व वयोमान व. ८, पिंगलांशावर झाला असेल तर किशोर अवस्था असून वय वर्षे १६, काक पक्ष्याच्या अंशावर प्रश्न असतां तरुण अवस्था असून वयोमान वर्षे ४०, कुक्कुटावर प्रश्नअसेल तर वृद्धावस्था व वर्षे ६० आणि मयूराचा अंश प्रश्नकालीं असेल तर अतिवृद्धावस्था, वय वर्षे ७५ आहेत. मयूर किंवा कुक्कुट या पक्ष्यांचा अंश असेल तर तस्कर पुत्रयुक्त आहेत. काकपक्ष्याचा अंश असल्यास तस्करास संतति नाहीं. श्येनांशीं अल्प आणि पिंगलांशीं अल्प प्रजा असेल, नामपक्षी, स्वरपक्षी व तात्कालिकांशपक्षी हे तीनहि एकच पक्षी असतील अथवा या तिघांपैकीं कोणतेहि दोन पक्षी एक असतील तर तस्कर स्वकुलांतला अथवा स्वजातींतील आहे. चोरी करणारी स्त्री असेल तर तिलाहि वरील सर्व विशेषणें लागू आहेत.

भोजनविषयक प्रश्न असेल तर तात्कालिकांश पक्षी व बलवान् पक्षी एकच असल्यास सुभोजन मिळेल व तात्कालिकांश पक्षी बलवान् पक्षाचा मित्र असल्यास मोठ्या आदरपूर्वक मिष्टान्न प्राप्त होईल. परंतु त्याच्या उलट म्हणजे तात्कालिकांश पक्षी बलवान् पक्षाचा शत्रू असेल तर कटु व तिक्त पदार्थयुक्त आणि परिणामी दोषकारक असें अन्न मिळेल.

याप्रमाणें गमनाबद्दल प्रश्न असतांहि जाणावें.

संततीसंबंधानें प्रश्न असेल तर स्वरपक्षी व तात्कालिकांश पक्षी हे दोन्ही एकच असून ते कुक्कुट किंवा मयूर असतील तर संततीची प्राप्ती होईल. जर काकपक्षी असेल तर संतति होणार नाहीं व ते पिंगल किंवा श्येन पक्षी असतील तर आदित्यव्रत, भौमव्रत, संतानगोपाळमंत्रजप, पालकदान, हरिवंशश्रवण, नागबली, नारायणबली इत्यादि धर्मानुष्ठान-रूपयज्ञ केल्यास संतति होईल असें समजावें.

गर्भिणीस मुलगा किंवा मुलगी होईल असा प्रश्न केल्यास तात्कालिक पक्ष्यांच्या लिंगावरून जाणावें ॥ १४ ॥

युद्धकलहादौ संधिज्ञानमाह—

युद्ध व कलह इत्यादिकांमध्यें जय किंवा अपजय होईल तें मंदाक्रांता वृत्तानें सांगतात.

संधिः स्वांशौ यदि युधि हितौ चेद्रिपून्यूनभंगो ।
राज्यस्थैर्यं बलिनि भुजि राज्येंऽत्यसुप्त्योस्तु हानिः ॥
भुक्तौ शूरे बलिहितलवेऽप्यन्नवस्त्रादिवृद्धि-
र्व्यापारेऽपि प्रवसतिषु सद्राज्यगत्योस्तथैव ॥ १५ ॥

**अन्वयः**—यदि हितौ स्वांशौ ( तर्हि ) युधि संधिः ( स्वात् ) रिपू चेत् न्यूनभंगः ( स्यात् ) राज्ये ( प्रश्ने ) बलिनि भुजि राज्यस्थैर्यः अंत्यसुप्त्योस्तु हानिः । भुक्तौ शूरे बलिहितलवेऽपि अन्नवस्त्रादिवृद्धिः । व्यापारे प्रवसतिषु राज्यगत्यौः तथैव ( वाच्यं ) ॥ १५ ॥

**अर्थः**—युद्धविषयक किंवा तंट्यासंबंधीं प्रश्न असल्यास बलवान् पक्षी व तात्कालांशपक्षी हे जर परस्परांचे मित्र असतील तर तडजोड होऊन

संधि होईल, व ते पक्षी जर परस्परांचे शत्रु असतील तर तत्कालिकांश पक्ष्याचें निसर्गादि षड्बल पाहून त्यांत बलवान पक्ष्याचें बल कमी असतां स्वपक्षाचा पराजय आणि अंशपक्ष्याचें बल कमी असतां शत्रुपक्षाचा पराजय होईल.

राज्यासंबंधीं प्रश्न असल्यास बलवान् पक्षी भोजनावस्थेंत अथवा राज्यावस्थेंत असेल तर राज्य बहुत कालपर्यंत चालेल व तो पक्षी शयना-वस्थेंत अथवा मरणावस्थेंत असेल तर राज्यास अपाय होईल. गमनावस्थेंत तो पक्षी असेल तर अपाय होण्याचा संभव आहे असें समजावें.

अन्नवस्त्रासंबंधीं प्रश्न असतां बलिष्ठ पक्षी भोजनावस्थेंत असेल किंवा मित्रांशांत असेल तर अन्नवस्त्राची प्राप्ति होईल.

व्यापारासंबंधीं प्रश्न असेल तर बलिष्ठ पक्षी राज्यावस्थेंत असतां व प्रवासाविषयीं प्रश्न असल्यास बलिष्ठ पक्षी गमनावस्थेंत असतां अनुक्रमें व्यापार चांगला चालेल व प्रवास सुखकारक होईल असें समजावें.

चौर्यंशानं मदाक्रांतयाऽऽह—

चोरी करणारा पुरुष आहे किंवा स्त्री आहे व त्याचें वय किती आहे वगैरे मन्दाक्रांता वृत्तानें सांगतात.

चौर्येंशाद्दिग्धनसमयहृज्जात्यवस्थादि वाच्यं ।
निद्रान्तांशेऽर्पितहृतगतद्रव्यवार्तापि नैव ॥
लाभोऽन्यांशे बलिनि चपलं कृच्छ्रतो दुर्बलेंऽभो-
वृद्धिः कूपादिषु जलखगात्तापवातौ तदंशात् ॥ १६ ॥

**अन्वयः**—चौर्ये (प्रश्न) अंशात् दिग्धनसमयहृज्जात्यवस्थादि वाच्यम् । निद्रान्तांशे अर्पितहृतगतद्रव्यवार्ता अपि नैव । अन्यांशे बलिनि चपलं लाभः दुर्बले अंशे कृच्छ्रता. जलखगात् कूपादिषु अंभोवृद्धिः तदंशात्तापवातौ ॥ १६ ॥

**अर्थ**:—चोरीसंबंधीं प्रश्न असल्यास तात्कालिकांशावरून दिशा, धातु-मूलादिधन, काल, चोराची जात व चोराची अवस्था ही पाहावी.

व्यापारासाठीं दिलेलें द्रव्य, चोरानें पळविलेला माल व सांडलेल्या

वस्तु यांसंबंधीं प्रश्न असतां तत्कालांश पक्षी जर निद्रावस्थेंत किंवा मरणावस्थेंत असेल तर त्या त्या वस्तूंच्या प्राप्तीबद्दल वार्तासुद्धां मिळावयाची नाहीं व जर तो पक्षी भोजनावस्थेंत, गमनावस्थेंत किंवा राज्यावस्थेंत असेल तर त्या त्या वस्तु शीघ्र प्राप्त होतील, आणि बलवान् पक्षी जर दुर्बल पक्ष्याच्या अंशामध्यें असेल तर मोठ्या दैविक व व्यावहारिक प्रयत्नानें मिळतील असें समजावें.

भूमिगत पाण्यासंबंधानें प्रश्न असला तर तात्कालिकांश पक्षी पिंगल असून तो बलिष्ठ असतां विहिरींत व तलावांत विपुल पाणी मिळेल. तात्कालिकांश काकपक्षी असल्यास उष्णता उन्हाळे होतील आणि कुक्कुटांश असल्यास वारा पुष्कळ सुटेल.

वृष्टिज्ञानं शिखरिण्याऽऽह--

वृष्टीचें ज्ञान, कुटुंबयोग व सौख्य वगैरे शिखरिणी वृत्तानें सांगतात.

बली स्वशः पिंगो यदि शशिबुधाहेऽनरिलवेऽ
प्यकाले सद्वृष्टिर्बलिभुजि तडित्सस्यविलयः ।
नृणां ताम्रे पिंगे निजदिनगते स्त्रीसुखमत-
श्चतुष्पाद्वृद्धिः स्याद् द्विजनृपलवात्तीर्थ सुकृतम् ॥ १७ ॥

अन्वयः--शशिबुधाहे यदि अनरिलवे बली स्वंशः पिंगः ( तर्हि ) अकाले अपि सद्वृष्टिः । बलिभुजि तडित् सस्यविलयः च । निजदिनगते ताम्रे पिंगे च नृणां स्त्रीसुखं । अतः चतुष्पाद् वृद्धिः च । निजनृपलवात् तीर्थ सुकृतं स्यात् ॥ १७ ॥

अर्थः--प्रश्न वृष्टीसंबंधीं असेल तर त्या वेळीं पिंगल पक्षी बलिष्ठ असून शुभांशांत आणि मित्रांशांत असेल व प्रश्न चंद्रवारीं अथवा बुधवारीं केलेला असेल, तर पर्जन्याचा काल नसतांही उत्तम वृष्टि होईल. असें जर आहे तर पर्जन्यकालाचा हंगाम असतां चांगली वृष्टि होईल हें निराळें सांगावयास नकोच.

प्रश्नाचा पक्षी कावळा असून तो बलवान् आहे तर विजांचा चकचकाट होईल आणि धान्याचा नाश होईल.

स्त्रीसौख्य व विवाह याबद्दलचा प्रश्न असेल तेव्हां कुक्कुट किंवा पिंगल पक्ष्यांचे तत्कालांश असून प्रश्न केलेला वार हा त्याच पक्ष्यांचा आहे तर स्त्रियांपासून सौख्य आणि विवाहाचा योग आहे असें समजावें, व असाच योग पशूंसंबंधाच्या प्रश्नांत असल्यास पशूही पुष्कळ होतील असें जाणावें. तर ब्राह्मण अथवा क्षत्रिय वर्ण ज्या पक्ष्याचे आहेत, त्या पक्ष्याचे तत्कालांश असतील तर तीर्थयात्रा व पुण्यकारक कर्मे घडतील.

दोषज्ञानं शालिन्याऽऽह—

संतति न होण्यास कोणता दोष व त्याचा परिहार काय वगैरे शालिनी वृत्तानें सांगतात.

नरपितृसुरदैवप्रेतदोषाः क्रमात्स्युः ।
शमभुजिनतिजप्याहारजय्याः शुभांशे ॥
सुमनसितचणाख्या शालिमाषौ गुडो गो- ।
रसमधुसिततैलं श्येनतो वृद्धिमेति ॥ १८ ॥

अन्वयः—शुभांशे नरपितृसुरदैवप्रेतदोषाः क्रमात् शमभुजिनति जप्याहारजय्याः स्युः । श्येनतः सुमनसितचणाख्या शालिमाषौ (तथा) गुडः गोरसमधुसिततैलं वृद्धिम् एति ॥ १८ ॥

अर्थः—संततिविषयक प्रश्नामध्यें तत्कालांश पक्षी श्येन असतां अहित कर्त्या मनुष्यांनीं जारणमारणादि प्रयोग केल्यानें पीडा; पिंगल असतां पितरांच्या क्षोभानें पीडा, काक असेल तर कुलदेवतेच्या रोषानें पीडा, कुक्कुट असल्यास प्रारब्धभोगामुळें पीडा व मयूरांश असेल तर भूत, प्रेत, पिशाच्च इत्यादिकांपासून पीडा आहे असें समजावें. या क्लेशांतून मुक्त होऊन सुखप्राप्ति व्हावी अशी इच्छा असेल त्यानें जारणमारण दोष परिहारार्थ ग्रहयज्ञ, चंडीपाठ हीं करावीं. पितरांच्या क्षोभाची शांति होण्याकरितां ब्राह्मणभोजन करावें. कुलदेवतेचा रोष दूर होण्याकरितां श्रीसूक्ताचा जप, रुद्राभिषेक, महापूजा, सप्तशतीपाठ करावे. प्रारब्धभोग टळण्यासाठीं व उत्पन्न झालेल्या रोगाकरितां कर्मविपाक ग्रंथामध्यें सांगितलेलें विधान किंवा विष्णुसहस्रनामजप करावा.

भूत-प्रेतदोषनिवारणार्थ बलिदान, नारायणबलि, सर्पबलि, त्रिपिंडी-श्राद्ध, विष्णुतर्पण करावें, म्हणजे ते दोष नाहींसे होतील.

या वर्षी कोणत्या जातीचें धान्य पुष्कळ पिकेल व कोणत्या रसाची वाढ होईल असा प्रश्न असल्यास तत्कालांश पक्षी श्येन असेल, तर गहूं, पिंगल असेल तर साखर, काक असेल तर हरभरे, कुक्कुट असेल तर साळी व मयूर असेल तर उडीद हीं धान्यें पुष्कळ पिकतील. तसेंच तत्कालांश पक्षी श्येन असेल तर गूळ, पिंगल असेल तर गोरस, (दूध, दहीं, नवनीत), काक असेल तर मध, कुक्कुट असेल तर शर्करा व मयूर असेल तर तैल, यांची वृद्धि होईल ॥ १८ ॥

ताम्रादिनां वृद्धि श्येनादिनां स्वाभाविकीं शूरतां च पुनः शालिन्याऽऽह-

ताम्रादिकांची वृद्धि व श्येनादिपक्ष्यांची स्वाभाविक शूरता शालिनी वृत्तानें सांगतात.

**ताम्रं रौप्यं हेममुक्त्राय एभ्यस्त्वक्तूलक्षौमप्रसूनोर्णकाश्च ॥**
**निट्शूराद्यौ कोकिकाकौ द्युशूरौ रात्र्यन्तेऽन्यः स्वेष्टदौ तौ तदेति ॥१९॥**

अन्वयः—एभ्यः (क्रमात्) ताम्रं रौप्यं हेममुक्तायः समर्घता स्यात् त्वक्तूलक्षौमप्रसूतोर्णकाः वृद्धिः निट्शूराद्यौ, द्युशूरौ केकिकाकौ अन्यः रात्र्यन्ते (शूरः), तदा तौ स्वेष्टदौ. इति ॥ १९ ॥

अर्थः—कोणत्या धातूची वाढ होईल याबद्दलचा प्रश्न असल्यास तत्कालांश पक्षी श्येन असेल तर तांबें, पिंगल असेल तर रौप्य, काक असेल तर सोनें, कोंबडा असेल तर मोत्यें व मोर असेल तर लोखंड यांची वृद्धि होईल.

वस्त्राच्या वृद्धीविषयीं प्रश्न असतां तत्कालांश पक्षी श्येन असेल तर त्वक् (किंतान, गोणपाट वगैरे), पिंगल असेल तर कापूस, काक असेल तर क्षौम-रेशीम, कोंबडा असेल तर प्रसून-केशरादि व मयूर असेल तर ऊर्णा-लोंकर यांची वृद्धि होईल.

श्येन व पिंगल हे पक्षी रात्रीचे शूर असतात. कावळा व मयूर हे दोन पक्षी दिवसाचे शूर-बली असतात. सूर्यास्त झाल्यापासून २५ घटिकांनंतर-उषःकालीं कुक्कुट बली असतो.

## अध्याय पांचवा

अथ कालज्ञानाध्यायो व्याख्यायते.

जन्मकालच्या, वर्षप्रवेशकालच्या व संक्रांतिप्रवेशकालच्या वेळेचें फल शार्दूलविक्रीडित वृत्तानें सांगतात.

वर्षतः कालज्ञानादिपृच्छां विनापि निर्दिशति शार्दूलविक्रीडितेन—

क्रांतौ स्वांशखगात्सुखार्घमुखमूह्यं मेष आब्दं तनौ ।
भाख्यांशोत्थवितः शुभाशुभफलं चाब्दं च सौराब्दतः ॥
स्वावस्थासदृशं फलं बलवशात्सर्वत्र चोह्यं धिया
रिष्टारिष्टशुभाशुभं खगवशात्प्राग्वत्सुताद्यं वदेत् ॥ २० ॥

इति श्री. प. प. वासुदेवानन्दसरस्वतीयतिविरचितं
पांचपाक्षिकं समाप्तम् ॥

अन्वयः— क्रान्तौ स्वांशखगात् सुखार्घमुखं ऊह्यं. मेषे आब्दं ऊह्यं. तनौ भाख्यांशोत्थवितः शुभाशुभफलं, सौराब्दतः आब्दं फलं च ऊह्यं. धिया रिष्टारिष्टशुभाशुभं स्वावस्थासदृशं फलं खगवशात् सर्वत्र ऊह्यं. प्राग्वत् सुताद्यं च वदेत् ॥ २० ॥

इ. श्री. प. वा. स. य. विरचिते पांचपाक्षिके स्वकृताऽऽशुबोधिनी-टीकायां कालज्ञानाध्यायः ॥

अर्थः—मेषादि संक्रांति ज्या वेळीं लागतात, त्या वेळचा तत्कालांश, वारांशपक्षी आणि संक्रांती राशीपक्षी या दोन पक्ष्याची निसर्गादि सहा बलें आणून ज्याचें बल अधिक असेल त्या पक्ष्याची सर्वसाधारण अवस्था लक्ष्यांत घेऊन सुख, आरोग्य, सवंगाई, महागाई इत्यादि फलें त्या त्या संक्रातीमध्यें सांगावीं.

मेषसंक्रांतीच्या प्रवेशावरून वर्षामध्यें होणारें आब्दिक फल सांगावें.

जन्मकालावरून जातक फल पाहावयाचें असेल तर जन्मकालच्या नक्षत्र-चरणावरून अवकहडाचक्रोक्त जें नक्षत्रनाम येईल त्या नांवावरून नाम-पक्षी ठरवावा व जन्मकालावरून तत्कालांश-वारांश पक्षी ठरवावा. नंतर

या दोन पक्षांतून जो बलिष्ठ पक्षी असेल त्या पक्षावरून शुभाशुभ जातक फल पाहावें.

आब्दिक फल–ताजकफल–पाहणें असेल तर जन्मकालच्या स्पष्ट सूर्या-इतका स्पष्ट सूर्य ज्या वेळेस होतो त्या वेळीं वर्षप्रवेश झाला असें समजावें. नंतर वर्षप्रवेशकालीन वारांश पक्ष्यावरून वर्षामध्यें प्राप्त होणाऱ्या शुभाशुभ फलाचा विचार करावा. म्हणजे जन्मकालचा किंवा वर्षप्रवेश-कालचा वारांशपक्षी जर बलवान् असून भोजनावस्थेंत असेल तर अन्न-पाणी विपुल प्राप्त होईल. जर तो पक्षी गमनावस्थेंत असेल तर नेहमीं परिभ्रमण घडेल. जर तो वारांशपक्षी राज्यावस्थेंत असेल तर गाई, बैल, म्हशी, घोडे इत्यादि पशु विपुल प्राप्त होऊन दासदासी, नोकरचाकर ठेवण्याची ऐपत येईल व श्रीमंती थाटांत दिवस जातील. जर वारांश पक्षी निद्रावस्थेंत असेल तर मोठा आळशी, खादाड व भाग्यहीन होईल आणि जर तो तत्कालांश-वारांश-पक्षी मरणावस्थेंत असेल तर नाना प्रकारच्या रोगांनीं नेहमीं त्रस्त होईल. दारिद्र्यानें अगदीं गांजून जाईल. असें हें फल जन्मकालावरून व वर्षकालावरून बुद्धिमान् पुरुषानें जाणावें.

रिष्टारिष्टसंबंधाचा विचार करावयाचा असेल, तेव्हां तात्कालिक पक्षी जर स्वतःच्या अंशांत किंवा मित्राच्या अंशांत अथवा शत्रूच्या अंशांत असेल, तर त्याप्रमाणें फलाचा विचार करावा.

संततिसुखासंबंधानेंहि विचार तत्कालांश पक्ष्यावरून वरीलप्रमाणें करावा.

॥ श्रीगुरुदेवदत्त ॥

---

# नवीन स्तोत्रें

## पाळणा

नीज माझ्या प्राणविसाव्या सखया श्रीदत्ता ।
निद्रा करि कां क्षणभरी आतां वत्सा अवधूता ॥ धृ० ॥
निजसुमनाचा करुनि पाळणा त्या अनुसूयेनें ।
नवविधभक्तिच्या सुरत्न केलें कोंदण ॥
सुविवेकाचा रचुनि खेळणा बांधियला जाण ।
चौनिगमाच्या चारि सांखळ्या सजविल्या सघन ॥ १ ॥
सप्रेमाचे मृदुलास्तरण घालुनि अतिरुचिर ।
त्यांत निजविलें बालक गोजिरवाणें सुंदर ॥
श्रीगुरुबोधबळाचा त्यासी लावुनिया दोर ।
हालवितां जाहली तियेची वृत्ति तदाकार ॥ २ ॥
समाधिस्थ होवोनि स्वरूपीं ती मग करि काय ।
पूर्णानंदसुखानुभवाचा गीत मुखीं गाय ॥
निर्गुण तूं निर्विकार तूझी नेणति श्रुति सोय ।
भक्तासाठीं रूप दाविशी मी कैंची माय ॥ ३ ॥
अगेय तूझा महिमा न वर्णवे द्विपंचशतवक्त्रा ।
नेणति शुकसनकादिक न कळे अजुनी श्रुतिशास्त्रा ॥
तूं भक्तमय दक्ष परात्पर पंकजदलनेत्रा ।
वासुदेव विधि शिव त्रिरूपा निजगा शुभगात्रा ॥ ४ ॥

---

## अभंग

दत्ताचिया भक्ता नाहीं भय चिंता । दैवें कष्ट येतां वारी दत्त ॥ १ ॥
दत्तनाम घेतां विघ्न मागें हाटे । पळें बारा वाटे कोठें जरी ॥ २ ॥
जरी या भाविक म्हणे दत्त दत्त । तयापुढें दत्त येत आहे ॥ ३ ॥
असे नामाचें हें माहात्म्य विख्यात । म्हणूनी सतत दत्त म्हणा ॥ ४ ॥
म्हणावया दत्त किमपि न श्रम । वासुदेवा वर्म सांपडे हे ॥ ५ ॥

## पद

दत्त भया वारी श्रीहरी । दत्त भया वारी ॥ ध्रु० ॥
दत्त स्मरतां कसी ये चिंता । जो स्वाधार हरी ॥ १ ॥
अनुदिनीं त्वत्पाद सांडुनी खेद । स्मरतां भीति हरि ॥ २ ॥
हा वासुदेवा अनुभव बरवा । हे घे चित्तीं धरी ॥ ३ ॥

---

## ॥ पद ॥ सुब्रह्मण्याचें ( कार्तिक स्वामीचें )

( चालः—माझा कृष्ण देखिला काय )

माझा स्वामी देखिला काय । कोणी तरी सांगा हो ॥ धृ० ॥
ज्याला असती बारा हात । षण्मुख जो जगीं विख्यात ।
ज्याला सर्वही सुरसंघांत । जोडिती हात जो ध्येय ॥ १ ॥
जो गौरीशिवसंभूत । षण्मातुर–जो विशात ।
तारकदैत्याचा अंत । करि सतत प्रभु वंद्य ॥ २ ॥
जो मयुरवाहन देव । स्मरतां जो घेतो धांव ॥
त्यापाशीं मागें सद्भाव । वासुदेव धरि पाय ॥ ३ ॥

---

## अष्टक देवीचें

नमोऽस्तु ते देवि जगन्निवासे । सच्चिद्विलासे सुमनोशहासे ।
या सेवकाची परिसे विनंति । धरोनि कारुण्य लवा स्वचित्तीं ॥ १ ॥
ब्रह्मांड हें निर्मिसी तूं महेशी । चिच्छक्ति तूं हेतु न केवि होसी ।
उत्पत्ति रक्षा प्रळयादि हेतू । ती तूं करी हा मम पूर्ण हेतू ॥ २ ॥
उपासना नित्य तुझी घडावी । त्वत्पादभक्ती हृदयीं जडावी ।
मुखीं तुझें नाम वसो सदैव । जे शीघ्र वारी भजतां कुदैव ॥ ३ ॥
मी पापी आहें जरी कां कुबुद्धि । तरी मला देऊनि तूं सुबुद्धि ।
बुद्धिप्रकाशें मज तारी ईशे । धीशे शिरीं हात धरी त्र्यधीशे ॥ ४ ॥
पापत्रया तूं निववी भवानी । तापत्रया तूं शमवी मृडानी ।
शर्वाणि सर्वार्ति हरी सदैव । रुद्राणि माझें शमवी कुदैव ॥ ५ ॥

रुद्राणि हृद्रोग हरी अशेष । शर्वाणि आपत्ति हरी अशेष ।
दारिद्य दुःखौघ भया निवारी । अरिष्ट वारूनिहि शत्रु मारी ॥ ६ ॥
वारी उभे दुर्व्यसना सनातनी । तारी भवाब्धींतुनी तूं चिरंतनी ।
कुसंग वारी मज देइ सन्मति । सुसंगयोगें मज देइ सद्गति ॥ ७ ॥
न लाभ मागे विजया न मागे । उत्कर्ष मागे न सुकीर्ति मागे ।
माझे तुझे पाद हृदीं असावे । त्वत्पादिं मच्चित्त सदा वसावे ॥ ८ ॥
कृपाकटाक्षें पाहतां न तोटा । तुझा मला होईल लाभ मोठा ।
तेव्हां कृपादृष्टि लवे शिवे तूं । मला निरीक्षी हरि जन्म हेतू ॥ ९ ॥

इति श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य श्रीवासुदेवानंदसरस्वतीकृतसर्वापद्वारी देवीस्तोत्रं संपूर्णम् ॥

---

## निर्गुण भूपाळी

उठि उठि बा जीवराया । सोडी अविद्या निंद्य माया ।
व्यर्थ जातसें नरकाया । स्वरूपीं सावध होई तूं ॥ ध्रु० ॥
पंचकोशांचें पांघरूण । विवेक हस्तानें काढून ।
देहत्रयाचें अंथरूण । वत्सा गुंडाळून तूं टाकी ॥ १ ॥
अहंता ममते त्याग । हाचि मलमूत्र उत्सर्ग ।
हरिनाम हे सवेग । बाह्यांतरीं शौच करी ॥ २ ॥
निंदेनें मुख कडुवट । झालेसें अति वाईट ।
हरिनामजळें चोखट । धुवोनि निर्मळ होई तूं ॥ ३ ॥
त्रिगुणाचें आचमन । करुनि दृश्य दे सोडून ।
क्रोधव्याघ्रचर्मी बैसून । विचार करी स्वहिताचा ॥ ४ ॥
हा स्थूल देह तूं नव्हेसी । घटापरी जडत्व यासी ।
आदि अंतीं अभाव त्यासी । साक्षी प्रकाशक तूं त्याचा ॥ ५ ॥
प्राणहि नव्हेसी निर्धारी । क्षुधेतृष्णेनें पिडे भारी ।
हाही जड स्थूलाचे परी । याहुनि बिलक्षण तूं आत्मा ॥ ६ ॥
मनहि नव्होसि निश्चित । चंचल संशयें तें ग्रस्त ।
अहंतें ममत्वें वेष्टित । याहुन बिलक्षण तूं चिद्घन ॥ ७ ॥

बुद्धि नव्हेसी निश्चय । निद्राकाळीं होतो लय ।
जगताहि व्याप्त होय । ईहून वेगळा तूं द्रष्टा ॥ ८ ॥

निद्रानंदहि तूं नव्हेसी । तो आनंद एकदेशी ।
आनंदरूप बिंब त्यासी । आत्मत्व होय परिपूर्ण ॥ ९ ॥

पंचकोशाचा जाणता । तो आत्मा जाण आयता ।
ऐसा अनुभव तत्त्वतां । पावुनि सुखिया तूं होई ॥१०॥

पंचकोशाचा अनुभव । आत्म्याचा तो न दिसे ठाव ।
तरी पाचातें स्वयमेव । जाणे, तो नाहीं होय कसा ॥ ११ ॥

अनुभवरूप तूं स्वतां । दुजा नाहीं अनुभविता ।
तरी त्यासी बोधरूपता । सहजचि आली जाण तूं ॥ १२ ॥

ब्रह्म असतांहि एकलें । मायोपाधि ईश्वर झाले ।
कोशामधिं जीवत्व आले । उपाधित्यागे एकचि ते ॥ १३ ॥

मुळांतील कोमल दर्भ । स्थूलपानें काढिता लाभ ।
तैसा आत्मा देहीं स्वयंभ । विचारें काढुनि घेई तूं ॥ १४ ॥

स्थूल सूक्ष्म कारण तीन । शरीराचा निरास जाण ।
करिता, आत्मा ब्रह्म पूर्ण । होय निश्चय क्षणमात्रें ॥ १५ ॥

महावाक्याचें मुख्य सार । तूं ब्रम्हचि हा निर्धार ।
महावाक्याचा बारंवार । विचार करीं साक्षेपें ॥ १६ ॥

सद्‍गुरुमुखानें श्रवण । महावाक्यार्थ होतां जाण ।
तत्काळचि ब्रम्ह पूर्ण । होय, परी तो दृढ नाहीं ॥ १७ ॥

श्रवणादिकांचा अभ्यास । येथें करुनि विश्वास ।
तरीच बोध दृढतेस । पावेल, संशय नाहींच ॥ १८ ॥

देह मी जैसा दृढ निश्चय । तैसा 'मी आत्मा' हा प्रत्यय ।
जाहल्या, कृतकृत्य होय । झाला कळस बोधाचा ॥ १९ ॥

मुळीचा तूं पुरुषोत्तम । संकल्पें जीवत्वाचा भ्रम ।
संकल्पत्यागें तूंचि ब्रम्ह । होसी अनायासें पाहिपा ॥ २० ॥

करितां सर्वहि व्यवहार । न पडावा आपुला विसर ।
ऐसे आत्मत्व दृढतर । होता सहजचि मुक्त तूं ॥ २१ ॥

वर्णाश्रमादिक हे सर्व । देहीं कल्पित याचा भ्रम ।
बोधस्वरूप आत्माराम । तेथें हें बंड कांहीं नसे ॥ २२ ॥

क्षुधा तृष्णा हे प्राणधर्म । शोक मोह हे बुद्धीचे नेम ।
देहा, जरा मृत्यु जन्म । निद्रादि अवस्था बुद्धीच्या ॥ २३ ॥

वर्णाश्रम आणि अवस्था । हा अभिमान घेसी माथां ।
त्यासी विधिनिषेध तत्वतां । हें गुह्य निश्चयें जाण तूं ॥ २४ ॥

वर्णाश्रमाचा अभिमान । ज्यास, तो श्रुतीचा दास जाण ।
तो अभिमान जातां पूर्ण । मुगुटमणी श्रुतीचा तूं ॥ २५ ॥

देह असतां विदेहत्व । कर्मे करितां अकर्तृत्व ।
सर्व भोगोनि अभोक्तृत्व । ऐसें सामर्थ्य ज्ञानाचें ॥ २६ ॥

प्रलयीं जेसें एक नीर । तैसें चिन्मय चराचर ।
( जीवा ) जयासी अणुमात्र । थार पहातां न दिसे कोठें ॥ २७ ॥

ऐसें केवळ ब्रह्म झालें । नरदेहीं सार्थक केलें ॥
आपण तरोनि तारिलें । कृपाळूपणें जग सर्व ॥ २८ ॥

ज्ञानी आणि जगदीश । येथें भेदाचा न दिसे लेश ।
हें स्वमुखें कृष्ण परेश । पार्था सांगे गीतेंत ॥ २९ ॥

निर्गुण भूपाळी पठण । प्रातःकाळीं करील जाण ।
तो स्वयें ब्रह्म पूर्ण । होईल, अवश्य हें फळ ॥ ३० ॥

जीवरायासी बोध केला । सद्गुरूंनीं, तो ब्रह्म झाला ।
सद्गुरु तेणें आनंदाला । गातो वासुदेव तें प्रेमें ॥ ३१ ॥६८०॥

# श्रीनर्मदास्तोत्र

( श्री. केशवराव भट, देवी डॉक्टर यांचे चिरंजीवाकडून )

वा रा तुझा हा झळके जयाला ।
सु रेंद्र रेवे नमिती तयाला ॥ १ ॥

दे ज़ो बुडी मर्त्य तव प्रवाहीं ।
वा हील कीं भीति भवप्रवाहीं ॥ २ ॥

नं दिध्वजे हो शिरि जान्हवीला ।
द मि प्रिये हो धरिली तयाला ॥ ३ ॥

स दैव कांक्षा तव सज्जलाची ।
र क्षीं मला भी हरिं तूं मलाची ॥ ४ ॥

स्व यें असोनि मुनि नित्य शुद्ध ।
तीं रीं तुझ्या राहति जे प्रबुद्ध ॥ ५ ॥

य मादि योगें जिस सेविती ते ।
ती नर्मदे तूं धुविं मन्मतीतें ॥ ६ ॥

द त्तात्रय श्रीगुरु मूर्ति तूं हा ।
त मोपहे निश्चय ठेवुनि हां ॥ ७ ॥

भ क्त स्मरे ह्या बरि देयिं दृष्टि ।
व रींच हा धन्य जगीं सुतुष्टी ॥ ८ ॥

---

## पद ( वाडीचें वर्णन )

मच्चित्ता चिंती साची । तूं वाडी नरसोबाची । धृ० । वेणीसह कृष्णा येथें । दक्षिणगा अष्टसुतीर्थें । तारक ती असती जेथें । पंचनदीसंगम तेथें । कल्पद्रुम आहे जेथें । प्रासाद प्राङ्मुख तेथें ।

चालः—त्यामध्यें सोज्वळ ज्योति ॥ तेथें बसे ब्रह्मज्योती ॥ यत्तेजें भासति ज्योति ॥ ज्योतिर्मय तो हो ज्याची । हक्याहे पद साची ॥ मच्चित्ता०

॥१॥ पुरुषार्थ राहती चार । स्तंभरूपें तेथ समोर । उत्तरेस विघ्नेश्वर । दक्षिणेस आसन रुचिर । प्राङ्मुख ते वामनद्वार । लखलखीत धातुविकार ॥

चालः–त्यामध्यें हरिपद आहे । त्याला जो प्रेमें पाहे । भवभारा नच तो वाहे । मोहें नच जगीं मति ज्याची ॥ २ ॥

जे प्रातःकाळीं पाहती । पादुका अभिषेकीती ।
जे महापूजा करिती । अभिषेकस्नपना करिती ।

चालः–गुरुचरित्र ऐकति पठति । आश्रिता भोजन देती । जे वस्त्रालंकृति देती । पालखी मिरविती गाती । सर्वहि ते संसृति तरति । भुक्ति मुक्ति दासी त्यांची ॥ मच्चित्ता० ॥ ३ ॥

पूजारी चारि फडांचे । सहकुटुंब पाळीवाचे । पाळुनी बिरुद तयाचे । वाहे योगक्षेम तयाचे । करुणाकर नरहर त्याचे । गुण गाये मधुर सुवाचें ॥

चालः–जो औदुंबरतळवासी ॥ अन्नपूर्णा योगिनी ज्यासी ॥ सेविती जान्हवी तैसी । आचरिता सेवा ज्याची । गति होते ब्रह्मी त्याची ॥ मच्चित्ता चिंती साची । तूं वाडी नरसोबाची ॥ ४ ॥

---

## पद (शिरोळ वर्णन)

श्री शिरोळ ग्रामीं येती । यतिवर्य श्रीगुरुमूर्ति ॥ धृ० ॥
जल कुंडी डावे हातीं । दंड ही उजवे हातीं ॥
नेसुनिया भगवी छाटी । नासाग्रीं ठेवुनि दृष्टि ॥
चालः–कौपीना पुरतीं वरती । नेसुनिया भगवी छाटी ।
पादुका पायीं असती । अशि येती ग्रामीं मूर्ति ॥ १ ॥
अष्ट सिद्धि ज्याच्या दासी । नवनिधी ज्याचे पायीं ॥
श्रुति असती बंदि जयासी । तो ग्रामीं ये भिक्षेसी ॥
चालः–श्री लोळे ज्याचे चरणीं । त्याची हे अघटित करणी ।
ग्रामीं होता द्विज कुलकरणी । तत्सदनीं ये गुरुमूर्ति ॥ २ ॥

येउनिया स्वामी द्वारीं । नारायण रव उच्चारी ॥
परिसुनी ये द्विजनारी । मृदुवचनें गौरवि भारी ॥
चालः–देउनिया आसन बोले । आजि आपुलें दर्शन झालें ॥
पूर्वजहि आजि उद्धरिले । केले पावन गृह गुरुमूर्ति ॥ ३ ॥

गृहधनी येतिल आतां । मी पाक हि करितें आतां ॥
यति वदती सत्वर क्षुधिता । द्यावि भिक्षा जी ये हाता ॥
चालः–लाजुनिया मग बोले ती । गृहि कण्या शिजल्या असती ।
परि पत्रावाळे घरीं नसती । यति पाथर आणुनि देती ॥ ४ ॥

प्रोक्षुनिया लिहितां प्रणव । स्त्री वाढी ठेवुनि भाव ।
तृप्त हो जेवुनि देव । विश्वंभर जो स्वयमेव ॥
चालः–अंगुलि अंकित तें चित्र । वरद असें भोजनपात्र ॥
करि लोकां तेंचि पवित्र । तद्गोत्रज जे पूजीती ५

# कीर्तनाख्यानें

## श्री. प. प. वासुदेवानंदसरस्वतीस्वामीकृत

### – १ विष्णुदत्त आख्यान –

साकी —॥ श्रीमाहुरपुर पवित्र सुंदर स्थान श्रीदत्ताचें ॥ ज्याचें करितां स्मरणचि अंता जातील मल चित्ताचें ॥ १ ॥ वद वद मम वाचें । नाम श्रीदत्ताचें ॥ धृ ॥ तेथें ब्राह्मण स्वधर्मनिपुण श्रीदत्ताचा भक्त ॥ विष्णुदत्त हो नाम जयाचें-वाचें बोले दत्त ॥ २ ॥ त्याची भार्या साध्वी आर्या मर्यादा धरी नित्य ॥ असें दंपति नित्य पाळिती-धर्मा त्यजुनि असत्य ॥ ३ ॥ वद वद मम वाचें । नाम श्रीदत्ताचें ।।धृ॥

आर्या ॥—अश्वत्थवृक्ष त्याचे द्वारीं असें त्यावरी वसे थोर ॥ घोर स्वरूप एक क्षुदित सदा ब्रह्मराक्षस क्रूर ॥ पंचमहायज्ञांती अर्पितसे विष्णुदत्त भूतबळी ॥ वृक्षातळीं तया तो खावुनि रक्षी तयासि भूत बळी ॥

कामदा वृत्त ॥—शुद्ध अन्न ते भक्षितां तया ॥ क्रौर्य जावुनि येतसे दया ॥ एकदां द्विजा रूप दावुनी ॥ भूत बोलिला शांत होवुनी ॥

दिंडी ॥ विष्णुदत्ता तूं असस धन्य धन्य॥ अन्य नोहे बा तव समान मान्य ॥ तूं वदान्य श्रेष्ठ मला दांतीं ॥ अन्न देवुनि दीधली मला शांती॥

पद ॥ ( माझा भरत देखिला काय या चालीवर. )

अहा कौतुक हे लोकीं ॥ दत्ता दाविसि कीं ॥धृ०॥ करितां नित्य तुझी सेवा ॥ धरूनि मनीं ह्या सद्भावा ॥ धर्महि आचरितां देवा ॥ भूत प्रसन्न करविसीं कीं ॥ १ ॥ जीं असती भूतें क्रूर । त्वत्स्मरणें तीं जाती दूर ॥ तुज स्मरतां अजि कां समोर ॥ राक्षस घोर दाविसि कीं ॥२॥

ओवी—भ्याला विप्र हें जाणोन ॥ राक्षस शांतरूप होऊन ॥ बोले देतों वरदान ॥ भय सोडून घे अभीष्ट ॥

आर्या—बोले राक्षस मानस सावरूनि घे द्विजा इष्ट ॥
श्रेष्ठ न नीचां उंचा स्वार्यी देखती हरावया कष्ट ॥

ओवी—ऐसा भ्रांत होऊन ॥ पत्नीलागीं सर्व सांगून ॥ तदनुमतें दत्त दर्शन ॥ करवी हें वरदान मागतसें ॥

साकी—बोले राक्षस हे आम्हांस अशक्य जरि तरी देवा ॥ तुजला दाविन त्रिवार साधुन घे इष्टा धरी भावा ॥ उन्मत्तवेष घेवुनि हिंडे मद्यापर्णी तया भूत ॥ पाहुनि बोलें विप्रा जा धरीं पद तें असें महद्भूत ॥

आर्या—पाहुनि विप्र तया मनि आणी नाना विकल्प तत्काळ ॥
हो दत्त गुप्त बोले भूत न सरला तुझा विपत्काळ ॥

साकी—अथापि दाविन सुसावधानीं होवून साधीं स्वार्थ ॥ ऐसें बोलुनि पुन: स्मशानीं पाहूनि दत्ता भूत ॥ म्हणे द्विजा हा श्रीदत्त पहा मसणामध्यें खेळे ॥ भस्म चर्चुनि हाडें घेऊनि गरगर फिरवी डोळे ॥

पद—परिसुनियां राक्षस वचन ॥ गेला तो द्विज धावुन ॥ दत्ताचे चरण धरून ॥ राहिला त्या पाहून ॥ करीं धरूनि हाडें दत्त ॥ हो तेव्हां जैसा मत्त ॥ ताडि तयाचें चित्त ॥ घाबरला सोडुनि धीर ॥ १ ॥

योगेश्वर अत्रिकुमार ॥ त्या द्विजा देई मार ॥ पद सोडुनि विप्र पळाला ॥ दत्तहि गुप्तचि झाला ॥ मग राक्षस त्या विप्राला ॥ बोले कां धीर त्यजिला ॥ एकवार तुज दावीन ॥ आतां तरि धीर धरून ॥ घे इष्टार्था साधून ॥ सावधान हो धरी धीर ॥ २ ॥

कालांतरी दावी भूत ॥ जो काकां श्वाना देत ॥ खरमांस तोचि दत्त ॥ तत्पदीं तूं हो बा सक्त ॥ श्राद्धाचें आमंत्रण ॥ दे त्याचें मत मानून ॥ पत्नीहि बोले वचन ॥ नच सोडा तुम्हीं धीर ॥ ३ ॥

साकी—तथास्तु म्हणुनि स्मशानिं जावुनी शीघ्र धरीं हरिपादा ॥ मांसातें जरि मारी हरि तरी ॥ विप्र न मानी खेदा ॥ १ ॥

त्याची निष्ठा पाहूनी बोलें हरि तूं इच्छिसी काय ॥ श्राद्धीं क्षण घ्या म्हणोनि टाकी द्विज भूमिवरी काय ॥ २ ॥

ओवी—दत्त बोलें मी येईन ॥ विप्र सांगावे मत्समान ॥ येरू तथास्तु म्हणोन ॥ करी नमन श्रीदत्ता ॥ योगभूमी दिसे स्मशान ॥ वेदशास्त्रें होत काक श्वान ॥ श्रीदत्ताज्ञा घेवून ॥ गृहीं येऊन सांगे सुता ॥२५॥

भूत बोलिला भास्करासिला ।। योजीं विप्र तूं श्राद्धिं बा मला ।। आठवी द्विजा तूं तरोनियां ।तारिवा मला पालुनी तया ।। २६ ।। तथास्तु म्हणुनी गेहीं येवुनि सांगे सर्वही विप्र ।। निजपत्नीला हो हर्ष तिला पाक करी ते क्षिप्र ।। २७ ।।

ओंवी---माध्यान्हीं दत्त येवुन ।। पुसे आले कीं ब्राह्मण ।। द्विज तद्रूपा गेला भुलोन ।। आसन देवून पत्नी बोले ।। २८ ।। प्रभो बसावें आसनीं ।। विप्र येईल त्वरा करूनी ।। ऐसें बोलोंनी अंगणीं ।। ती येवोनीं प्रार्थी सूर्या ।। २९ ।।

अभंग---गोधन बंधनहरा ये भास्करा ।। लोकनेत्र सूरा प्रभाकरा ।। १ ।। श्राद्धीं दत्त आले विप्र तया सम ।। तुजविण धाम निधे न दुजा ।। २ ।। तरि शीघ्र ये बा असें प्रार्थितां सूर्या । तो ये शीघ्र तया दे आसन ।। ३० ।।

श्लोक---देवहीनं कथं दर्शश्राद्धमित्युदिता सती ।। गृहेशं प्रार्थयामास सोग्निर्विप्र उपान्तः ।। ३१ ।।

ओंवी---अग्नि बसे देवस्थानीं । दत्त सूर्य हे पितृस्थानीं ।। यथाविधी श्राद्ध करोनी । विप्र वंदूनि बोलतसे ।। ३२ ।।

---

## श्रीदत्तभक्त आयुराजचरित्र

भगवंतपदीं स्थीर राही । मनारे ।। ध्रु० ।। सुख विषयाचे अंतरीं बापा श्वानवमनवत् पाही ।। १ ।। दत्तपदानें सेवुनि निशीदिनीं इहपर सौख्यन्चि घेयी ।। २ ।। नरदेहाचा लाभन्चि ऐसा बा रे पुनरपि नाहीं ।।

श्लोक—लब्ध्वा सदुर्लभमिदं बहु संभवांते । मानुष्यमर्थदमनित्यमपी हतधीरः । तूर्णं यतेः न पतेदनुमृत्यु यावन्निश्रेयसाय विषयः खलु सर्व तस्यात्.

ओंवी—विषयजनित जें जें सुख । तेथें होतें परम दुःख ।। पूर्वी गोड अंतीं शोक । नेमस्त आहे. ।।

संतोक्ति आहे. श्लोक—मनो मधुकरो मेघो मानिनी मदनो मरुत् । मा. मदो मर्कटो मत्स्यो मकारा दश चंचलाः ॥

( चाल—मय्या मेरी मैनही माख )

दुसरा—मदनाथ कैसे करूं मै भजन तुमारो । चितचंचल मनथे हमारा ॥ धृ ॥ कथापुराण भागवत गीता सुनत जनम गयो सारो । छूपो छोडू तो हात आवो । फिरे जैसे ढोर उजारो ॥ १ ॥

इनमन वाको लाज नहि है समजायो सो सो बारो । एकही पल जो स्थिर न रहत है फिर फिर खावत फेरो ॥ २ ॥ तिसरा

( चा.—साध्य नसे मुनिकन्या )

पद—हें मन चंचल मोठें । न लगे याचा अंतची कोठें ॥धृ०॥ वायुपरीसही दुष्कर याचा निग्रह मजला वाटे । शमवूं जातां अधिकची पेटे ॥ १ ॥

श्लोक—चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवत् दृढं । तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करं । ( हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ) हे ऐकून श्रीकृष्ण—अर्जुना.

श्लोक—असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलं । (पण अर्जुना) अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते ॥ श्लोक—मित्रत्वेन रिपुत्वेन तथौदासीन्यतोपि वा । वशीकुर्यात् मनो मर्त्यो नान्यथा मुक्तिमाप्नुयात् ॥

श्लोक—मनः कुत्रोद्योगः सपदिवते गम्य पदवी । नरं वा नारींवा गमनमुभयत्राप्यनुचितं । यतस्ते क्लीबत्वं प्रतिपदमहोहास्य जनकं । जनस्तोमे मा गाः त्वमनुसर हि ब्रह्मपदवीं ॥ ( मूळपद मनारे भगवंत पदी )

श्लोक—हस्तं हस्तेन संपीड्य दंतान् दंतैस्तथैवहि । उत्तंभ्य दृष्टिं रोषेण मनःस्थैर्यं समाचरेत्.

श्लोक—यत्र यत्र मनो याति तत्र तत्र स्वयंवशी । न गच्छेत् यत्नतो धीमान् ततः शांतं मनो भवेत्॥ (किंवा) चले प्राणे चलं चित्तं निश्चले निश्चलं मनः (मनः प्रशांतत्वे उत्तम सुखाप्तिः गीतायां ) श्लोक. प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमं ॥ उपैति शांतरजसं ब्रह्मभूतमकल्मषं ॥

श्लोक— मनोसि सांतं भज तद्यनंतं क्षयार्दितं चंद्रमसं जहीहि सहिस्व-यं सांत इति प्रसिद्धं धत्ते सदा विष्णुपदावलंबं।

पद— अवगुणचित ना धरो हारी मारे ॥ धृ ॥ एक नदीया एक नार कहावत ॥ मैलो नार भये ॥ स जबदो मिल एक बार न भयी तव गंगानाम पये ॥ १ ॥ एक लोहा पूजामे राखत एक घर वंधकि परो ॥ सो दुनिया पारख नही राखत कंचन करत खरा ॥ २ ॥ एक माया एक ब्रह्म कहावत जुरशाम जगरो ॥ कायाकिनिर्धार करो हरी ॥ नही प्राण जांत रहो ॥ ३ ॥

आयुराजः— सोमवंशे राजाआस ईशं भेजे त्रीशं योगाधीशं संतं सोवददेतं ॥ १ ॥ अह हा कष्टं भूप वरिष्ठं मन्ये त्वां मन्निष्ठं ॥ दास्ये प्रीतो वरं हि मत्तोस्पष्टं वरय प्रेष्ठं ॥ ( प्रिय )

गद्यं— अथ श्रीभगवतो दत्तदेवस्य दातृत्वादिगुणप्रवचनाय स्वांत-मैलावघाताय चराचरप्राणीपोषकतापहारकमनोल्हादकशशेः वंशजस्य सम्राट्पुण्यशीलप्रजापालनतत्परस्य धर्मपथानुवर्तिनः आयुर्नाम्नो दत्त-भक्तस्य अनपत्यत्वदुःखितस्य चरित्रं वक्ष्ये ॥ या गद्यामध्यें अथ शब्द प्रथम नच घातला तर श्लोक ओंकारश्चाथशब्दश्चद्वावेतौ ब्राह्मणः पुरा कंठं भित्वा विनीर्यातौ तस्मात् मांगलिकावुभौ ॥

राये उपाय केले पुत्रप्राप्तीस जे प्रथीत महा ॥ दैवें निष्फळ झाले परी धैर्ये शोधितो व्यथातमहा ॥

ओवी—जे गुर्वंघ्री सेविती । सत्पुरुषातें भजती। त्यांची संतति। वाढते ॥ सह्य गिरीवर श्रीमत् दत्तात्रेयाकडे जा. हें ऐकून

अत्रिसुता सेवितो आयु तो.॥ अनन्यमतिनें भाव धरुनिया हरिपदीं मन लावितो ॥धृ०॥ पुत्राविण शिणतो ॥ दयाळा॥ कृपामृताची वृष्टी करूनिया सकळ खेद वारितो ॥ स्तवन करूनी प्रार्थितों ॥ दयाळा ॥ वर्णुनी थकले चारी साही अठरा म्हणूनी नमितों प्रसन्न व्हा इच्छितों ॥ दास हा ॥ हेतु मनांतील पूर्ण व्हावया चरणकमल धरितों ॥ १ ॥

श्लोक— ( मथनेन पृथक् कृतं पुनर्नवनीतं नहि तक्र ऐक्यभाक् ) अत्री गुरफुटून न राहतां कसे राहत होते.

ओ०---घरीं जारिणी वावरे ॥ तिचें चित्त जारीं ठरे ।। नाना ते विक्रीया आचरे।। ब्रह्मीं लीन ।। त्या अत्रि पुत्र दत्ताची सेवा-घनाक्षरी।। राजा करी बहुस्तव।। भक्तियुक्त पुत्रास्तव ।। जेंवि पतीव्रता धव।। सेवी प्रेम ठेवुनी ।।

झंपा— दत्त दावी तदा उलटची आचरणा ॥ पारखी राजमन निश्चयाका ।।धृ०।। नग्न तो होऊनी, स्त्री सवे घेऊनी, नग्न ती करूनीया सेवी तिजला ।। १ ।।

मद्य हर्षोनिया घेतसे प्यावया । पाजुनी स्त्रीस मग आपण प्याला ।।२।। या परि थाट हा पाहुनी वीट जे ॥ न मनिती त्या करीं स्वर्ग आला ।।२।।

ओवी—धर्मातिक्रम साहस ।। जिरे ईशा न अन्यास
शिवाविणें जें विष ॥ जाळी अन्या ॥

श्लोक—धृत्वांके युवतिं शश्वत् पिबंतं मद्यमुत्तमं ॥ सर्वयोगाढ्यमप्यार्यं मत्वा भक्त्या ननाम सः ।। इतकेंही दाखवून जात नाहीं असें पाहून दत्त:

ओ०--- तूं येथें राहूं नको म्हणून ॥ वारंवार लोटे भगवान ॥ तरी राजा दत्तमार साहून ।। राहे मन दृढ करोनि ॥

तुकोबाराय:---चणे खावे लोखंडाचे ।। मग ब्रह्मीं पद नाचे ।। ( त्यास सेवा सांगावी ) काय:

साकी:---प्रतिदिन लाना नर कपाल मोलाजा मासवे (ती) दारू ।। मुजुकु देना मे नहीं मानु शास्त्रादिक वेदारू ॥

श्लोक---सेवा करि केला हरि स्ववश मागें सुपुत्र मज दे ।। तारी अमुत्रपर दाता तसाचि सुर सेवील सुशील वरदे ।। दत्ते असाही सुतओ हजरी कठीण भक्तासी काय कमती ॥ ऐसे वदोनी वर देती फळासी हरी पत्नीस देई म्हणती ।।

अंजनीगीत---स्वप्नासमान संसार, पुत्रादीक हे नश्वर ।। पुत्रार्थी होऊनी वरा मागसी की राया ।। अरे मुक्ति स्थानापन्न होऊन ।। माग विकारे संतान ।। ज्ञानाला प्रतिबंध म्हणून ।। हेंचि इच्छिसी ।।

पुत्रासाठीं माझी भक्ति तुज लागली सकाम जरी ॥ सुकृतेंचि हेंही घडलें निष्काम कर्में होऊनी तु मुक्ति वरी ।।

चतुर्विधा भजंते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ॥ आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥

श्लोक--राजन् फलमिदं पत्न्या इंदुमत्यै प्रयच्छ भो ॥ तथेत्युक्त्वाभिवाद्येशं पृष्ट्वागात् स्वपुरं नृपः ॥

सुख विषयाचें ( मूळपद )

घनाक्षरीः—राजा पढा सबी न्यान ॥ पुत्र बिना शून्यमान ॥ गुरुसि जे भक्त का आख्यान । लिया भाव जोरसे ॥

( क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तत् ज्ञानं मतं मम ) ( ते नाहीं म्हणून पत्र बिना ) पुत्राविणें परलोक ॥ न हा साधे श्रुतिलेख ॥ गुरुः अशा रीतीनें अर्थार्थी भक्त जरी झाला तरी कांहीं बिघडलें नाहीं असें सांगितलें आहे.

पदः--वाटेल ती भक्ती घडोरे ॥ वाटेल ती भक्ती ॥ धृ ॥

१ क्षुद्र देवता संसृती देती ॥ सेवूं नये बा ती ॥ १ ॥ गोविंदाची प्रकाम भक्ती ॥ घडता दे मुक्ती ॥ २ ॥ जनन मरण भय छेदुनी करीते ॥ भगवंतीं प्रीती ॥ ३ ॥ ह्या गोविंदाची जरी ॥ सकाम भक्ति घडेल तरी ॥ अनुक्रमें हो अधिकारी ॥ पुन्हां संसारीं न पडे तो॥

अश्वधाटी : सेवी सदा पितर प्रेमें तया पितर देती स्वलोक आपुला ॥
भूतादिकां भजती त्या त्या स्थलींच गती एते म्हणूनी हरिला ॥
सेवा सकाम करी भक्ती कराल तरी अंतीं हरीहि मिळतो ॥
आयु असें स्वमनीं आणूनी शास्त्रमत अर्थार्थी भक्ति करितो ॥

श्लोक—देवान् देवयजो यांति पितृन् यांति पितृव्रताः । भुतानि यांति भुतेज्या यांति मद्याजिनोऽपि माम् ॥असो. दिंडी—॥आयु राणीला सकल वृत्त सांगे ॥ प्रसादाचे फल देई तिला स्वांगे ॥ इंदुमतीनें मग भाव धरूनी वेगें फला भक्षुनी पतिचरण चुरूं लागे ॥

ओ०—मग ती विलासे करूनी ॥ पतीशी रत होऊन ॥ रात्री करी गर्भ धारण । दत्त वचनं अन्यथा नोहे ॥

गद्यं—ततःसा महिषी स्वप्ने हारकंकणकेयुरनुपुरालंकृतं मणि आजत बहू फल शेष छत्रं । शुभ किरीट कुंडलधरं श्वेतसक वस्त्रलेपनं मुक्तां

पद्मचार्पयंतं क्षीरपूर्णेन कुंबुना स्वात्मानमभिषिंच्यंतं दृष्ट्वा हृष्टासती निद्रां विससर्ज ॥

पृथ्वी––उठूनी पतिला कथी सकल वृत्त अत्यादरें ॥ निजूनी गमवूं नको फल तूं भोग आतां सरे ॥ असे वदुनी राणिला गुरूसी आयु सांगे स्वयें ॥ विचार करूनी गुरू म्हणती पुत्र पोटींही ये ॥

कामदा––आह शौनको हुंडघातको। नूनमर्भको लोकपालकः ॥
संजनिष्यतेऽनेन सूच्यते भद्रमस्तु ते यामि भूपते ॥

दत्तप्रसन्न ( उत्तरार्ध )

पद––भगवंतपदीं स्थिर राही ॥ध्रु०॥ सुखा ॥१॥ दत्त पदातें ॥ २॥
नर देहाचा ॥३॥ कृष्णा रामा हरि विठ्ठल ॥

संत श्रेष्ठांचा उपदेश आपल्या मनास तोच जनास; नदीवर पूल बांधणें तो स्वतःच्या फायद्याकरितां, पण त्या मार्गानें जाणारा आपलेंही हित साधून घेतो ॥ म्हणून मनास उपदेश केला आहे.

ओ०––सकल विषय त्यागणें ॥ शुद्ध कार्याकारण घेणें ॥ विषय
त्यागाचीं लक्षणें । जाणीजे ऐसी ॥

श्लोक––नृदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं । प्लवं सुकल्पं गुरुकर्णधारं ॥
मयानुकूलेन नभस्वतेरितं । पुमान् भवाब्धिं न तरेत् स आत्महा.

श्लोक––लब्ध्वा जन्मामरप्रार्थ्यं मानुष्यं तत् द्विजाग्र्यतां ॥ तदनादृत्य
ये स्वार्थं घ्नंति यांत्यशुभां गतिं ॥

अभंग––एक्या एक्या योनी कोटि कोटि फेरा ॥ नृदेहाचा वारा लागे
मग ॥ छवं गुरु मयानु ॥

श्लोक––(नरतनु अशी नौका सत्‌गुरु जीस तारी ॥ भवनदी अनुकूल
अक्ष पूर्णावतारी ॥ वाणी गुणानु कथने श्रवणौ कथायां ॥
हस्तौ च कर्मसु मनस्तव पादयोर्नः ।
स्मृत्यां शिरस्तव निवासजगत्प्रणामे ॥
दृष्टिः सतां दर्शनेस्तु भवत्तनूनां ।

श्लोक—जिव्हे कीर्तय केशवं मुररिपुं, चेतो भज श्रीधरं ।
पाणिद्वंद्व समर्थयाच्युतकथां श्रोत्रद्वय त्वं श्रुणु ।
कृष्णं लोकय लोचनद्वय हरेर्गच्छांघ्रियुग्मालयं ।
जिघ्र घ्राण मुकुंदपादतुलसीमूर्धन्यमाधोक्षजं ।

समाधान नसेल तर

श्लोक—कृते जनार्दनो देवस्त्रेतायां रघुनंदनः ।
द्वापारे रामकृष्णौ च कलौ श्रीपादवल्लभः ।

नृदेहमाद्यं हा श्लोक ऐकला म्हणजे श्रोते बुवांच्या पांचवीची पूजा झालेली आहे असें म्हणतात. याशीकाचें अध्यक्षस्थान नारायण नदांनीं घेतलेलें. त्या कार्याच्या आरभीं त्यांच्या वाक्याचा मान ठेवावा लागतो. उपाध्येबुवा व मुलीचा बाप कितीहि लग्नें केलीं तरी प्रत्येक कन्यादानाचे वेळला ' मम समस्तपितृणां निरतिशय सानंद ब्रह्मलोकादीवाध्यादी ' असा संकल्प करावाच लागतो व तसें आमच्या या भागवत धर्माचें अध्यक्षस्थान शुकाचार्यांनीं घेतले कारणांनीं नरतनूच्या महत्त्वाच्या वेळेला ' नृदेहमाद्यं ' हा श्लोक म्हणावा लागतो. पण आमचें मन ऐकण्यास राजी नाहीं. आमच्या घरांतहि पाठ येतो. अरे जरी मन राजी नसेल तरी श्रीरामदासांची उक्ति तर पाहा. काय.

ओ०—हें वाक्य ऐकून जर ऐकण्यास मन राजी नसेल तर आमचें कार्य आम्हांला करणें भाग आहे. याला पुरावा आहे.

तुम्ही करा, आम्हाला तर कंटाळा येतो, अरे थोडा तर ऐक. श्लोक रामकृष्णाची उपासना न सांगतां दत्ताची सांगितली याचें कारण काय ?

श्लोक—भुभारभुततद्द्वेष्यघाताय विविधास्तनूः ।
भूत्वा कंटकवत् मन्ये कृतकार्यो जहात्यसौ । ही दत्तमूर्ती कशी आहे.

श्लोक—अस्यैवपूर्णकृत्याःस्यु तन्वस्तासूत्तमोरामा । तनूरेकास्ति दत्ताख्या कृपालुःस्मर्तृगामिनी ।

अपूर्णकृत्य तनु आणखी ज्या आहेत त्या कोणत्या ?

श्लोक—श्रीदत्तो नारदो व्यासः शुकश्च पवनात्मजः ॥
कार्तवीर्यश्च गोरक्षो सप्तैते स्मर्तृगामिनः ॥
कश्चित् हेमपुरीं ददौ ध्रुवपदं कश्चित् पयोब्धिं ददौ ॥
कश्चित् प्रेष्ठं सुता निजास्थि च तथा सर्वस्वमप्यर्पयत् ॥
स्वात्मास्वेन न कुत्र चित् खलु मुदा दत्तोथ दत्तो यतो ॥
दत्तेनेत्ययमेव दत्त इति हि ख्यातोभवत् चात्रिजः ॥

थोडीशी मौज पाहा—रामकृष्ण विवाहित, दत्त ब्रह्मचारी; रामकृष्ण गृहस्थाश्रमी, दत्त यती— रामकृष्ण क्षत्रिय, हे ब्राह्मण—यांना गुरु (वसिष्ठ-संदीपनासारखे) सर्वांचे गुरु. रामकृष्ण त्रिगुणांत-दत्त-भावातीतंत्री गुणरहित ॥ यांनीं शरीर सोडलें, हे (दत्त) अपूर्णकृत्य-संतांनीं एक जागीं म्हटलें आहे दोहा. हे (दत्त) स्मर्तृगामी ॥ कलीयुगांत दत्तजागृती : कशी दत्त प्रासादिक नाटक मंडळी, दत्त प्रा. फ्लोमि. (आटयाची चक्की) हेअर कटींग गुरुचरीत्र वाचनावडी-गुरुवार हें सर्व पाहून हृदय सौख्यार्थ

भक्त—दत्त पदाते सेवुनी.

अशी श्रीमत् दत्तात्रयाचे चरणीं आवडी धरून इहपर लोक कमाई कोणी साधावी त्या दत्तभक्त आयुराजाचें चरित्र गनकथा संबंधानुरोधानें सांगणें आहे. कायगत कथा संबंध आहे.

आर्या—विज्ञाप्यैतत् देवाः सवासवाश्च कुरुत्सवं नाकं ॥ अनुयाता हुंडसुता वीताभीताऽऽपसाशु भूलोकें ॥

श्लोक—असूर हुंडासुर ऐकी जेव्हां ॥ मुलें मुलीच्याच उदंड तेव्हां.
भयामुळें व्याकुळ फार झाला ॥ स्मरूनी शापा नुमजे तयाला ॥

भक्त —अभंग.

कवि—ओ० असुरें विचार केला । पोटीं शिरोनी मारूं शत्रूला । तो तेथें बिलोकी सुदर्शनाला । मग राणीस दावली दुष्ट स्वप्नें ॥ तें दुष्ट स्वप्न पाहून चिंताक्रांत झालेली इंदुमती शोक करूं लागली.

पद—(अजि आक्रूर हा.)

त्रिसुपर्णात सूर्य दुष्टस्वप्ननाशन करणारा आहे, हें मनीं आणून सूर्य प्रार्थना केली. मंत्रे तीर्थे ॥ भक्त—

आर्या–ऐसे सूर्या प्रार्थुनी भय मनीचे सोडी राणी इंदुमती ॥
अमुरें जाणुनी तें मग अन्नादिक त्यजुनी होय हीन मती ॥

गद्य—तदनु दनुजपतिरतिक्रूरतरो हुंडासुरोऽधीरतरो भूत्वाज्ञात्वा गर्भगतोयं निजशत्रुरिति मति मानपि मनसापीसतां नृपदयीतां घर्षयितुं असमर्थो व्यर्थोद्यमः हीनपानाशन शयन एवं सन् तत्रैवांतर हितोंतर (छिद्) प्रेप्सुमतिष्ठत ॥ हें यांनी केलें. आतां आयुराज काय करीत होता.

श्लोक–ओवी–ऐसा किती काळ जाता ॥ राज्ञी प्रसूत न होता । भूप उपाय योजिता । झाला मंत्रे । असें करितां करितां

गद्य—अथ काले सुमंगलांकिता नृपदयिता सोच्चगतानस्तमित पंचखेटसूचिताऽव्याहतसंपदं मुदं वर्धयंतं संतं सुत मसूत ॥ असें लेकरूं गर्भातून बाहेर येतांच

भक्त—अभंग

श्लोक—बाळातें पाहुनीया असुर मनीं म्हणे शुत्रु हा ह्यासी न्यावें ॥ मायादेवी स्तवूनी शिरुनी शरिरी तो दासीच्या रिष्टी घावे ॥ (अरिष्ट सुतिकागृहं ) मंत्रें सर्वांसी निद्रा आणूनी उचलिलें बालका गेहीं नेयीं ॥ भार्यातें देऊनीया कथि तीस हाणीया मांस खाण्यास देई ॥

श्लोकः—शक्तोऽपि दत्तोखिल लोक सारो ॥ तन् मंत्र शक्तीं न जघान धीरः ॥

भक्त— पद—

अशा रितीनें आर्या–

व्याजादेणार्भामिष मसुरायादात्त्सधूर्त आश्वसुरः ॥
तथ्यं मेने स मुनिर्दययया बालं जुगोप वित्ततरः (बुद्धिमान )

श्लोक भक्त— प्रातः काली उठुनी द्वारी मुनी तो पाहे सुपुत्रा प्रति । ध्याने जाणुनी शीघ्र घे उचलुनी देई स्त्रियेच्या हातीं । वेळी ठेविती नाम हे नहुष तें संस्कार केलें असें । बाळाचे पुरवूनी लाड अवघे मातेव रक्षीतसे ॥

ओवी—इकडे तो प्रातः काळ ॥ होतां गेलें मंत्रबळ ॥ इंदुमती पाहे बाळ ॥ कोठें तिला दिसेना ॥

ओवी—आयुराजा शोक ऐकून ॥ आला तेथें तो धावून ॥ पाहे कष्टी ाळाविण । अति दुःखीत राणीला ॥

पद—( कृष्णगडी ) आयु मग बाहे दत्ताला । धाव बा दुःख रायाला ॥ ेनुख व्याकूळ मी झालों ॥ मोहूनी कष्ट पंकी गडलों ॥ जळाविण मासा ाळमळतो । तेवि मी दुःखानळें जळतों ॥ आश्रय एक तुझा आहे ॥ ासाददृष्टीं मज पाहे । येऊनी सुख देई मजला ॥ धाव बा.

भक्त—अभंग भक्ति—द्विगुणीत झाली । दत्तालागी कृपा आली । कैसी करी तो आपुली ॥ बोलीयेली बोले व्यर्थ ॥

( न मे भक्तः प्रणश्यति ) दिंडी—

साकी—भुभृति विलपति सतितं नारद एत्य प्राह सहर्षं ॥
असुरहतोऽपि तेर्भकः समास्ते मुनिसद्मनि गततर्ष ॥ ( दुःख )
भूपः श्रुत्वा तमाह नत्वा कस्य गृहेस्तिऋषिराह ॥
दर्शयति तुंडं हत्वा हुंडं लब्ध्वा विध्याह ॥

असें होईल. पण वेड्या शंभर वर्षे दत्ताची सेवा करून शोक ज्या पुत्राचा करतोस तो कसा आहे हा विचार तुझ्या ठिकाणीं नाहींरे बापा अशा रितीनें श्लोकः ॥

सांगूनी ज्ञानशोका हरूनी मुनी काथि पुत्रवृत्तांत सारा ॥
तु आयुपुत्र ऐसी परिसुनी नहुषें खे. गी. शंकेशी सारा ॥
प्रार्थी अरूंधती ते मुनीशी म्हणती ते ऐकिलें जे न खोटें ॥
तो हुंडा मारी लग्ना करी ऋषिवचनें आईबापाशी भेटे ॥

श्लोक—साहायार्थं देवाः समागताः तत्क्षणेः सतैः साकं । यमलोकं रिपु ासुरं सुरधारंचाप्यनीनयन् मारू ॥

हें ऐकून ॥

श्लोक—हुंडाऽसुरः प्राह मनुष्यपोत ज्ञानं न ते मे बलमल्पचित्त ।
प्राप्तोस्मि कालो यदि जीवनेहा चेन्मां गतस्सन्शरणं व्रजेह ।

नहुष म्हणतोः—नहि शशिकुले जातः कश्चित् नरः शरणंगतो ।
हसितवदनो बालो दीनो जगौ खलु मे श्रुणु । प्रहरकुचरत्वं
( पृथ्वीवर स. कः )

मां कामं दयामिह मा कुरु ॥ श्लोक.

अशा रीतीनें

तो हुंडा मारी लग्ना करी ॥

सा.—तया साकं साकं जनकं चक्रे प्राप्य विशोकं ।
साकं मात्रा पित्रा लोकं मेनेसस्वरलोकं । ( साकं । आकेन सहितं दुःखेन स० ) असें मनांत आणून—
राज्यं दत्त्वा अस्मै स सदारः प्राप्यवनं क्षितिदासः ॥
उदार आपक्षेमं तापक्षतिमतिशूर उदारः—

---

## अथ सतीचरितम्

स्त्रियांना तारक एक पती । धृ० ॥ दुष्ट नष्ट अति रुष्ट कुष्ठी परी सोशी सकल ताप ती ॥ १ ॥
यद्भीतीनें अनल जाहला शीतल त्वरित गति ॥ २ ॥
पतीव्रतेच्या शापें जाहला अस्तंगत दिनपति ॥ ३ ॥
देखुनि सतीच्या सामर्थ्यातें, सुरनर मुनी कांपती ॥ ४ ॥

कृष्णा रामा हरि विठ्ठल. या जगांत मनुष्यजन्म मिळाला. स्वधर्म-बलानें जीव कृतकृत्य होतो. हा सिद्धांचा सिद्धांत आहे.

श्लोक—विशालः सर्वकामो वा गुणैर्वा परिवर्जितः । उपचर्यः स्त्रियः साध्व्या सततं देववत् पतिः ॥ अवी

चौपाई-वृद्ध, रोगी वश जड धन हिता । अंध बधिर क्रोधी अतिहीना । ऐसे दुपति कर किय अपमाना । नारि पाव यमपुर दुःख नाना ।
एक धर्म एक व्रत नेमा । काय वचन मन पतिपद प्रेमा । आनधर्म नहि दुसरा देवा, नारिधर्म केवल पतिसेवा.

श्लोक—आला चुकोनी पतिचा जरि राग चित्तीं । मानुं नको विषम तूं धरी शांत वृत्ती । वेळीं तयाकडून या अपराध झाला । सोशी, नको उलट उत्तर देऊं त्याला. आणि असेंहि घडेल.

श्लोक—उक्त्वा प्रत्युत्तरं दद्यान्नारी क्रोधेन भारत । सुरमा वा
शृगाली च जायतेत्र न संशयः

श्लोक—सुतं पतंतं प्रसमीक्ष्य पावके । न बोधयामास पतिं पतिव्रता
पतिव्रताशापभयेन पीडितो । हुताशनश्चंदनबिंदुशीतलः
मितं ददातिहि पिता मितं भ्राता मितं सुतः । अमितस्यतुदातारं
भर्तारं कान सेव्यते.

श्लोक—दुःशीलो दुर्भगो दीनो वृद्धो रोग्यधनोऽपि वा ॥१॥
पतिः स्त्रीभिर्न हातव्यो लोकेप्सुभिरपातकी
हा पातकी आहे म्हणून न हातव्यो न त्याज्यः

श्लोक—ब्रह्महा हेमहारीच सुरापो गुरुतल्पगः
महापातकिनस्त्वेते तत्संसर्गी च पंचमः

श्लोक—पतीच्या तुझ्यामाजि जो नेम झाला ।
नको बाध आणूं कधींहि तयाला ।
जिवासारखा ठेऊनि अंतरांत ।
जपूनि सदा नीट वागे घरांत ।
स्त्रीपुंकक्य प्रभयती यदा तत्धिगेहं विनष्टं

श्लोक—नसे पातिव्रत्यासम युवतिशी धर्म जगतीं ।
पतीच्या सेवेनें इहपर मिळे उत्तम गती.

पद—घे त्या देवाचें दर्शन घे ॥ संसारमायेंतुनी शीघ्र निघे ॥ त्यादत्त देवाचें ॥ धृ ॥ आदि अंत ना मध्य जयाला ॥ नैति वेद जयाला नैति ॥ ज्या पासुनी तो त्रिगुणची झाला॥ तसे विधि हरिहर हे तिन्ने ॥ त्या दत्त देवाचे ॥ १ ॥

आगम अगोचर सत्ता ज्याची । सहज लीला हे आहे त्याची ॥
स्वेदज उद्भिज्ज अंडज जारज । ज्यापासुनी हें सर्व निघे ॥ २ ॥

भजन—दिगंबरा दिगंबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा ॥ दत्तात्रय महाराज की जय.

---

## अथ सती-चरित्र

आर्या—धैर्ये होऊनी तन्मय निजधर्मे जो भजे जगन्नाथा ॥
माथा घे तत् योगक्षेमा हरि हे प्रसिद्ध जगीं गाथा ॥
आर्या—विप्रा कृच्छ्रतपस्या इज्या. दानार्चनावन नृवर्या ॥
आर्या कृषिगोचर्या वाणिज्य पदभूभवा सुपरिचर्या ।
आर्या—धर्मशिवे दिधला हा मर्म विवादे स्वसेवका शर्मा ॥
चर्मन पाळुनी गाळुनी धर्म भजो. स्त्री धवान परकर्मे.
साकी—कोट नारमो कोई एक होई परम सती सुनो भाई ॥
पतिविना और कछु नहि ज्याने वेद है जिसके ग्वाही ॥
साकी—प्रतिष्ठानी कौशिक नामक होता ब्राह्मण एक ॥
त्याची भार्या साध्वी धर्मी ठेंवी अनुदिनी सोक ( हौस )
ओवी—होती रूप लावण्या खाणी, वसनाशना मनी नाणी ॥
पण—क्रूर पतिचे जोडोनी पाणी । शांतवी चित्त सर्वदा—
पृथ्वी—असूनि घरी योषिता सति सुरूप मान्याखिला ॥
त्यजूनि तिस वारयोषीतगृही सदा ठाकला ॥
बसूनी गणिका त्यजी गद महा तया दूर ती ॥
सुदुःखित गृहासि ये स्मरुनी स्त्रीस ते दुर्मती ॥
श्लोक—स्वदेशजातस्य नरस्य नूनं गुणाधिकस्यापि भव देवता ॥
निजांगना यद्यपि रूपयाशि स्तथांपि लोकः परदारसक्तः ॥
पद—(उद्धवा शांतवन) निज दैवदत्त कुरूपस्वनी॥ जरी ऐसी आपुली गृहिणी ॥
चाल—तिज वरती प्रेम असावे । शिरी धरिती स्वाज्ञा भावे ॥
ते किंकर गेही रहावे ॥ व्हावे नच वश रागाला ॥
श्रीकमलापति पद कमला । हृतकमला धरी तूं बिमला ॥
अश्वधाटी—पाहे धवास सती हर्षुनी ठेवी धृती देवासमान गणी त्या॥
त्याचा तिला किमपी दुर्गंधी पाहि तरी, ना वीट, फार जपी, त्या
नीती त्यजीन पति बोले जरी कठीण ताडी तथापि नमिती
सेवी सदा धुवूनी पू-मूत्र आणि मल सोडी न शांती कधीं ती॥

कामदा—एकदा गृही निजुनी पाहिली ॥ वारयोषिता ब्राह्मणे भली वी तया मनी फार खोचली । स्त्रीस वदे तीच वेद चारु-दर्शनी । ऐक भामिनी ॥

का०—तूं जरी प्रिया मम तरी हरी । ही व्यथा तिची झडकरी करी॥ भेट रुग्ण मी ना तरी धरी । प्राण हा बाण हा लागे ते मनी। ऐक भामिनी.

श्लोक—पुरा प्रतिष्ठानपुराग्र्यआसीद्द्वीजोरु जार्तोक्षम एव गंतुं । दृष्ट्वा दिनस्त्रीं स जगौ निजस्त्रीं तद्धाम मांसाध्वी नयाद्यरंतुं.

श्लोक—इतिपतिगदितं सतीनिशम्य स्मितवंदना सदनान्निजान्निजातं । निजभुजशिरसि प्रगृह्ययातानिशि तडिताऽपथमावलोक्य शांता ॥

साकी—परिसुनि तद्वचना ती हाती बहुतचि शुलका घे । निघे घेऊनि स्कंधी धवांते जाते वेश्येमागें ।

आर्या—रात्रौ निबिडध्वांती विद्युत्तेजें सुमंद गती चाले । झालें शिखर जणूं हें पातिव्रत्त्याद्रिचे न कधी तोले ।

ओवी—सवतीचे मत्सरे प्राण देती । ही तरी स्कंधी वाहोनी पती ॥ जातां वेश्येच्या गृहाप्रति । धन्य जाणा सती हे ।

आर्या—खेद न मानुनी हर्षुनी बोले कांहीं असेल मम धर्म । तद्योगे पति होवो पूर्ण मनोरथ तरीच मम शर्म ॥

श्लोक—कांतां कांताय सा कांता प्रयाताऽकांतरे स्थिता । कांतारेत्रीक्ष्यं मांडव्यं शूलोतं तं व्यताडयत ॥

आर्या—शूळीं दिधला वध्यभ्रांत्या मांडव्य जेथ भूपतिनें । तेथें जाता ध्वांती नेणुनी धक्का दिला सतीपतीनें ।

गद्य—ततः क्रुद्धेन मुनिना मुनिनांधेनापीनालोकनादेतत्पतिना की नाशभवनातिथीनाभाव्यमित्त्यभिहितमाकर्ण्योद्वार्ते मा एहीति ग्रुनार्थं शपित्वाऽभीष्टं संपाद्य स्वसदनं सागमत् ॥

श्लोक—ध्वांते गाढेप्येवमेवास नाकः। शोकाविष्टोयशभोक्ताप्य-
नाकः।

आर्या—सूर्य न येतां उदया भूचर खचरामरेंद्र गडबडले।
पडले भूमीवरते लोकी जीवजंतु फार तडफडले।
कालाभावे झाले द्विज अक्रिय सर्व उद्यम बुडाले।
मेले बहु मग बोले सुरचय नाकी असें कसें झालें।
आम्हा यागे रक्षिती भक्षिती अस्मत् प्रसादनरवर्ष (नरेश्रेष्ठः)
हर्ष परस्पर सुमजे नुमजे हे काय आजि दुर्धर्ष। (दुःखानी
धारण करणेस कठीण).
मनुजे याग न करितां सोडाव्या आम्ही ईती परिभीती।
वाटे त्याहि कांहीं नाहीं केली खचीतचि अनीती।

श्लोक—अतिवृष्टिरनावृष्टिः मुषकाः शलभाः शुकाः॥
स्वचक्रं परचक्रंच सतैता ईतयः स्मृताः॥
काय करावें असा विचार करीत असतांना—

ओवी—मग सतीकृत्या ओळखून॥ सत्यलोकां जाऊन
सांगती विधीस तें ऐकून॥ ब्रह्मा बोले सुरांते॥१॥
तेजें तेजा शमवावें। सतीनें सतीचें मन वळवावें
ऐसे बोलोनी ब्रह्मदेवें॥ देवासह गमन केलें॥

पद—येऊनी कर घेऊनी सुर होऊनी श्रमी॥ जोडूनी कर सोडूनी दर
अत्री आश्रमी॥ घासुनी शीर अर्पुनी करते स्वराश्रमी॥

चाल—म्हणती, प्रणती, प्रणती, अनुसूये सतीवर्ये, मुनीभार्ये सदय
हृदय हो॥ निर्जरचयजर्जर भयभीत हा नही.
त्रस्त सती सरस्त्रे (भ्रष्टे) मती शापी भास्करा॥
ध्वस्त धृती अस्तमती बावये दरा (भय)॥
न्यस्तगति हें जगती कापे थरथरा। म्हणुनी शीणुनी जाणुनी—
तुजवरदा, अजि एकदा, त्यजुनी मदा॥ आलो शरण हो॥
निर्जरचया॥ २॥

श्लोक—अहो महत्वं महतामपूर्वं, विपत्तिकालेऽपि परोपकारः॥

यथास्यमध्ये पतितोऽपि राहोः। कलानिधिः पुण्यचयं ददाति ॥
ते मोठे ॥ नाहीं तर असें पहा की—

पद —गांवचा अधिकारी झाला म्हणुनी काय गावची बुडवावा ॥
वडील रागे भरती म्हणुनी काय जिवेची मारावा ।
अग्नि प्रज्वल झाला म्हणुनी काय घरासि लावावा ॥
सद्गुरू प्रसन्न झाला म्हणुनी काय शाप देत जावा ॥

पद—सूर्य येता उदया ममधव मुनी शापे हा मरे ॥ जाणुनी हे शापी सूर्या द्विजभार्यात्यादरे ॥ रवि उदया ये न माये जग सारे हे मरे ॥ दया येवो तूज याची आजी अरुणा आणवी ॥ समजावी तु सतीते याकरता जाणवी ॥

आम्हा ते वलेना ते तुम्हा ते कळेना ते ॥ साध्वी हो सुंदरी साध्वी तूं हो खरी ॥ अन्योन्या गोष्ट माने माध्वी (गोड) वाटेवरी तोडीनें शीघ्र करास गती तुम्ही रवी ॥ समजावी ॥ २ ॥

ओवी—सती म्हणे तुम्ही देव ॥ लोकपाल सदैव ॥ तुम्ही म्हणता घेतली धाव ॥ वाटे अभिनव आश्चर्य हें ॥ असो तथापि चला जाऊं ॥ त्या सतीला समजाऊं ॥ युक्तीनें तिला वळवू ॥ म्हणोनी निघाली अनसूया ॥

श्लोक—प्राब्रवीत् द्विजसतीमनसूया। भारतीमघसतीमनसू यां ॥ साधु साध्वि वृष (धर्म) एष धृतस्ते लोक एष हि वशे विहितस्ते ॥ इति-ब्रुवंतीमवदत् सतीसा प्रशस्तमुक्तं कुत आगमः सति ( संबोधन ) इनोदयायेति तयोदिता सती सतीक्ष्णदृक् प्राहतदा मुनेः सती ॥

श्लोकः—अस्तिका निजसखीं प्रियंवदाप्यस्तिकाद्य भवती प्रियंवदा ॥ वक्ति कागिरमहोन वेदम्यहं ॥ पुत्तिकासमतनुर्भवाम्यहं ॥

श्लोकः—उवाचानसूयाव्हेयार्क मथाते। प्रियाग्र्येदयालो हरेर्धामयाते ॥ ततोसौ निवर्त्स्यापिनीरुक् सुराभोद्रुतं दीयते यर्हिते रोचतेद्य ॥

ओवीः—अनुसूया म्हणे गे सती ॥ जरी मरे तुझा पती ॥ तरी मी वांचवीन सुमती ॥ नको खंती करूं त्याची ॥

ओवी---धन्य हो अये अनसूये ॥ पतिव्रते महामाये ॥ धन्य हो अत्रि प्रिये । निगमगेये तुज नमो ॥

श्लोक---तथेति सार्के प्रणताऽह्वयत् सतीं सतीक्ष्णगुः प्राक् उदितोब्जिनी तर्तीं ॥ प्रहर्षयंश्च व्यथयन् भृशंसतीं हरन् द्विजासूंश्चसमंतमस्ततिं ॥

श्लोक---देवहूतीदयिता दयितांघ्रिं। साविचिंत्य सहसा सहसाह ॥ एतदद्य चरणंमेशरणं भर्तुरेव सतु जीवतु जीर्णः-

श्लोक---सत्यां वदंत्यामितीत्रय सत्यां ॥ सत्याप्रमीतो दयितोऽपि विप्रः स जिवीतां देव इवास नीरूक्नितांत शांतश्च सतीप्रभावात् ॥

झंपाः---अहा हे सती की महाशक्ति लोकी ॥ कुलट करील जणु हे त्रिलोकी-धृः उदीत इन पाहुनी ॥ नमिती जन हर्षुनी ॥ खेद सती पावुनी पडली शोकी ॥

मौनीवर। कामिनी दोन्ही.कर जोडुनी-अत्रिपद वंदनी वेदकी, अहा स्वपति भजनाहुनी किमपि नानी मनी-सतत पतिसेवनी त्रितनु टाकी-द्विज सरिच येक्षणी. वाचू म्हणे ते क्षणी तो जिता होऊनी विलोकी ॥२॥

अहा---आर्या-

साध्व्यनुभाव प्रमुदित सुमने वर्षुनी नमानि सुरसुमने-बोलति सघे ये इच्छितवर केलें त्वां बरे न जे सुमनेः ( देवाने )

बोले ती वृंदारक तारक ध्या पुत्र पुज्य सर्वत्र। सुखदाति हरीहर विधी असती तसे तेची होती तव पुत्र-

---

## चंद्रहास आख्यान

अथ श्रीविष्णुभक्तचंद्रहासचरित्रस्य पूर्वरंगः प्रारम्यते.

पद---भक्त पराधिन मी ॥ उद्धवा ॥ मत्प्राप्तीचीं अन्य साधनें भक्ती-हूनी कमी ॥ उद्धवा ॥ ज्ञाना सदृश पवित्र नाहीं ते ईप्स्या गर्भी ॥ उद्धवा ॥ २ ॥ दास म्हणे हंकृतीचें इष्यानें राहेना उर्मी ॥ उद्धवा ॥ ३ ॥

श्लोक—न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव। न स्वाध्याय स्तपस्त्यागो यथाभक्तिर्ममोर्जिता ॥ १ ॥ आरभ्यते न खलु विघ्नभयेन नीचैः। प्रारभ्य विघ्नविहता विरमन्ति मध्याः। विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः। प्रारब्धमुत्तमजना न परित्यजंति ।

आर्या—मंदाविदधतुर्निंदां निपुणों हरिपादसेवनं तनुते ।
मंडूकेषुरटत्स्वपि मधुपो मकरंदसेवनं कुरुते ॥ ३ ॥

अंकोले निजबीजसंततिरयःकांतोपलं सूचिका ।
साध्वी नैजधवं लताक्षितिरुहं सिंधुः सरिद्वल्लभम् ।
प्राप्नोतीह यथातथा पशुपतेः पादारविंदद्वयं ।
चेतोवृत्तिरुपेत्य तिष्ठति सदा सा भक्तिरित्युच्यते ॥ ४ ॥

यत्कर्मभिर्यत्तपसा ज्ञानवैराग्यतश्चयत् ।
सर्वं मद्भक्तियोगेन मद्भक्तो लभतेंजसा ॥ ५ ॥

तरवः किं न जीवंति भस्त्राः किं न श्वसंत्युत
न खादंति न मेहंति किं ग्रामपशवोपरे ॥ ६ ॥

श्रेयःश्रुतिंभक्तिमुदस्य ते विभो ।
क्लिश्यंति ये केवलबोधलब्धये । तेषामसौ क्लेशलएवाशिष्यते ।
नान्यद्यथा स्थूलतुषावघातिनां ॥ ७ ॥

मीनः स्नानरतः फणी पवनभुक् मेषस्तु पर्णाशनी ।
नीराशी खलु चातको प्रतिदिनं शेते बिले मूषकः ।
भस्मोद्धूलनतत्परो ननु खरो ध्यानेपि सक्तो बको
एते नैवच यांति मोक्षपदवीं भक्तिः प्रधानं तपः ॥ ८ ॥

भक्तिर्जनित्री ज्ञानस्य भक्तिर्मोक्षप्रदायिनी
भक्तिहीनेन यत्किंचित् कृतं सर्वमसत्समं ॥ ९ ॥

यदि गमनमधस्तात्कालपाशानुबद्धो ।
यदिच कुलविहीनो जायते पक्षिकीटे ।
कृमिशतमपिगत्वा जायते चांतरात्मा
मम भवतु हृदिस्थे केशवे भक्तिरेषा ॥ १० ॥

भक्तिरेवानुत्तमात्र सर्वसाधनकारिणी
कर्मज्ञस्याप्यभक्तस्यमोघं कर्मेत्यथाब्रवीत् ॥ ११ ॥

विवरणं—प्रथमं संगतया भगवदुद्देशेन स्वाश्रमोपचितकर्मानुष्ठानं ततो महत्सेवा ततस्तत्कृपा। ततस्तद्धर्मश्रद्धा ततो भगवत् कथाश्रवणं ततो भगवति रतिः तथाच देहद्वय विवेकज्ञानं ततो दृढा भक्तिः ततो भगत्तत्वज्ञानं तत स्तत्कृपया सर्वज्ञत्वादि भगवद्गुणाविर्भावः इति क्रमोस्ति. शुद्धांतःकरणानांच ध्यानार्थे भक्तिरुच्यते। समाप्तमिदं चंद्रहासचरित्रस्य पूर्वरंगः। प्रीयतां अनेन लेखनेन श्रीमद्दत्ताभिन्नः श्रीवासुदेवोयतिः

आश्विन व. शके १८७२

अथ श्रीचंद्रहास्याख्यान

श्लोक—धर्मांचे हयमेध वाजि फिरतां दिक्चक्रवालांतरीं
आले कुंतलभूमिपालनवरोद्यान प्रदेशावरी
त्यामागें हरी पार्थ वीर असतां संनद्ध संरक्षणी
झाले अद्भुत अश्व दोन्ही सहसा होती अदृश्य क्षणीं ॥१॥

तद्रक्षणी पांडुसुतादि सेना। होती परि अश्व तदा दिसेना।
नेले सुरेंद्र हय देव लोकीं। म्हणोनिया सैन्य वरी विलोकी ॥२॥

आर्या—नष्टतुरंगम चिंता वीरमनीं प्राप्त जाहली महती
तों आला अमर मुनि यन्मुखि हरिनाम निजकरां महती॥ ३ ॥

ओवी—पार्थ म्हणे नारदमुनि। आपलें येणे जाहलें कोठोनी।
आमचे शामकर्ण दोन्हीं। काय नयनीं पाहिले ॥ ४ ॥

श्लोक—नारदस्त्वब्रवीदश्वौ गतौ कौंतलकंपुरं।
यत्रराजा चंद्रहासो वैष्णवपुरपालकः ॥ ५ ॥

साकी—चंद्रहास नृप बडा प्रतापी सत्यधर्मपर राजा।
रनमो जाके परशुरामबिन उपमाको नहिदूजा ॥ ६ ॥

श्लोक—यस्मै कुंतलको राजा। राज्यं दत्त्वा वनं ययौ।
दुष्टबुद्धेः प्रधानस्य कन्यां यः परिणीतवान् ॥ ८ ॥

आर्या--सकल प्रजाजनमानसकैरवनी सुखद चंद्रहासाचा।
नारद म्हणे नरा तुज कथितो इतिहास चंद्रहासाचा।
होता दयालू धार्मिक केरलपति कीर्तिमान्सुनय
सद्गुण सुलक्षणां वीतमल राक्षि तयासि जाहला तनय ॥९॥

श्लोक--कदाचिद्वैरिभिर्युद्धे। हतःकैरलभूमिपः।
परलोकगतं श्रुत्वा। पर्त्नि पत्न्यं वगारस्मुदा ॥ १० ॥

अभंग—ज्याचे खावें अन्न त्याचें देखूं नये उणे॥

श्लोक—पित्रभवां रहितं बालं धात्रि कुंजलकं पुर।
नित्ये पुराश्रयस्तस्या। भविषं पति भूर्जीतं ॥ १ ॥

साकी—भिक्षा मागुनि असतां तेथें! पावलि माता मरण ॥

श्लोक—सुलक्षण स्वरुपतो नृपति पूत्र जन्मोनियां।
दया करुनि आणिती जन तया स्वकीया लया।
अनाथसुत कौतुकें वसविता निजांकावरी।
सभक्ष वसनार्पणें सुखविती स्वपुत्रापरी ॥ १२ ॥

दिंडी—पंच वर्षांचा बाल मंदहास्य।
दीर्घ वक्षस्थल चंद्रसंनिभास्य।
चेंडूगोट्या घेवोनि चंद्रहास्य।
शिशूमाजीं खेळतां करी लास्य ॥ १३ ॥

आर्या—एके दिवशीं बालक खेळत असतां अनेक शिशूंसहित!
त्या शालिग्राम शिला सांपडली जी करा स्वदा सहीत ॥१४॥

ओवी—भलत्या उदकें घाली स्नान। भलतेंचि वाही तया पान।
भलतें अन्न करोनि अर्पण। मग आपण भोजन करी ॥ १५ ॥

करोनी निजवदनसंपूट। त्यामाजी घातला वैकूंठपीठ।
ज्याचें नित्य ओष्ठ पुट। रामनामें उच्चारी ॥ १६ ॥

तो कोणे एके दिवशीं। स्वेच्छें खेळतां बालकांसी।
दुष्टबुद्धेचे गृहासी। अवचट गेला एकला ॥ १७ ॥

दिंडी—भोजनाचा चालिला बहू थाट ।
चंदनाचे मांडिले रम्य पाट ।
वरी बैसली विप्रपंक्ति दाट ।
स्वमुखानें करितात वेद पाठ ॥ १८ ॥

ओवी—अर्घ्य पाद्यादिपूजाविधान । तयांचे करि प्रधान ।
त्यासी देत मिष्टान्न । त्या माजी बाळ बैसला ॥ १९ ॥

आर्या—करितां ब्राह्मणभोजन बाळ सुलक्षण विलोकुनि नयनीं ।
होईल राज्याधिप हा म्हणति तदा भाविजान तें स्वमनीं॥२०॥

साकी—भोजन पाके बछरा उठकर प्रधान अंकी बैठा ।
विप्रके मनमे ऐसा आया कीं यह है इनका बेटा ॥ २१ ॥

ओवी—मग मंत्राक्षता जपोन । प्रधानपुत्र हाचि म्हणोन ।
बालकांसी दिधले आर्शीवचन। सकल द्विजवरें तेधवा ॥ २२ ॥

श्लोक—मंत्राक्षता विप्रकराग्रमुक्ता । पतंति राजन्यदि मस्तकेषु ।
शिलाच देवो मनुजो नरेंद्रो। बंध्यागता पुत्रवती भवंती ॥२३॥

मनोहरो लक्षणलाक्षितांगो । बालो ध्रुवंराज्यधरो विभाति ।
त्वं दुष्टबुद्धे प्रतिपालयिनं । स्वत्संपदा पालविताभंकोटो ॥२४॥

छंद—वचन ऐकतां साचिव यापरि–कुपित जाहला परम अंतरीं ।
अशन माझिये सदनि करूनिया । सुवर देतसा बालका या॥२५॥

श्लोक—विचार्यमंत्री नृपराभिकंतं । समादरस्तोंत्यजवृंदमातुरः ।
रेरे पशु द्यावनगव्हरं महद्विनीय बालं प्रतिहंतुमर्हथ ॥ २६ ॥
चिन्हं शरिरस्य किमत्यवश्यमानीय मस्मत्परितोषकारी ।
ततोभवद्भ्यो विविधा महिष्यो । मया प्रदेया षटमुग्धभाजः।२७।

पद—दुष्टबुद्धिच्या वचनें अंत्यज जातां बाळ घेऊन। कराया दारुणतर शासन ॥ धृ० ॥ बाळ म्हणे अजि मजला कोठें नेतां । तुम्हीं येथून । माझें झालें नसे भोजन । व्याघ्र केसरी गर्जति ऐसे भीतिप्रदकानन । नेला तेथे मृगाकानन । खड्ग काढुनी अंत्यज म्हणती करितों तुझें कंदन । घाबरे बाळ करी वंदन । माझी

माता तात तुम्हीं हों। मीं तुमचा नंदन। यापरि करितां अक्रंदन। कळवळले मनि दुष्ट नष्ट ते कष्टप्रद दुर्जन। झाले यंत्र जसा चंदन। बाळपणि ज्या घडलें शालिग्रामशिलापूजन। तयांचें करिल काय दुर्जन। त्यासि न वधितां देति सोडुनि चरणांगुली कापून॥ कराया॥ १॥

अंजनी—चरणांपासुनी रुधिर वाहे। शितोष्णाचा वेग न साहे। स्वजन कोणी शोधोनि पाहे। कांताराभाजी॥ २८॥

दंडी—अश्रु नयनीं दाटला कंठभारी। करी आक्रोश स्मरुनि कैटभारी॥ फिरत असतां काननीं चंद्रहास्य। कुलिंदेशे पाहिले नयनि त्यास॥ २९॥ नृपति बोले बा कवण मायतात। कवण वंशीचे जन्म बोलतात दुष्ट चांडाळें दुःख दिलें काय। सांग बाळा त्या करिन मीं उपाय॥ ३०॥

श्लोक—राजासंशयसागरांत बुडतां आकाशवाचोत्तरें।
सांगे श्रीहरी तो कुलिंदनृपते हा पुत्र घे तूं त्वरे।
आहे क्षत्रियबीज शुद्ध बरवे दुर्दैवयोगें असा।
हिंडे काननीं लाभ हा तुज भला झाला गृहीं जा कसा॥ ३१॥

ओवी—व्योमरवेगतसंशय घेवूनि सुतजाय आपुल्या भवनीं।
सांगे सतीला झाला ईशदये हा सुपुत्रलाभ वनीं॥ ३२॥
व्रतबंधानंतर करि सद्विद्याध्ययन, सद्गुणाभ्यसन
सद्धर्मनीतिवांचुनि, संतत ज्याला नसे दुजे व्यसन॥ १३॥
तो चंद्रहास नामें तेजे झाला सपत्नतापकर
कर जोडुनिया अर्पिती दिग्विजयीं अखिल ज्यासी भूप कर॥ ३४॥

श्लोक—अथाभ्यषिंचत्तं पुत्रं चंद्रहासं स्वके पदे
वेदविद्भिर्द्विजैःसार्धं, कुलंदः पंचमीदिने॥ ३५॥

आर्या—कळवी आज्ञा राष्ट्रीं संतत विष्णुव्रता करो जनता।
विमुखा वधिन जनांसि रक्षीन मीं कृष्णपदसरोजनता॥ ३६॥

श्लोक---तां चंद्रन्हाही परिपालयंतं । तं चंद्रहासं जनकः कुंलिदः
उवाच हे पुत्र मया प्रदेयं । निष्काथिंत कुंतलपालराज्ञे ॥ ३७ ॥

दुताने कनक सुवस्त्र रत्नमाला । घेवोनी मग नमोनी नृपोत्तमाला।
अर्पया करभार कुंतलेश्वरालागेले ते हरीदिनी सर्व तत्पुराला ३८

आर्या---ग्रामनदी सलीलांत स्नानादिक करुनि ते सदाचार ॥
पूजुनि विष्णूमूर्ती, सचिवगृहा जाति ते सदाचार ॥ ३९ ॥

ओवी---मुखें करिती हरिनामोच्चार । प्रधानासि करिती नमस्कार ॥
तुळसीमाला मंडीत शरीर । शिरीं मंजरी खोविल्या ॥ ४० ॥

तयाचे पाहोनि चिन्हां । प्रधानें ठेविले दूषणा ।
अमंगलरूपी आमुचे सदना । काहो तुम्हीं प्रवेशला ॥ ४१ ॥

साकी—सचिव कहो तूं कौन कांहां के । कोन तुम्हारा राजा ।
दूत कहत मै कुलिंद सुतके नवकर उन्ने भेजा ॥ ४२ ॥

प्रतिवत्सर करभार आपका सबही हमने लाया ।
चंद्रहास कुलदीप भूपने आपनें खातर दीया ॥ ४३ ॥

धनी हमारा बडा प्रतापी सत्यधर्म राजा ।
सब भूपनका किया पराजय यशरनका शिर ताजा ॥ ४४ ॥

ओवी—मग सेवकांसी बोले प्रधान । यासी सत्वर द्यावें भोजन ।
ते म्हणती आजी हरिदीन । अन्न न सेवूं सर्वथा ॥ ४५ ॥

श्लोक—प्रातर्भुक्त्वा चतैः सार्कं जगामनिजभूपतिं ।

ओवी—म्हणे सचिव जोडूनि हस्त । कुलिंद झाला मदनमस्त ।
करोनिया बंदोबस्त । आजि समस्त भूपातें ॥ ४६ ॥

संदिश्य मदनं पुत्रं व्यापारे नृपतेरथ ।
कांतार्थिनीं सुतां वीक्ष्य यौवनोद्भिन्नशैशवां ॥ ४७ ॥

आर्या—स्वमनी कपट धरोनि जाय सचिव तो कुलिंद नगराला ।
वाटे त्यागुनि अमृत प्राशाया जाय धाउनि गरला ॥ ४८ ॥

अभंग—भूपें सत्कारिले त्यांस । लागे चरणीं चंद्रहास ।
पुसतां सांगे माझा सुत । प्राप्त झाला काननांत ॥ २ ॥
त्यासी देखोनिया चित्तीं । खिन्न झाला तो सुमती ॥ ३ ॥

श्लोक—चांडाळानी सत्य माझा दुष्टांनीं घात साधिला ।
छिन्नषष्ठांगुली शत्रु काननी सोडूनी दिला ॥ ४९ ॥
द्वौ पुत्रौ मम विद्येतें युवानौ मदनामलौ । तौ किंकरिष्य
तथास्यदेयंमे संपदां प्रभुः ॥ ५० ॥
यद्रतंग तमे यास्तुकरिष्याम्यनृतं वचः ।
मुनीनामथ निश्चित्य । मनसा या कविद्विरं ॥ ५१ ॥

ओवी—ऐसी दुष्ट बुद्धि धरोनि । बाह्य बोले अमृतवाणी ।
म्हणे धन्य कुलींदा जनीं । ऐसा पुत्र लाभला ॥ ५२ ॥
कीं कूपमुखीं तृण आच्छादिलें । किंवा विषगुळें लेपिलें ।
ऐसें वाक्य बोले चांगलें । परि घातुक विषाहुनीं ॥ ५३ ॥

श्लोक—निगूढं विद्यते कार्य सुतंते प्रेरये परं ।
राजोवाच दलं देयं गमिष्यति सुतोधुना ॥ ५४ ॥

( चाल—अक्रूर हा )

पद—तो सचिव मतें जाय घेऊनि पत्र । कुंतलासि अंबुजनेत्र ॥धृ०॥
पुरनिकट महाराम रम्यतर पाहे । चंद्रहास मनिं बहु मोहे ।
तो स्वमनि म्हणे । काय चैत्ररथ आहे ।
नंदनाख्यवन अथवा हे । ज्या माजि हे त्रिविध समीरण वाहे ।
जणू वसंत सततचि राहे । (चाल) सविकास मल्लिका जाती ।
फलयुक्त विविध तरु जाती । यद्योगें श्रम बहु जाती ।
हे जाणुनिया वृक्षस्थलीं मृगगात्र । निद्रेसी जाहला पात्र ॥१॥

तो सचिवसुता ह्याच उपवनीं आली । घेऊनी बरोबर आली.
अति कुतुकभरें बिमळ सरोजल केली । बहु तिणे सख्यासह केली.
मग सुरस तरोद्यान पादांती झाली । फलकुसुम वेचिती झाली.

चाल—पाहीला पुरुष सुकुमार । कैरलाधिश सुकुमार
लावण्यविनिर्जित मार । मग करी मनीं सुविचार ॥
म्हणे बांधाया कंठीं सुमंगलसूत्र । हा योग्य दिसे नृपपुत्र ॥ २ ॥
आर्या—कमलाक्ष हिमकरानन कनक तिरस्कारी कांतियुत काय ?
गंधर्वेश्वर कीं हा तातें मज धाडिला पति काय ॥ ५५ ॥
ओवी—या परि ते मृगनेत्रा । वारंवार पाहे रमणवस्त्रा.
तों अकस्मात देखीले पत्रां । वस्त्र पल्लवीं सुटले जे.॥ ५६ ॥
तों युक्तिनें घेतलें उचलोन । त्यावरि देखिले मुद्राचिन्ह ।
उकलोनी पाहे तो लेखन ।तातहस्तीचें ओळखिलें ॥ ५७ ॥
श्लोक—स्वस्तीश्री मदनक्षतीश्वर सुतो योयं मया प्रेषित
स्तस्मादस्य कुलंवयो दृढवपुप सुविद्याधनं ।
शीलं चैवनिदेशितो ममयतो नैवेक्षणीयंत्वया ।
मित्राय स्वगृहागताय विषमेतस्मै रहो दीयतां ॥ ५८ ॥
आर्या—परमहितोयं बालो न विचार्य रूपकुलगुणाद्यस्य ।
विषयागताय सहसा विषमस्मै दीयतां त्वया सरया ॥ ५९ ॥
ओवी—नखें कार्ढा नेत्र कज्जल—माजी मेळविलें निर्मल जल ।
कान्हा दिधला तात्काल । यथार्थ जैसा नोवखे ॥ ६० ॥
श्लोक—पत्रं रसालनियसिक्ृतमुद्रं विधाय सा—
कंचुकाभरणांतरेन्यस्य विषयागान्नीवेशनं ॥ ६१ ॥
प्रक्षालितास्य कृतवक्त्रशुद्धि । पल्याणयुक्तं
हयमारुरोह । चतुर्भिरैवानुगतः स्वभृत्यैः
पुरं विवेशाप्रतिमप्रभावः ॥ ६२ ॥
साकी—चंद्रहास नृप याचा मदनें अतिशय आदर केला ।
पत्र पित्याचें वाचुनी सारे प्रमुदित मानसिं झाला ॥ ६३ ॥
श्लोक—शृण्वतां सर्वलोकानां । वाचया मास मंत्रिजः
स्वस्त्यस्तु मदनायाशु । विषयासौ प्रदीयतां ॥ ६४ ॥

केका—तृतीय भवनीं असे भृगु गुरुहि एकादशी ।
सुदुर्लभ मिळावया बहुत बा सुवेळा अशी ।
असे गणक सांगती अजि मुहुर्त आहे बरा ।
निशासमयीं गोरजीं बहु तुम्हीं करावी त्वरा ॥ ६ ॥

दिंडी—लग्न झाल्यावर सर्वही द्विजाती ।
वसनभूषा घेवुनी गृहां जाती ।
मदनाचें दातृत्व पथीं गाती ।
पाहुनि कुमति कोपला फार चित्तीं ॥ ६६ ॥

आर्या—द्विज म्हणती दिलि मदनें विषया तव चंद्रहास रायाला ।
सचिवा श्रीहरी सुदती कमला तैसीच योग्य ही ज्याला ॥ ६७॥

श्लोक—घरीं येतां बोले अति कुपित तो आत्मतनया ।
कुलांगारा केलें अनुचित तुवा हे गतनथा ।
कुपुत्रा पत्रातें न गणुनि दिली आजि अहिता ।
तया दुष्टामाजी परमगुणसंपन्न दुहिता ॥ ६८ ॥
दूर प्रसर्पण मुखंममदर्शयाद्य । पत्रं समानय
निरीक्ष्यचतत्र किंचित्। तेनाहृतं पत्रमपश्य-
देषमंत्री विघातुर्लिपिमन्वमंस्त ॥ ६९ ॥

पद—चिंता करी मानसी—पत्र लिहितां मज चतुराला
भूल ही पडली कसी ॥ १ ॥
गति दैवाची अशी विचित्रा ।
विष द्यावें परि विषया दिधली मदनानें शत्रूसीं ॥ २ ॥
विप्रजनोक्ति अशी सांगती ।
अतीव मिथ्या होय सर्वदा युक्ति करीन मी तसी ॥ ३ ॥

ओवी—एकांती चांडाळातें पाचारून । तया प्रतिबोले वचन ।
म्हणे तुम्हीं चंडी देवालयीं जाऊन । माझी आज्ञा करावी ७०

श्लोक—जाते पितृप्रसुकालेयः कश्चिदपि यास्यति ।
तं हिंसयांत्यजायत्नान्मा बिचारयत ध्रुवं ॥ ७१ ॥

आर्या—सचिव वदे शशिहासा जाऊनि तुवां पितृप्रसुकालीं ।
पूजी कुलधर्मास्तव ग्रामबहिर्देश संस्थिता काली ॥ ७२ ॥

मधुमालिनी विवाहाविषयीं होताची भुप खिन्नमना ।
तों आला साचिवात्मज मदन करी चरणपंकजी नमना ॥७३॥

श्लोक—विषया मम तातेन । चंद्रहासाय सार्पिता ।
राजोवाच प्रधानेन । स्वकार्यं साधितं पुरा ॥ ७४ ॥

दिंडी—सचिव तनयासी कुंतलेश बोले ।
तुझ्या तातें अतिनिंद्य कर्म केलें ।
मदनवत्सा हे कळवितां न अन्या ।
चंद्रहास अर्पिली स्वीयकन्या ॥७५॥

आर्या—तरी मदना शशिवदना संप्रति मी घालितों तुला आण ।
तो चंद्रहास या क्षणीं जावुनी मंम मंदीरासी बा आण ॥७६॥

ओवी—मग निर्मत्सर कुलिंदपुत्र । संध्या वंदन करूनी पवीत्र ।
हातीं घेवूनिया पूजापात्र । श्रीहरी स्मरोनी चालिला ॥ ७७ ॥

श्लोक—जातां गृहासी मदनासी वाटे । दैवें तयाला शशिहास भेटे ।
जावें तुवां संप्रति राजधामीं । पूजोनि येतों जगदंबिका मीं ॥७८॥

मदनस्त्वंबिकागारे खड्गेनोपय मंगत
शशिहासोपि भूपासकन्योपयमभागभूत् ॥ ७९ ॥

आर्या—लब्धश्रीराज्यविभव भेटाया दुर्मतीस तो आला ।
वंदुनि वृत्तांत कथी पूजाया मदन अंबिका गेला ॥ ८० ॥

( पद—चाल—फटका )

शशिहासाची वाणी परीसुनि दुर्मति मनि बहु घाबरला ।
सुतवात्सल्ये जाय धावुनी धेनूपरी हंबरला ॥ १ ॥

अंबायतनीं खड्गभिन्नतनु मदन मदनसमसुत पडला ।
पाहुनि बोले वत्सा दारुण योग असा तुजला घडला ॥ २ ॥

गांजियले मी तुजला भारी । राग मनामध्ये तो जडला ।
म्हणुनी मजला टाकुनी तुजला स्वर्गपंथ हा आवडला ॥३॥
या क्रूरानें विचार न करुनी माझा वंशांकुर खुडिला ।
त्या दुष्टांचा वध करितानां । का नाहीं तो कर झडला ॥ ४ ॥
प्रतिकूलोत्तर बाळा कधींही केले नाहींस मज वडिला ।
परघाताचा हेतू मी धरिला । माझा मजसीची तो नडला ॥ ५ ॥
दुष्टबुद्धिनें आत्मवधाचा हेतु मानसीं तरि धरिला ।
सुतवात्सल्ये ॥ ६ ॥

आर्या—किती म्हणति चंद्रहासें राज्यमदें ससुत सचिव हा वधिला ।
त्यासिदया इतरांची येईल जरी मधुरता पयोनिधिला ॥ ८१ ॥
ऐसा विचार करुनी केला निश्चय पुरांत अज्ञानी ।
परि सूत त्यासी म्हणती हे न करील चंद्रहास तो ज्ञानी ॥८२ ॥
जगदंबा प्रासादी पंचत्वापन्न पाहिले दोघे ।
मृदु चित्त वाहीला नृपनंदन मग परमदुःख सरी दोघे ॥८३॥
बद्धांजली भूप म्हणे विजीता तव भक्तपालन पराधी ।
मृत्युंजयदयिते त्वा वधिला मत्श्वशुरका अनपराधी ॥ ८४ ॥

पद—भगवति हरी वल्लभे आंबिके विधी हरीहर संस्तुते ।
चरणाप्रति मी शरण आलो करि करुणा उदयोस्तु ॥ धृ ॥
पदनतजनपालिनी वत्सले अगाध तूझी क्षमा ।
एकमुखे मी किती वर्णावी मन्मती बहु अक्षमा ।
अतर्क्य महिमा तुझ्या गुणाचा न कळे निगमागमा ।
स्वीय जनास्तव धरीसी युगायुगीं मूर्ती हृदयंगमा ।
मधुकैटभ खल शुंभ निशुंभादिक बहुदनुजाधमा ।
मारूनी भक्तांसाठीं केली निष्कंटक ही क्षमा ॥
चाल—गिरीसुता विधी स्त्री रमा । ह्या मुर्ती तुझ्या निरूपमा ।
ज्या हारीती साधूच्या श्रमा । अष्टादश भुज ।

विधृत गदादिक विविधायुध मंडित । विष्णुदास मी ।
सतत मजला रक्षी कुलदेवते ।

श्लोक---असा स्तव करोनिया हवन तो स्वमांसे करी-
कृपाण शिरी ठेवितां मग धरी भवानी करी-
म्हणे सु-वर मागतूं अति अलभ्य देतें तुला ।
परोपकृतिला तुझ्या त्रिभुवनी नसे बा तुला ॥ ८५ ॥

आर्या---माते तुवां प्रसादें उठवावा श्वशुर आत्मजासहित ।
यासहि दर्शन देवुनि करी जननमरणभयरहित ॥८६॥

अंबेनें मग करितां दोघांवरी दिव्य अमृतवृष्टी ते
सुप्तोत्थितसे उठले करितां त्रिदिवेश पुष्पवृष्टीतें ॥ ८७ ॥

प्रपूर्य विष्णुदासस्य चंद्रहासस्य कामनां ।
अंतर्हीता स्वभक्तानामभूत्सांतर्हिता तदा ॥ ८८ ॥

---

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः

## अथ श्रीवटसावित्रीचरित्रस्य पूर्वरंगः

( पद १ )

या जगीं धन्या तीच सती ।। धृ० ।। पति हें दैवत पति हेंचि व्रत जाणें स्वसुख पती ।। १ ।। परसदनीं पद पडतां पावे भय जणु अहि-वरती ।। २ ।। वचनप्राप्ति ही अतिशय दुर्लभ कृपणधनाहुनि ती ।। ३ ।। सांगे केसरी यद्व्रततेजें नृसुरासुर दिपनी ।। ४ ।। या जगीं धन्या तीच सती ।।

( पद २ )

या जगीं तो नर धन्य म्हणावा ।। धृ० ।। प्रपंच साधुनी परमार्थाचा लाभ जया व्हावा ।। १ ।। शमदमसाधन साधुनिया जो सुकृताचा ठेवा ।। २ ।। ममताहंता ईर्ष्यासूया क्रोधही टाकावा ।। ३ ।।

हें पद अगोदर म्हणून नंतर शंका कीं—कां हो ज्या ग्रंथांत पाहावें व ऐकावें त्या ग्रंथांत पुरुषांनाच कां उपदेश नियम आदिकरून आढळतात व स्त्रियांना कोठें कांहीं उपदेश नाहीं काय ? तर म्हणतात कीं—होय. स्त्रियांना मंत्रोपदेश नाहीं परंतु धर्मोपदेश आहे. तो कोणता तें कवि सांगतात—या जगीं धन्या तीच सती ।।

भर्ता देवो गुरुर्भर्ता धर्मतीर्थव्रतानि च ।।
तस्मात्सर्वप्रयत्नेन पतिमेकं भजेत्सती ।। १ ।।

भक्त्या च्छायेव याश्रान्तं स्वभर्तृपरिचारिणी ।।
पतिरेव व्रतं यस्या अखंडं सा पतिव्रता ।। २ ।।

लेपोत्युष्ण इवानिलोऽनलसमः शीतांशुरुष्णांशुवत्
शय्या वृश्चिकवत्सुमस्त्रगहिवद्भूषा समा कंटकैः ।
वाङ्माधुर्यमपि प्रदीपनसदृक् स्वाद्वन्नमत्युत्कटं
प्रेष्ठे त्वंतरिते क्षपेत् दृढतरं साध्व्या अभूत्सर्वदा ॥ ३ ॥

स्वैरिण्योपि स्त्रियः श्वादियोनिं गत्वा व्यथंत्यलं ।
भर्तुराज्ञां विना नारी उपोष्य व्रतचारिणी ॥
आयुष्यं हरते भर्तुः सा नारी नरकं व्रजेत् ॥ ४ ॥

वशानुवर्तनं देहयात्रा श्वश्र्वादिगौरवं ।
लोकयात्रेश्वरो भर्ता करणं पोष्यपोषणम् ॥ ५ ॥

पादांबुतीर्थमुच्छिष्टं प्रसादो देवतार्चनम् ।
तत्सेवा भूषणं तोषो धर्मोनुज्ञानुपालनम् ॥ ६ ॥

क्रुद्धश्चेत्प्रार्थनीयो न गंतव्यं परसद्मनि ।
नाज्ञां विना गुरोर्गेहे न वक्तव्यं सदेतरैः ॥ ७ ॥

स्वीकार्यं वस्त्रभूषादि भर्त्रा दत्तं यदृच्छया ॥
न निंद्यो दुर्भगो दीनो दुःशीलोपि शिवोपमः ॥ ८ ॥

प्रतिवादाच्छुनी भर्तुरुलूकी गुरुवंचनात् ।
पतिं विना स्वादुभुक्त्या वराहोलूकयोनिगा ॥ ९ ॥

पतिरेव हि नारीणां दैवतं परमं स्मृतं ।
मानसः सर्वभूतानां वासुदेवः श्रियः पतिः ॥ १० ॥

नोपदेश्यो मनुः स्त्रीणां पतिभक्तिस्तु तारका ।
दत्तोप्यनुपयुक्तः स्याद्दातुर्हानिश्च शुक्रवत् ॥ ११ ॥

पदन्यासो गेहाब्दहिरहिफणारोपणसमो
निजावासादन्यद्भवनमपरद्वीपतुलितम् ॥

वचो लोकालभ्यं कृपणधनतुल्यं मृगदृशः
पुमानन्यः कांताद्विधुरिव चतुर्थीसमुदितः ॥ १२ ॥

एतत्धर्माश्रयात्साध्वी दुर्गतिस्थमपि प्रियं ।
प्रसह्योद्धृत्य चिल्लीव सर्पं स्वर्विशति ध्रुवम् ॥ १३ ॥

शवाभावे गर्भिणीत्वेऽल्पेऽर्भे वैधव्यपालनम् ॥
या जगीं धन्या तीच सती ॥
समाप्तोयं सावित्रीचरित्रस्य पूर्वरंगः

अथ श्रीवटसावित्रीचरित्रप्रारंभः

१ साकी

धर्म म्हणे मुनि मार्कंडेया आढळली कीं अन्या ।
सत्वाढ्या आमुची जशी ही भार्या लोकीं धन्या ॥ १ ॥

२ आर्या

मुनि त्यासि म्हणे होती सावित्री नाम अश्वपतितनया ।
तच्चरित श्रवण करी ऐकाया योग्य साधुपतितनया ॥ २ ॥

३ श्लोक

जन्मनि स्वजनदुःखकारिका । संप्रदानसमयेऽर्थहारिका ॥
यौवने विषयदोषकारिका । दारिका हृदयदारिका पितुः ॥ ३ ॥

४ पद

झाली ज्याची उपवर दुहिता चैन नसे त्या तापवी चिंता ।
केवि मिळे पति कुलीन सुंदर लोकप्रिय जो धनवान त्याला ॥

५ श्लोक

झालीस प्रियकन्यके नृप म्हणे दानासि योग्या तरी
कोणी गे तव तुल्य ना वर मिळे ही काळजी अंतरीं ।

वत्से यास्तव तूं फिरोनी अवनी चित्तानुरूप स्वयें
पाहोनि वर नेमुनि परतुनि सांगावया शिघ्रा ये ॥ १ ॥

श्लोकः–कन्या वरयते रूपं माता वित्तं पिता श्रुतं। बांधवाः कुलमिच्छन्ति मिष्टान्नमितरे जनाः ॥ ६ ॥

पदः–(चाल अक्रूर हा नेतो श्रीकृष्णाला) मग सावित्री राया सचिवासहित शाल्वदेशीं गेली फिरत. मग शोधीती द्युमत्सेन राजसुत। सत्यवान गमे तिज उचित। वर नेमुनि तो चित्तीं होवूनी मुदित। निजग्रहासि आली परत।

चालः–तो नारद ऋषीसह तात। स्थिती पाहुनि आनंदांत॥ ती उभयतास वंदीत। मुनि तोषुनिया तीस म्हणे बैसावे। सौभाग्य सौख्य पावावे. ॥ ७ ॥

श्लोकः–रायासि नारद पुसेचि अगा नृपाला। ही कोण सांग मुलगी तव काय बाला॥ ये काय ही श्वशुर धामीहुनी मुलीला॥ पाहोनि ही मज गमे बहु भाग्यशीला॥ २ ॥

दिंडीः–नृपति बोले हे मुनीश्वरा बाहे। अजुनि दुहिता अविवाहीत आहे॥ स्वयें शोधाया योग्यशा वरातें–म्यांचि बाहेर धाडिलें हिला होतें॥ ९ ॥

आर्याः–वद वत्से काय कसें वर बरवा पाहिला न लाजावें॥
या गुरुनें धन्य असें वदुनी स्वमुखें तुला मला जाये॥

श्लोकः–सावित्री वदली पित्या मन तुझे वृत्तासि माझ्या भजो।
ऐके शाल्वपति प्रसिद्ध जगतीं भूप द्युमत्सेन जो॥
राजा भूपवनस्थ अंध तरी तो मनिं दिला सासूरा॥
तत पुत्रा वरिले जसे तनुमनें दाक्षायणीनें हरा॥

आर्या:-नारद म्हणे नृपा हे चुकली योजूनि सत्यवान नवरा ॥
नवरा वा जरि गुणवान योजूं अन्या उणें असे नवरा ॥

श्लोक:-राजा म्हणे सुकुलवान गुणवान सुरूप ॥ तो राजपुत्र मग कां न सुतानुरूप ॥ सर्वैर्गुणैश्चसंपन्नो रत्नैरिव महार्णवः ॥ एको दोषो महानस्य गुणानावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥

बोले मुनिंद्र पुढती तुज तो नढेल ॥ त्याज्येषु शुक्र पुनर्वीव्यसुता घडेल ॥ १४ ॥

ओवी:-प्रथम बोले तयाचे नयन। अंध बलहीन देखोन। स्पर्धी दायाद मिळोन। राज्य सर्व हरिलें ॥ १५ ॥

हें ऐकोनी दुश्चित वार्ता। कन्येलागीं बोधि पिता ॥
सत्यवान् त्यजोनि भर्ता। वर आणिक विचारी ॥ १७ ॥

आर्या:-भूप म्हणे न वरावा वत्से जरि सुगुणसागर लवायु ॥
शीतल मंद सुगंधिहि वद सेवावा कसा गरलवायु ॥ १८ ॥

पद. चाल:-अक्रुरति सुमती म्हणे वरूणी पयोनिधी सरिता देखिली न मागें फिरता ॥ कधीं दिपातें टाकूनि रत्नावरूता. नच पतंग दिसला फिरता-वर चित्ते जो वरिला तदितर आतां पुरुष सर्व तुजसम तातां.

चाल:-यम येईल मान चिराया ॥ तरि मन न चलेल चिराया। समजोन अचल धीरा या ॥ जे विहीत दिसे करणें तेचि करावें. सौभाग्यसौख्य पावावे.

आर्या:-देवर्षि म्हणे त्यासिच दे साध्वीव्रतपरा सुता राया
ज्यायोगें जगतीं या तरतिल साध्वी पतिव्रता राया
होते सद्धर्माच्या कासेला लागता सदाशिव हो
येतो बसा प्रसन्न प्रभु मृत्युंजय तुम्हां सदा शिव हो ॥२१॥

श्लोकः—मृत्युजय प्रभुकृपेचि अखंड राहो ॥ सौभाग्य कायम हिचें सुखदीप राहो ॥ आशी अशी वितरुनी मुनि कन्यकेला । तोषोनी घेऊनि निरोप मुनिंद्र गेला ॥ २२ ॥

ओवीः—जाणोनि कन्येचा भावार्थ ॥ घेवोनि सामुग्री समस्त । वना पातला नृपनाथ । द्युमत्सेना जवळी कीं ॥ २३ ॥

श्लोकः—दुहिता मम सावित्री तव पुत्रमथीप सति ॥ तां स्वधर्मेण धर्मज्ञ स्नुषार्थी त्वं गृहाण मे ॥ २४ ॥

श्लोकः—चुतास्मिराज्याद्वनवासमाश्रितो ॥ चरामि धर्मे नियता तपस्विनः ॥ कथं त्वनर्हा वनवासमाश्रमे । निवत्स्यते क्लेशमिमं सुत तव ॥ २५ ॥ सुखं च दुःखं च भवाभवात्मकं ॥ यदा विजानाती सुतार्ह भवच ॥ नमद्विते युज्याति वाक्यमीदृशं ॥ विनिश्चयेनाभिगतोऽस्मि ते नृप ॥ २६ ॥ सुखस्यानंतरं दुःखं दुःखस्यानंतरं सुखं ॥ २७॥

ओवीः—वोपोनि संपदा कोटीवरी ॥ सत्यवाना दिधली कुमरी ॥ कन्या ठेवोनि वनगव्हरीं ॥ राजा नगरातें पातला ॥ २८ ॥

अभंगः—माता पितरें स्वाधिन केली । तापसवस्त्रें धारण केली । पतिसेवेसी सादर झाली । तेव्हांपासोनि । २९ ॥

श्लोकः—अभ्युत्थानमुपागमे गृहपतौ तद्भाषणे नम्रता ॥ तत्पादार्पित दृष्टिरासनविधी तस्योपचर्या स्वयं ॥ सुप्ते तत्र शयीत तन्मयमतो जह्याच्च शय्यामिति ॥ प्राचैः पुत्रि निवेदितः कुलवधूसिद्धान्तधर्मागमः ॥ ३० ॥

दिंडीः—अशी सावित्री वर्तता निजांगें । स्वपतिनिधनाची टोंच जिवीं लागें ॥ तरि न डगमगली करूनि सद्विचार । नारदोक्तिस्तव उरति दिवस चार ॥ ३१ ॥

आर्याः—उरता चार दिवस तो करिती झाली पतिव्रतारंभा ॥
पति होण्या दीर्घायू आचरती जाहली तदा रंभा ॥ ३२ ॥

ओवीः–सासूश्वशुराते वंदून ।। सावित्री व्रतारंभून । पतिचरणाचें स्मरण करून । प्रार्थिती ते जगदीशा ।। ३३ ।।

आर्याः–श्वशुर म्हणे त्रिदिनव्रत झाले कीं वंश धन्य केला गे ।
कर पारणा क्षुधा बहु पूर्वत्रयामाजि कन्यके लागे ।। ३४ ।।

केका. श्लोकः–फळें आणि मुळेंहि तो त्वरित घ्यावया चालला । तदा सति म्हणे अहो आपुलि दासी ही न्या हिला । बघीन वनरम्यता जसि असे तशीहि बरी ।। न सोडि आपणां कधीं खरि असेचि ही वैखरी ।।३९

पद. चालः–बघता वन उफराटें, पायिं करपे रुतती काटे । कोमल तनु पुष्पाहून । कसे साहेल तूजला ऊन । पावशील तूं श्रम साची । उपवासि चार दिवसांची ।। पतीनें सांगितल्यावरून सावित्रीनें वडिलांची आज्ञा घेतली.

ओवीः–हातीं कुठारादी धरून । उभय ते उभयतांसी नमून । आज्ञा तयांचि घेऊनी । निघते झाले ते काळीं ।। ३८ ।।

आर्याः–पात्र भरूनि फळांनीं काष्टें फोडुनि वनांत सत्वर तें
पाहोनि तत् कलत्र स्मरले मुनिवच मनांत सत्वर तें ।। ३९ ।।

अभंगः–नाथा हो तुम्ही शूर विरा । विनती माझी दारूण चारा ।। संकटकालीं द्या मज धीरा । सद्भाषण करूनी ।। ४० ।।
सावित्रीच्या विनंतीकडे लक्ष न देतां–

ओवीः–काष्टे फोडिता हाटोनेटी । टणका भिन्नलासे ललाटीं ।
मूर्च्छा येऊनी पृथ्वीवरती । दंडप्राय पहुडला ।। ४१ ।।

आर्याः–तुझिया मृदु शीतांकीं शिर ठेवुनि वाटते निजावें गे
त्वत्स्पर्शामृत म्हणुनी या मत्तापें पळोनि जावें गे ।। ४२ ।।

अभंगः—धरूनि मस्तक मनीं म्हणे बाला। आपला ठोकताळा भविष्याचा ॥

ओवीः—भार्या मस्तक ठेवूनि अंकीं। हृदय थापटी मृदु हस्तकी।
निशीप्रमाणे घटीका लोटती। तो एक प्रहर जाहला ॥ ४४ ॥

अभंगः—हरहर माझ्या हे दुर्दैवा। शेवटीं साधीला पर्ण दावा.। हे श्रीमृत्युंजया सदाशिवा। पाव आम्हांसी हे समयीं ॥ ४५ ॥

श्लोकः—शरणं तरुणेंदुशेखरः शरणं मे गिरिराजकन्यका ॥ शरणं पुनरेव तावुभौ शरणं नान्यदुपैमि दैवतं ॥ ४६ ॥
असेंच जर आहे तर देवा—

पदः—माझी लाज तुला जगदिशा ॥ धृ० ॥ बुडते दुःखसमुद्रीं आतां ॥ पाहाशि काय तमाशा ॥ १ ॥ अष्टादश षडचारी गाती छेदन करी यमपाशा ॥ ४७ ॥

श्लोकः—तावत्तत्रसमागच्छत्पुरुषः कृष्णपिंगलः ॥ ४८ ॥ अयं च धर्मसंयुक्तो रूपवान् गुणसागरः ॥ नहि मत्पुरुषैर्नेतुं अतोस्मि स्वयमागतः ॥ ४९ ॥

आर्याः—अंगुष्ठमात्र पुरुषाप्रति यम पाशें करोनि आकर्षी।
तें हाय हाय म्हणुनी बहु सद्गद कंठ साश्रु तो कर्षी ॥ ५० ॥

ओवीः—त्याचा लिंग देह काढून। चालिला दाक्षिण पंथें घेऊन। मग
ती सुंदरी शोकायमान। पाठीं धांवे तयाचे ॥ ५१ ॥

जीव आहे तोवरी कुडें। जीव नसतां तोंचि मढें ॥ सावित्री मागें येत आहे असें पाहून यम म्हणातात कीं, 'तूं कां येतेस?' ती म्हणालीः—

श्लोकः—यत्र मे नीयते भर्ता स्वयं वा यत्र गच्छति ॥ मयापितत्र गंतव्यं एष धर्म सनातनः ॥ ५२ ॥

दिंडी:-वाट बिकट ही आमुची फार लांब। पावशील श्रम परतून जा थांब। असे तुझा जो पुण्यामार्ग पैसा। पति सद्‌गुण मनिं आठवोनि ऐस ॥ ९१ ॥

श्लोक:-सती बोले देवा स्वपति जिकडे मीहि तिकडे ॥ भवत्संगें माते सवघड नद्या पर्वतकडे ॥ प्रभो युष्मत्संग भ्रमण घडतां सत्त्वचरणा ॥ भवाब्धि द्रोणासा घडुनिही तुटे जन्ममरणा ॥ ९४ ॥

ओवी:-सत्व वाढले संगतो। घडतां अनुग्रह सहज स्थिती ॥ सप्त-
जन्माची सुनिश्चिती। परि हरती दुष्टकर्में ॥ ९५ ॥

श्लोक:-तुम्हां देवा लोकीं म्हणति समवर्ती पितृपती ॥ तरी कां या कन्येवरती इतुकी निष्ठुर पती ॥ स्वजामाता नेतां मज मुलिस ताता ढकालितां ॥ यमांतःकरणीं हें वचन सतिचें दे विकलता ॥ ९६ ॥

अशा तिच्या भाषणानें यम कळवळून जीवितं विना वरं वृणीष्व।

श्लोक:-च्युतः स्वराज्याद्वनवासमाश्रितो, विनाचक्षुः श्वशुरो ममाश्रमे ॥
सलब्धचक्षुर्बलवान् भवेन्नृपस्तत्र प्रसादज्वलनार्कसंनिभः

आर्या:-दिधलें धर्म म्हणे परि जाताचि होती तशीच मागून।
देव म्हणे पुनरपि वत्से घे वर दुजाहि मागून ॥ ९८ ॥

श्लोक:-गतं पुरा मे श्वशुरस्य धीमतः। स्वमेव राज्यं लभतां स पार्थिवः
नच स्वधर्मं प्रजहीत मे गुरुर्द्वितीयमेवं वरयामि ते वरं ॥ ९९ ॥

दिंडी:-धर्म बोले हें दिलें जा स्वगेहीं। परी मागुनि येतसे सति पाहीं। असें जाणुनि मानसीं विकल होतो। साध्वि मागुनि घे वर तिजा वदे तो ॥ ६० ॥

श्लोक:-ममानपत्यः पृथिवीपतिः पिता। भवेत् पितुः पुत्रशतंच औरसं॥
कुलस्य संतानकरंच यद्भवेत्तृतीयमेवं वरयामि ते वरं ॥६१॥

ओवी:-दिधले म्हणूनि उदार हस्तें । आतां जाई संतुष्टचित्तें ॥
तुझ्या भिडे गोविलें मातें, पतिव्रते सुपवित्र ॥ ६२ ॥

दिंडी:-शिरुनि चित्तीं बहु दाखवोनि गोडी । सती दुर्लभशा वस्त्र या जोडी ॥ तरी सोडीना क्षणहि पितर देवा । सोडियेल्या वांचोनि नवर-देवा ॥ ६३ ॥

सावित्री यमाचे मागून जात असतां काय म्हणते. अहो वर देऊन कृतार्थ—

श्लोक:-वदे न्याहो माते वर म्हणतसे माग चवथा । प्रभो वारंवार श्रम कशि तुम्हां देऊंचि वृथा ॥ परी आतां पायीं विनती लघुसि एक सदया । मला बोला वत्से शतसुतवती हो जगतिं या ॥ ६४ ॥

आर्या:-भुलला धर्म द्युतिला धृतिला मतिला तिच्या तथा स्तुतिला ।
न करूनि विचार जीवीं मागे म्हणुनि म्हणे तथास्तु तिला ॥६५॥

ओवी:-येरी बोले करूनि नमन । स्वमुखें दिधले वरदान । पुत्रप्राप्ती उपाय कवण । हें तो कळले पाहिजे ॥ ६६ ॥

हें ऐकून धर्म चकित झाला व आपल्या मनाशीं म्हणाला कीं शतपुत्र वैधव्यदशेनें कसें मिळतील? इतक्यांत पुनः सावित्री म्हणते:-

श्लोक:-वरातिसर्गः शतपुत्रता मम, त्वयैव दत्तो ह्रियतेच मे पतिः ।
वरं वृणे जीवतु सत्यवानयं, तवैव सत्यं वचनं भविष्यति ॥६७॥

पद चाल:-उद्धवा शांत.-

धर्म तो सद्गति वदला, त्वां खरें जिंकिलें मजला ॥ धृ ॥

त्वत्पातिव्रत्यगुणांनीं तुजवर हें मन लोभावें ॥ तुष्टुनि पाचवे हे वर मी देतों तुज स्वसिद्धभावें ॥ सौभाग्यसुखें नांद सुखें तूं पतिसह अशी या भावें ॥ त्वत्कांत चतुःशतवर्षें साम्राज्य करो निज नांवें ॥

चालः—सोडिला तुझा हा स्वामी । जा सुखे त्याजसह धार्मी । मत्स्मरण असो येतो मी । केसरीस हर्षहि झाला ॥ ६८ ॥

श्लोकः—जातां धर्म कलेवराजवळी ती धांवोनि ये सत्वर । पुन्हा अंथरूणीं बसे स्वपतिचे घेवोनि अंकीं शिर । कांतांगी नवचेतना निरखुनि आल्हादली ती सती। जैसी काव्यसुता कच प्रकटितां शुक्रोदरांतूनि ती ॥ ६९ ॥ तो लोचनें उघडुनि दयितेस पाही ॥ बोले प्रिये मज गमेचि विचित्र कांहीं । मांडी दिली सुमृदुशीच उशी मला गे । हो रात्रि फार तरि गाढची झोप लागे ॥ ७० ॥

आर्याः—अजुनि येतिन सूत स्नुषा कां परतुनि निजसदनीं ॥
जाहाली जर प्रहर रजनी ॥ व्याघ्रवृकांनीं भक्षियलें कीं,
वाटचि ती चुकूनी ॥ असतील भटकत सकल वनीं ॥ १ ॥
भेटतील ते आज उद्यां कीं परवां कीं महनीं ॥ लागली
तळमळ ही स्वमनीं ॥ २ ॥

अशी चिंता करीत आपले स्त्रीसह ऋषींच्या आश्रमांत शोध केला पण शोध न लागलेमुळें घरीं येऊन दुःखानें:—

पदः—प्राणप्रिये मन कुश्चित होते, धीरता सर्वही सोडुनि जातें ॥ पारि मजला एक सुचिन्ह गमते । दृष्टीच्या योगें ॥ ७२ ॥

पद पुढें चालूः—शकुन गांठ हि बांधायाला केसरी कवी सजला । काळ हा सुलट दिसे मजला ॥ ७३ ॥

सकाळीं सत्यवान सावित्री घरीं आलीं आणि पारणा केली.

आर्याः—दुसरे दिवशीं सति प्रार्थि घेवोनि आपुल्या पतिते
या राज्य करा सचिवें वधिला हरिली स्वभूमीं ज्या पतितें ॥७४॥

मग द्युमत्सेन राजानें नगरास जाण्यास्तव ऋषींचा निरोप घेऊन निघाला.

आर्या:-सिंहासनीं बैसविला सावित्रीच्या व्रतोंचि हा नियम ।
व्रतसामर्थ्य म्हणा परि गेला होता करूनि हा नियम ॥ ७९ ॥

नारदाचा आशिर्वाद:-भजन-जयहरि गोविंद राम सावळे गोपाळ राधे गोविंद जा. पा. पु. सद्गुरु हेंचि दान.

सावित्रीआख्यान समाप्त.

श्लोक:-लाभस्तेषां जयस्तेषां कुतस्तेषां पराजय: । येषामिंदीवरश्यामो हृदयस्थो जनार्दन:



( मूळ प्रतीमध्यें बरीच अशुद्धि असल्यानें व छपाईस वेळ थोडा मिळाल्यानें आख्यानांत कांहीं अशुद्धि राहण्याचा संभव आहे. )

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः

# श्रीमत्सद्गुरु श्रीसीतारामहाराज टेंबे यांचा पदसंग्रह

### श्रीदत्तनमन

दत्तात्रेय नमोस्तु ते भगवते पापक्षयं कुर्वते ।। दारिद्र्यं हरते भयं शमयते कारुण्यमातन्वते । भक्तानुद्धरते शिवं प्रददते सत्कीर्तिमातन्वते ।। भूतान्द्रावयते वरं च ददते श्रेयःपते सद्गते ।। १ ।।

### श्रीगुरुचरित्रम्

आदौ रूपमरूप ते गुणगणेशान्मानवं स्वीकृतं ।। वर्णाद्याश्रमधर्मधारणमथो श्रीदत्तदेवेड्गुरो ।। तत्संस्थापनतीर्थपादवपुयुक्तुर्येकवीट्स्वार्तिहन् ।। वंदे ते गुरुवासुदेवयतिराट्सेव्यांघ्रिकंजं परं ।। १ ।।

### नमन

आनंदमानंदकरं प्रसन्नं । ज्ञानस्वरूपं निजबोधरूपं ।। योगींद्रमीड्यं भवरोगवैद्यं । श्रीसद्गुरुं नित्यमहं नमामि ।।

### भजन

**वासुदेवगुरु माझे आई ।। मला ठाव द्यावा पायीं ।। ५ ।।**

### पद (पंचतुंड०)

शंकरतनया ये गणराया । विघ्ननाशना भयहरणा ।। भजनारंभीं स्तवितों तुजला । सन्मति देई मज दीना ।। ध्रु० ।। श्रुतिगण वर्णिति गूण जयाचे । अंत न लागे तव महिमा ।। शुकसनकादिक वंदिति ज्याला । मुनिजन गाती त्वन्नामा ।। १ ।। सिंदुरचर्चित दुंदिल शोभे । पाशांकुशधर तव मूर्ति ।। मूषकवाहना तूं अघशमना ।। किति वर्णूं मी मंदमती ।। २ ।। मंगलधामा अचिंत्यमहिमा । गाऊं निशिदिनिं तव नामा ।। सीतारामा दे निज प्रेमा ।। मति गुंगो ही गुरुभजना ।। ३ ।।

भजन

## गणेश गौरीहरनंदन, विघ्नविनाशन गजानन

अभंग

वीणा घेउनीया करीं ॥ सरस्वती ये अवसरीं ॥१॥ येई येई लवकरी । दीनदासाला उद्धरी ॥ २ ॥ जोडुनियां दोनी कर ॥ विनवितों देई वर ॥ ३ ॥ वासुदेवभजनाला ॥ स्फूर्ति द्यावी बाळकाला ॥ ४ ॥ इच्छितसों आह्मी बाळ ॥ कृपा राहो सर्वकाळ ॥ ५ ॥

भजन

## सरस्वती सरस्वती ॥ भजनीं भक्तां दे स्फूर्ति

श्रीसद्गुरुध्यान

श्रीसद्गुरुं च यतिरूपधरं ह्यनंतम् ॥ सच्चित्सुखं विधिहरीशमयं दयाब्धिम् भक्तिप्रियं भजकदुःखहरं ह्यधीशम् ॥ श्रीवासुदेवगुरुदत्तमहं नमामि ॥ १ ॥

## पंचपदी

पद. ( असा धरि छंद. )

सद्गुरु यावें । मम भजनीं सादर व्हावें ॥ध्रु० ॥ तव आगमनें विघ्नें पळती । कामादिक रिपु नष्टचि होती ॥ आशा तृष्णा मनिं बहु झुरती । कोठें जावें ॥ १ ॥ भवविपिनींचा मार्ग भयंकर । क्षुरधारेपरि ह्मणती कविवर ॥ सद्गुरु येउनि धरितिल जरि कर । अमरचि व्हावें ॥ २ ॥ किति रे माझा अंत पाहसी । मज दीनासी काय मागसी ॥ विश्वाचा तूं पालक असशी । मनिं समजावें ॥ ३ ॥ माझा धांवा हा परिसोनी ॥ दंडकमंडलु करिं घेवोनि ॥ देशिक आले हो धांवोनी ॥ आसन द्यावें ॥ ४ ॥ हृत्पीठावरि गुरु हे बसले ॥ भजनीं प्रेमाचे पुर आले ॥ सीता-रामीं चित्त रंगलें ॥ सात्विक भावें ॥ ४ ॥

पद ( झाली ज्या० )

रम्य किती ही श्रीगुरुमूर्ति । भजका भजनीं दे जी स्फूर्ति ॥ध्रु० ॥ दुष्ट जनातें सुजन करोनी । सुमार्ग दाउनी केली कीर्ती ॥ १ ॥ योगी

जन हे ध्याती निशिंदिनीं । रम्य मनोहर वामनमूर्ति ॥ २ ॥ कलिमाजीं या नाहीं दुसरी । उपमा द्याया या भूवरती ॥ ३ ॥ किति वर्णावे गुण तियेचे ॥ सीतारामीं दे विश्रांती ॥ ४ ॥

पद ( श्रीहरीच्या वेणु० )

कधिं मजसी भेट देसी गुरुराया सांग बा । तुजविण या जगीं त्राता अन्य नसे कोणि बा ॥ ध्रु० ॥ तोयविना मत्स्य जैसा तडफडुनी राहतो । धेनुविना वत्स जैसा हंबरुनी पाहतो ॥ चातक तो मेघमार्गा दिन रात्रीं लक्षितो । त्वद्विरहा न साहेचि दास तुला बाहतो ॥ १ ॥ भवडोहीं बुडुनि जातों घालिं उडी झडकरी । अजि सखया रुसुं नको तूं धरिं आतां मज करीं ॥ भक्तांचा सारथी तूं श्रुति वाक्यां मनिं धरीं । ब्रीद तुझें बा न सोडी या दीना उद्धरी ॥२॥ मोहादी जलचरें हीं बहु मजला भक्षिती । तृष्णेच्या लहरि मोठ्या अज्ञजळीं बुडविती ॥ शब्दादि विषय हेचि वायु-रूपें पीडिती । नावाडी बनुनि ज्ञानोडुपीं मज तूं बैसवीं ॥ ३ ॥ हो शास्ता षड्रिपूंसी दे मजला ज्ञान तें। तव चरणीं अर्पियेलें मन माझें सत्य तें ॥ स्वरुपाचें लागलें मम चित्ताला ध्यान तें । प्रार्थि तुला सीताराम दर्शन दे लौकरी ॥ ४ ॥

पद. ( उत्तम जन्मा येउनि रामा )

दीन दयाधन पतीतपावन सद्गुरु तूं देवा ॥ अनन्यभावें निशिदिनिं आह्मी करूं तुझी सेवा ॥धृ०॥ तेजोमय हें स्वयंप्रकाशक निर्मल तव स्वरुप । जगदुद्धारास्तव तूं घेसी हें मानवरूप ॥ अंतरिं दृष्टी करुनि पाहतां निर्गुण हें अरुप । जडेंद्रियासी प्रकाश देसी जैसा जगिं दीप ॥१॥ वसति दीव्यत इति व्युत्पत्त्या अन्वर्थक नांव। सर्व भूवरी प्रसिद्ध जाहलें स्वामि वासु-देव ॥ बहुजन त्वद्दर्शनासि येतां मागति पदिं ठाव । त्यांची इच्छा पुर-वुनि भजनीं देसी सद्भाव ॥२॥ स्वाश्रमोचितकर्मे करुनी जे द्विज जगिं असती ॥ सात्विक बुद्धी पाहुनि त्यांवरि तुमची बहु प्रीती ॥ इच्छा त्यांची पुरवुनि देसी संतति संपत्ती ॥ दुराचारें वर्तति जे जन जाती अधोगती ३ ॥ सज्जनरक्षण धर्मपालनास्तव तूं अवतरसी । कलिमाजीं या सर्व देवता गुप्त होति ऐसी ॥ श्रुतिस्मृतींचीं वाक्यें स्मरुनी जागृत तूं होसी । सीताराम तव गुण गाउनि दृढ मिठी दे चरणांसी ॥ ४ ॥

## पद ५ ( झंपा )

मना ध्याय गुरुवासुदेवास चित्तीं ॥ याहुनि अन्य तुज किमपि नाहीं ॥ ॥ ध्रु० ॥ गर्व हा सोडुनि, शरण जा गुरुपदीं । नित्य हें तपचि तं आचरावें ॥ वासुदेवामुखें मार्ग हा पाहुनी । सतत नाम स्मरत डुलत राही ॥ १ ॥ कामक्रोधादि षड्वैरि तुज गांजिती । म्हणुनि तूं गुरुचरणीं लीन होई ॥ श्रवण मननादि हें कर्म तूं करुनिया । दुःखरूपी भवापार होई ॥ २ ॥ साधुसंगति धरूनि इंद्रियें वळवुनी । स्वात्मरूपामृता पिवुनि राहीं ॥ हेंचि साधन तुला मुक्तिचें सांगुनी । दास सीताराम हा मुक्त होई ॥ ३ ॥

## भजन

**गरुडेश्वरवासी दयाळा अंत किती पहासी ॥**
**धांवत येई दर्शन देई आहे मी परदेशी**

## अभंग

स्वामी वासुदेवा परिसा विज्ञापना । भक्तांवरि प्रेमा राखा नित्य ॥ १ ॥
तारियेले भक्त न कळे तुझा अंत । मी काय पतीत कीर्ति वाणूं ॥ २ ॥
जगाच्या कल्याणासाठीं अवतार । हा माझा निर्धार सत्य असो ॥ ३ ॥
तुमचि ब्रीदावळी पतीतपावन । हें श्रुतिवचन सत्य करीं ॥ ४ ॥
पतीतांकरवी वेद बोलावीला । रेडा दुभवीला भिक्षुरूपें ॥ ५ ॥
तो तूं भिक्षुरूप होवोनियां येसी । सीतारामापाशीं वास तूझा ॥ ६ ॥

## अभंग

तुझा वास जेथें असे निरंतर । यमही किंकर होई त्याचा ॥ १ ॥
अष्टसिद्धि दासी होउनि राहाती । योगियांची गती नाहीं जेथें ॥ २ ॥
कामादि षड्वैरी पळोनियां जाती । आशा तृष्णा मरती भिवोनियां ॥ ३ ॥
ऐसा महिमा सद्गुरुकृपेचा । अनुभव त्याचा सीतारामा ॥ ४ ॥

## अभंग

रामा आली आतां निवृत्ती मजला । हर्ष बहू झाला मनीं माझ्या ॥१॥
ऐसें हें स्त्रीरत्न गुरुरायें दिल्हें । मोक्षपद आलें माझ्या हातां ॥ २ ॥
आतां कैचे जन्म गेला भवभ्रम । मनीं दत्ताराम प्रगटला ॥ ३ ॥
प्रगटला ज्ञानदीप हा हृदयिं । अज्ञानासी घाई झाली बहू ॥ ४ ॥
माझा सर्व भ्रम वासुदेवें नेला। स्वरूपीं लीन केला सीतारामा ॥ ५ ॥

## अभंग

तुम्ही सर्व जन शुद्ध मन करा । भवसिंधू तरां लवलाहे ॥ १ ॥
ऐसें महापर्व पुन्हा नये हातीं । विचारोनी चित्तीं मार्ग धरा ॥ २ ॥
संसार सागर बहू आहे खोल, बुडोनियां जाल अज्ञोदकीं ॥ ३ ॥
कामक्रोधादीक जलचरें खाती । दारा पुत्र जाती टाकोनिया ॥ ४ ॥
घेउनी ज्ञाननौका आला वासुदेव । तारिल हा भव शरणांगतां ॥ ५ ॥
दास सीताराम नौकारूढ झाला । तरोनियां गेला भवसिंधु ॥ ६ ॥

## अभंग

शरीर केवळ निरयाची खाणी । बोलताती ज्ञानी हेंची सत्य ॥ १ ॥
पित्याचें हो रेत मातेचा विटाळ । त्याचें होतें फळ तोचि देह ॥ २ ॥
मांसाचा हा गोळा गंगेत धूतला । कैसा शुद्ध झाला बाह्यस्नानें ॥ ३ ॥
विष्ठा मूत्र रक्त रेत भरिलें आंत । नवद्वारें वाहत अहर्निशीं ॥ ४ ॥
काम क्रोध लोभ अंतरींचे मळ । कैसे होती दूर तीर्थस्नानें ॥ ५ ॥
मुख्य स्नान शमदमादि साधन । तेणें शुद्ध मन होत असे ॥ ६ ॥
शुद्ध मन होतां ब्रह्म मिळे हातां । सीताराम भक्ता अनुभव ॥ ७ ॥

## अभंग

गुरु माझा मोक्षदाता । श्रुती गर्जति सर्वथा ॥ १ ॥
गुरु माझा कल्पतरू । भवाब्धीला हा उतारू ॥ २ ॥

गुरु एक माता पिता । दुःख शोक भयहर्ता ॥ ३ ॥
गुरुला जे शरण जाती । ऋद्धिसिद्धि दासी होती ॥ ४ ॥
गुरु देवाचाही देव । भक्तांलागीं त्याचा ठाव ॥ ५ ॥
मुख्य वासुदेव गुरु । सीतारामा हा निर्धारु ॥ ६ ॥

भजन

पितांबराची कास कसूनी शेला झळकला ॥
गरुडावर बैसोनि माझा कैवारी आला ॥

---

## सात वारांचीं पदें

## रविवार

पद. ( माझा कृष्ण )

गुरु हा केवळ माझा प्राण । इंद्रियें हालवि जो ॥ ध्रु० ॥ कलियुगीं संन्यासी बनुनी । तीर्थे हिंडे जो अनुदिनीं । भक्तिमार्ग जना दाउनी । धर्मस्तंभा स्थापितसे ॥ १ ॥ श्रुतिस्मृत्यादिक आधार । देउनि ग्रंथही केले फार । झाला व्यासांचा अवतार । भासे लोकां प्रत्यक्ष ॥ २ ॥ योगाभ्यासाची बहु प्रीत । शिष्यां शिकउनी दाविती पंथ । ऐकुनी येती साधुसंत । दिसती जैसे कपिल मुनी ॥ ३ ॥ वेदां न कळे ज्यांचा अंत । शेषहि थकला गाउनि गीत ॥ भाविक भक्तांवरि बहु प्रीत । भक्तां हृदयीं वास करी ॥ ४ ॥ सद्गुरु केवळ ब्रह्मस्वरूप । मायिक धरिलें मानवरूप । ज्याच्या स्मरणें पळतें पाप । सीताराम जपीं नित्य ॥५॥

भजन

जय जय भास्कर ॥ पाहि दिवाकर ॥ १० ॥

---

# सोमवार

## अभंग

गुरुराया मज द्यावें वरदान । देहाचें हें भान नसो मज ।। १ ।। कर्पुर अनलीं उदकीं सैंधव । तैसें मन तत्वीं लीन होवो ।। २ ।। आत्माकार दृष्टी होऊनी रहावी । बाह्य वृत्ती जावी विरोनिया ।। ३ ।। समाधी तो द्यावा निर्विकल्प मज । जगापाशीं काज नाहीं आम्हां ।। ४ ।। तेव्हां माझा जीव होईल तो सुखी । काळाचीये मुखीं घालूं निंब ।। ५ ।। सदा घडो संग तुझ्या चरणांचा । निर्धार हा साचा सीतारामा ।। ६ ।।

## अभंग

**शिवहर शंकर धूर्जटे । सांब सदाशिव धूर्जटे १**

---

# मंगळवार

## पद ( रुचती कां ती० )

सावध हो मानवा तूं व्यर्थचि कां भुलसी । सुविचारें ध्येय ध्यातां ब्रह्मपदा पावशी ।। ध्रु० ।। पितृमलापासुनियां उत्पत्ती पावला । अन्नमय कोश ज्याला शास्त्रानें वर्णिला ।। स्थूल भोगा भोगुनियां अंति जाई लया । तो आत्मा होय कैसा वृत्तीनें पाहशी ।। १ ।। देहादी दृश्य सारें हें माया-वैभव । अज्ञानापासुनीया हो ज्याचा उद्भव ।। जन सारे लुब्ध नाहीं होती ज्या अनुभव । गुरुचरणीं शरण होशी तरिच सुखा भोगिशी ।। २ ।। नामरूपाहुनी भिन्न विश्वीं जो संचला । हृत्कमलीं चित्कलेनें योगि जना लाभला ।। अविनाशी शुद्ध बुद्ध वेदानें बोधिला । तो दत्त अत्रिपुत्र सुमनानें पूजिशी ।। ३ ।। यापरि ही बोधमाला कंठीं घाली नरा । हृदयीं स्मर दत्त देवा तो नेई परतिरा ।। नाहीं जगीं अन्य कोणी याविणें आसरा । सीतारामा नेइ धामा त्या गुरुला भाविशी ।। ४ ।।

**जय जय भगवति दुर्गे देवी मजवरी कृपादृष्टि ठेवी**

---

# बुधवार

## पद ( अनुसूयानंदना )

गुरुराया कांहो ऐसी, निष्ठुरता धरिशी । आम्हीं तुझे दीन सर्व कां दूर करिसी ।। धृ० ।। तान्ह्याबाळा टाकुनिया केवी माता जाइल । जिवनाशी सांडुनीया मच्छ केवि राहिल ।। तुम्ही जातां दूर देशीं गति कैशि होईल । अंत नको पाहूं आतां धरि आम्हा पोटिशी ।। १ ।। भक्ताचे वचनासी जगदीशें पाळिलें । पुंडलिकें परब्रह्म विटेवरी स्थापिलें ।। तैशी इच्छा पुरवाल मनिं ऐसें भाविलें । ठाव तुझे पदीं द्यावा मागतों दिननिशीं ।। २ ।। जानकीवल्लभाचें नाम तुम्हां साजलें । अवतार घेउनीया योगधर्मा स्थापिलें ।। ब्रह्मचारी आश्रमाशी वर्तोनी दाविलें । एकमुखें काय वर्णूं तव ,गुण कीर्तिशी ।। ३ ।। अपराध क्षमा आतां करि आमुचे दयाळा । दीन लेकराचा पोटीं येऊं दे कळवळा ।। वियोगाचें दुःख आतां नको देऊं सकळां । घडो आतां नित्य सेवा सीतारामा चरणांसी ।। ४ ।।

**भजन**

**पंढरिनाथ पंढरिनाथ-आम्ही अपराधी घ्या पदरांत ।।**

---

# गुरुवार

## अभंग

गुरु माझा मोक्षदाता ।। श्रुती गर्जती सर्वथा ।। १ ।। गुरु माझा कल्पतरू । भवाब्धीला हा उतारू ।। २ ।। गुरु एक मातापिता । दुःख शोक भयहर्ता ।। ३ ।। गुरूला जे शरण जाती । ऋद्धि सिद्धि दासी होती ।।४ ।। गुरु देवाचाही देव । भक्तांलागीं त्याचा ठाव ।। ५ ।। मुखीं वासुदेव गुरू । सीतारामा हा निर्धारू ।। ६ ।।

पद (अमोल काया.)

सद्गुरुचरणीं रत हो मनुजा मार्ग सुलभ तुज कथितों रे ।। धृ० ।। मानवदेह मोठा दुर्लभ पुन्हां नये बा तुजला रे । निशिदिनीं सज्जनसंग धरुनिया मुक्तिपदावर जावें रे ।। १ ।। यमनियमादिक प्रथम साधुनी आसन सुस्थिर राखावें । रेचकपूरक गुरुमुखें जाणुनि वायुनिरोधन साधीं रे ।। २ ।। विषयापासुनी मन फिरवोनी दत्तस्वरूपीं ठेवावें । त्रिमूर्ति षड्-भुज काषायांवर ध्यान हृदयीं तव स्थिर करि रे ।। ३ ।। तत्वमसीति श्रुति वाक्याचें विवरण करुनी पाही रे । निवांतदीपस्थितिवत् मन हें होतां स्वरूप प्रगटे रे ।। ४ ।। सेवा करितां गुरुचरणाची होईल प्राप्ती स्वरूपाची । स्वानुभवानें सीताराम हा कथितो हृद्गुज तुजसी रे ।। ५ ।।

भजन

**दत्तात्रेय अवधूता । जनार्दन स्वामी एकनाथा ।।**
**श्रीमद्वासुदेव स्वामिन् । दयाब्धे तारकपददायिन् ।।**

---

## शुक्रवार

पद (झंपा)

सदा कृष्णचरणीं । मना स्थिर होई । तारि तुज भवनदी-पार नेई ।। ध्रु० ।। मुरलिवदन करी । राधिका मन हरी । चौर्यकर्मे करी । गोकुळीं जो । देवकीचा तनय । जो असे श्रुतिगेय । सदय ज्याचें हृदय । त्यासि ध्यायीं ।। १ ।। पांडवांचा सखा । पीत जो बाकिविखा । लाउनी स्तन मुखा । प्राण घेई । मातृसमसद्गती । देतसे तिजप्रती । वर्णितां शेषमति चकित होई ।। २ ।। दैत्यवर्गा हरी । रुक्मिणीला वरी । यदुकुला उद्धरी । कृष्णनाथ ।। भक्तिं आकर्षिला । गोपि वेधुनी भला । भोगुनी तन्मना शांति देई ।। ३ ।। षोडशस्त्रींसहस्रांसि जो रमउनी । ब्रह्मचारी हरी । राहिला जो । तोचि ये पंढरी । राहि जो विटेवरी । दे सीतारामा या ठाव पायीं ।। ४ ।।

पद ( प्रभातीची चाल )

घडि घडि पल सतत तुझे पाय स्मरूं कृष्णा। षड्रिपु मज गांजिति हे वारीं भवतृष्णा ॥ ध्रु० ॥ मायामय भवसागर। वाटे बहु अति दुर्धर ॥ बुडतों मी देउनि कर। काढि सख्या कृष्णा ॥ १ ॥ अबकुंड अति सुंदर। वाटे तुज बहु प्रियकर ॥ राधेसह वससि नित्य। तूंचि मेघःश्यामा ॥ २ ॥ अति विनयें करितों स्तवन। चरणिं अर्पि हृदय सुमन ॥ भक्तिभावें ध्याई चरण। ने मज निजधामा ॥ ३ ॥ तारियले भक्त अमित। गोप वधू होती मुक्त ॥ धांव प्रभो पहासि अंत। तारिं सीतारामा ॥ ४ ॥

भजन

जय जय कमले-लक्ष्मी विमले ॥ ५ ॥

---

## शनिवार

पद ( बाळा जो० )

उद्धरिं गुरुराया। अनसूया-तनया दत्तात्रेया ॥ ध्रु० ॥ जो अनसूयेच्या, भावाला, भुलुनी तत्सुत झाला। दत्तात्रेय अशा, नामाला, मिरवी वंद्य सुराला ॥ तो तूं मुनिवर्या, निज पाया, स्मरता वारिसि माया ॥ १ ॥ जो माहूरपुरीं, शयन करी, सह्याद्रीच्या शिखरीं। निवसे, गंगेचें स्नान करी, भिक्षा कोल्हापुरीं ॥ स्मरतां दर्शन दे, वारि भया, तो तूं अग मागेया ॥ २ ॥ तो तूं वांझेसी, सुत देसी, सौभाग्या वाढविसी। मरत प्रेतासी, जीवविसी, सद्वरदाना देसी ॥ यास्तव वासुदेव, तव पाया, धरि रया तारीं सदया ॥ ३ ॥

भजन

अंजनिसूता जय हनुमंता-दर्शन दे तव राघवदूता ॥

## संतमहिमा

सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः । भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ।। निरपेक्षं मुनिं शांतं निर्वैरं समदर्शिनम् । अनुव्रजाम्यहं नित्यं पूयेयेत्यंध्रिरेणुभिः ।।

भा. स्कं. ११.

## भजन

## रामदासगुरु माझे आई । मला ठाव द्यावा पायीं ।।

## करुणात्रिपदी

### पद १ लें ( वसंती )

श्रीमद्वासुदेव ध्यानीं । मनिं भरला तो योगिराज मी पाहिन कधिं नयनीं ।। १ ।। जितेंद्रिय महाराज ज्ञानी । बसला कोठें दिव्य समाधीं लावुनियां विपिनीं ।। २ ।। भो गुरुवरा परमहंसा । दाविसि केव्हां चरणसरोजें तूं अपुल्या दासा ।। ३ ।। अहो यतिवरा कर्णधारा । सदया तुजविण कोण करिल या भवांबुधीपारा ।। ४ ।। अशी ही आस धरुनि पोटीं । बसलें निर्भय मानसं बालक द्यावि तया भेटी ।। ५ ।।

### पद २ रें ( धांव रे राम० ]

नमो गुरु वासुदेवा । घडलि नाहीं कांहीं सेवा ।। दुस्तर संसारीं या । श्रम झाले माझ्या जीवा ।।१।। दंभाहंकारयुक्त । विषयिं झालों मदोन्मत्त ।। देउनि दर्शनासी । केलें यतिवरा मुक्त ।। २ ।। पापगर्ती आर्यावर्त । आर्त भक्तउद्धारार्थ ।। आज्ञा होतां अत्रिजाची । सोडुनि दिधला ब्रह्मावर्त ।। ३ ।। जन्मार्जित पुण्यें फळलीं । म्हणुनि पाउलें पाहिलीं ।। तारी आतां गुरुराया । तूंची आमुची माउली ।। ४ ।। कृष्णातीरीं औदुम्बरीं । वास करी निरंतरी ।। तेचि तुम्ही कळों आलें । राहा सर्वांचे अन्तरीं । ।। ५ ।।

## पद ३ रें

अनन्य विनती करी । चरणद्वय धरी ॥ गुरुराया हो मज दीनाला उद्धरी ॥ धृ० ॥ हा प्रपंच दुस्तर असे । शोक अणु नसे ॥ गुरुराया हो म्यां आतां करणें कसें । एक स्थलिं मन ना वसे ॥ उगिच भ्रमतसे । गुरुराया हो या विषयीं मन भ्रमतसे ॥ हे जलांत कमळें जसें भ्रमर भ्रमतसे गुरुराया हो मज नकळत घडलें असे । मी माझें मानुनि करी आस त्यापरी ॥ गुरुरा० ॥ १ ॥ हें पडलें मज संकट अती दुर्घट । गुरुराया हो जड झाला कायाघट । संसारीं अति खटपट दुःख निपट ॥ गुरुराया हो बहु जीर्णच्चि झाला पट । किति करणें हो वटवट विषय बोखट । गुरुराया होउनि गेलों स्त्रीलंपट ॥ मी दैन्य जाणुनि करीं नीच चाकरी ॥ गुरु० ॥ २ ॥ तनु पडली चिंतानळीं प्रेमें आहळीं । गुरुराया हो मज पाठिं लागला कली ॥ षड्वैरी करिती रळी सर्वदा छळी । गुरुराया हो वरी दैवही जाहलें बळी ॥ हीं विषयेंद्रियें मोकळीं कोण आकळी । गुरुराया हो या दुःखें मी तळमळीं ॥ मी बुडतों भवसागरीं धांव लवकरी ॥ गुरु० ॥ ३ ॥ तुम्ही दयाळा गुरू सज्जना विनंति माना । गुरुराया हो मज जाहली यमयातना ॥ तरि धाउनिया ये क्षणा करीं रक्षणा ॥ गुरुराया हो निरसावी अवलक्षणा ॥ तुम्हा काय देऊं रक्षणा गुरुराया क्षणा । गुरुराया हो करूं चरणीं प्रदक्षिणा ॥ दास विनवितों द्वय करी बसुनिया घरीं ॥ गुरु० ॥ ४ ॥ गुरु महाराज गुरु ॥ जयजय परब्रह्म सद्गुरु ॥ ५ ॥

## पद ( बाळा जो जो. )

येईं लवकरि बा, गुरुवर्या । वासुदेव यतिराया ॥ ध्रु० ॥ भवजलानिधिमाजी, बुडतों मी । पैलथडी ने स्वामी ॥ कामक्रोधादिक, टपले हे । ग्रासाया मज पाहे ॥ शक्ति न तत्संगें, झगडाया । शिणली माझी काया १ येउन नरदेहीं म्यां कांहीं । निजहित केलें नाहीं ॥ बाल्यावस्था ती, क्रीडेंत । घालविली गुरुनाथा ॥ यौवनमदभारें, बहु मत्त । न कळे युक्तायुक्त । रात्रंदिन झटलों, गुरुराया । विषयसुखा सेवाया ॥ २ ॥ छळिलें बहु संतां, भगवंता । अंतरिं भरलि अहंता ॥ पडतां कानीं ती, ईशकथा । शूल उठे

मम माथां ॥ अज्ञानांध असा प्रभु झालों । इहपर सौख्या मुकलों ॥ आली घोर जरा, मज खाया । जन्मुनि झालों वाया ॥ ३ ॥ अधमाधम मोठा, मी पापी, मजवरि करुणा ओपीं ॥ तुजविण कोणाचा, करुं धावा ॥ न करीं माझा हेवा । पतितोद्धारक या, नांवातें ॥ वागविसी गुरुमूर्ते । भक्त तुझें लागे तव पाया ॥ घ्या पदरीं दासा या ॥ ४ ॥

### वरप्रसाद ( अभंग )

आकल्प आयुष्य । व्हावें तया कुळा ॥ माझिया सकळां हरिच्या दासां ॥ १ ॥ कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं । हीं संतमंडळी सुखी असो ॥२॥ अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥३॥ नामा ह्मणे तया असावें कल्याण । ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥४॥

### नमन ( श्लोक )

नमो गुरू कृपाकरा नमो गुरू गुणाकरा । नमो गुरू परात्परा नमो गुरू महत्तरा ॥ नमो गुरु सनातना नमो गुरू मनोन्मना । नमो गुरू घनाघना नमो गुरू निरंजना ॥ १ ॥

### प्रार्थना ( श्लोक )

पिता माता बंधु तुजविण असे कोण मजला । बहु मी अन्यायी परि सकळही लाज तुजला ॥ न जाणे मी कांहीं जपतपपुजा साधनरिती । कृपा दृष्टी पाहें शरण तुज आलों गुरुपती ॥ १ ॥

### भजन

## दिगंबरा दिगंबरा । श्रीपादवल्लभ दिगंबरा ॥ १० ॥

### आरती १

जयजय श्रीमद्‌गुरुवर स्वामिन् परमात्मन् हंसा । वासुदेवानंदसरस्वती आराते तदहंसा ॥ध्रु०॥ सोऽहं हंसः पक्षाभ्यां संचरसि ह्याकाशे । वासस्ते खलु लोके सत्ये क्रीडा तव मानसे ॥ १ ॥ मुक्ताहारो ब्रह्मवाहको वैराट् रूपधर । भक्तराज हृत्ध्वांततमोहृत्सर्वा कुरु मां च हर ॥२॥ पक्षस्यैके वाते-नैते भीताःक काद्याः । पलायितास्ते दुतं प्रभावाद्‌भवंति चादृश्याः ॥ ३ ॥

एवं सति खलु बालस्तेहं ग्रसितः कामाद्यैः । मातस्त्वरया चोद्धर कृपया प्रेषितशौर्याद्यैः ॥ ४ ॥ दासस्ते नरसिंहसरस्वति याचे श्रीचरणम् । भक्तिश्रद्धे वासस्ते हृदि सततं मे शरणम् ॥ ५ ॥

## आरती २

जयदेव जयदेव पुरुषोत्तममूर्ते, जय आनंदमयमूर्ते । वासुदेवानंदसरस्वति गुरुकीर्ते ॥ ध्रु० ॥ कृष्णावेणीपंचगंगासंगमीं । येउनि सुरमुनि वंदिति श्रीदत्तस्वामी ॥ तो करुणासिंधु हृदयीं सांठविला नामी । तद्रूपचि होउनियां विचरतसां स्वामी ॥ १ ॥ सद्विद्या संपादुनि उपनिषदीं रमला । तीर्थे हिंडुनि सर्वा गुरुपदिं रंगविला ॥ गुरुचरितादिग्रंथामृत हें पाजविला । यच्छ्रवणें पठणें हरि हर भवविधिजाला ॥ २ ॥ श्रीमद्दत्तगुरुयशा दशदिशिं गाजविलें । जगदीश्वर दत्त गुरु हृदिं ज्यांच्या डोले ॥ सुरमुनि गंगा कृष्णा रेवा स्तुति बोले ॥ तो हा सद्गुरु यत्पदिं मम मानस रमलें ॥ ३ ॥ प्रथमानंदवत्सरीं देहीसा जहाला । अन्यानंदवत्सरीं विदेही हा भरला ॥ मध्यें सर्वानंदमयकायचि गमला । तो आनंदमयचि हा गुरु मद्हृदिं गमला ॥ ४ ॥ अठराशें छत्तिस शकिं जेष्ठीं कुहुतिथिला । आनंद संवत्सरिं स्वानंदी भरला ॥ मंगलदिनिं सवितास्ता ऊर्ध्व वसूघटिला । ब्रह्मचि होऊनि ब्रह्मीं गुरुपदिं हा बसला ॥ ५ ॥ सद्बुद्धी देउनियां सन्मार्गी लावी । द्या तव पदभक्ति जी भवसिंधुस नुरवी ॥ अघौघहारक नामस्मरण मनीं वसवी । त्वत्पदकमलरसास्पद नृसिंहहृत्करवी ॥ ६ ॥

## आरती ३

दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा । आरति हे तव चरणीं राहो नतितति गुरुवरा ॥ धृ० ॥ दिग्भिर्वेष्टितमम्बरमेव प्रत्यग्ब्रह्मेति । खं ब्रह्मेति श्रुतिरपि वदति दिगंबरा चेति ॥ १ ॥ दिवत् चाम्बरमेव व्यापक पूर्ण ब्रह्मेति । सच्चित्सुखघनमायातीतं दिगंबरा वदति ॥ २ ॥ श्रीपाद वल्लभ नाम प्रापय नक्रगजेंद्रमिव । द्रौपद्यंबरीषचोरग्रसितद्विजमेव ॥ ३ ॥ दिगंबरा गुरु वासुदेव दत्तस्त्वं ब्रह्म । कामक्रोधग्रसितं मां लभ तथैव झटिति वह ॥ ४ ॥

## आरती नर्मदेची ४

आरति करितां सप्रेमानें मेकलतनयेला । जननमरणभय हरण करोनी दे जी सद्गतिला ।। ध्रु० ।। अमरकंठ हें स्थान मनोहर पाहुन तूं जननी । प्रकट होउनी रूप दाविलें जलमय होवोनी ।। दर्शनमात्रें अघ शमवोनी रक्षिसि दिनरजनी । विबुध ऋषीश्वर द्विजगण हे तव ध्याती पदकमला ।।१।। योग याग तप मंत्र जपादिक कष्टसाध्य असती । अंतराय बहु निजकर्मानें अधःपात देती ।। रेवे तुझिया दर्शनमात्रें मिळे भुक्ति मुक्ति । अनन्य भावें शरण मी आलों दावी स्वरूपाला ।। २ ।। कपिलमहर्षी सिद्ध पदवितें मेळवि तव कृपया । जामदग्न्य तो अतुल बलानें क्षत्रिय मर्दुनियां ।। सहस्रार्जुनें तव प्रसादें दत्ता तोषुनिया । सर्वैश्वर्या भोगुनि अंतीं वरि जो मुक्तीला ।। ३ ।। भिल्लकिरातादिक जडजीवां तारिसि तूं जननी । त्वत्सम अन्या या भूवरती न देखिजे नयनीं ।। अनन्यभावें शरण मी आलों तारीं दिनरजनीं । सीतारामा दे विश्रामा प्रार्थितसें तुजला ।। ४ ।।

### प्रार्थना ( श्लोक )

पापी नास्ति हि मत्समो गुरुवर ब्रह्मांडभांडोदरे । हर्ताऽघस्य च नास्ति नास्ति हि समस्त्वादृग्दयासागर ।। अन्याधारविहीनमीश भगवन् दीनं ग्रहग्रासितम् । रक्षस्वाद्य च वासुदेव गुरुवर्याऽऽद्य प्रभो मां भवात् ।।१।।

### पद ( चा०—सदर )

अमोल काया जाइल वाया प्राण्या विचार करि चित्तीं ।। ध्रु० ।। लक्ष चौऱ्याशीं फेरे फिरतां मानव देहा आलासी । विषयसुखाला पशुवत भुलुनी स्वस्वरुपाला मुकलासी ।। १ ।। गृह धन दारा आप्त सुतादिक देहाचे हे साथी रे । यमरायाची वर्दी येतां कोणि नये तुज सांगीरे ।।२।। भौतिक देह हा टाकुनि भूवरि संगें येईल पुण्य पाप । लिंग देह तो काढुन नेती अपार दुःखें भोगिसि रे ।। ३ ।। नर देह हा पुन्हा नये तुज ऐसें आणुनि तूं चित्ती । नित्यानित्य हा विवेक करुनी सद्गुरु चरणीं शरण रिघें ।। ४ ।। सज्जन संगति नित्य धरोनी ईश्वर भजनीं रंगुनि जा । सीताराम हा प्रार्थितसे तुज चित्तीं विचार करुनि पहा ।। ५ ।।

( ३ पद चा० दिंडी )

गुरुराया धावरे लवकरी। तव विरहें मज दुःख होई भारी ॥ गुंतलासी कोणत्या भक्तकाजा। उडी घालुन तूं राखी प्राण माझा ॥ भक्तवत्सल तूं असिस जगन्नाथा। राखिं ब्रीद आपुलें दिनानाथा ॥ दयाळू तूं सर्वज्ञ जरी होसी। कृपा करुनि मज राखे पायापासीं ॥ ३ ॥ भवरोगें त्रासलों स्वामिराया। ज्ञान भेषज देवोनि हरीं माया ॥ ॥ कसा निष्ठुर तूं होसि वासुदेवा। सीतारामाचा नाइकसी धांवा ॥ ४ ॥

( ४ पद चा० झंपा )

भजा अत्रिनंदन गुरू दत्त यासी। स्मरणमात्रें हरी आपदासी ॥ ध्रु० ॥ कोण वर्णू शके दत्तगुरुच्या गुणा। वासुकीची रसना चकित जाहाली। वेद मौनावले योगि बहु शीणले नेणती दत्तगुरुच्या रूपासी ॥ भ० ॥ ॥ १ ॥ अनसुयेच्या सदनिं याचक होवुनी। रुद्र ब्रह्मा हरी प्राप्त जाहले। छद्म हृदयीं धरुनिया याचती भोजना। नग्न होवुन जरी अन्न देसी ॥ २ ॥ तरिच भोजन करूं तूझिया आश्रमीं, नातरी विन्मुख होऊं आम्ही ॥ वाक्य हें परिसुनी, मुनि चरण चिंतुनी, पुत्रभावें मनीं भावि त्यांसी ॥ ३ ॥ सिंचि जल त्यांवरी, आलि निज मंदिरीं, होऊनी दिग्वसन, वाढि पात्रें। तव तीं शिशु होवुनि मग करिति रोदना। चकित होवुनी स्तन्य पाजि त्यांसी ॥ ४ ॥ अत्रि मुनी स्वाश्रमीं पातले जेववा, अनसुया वृत्त कथी, सर्व तेव्हां। देव आले घरा हर्ष झाला खरा। भेट देती सीतारामयासी ॥ ५ ॥

( ५ पद चा० झंपा )

प्रभो जानकीवल्लभा येइं रामा। पोळलों भवदवें तारिं आम्हां ॥ ध्रु० ॥ दुष्ट राक्षस बहू मातले भूवरी। दुःख देती सदां गोद्विजातें ॥ धर्म रक्षावया प्रगट झालासि तूं। मारुतीसहित तो कीशसेना ॥ १ ॥ सिंधु उतरावया सेतु हा बनवुनी जाळिली राक्षसासहित लंका। कीर्तिध्वज स्थापुनी जनकजा घेउनी। पातले स्वाश्रमा मूळधामा ॥ २ ॥ स्थान रेवातटीं घाट

ब्रह्माणिचा, विप्र तैलंग हें वसति जेथें । चैत्र मासीं पक्षा करिति उत्साह हा, ब्राह्मणा भोजनें देति नाना ॥ ३ ॥ दक्षिणें लक्ष्मण वामिं जनकात्मजा, वायुसूनु उभा अग्रभागीं । भक्तसंरक्षणा तिष्ठती भूवरी, हर्ष वाटे मनीं सीतारामा ॥ ४ ॥

( पद चा० पंचतुंडनररुंडमा० )

श्रीगुरु दत्ता ये अवधूता भक्तजनांतें सांभाळीं । सर्व संकटें दूर करोनी आपुल्या भक्तां परिपाळी ॥ ध्रु० ॥ भवाटवीचा मार्ग भयंकर मदनव्याघ्र हा बहु पीडी । क्रोध लोभ हे जंबुक निशिदिनिं भक्षिति मजला घालिं उडी ॥ १ ॥ बहुविध योनी भ्रमण करीतां विसरुनि गेलों तव स्वरुपा । मायापाशीं बद्ध होउनी संचय केला बहु पापा ॥ श्रीगु० ॥ २ ॥ परधन दारा आप्त सुतादिक यांवरि जडलें मन माझें । पुराण कीर्तन सद्गुरुसेवा कधिं नच घडली या देहें ॥ श्री० ॥ ३ ॥ दीनदयाघन अत्रिनंदना मम अपराधा क्षमा करीं । तव गुण गाया द्यावी सन्मति सीताराम ही विनंति करी ॥ ४ ॥

## शुभं भवतु

---

श्रीम० प० विद्यारण्यस्वामिविरचितं

# प्रार्थनाद्विपंचाशत्कं

( दररोज भजन संपल्यावर ४–४ प्रार्थना अनुक्रमानें म्हणाव्या अशी श्रीगुरुमहाराजांची आज्ञा आहे. )

हिरण्यगर्भादिस्थावरांतेषु शरीरेषु यदेकं चैतन्यमस्ति तदेवाहमस्मीति दृढज्ञानसिद्धिर्भूयादिति भवंतो महान्तोऽनुगृह्णन्तु १

लयविक्षेपकषायरसास्वादेभ्यो रक्षितं चित्तमविघ्नेन ब्रह्मण्यवस्थितं भूयादिति भवंतो म० २

नित्यनिर्विकारासंगाद्वितीयपरिपूर्णसच्चिदानन्दस्वप्रकाशब्रह्मानुभवसिद्धिर्भूयादिति भवंतो महान्तोऽनुगृह्णन्तु ३

अहमादिदृश्यविलक्षणास्मत्प्रत्ययाऽनुभूतप्रत्यक्चिन्मात्रानुभवसिद्धिर्भूयादिति भवंतो महान्तो० ४

सजातीयविजातीयस्वगतभेदरहिताखण्डसच्चिदानन्दाद्वितीयब्रह्मानुभवसिद्धिर्भूयादिति भवन्तो महांतो० ५

नित्यशुद्धबुद्धमुक्तसत्यपरानन्दाद्वितीयब्रह्मात्मानुभवसिद्धिर्भूयादिति भवंतो म० ६

स्वगतादिभेदरहितसच्चिदानन्दलक्षणब्रह्माभिन्नकूटस्थप्रत्यक्स्वरूपः सर्वसाक्षीति चिद्रूपानुभवसिद्धिर्भूयादिति भवंतो म० ७

स्वात्मनोऽन्यत्वेन प्रतिभातं सकलं साक्ष्यं जगत् स्वाविद्याविलसितत्वेन स्वानन्यत्वात् स्वात्ममात्राद्वितीयब्रह्मात्मानुभवसिद्धि सम्यग्भूयादिति भवंतो म० ८

असंभावनाविपरीतभावनारहितत्वेन करतलामलकवदहं ब्रह्मास्मीत्यप्रतिबद्धापरोक्षब्रह्मसाक्षात्कारो दृढीभूयादिति भवंतो म० ९

यो ब्रह्मादिस्तंबपर्यंतानां सर्वेषां प्राणिनां देहमध्ये तत्तत्साक्षित्वेन भासमानः परिपूर्णात्माऽस्ति सोऽयं परमात्मा केवलं मुमुक्षोः पुरुषस्य मे स्वरूपमित्येवंरूपात्मसाक्षात्कारो भूयादिति भवंतो महांतो० १०

वासनाक्षयमनोनाशतत्त्वज्ञानाभ्यासवशात् ज्ञानरक्षा तपःसिद्धिः सर्वसमत्वं दुःखनिवृत्तिः सुखाविर्भाव इत्येतत्पंचप्रयोजनसिद्धिर्भूयादिति भवंतो महांतो० ११

मैत्रीकरुणामुदितोपेक्षेतिसद्वासनापाटवेन रागादिदुर्वासनाक्षयः सम्यग्भूयादिति भवंतो महांतो० १२

निरंतरस्वात्मानुसंधानवशान्मनसो वृत्तिरूपपरिणामपरित्यागेन निरुद्धताकारेण परिणामो दृढीभूयादिति भवंतो महांतो० १३

शमादिपूर्वकं श्रवणमननिदिध्यासाभ्यासबलात् विषयासक्तिः प्रज्ञामांद्यं कुतर्को विपर्ययदुराग्रहश्चेति वर्तमानप्रतिबंधचतुष्टयनिवृत्तिद्वाराऽप्रतिबद्धापरोक्षब्रह्मसाक्षात्कारो भूयादिति भवंतो० १४

उपक्रमादिषड्विधलिंगैरशेषवेदान्तानामद्वैते ब्रह्मणि तात्पर्यावधारणं भूयादिति भवंतो म० १५

गुरुमुखाच्छ्रुतस्याद्वितीयवस्तुनो वेदान्तानुगुणयुक्तिभिरनवरतमनुचिंतनं भूयादिति भवंतो महांतो० १६

विजातीयदेहादिप्रत्ययानंतरितसजातीयसच्चिदानन्दात्मप्रत्ययप्रवाहो निरंतरं भूयादिति भवंतो महांतो० १७

असंगोऽहं चिदात्माऽहमिति प्रत्यगात्मनि निवेशिते वृत्तिरहिते

संस्कारमात्रशेषतया सूक्ष्मरूपेणावस्थिते चित्ते आत्मनः स्वरूपभूतपरमानन्दो निरंतरं सम्यगाविर्भूयादिति भवंतो म० १८

अहमात्मा साक्षी केवलचिन्मात्रस्वरूपो नाज्ञानं तत्कार्यं च किंतु नित्यशुद्धबुद्धमुक्तसत्यपरमानंदाद्वयं ब्रह्मैवाहमस्मीत्यभेदेनावस्थानं समाधिरंतःसमाधिना दृग्दृश्यविवेके बहिःसमाधिना ब्रह्मसर्गविवेके च दृढे जाते तेन विवेकद्वयेनायं गलितदेहाभिमानो विज्ञातपरमात्मतत्त्वश्च भूयादिति भवंतो म० १९

देहाद्बहिः सकलनामरूपात्मकेषु वस्तुष्वपि सर्पधारादिषु रज्जुरिव व्याप्तः सच्चिदानन्दलक्षणो यः परमात्मा स एव परशब्देनोच्यतेऽतरहमादिदृश्यविलक्षणोऽस्मत्प्रत्ययालम्बनभूतः प्रत्यक् चिन्मात्रस्वरूपः साक्ष्याख्यो जीवात्मा स एवावरशब्देनोच्यते परश्चासाववरश्चेति परावरः प्रत्यगभिन्नः परमात्मा तस्मिन्नेवमन्तर्बहिः पररूपेणावररूपेण चावस्थिते परमार्थतः परावरे ब्रह्मणि त्वं वाहमस्मि भगवो देवते वाहं वा त्वमसीति श्रुत्यनुसारेणाहं ब्रह्मास्मि ब्रह्मैवाहमस्मीति व्यतिहारेणाखण्डैकरसत्वेन साक्षात्कृते सति तेन परावरब्रह्मसाक्षात्कारेणास्य परावरब्रह्मसाक्षात्कृतवतस्तव हृद्ग्रंथिभेदः सर्वसंशयनिवृत्तिः सर्वकर्मक्षयरूपः परमपुरुषार्थः सम्यग्भूयादिति भवंतो महांतो० २०

अहंकारात्मनोरेकत्वभ्रमनिवृत्तिरूपो ग्रंथिभेदो दृढीभूयादिति भवंतो महांतोनुगृह्णन्तु २१

आत्मा देहत्रयातिरिक्तो न वा, व्यतिरिक्तत्वेऽपि कर्तृत्वादिधर्मयोगी न वा, अकर्तृत्वेऽपि तस्य ब्रह्मणोऽभेदो नास्ति वा, अभेदेऽपि तज्ज्ञानं कर्मादिसहितं मुक्तिसाधनं केवलं वा, आत्मा साक्षी कर्ता वा, साक्षित्वेऽप्यस्य ब्रह्मत्वमस्ति न वा, ब्रह्मत्वेऽपि

तद्बुद्ध्या वेत्तुं शक्यते न वा, शक्यत्वेऽपि तद्वेदनमात्रेण मुक्तिरस्ति न वा, मम परमार्थतो ब्रह्मत्वमस्ति न वा, ब्रह्मत्वेऽपि मम तादृग्रूपं साक्षात्कृतं न वा, साक्षात्कृतेऽपि इतःपरं कर्तव्यमस्ति न वा, कर्तव्याभावेऽपीदानीं मम जीवन्मुक्तत्वमस्ति न वा, जीवन्मुक्तत्वेऽपि वर्तमानदेहपातानंतरं भाविनी विदेहमुक्तिर्भविष्यति न वा, तत्प्राप्तावपि कालान्तरेषु पुनर्जन्म भविष्यति न वेत्यादिसर्वसंशयनिवृत्तिर्भूयादिति भवंतो महांतो० २२

अनारब्धानामागामिजन्महेतूनामनेककोटिजन्मार्जितानां प्रारब्धाऽतिरिक्तानां संचितकर्मणां निवृत्तिरूपः परमपुरुषार्थः सम्यग्भूयादिति भवंतो महांतो० २३

यः पूर्णानंदैकबोधस्तद्ब्रह्माहमस्मीति ब्रह्मात्मानुभवमात्रपर्यवसाने बुद्धिर्निरंतरं भूयादिति भवंतो महांतो० २४

यस्मिन्काले द्वैतभानं नास्ति निद्रापि नागच्छति तस्मिन्काले उपलभ्यमानं यत्सुखमस्ति स ब्रह्मानन्द इति ब्रह्मानुभवसिद्धिर्निरंतरं भूयादिति भवंतो महांतो० २५

मनोव्यापाराभावसमये यत्सुखं भासते तत्सुखमात्मरूपमित्यात्मनिश्चयः सम्यग्भूयादिति भवंतो महांतो० २६

स्वस्वप्नः स्वातिरेकेण यथा नास्ति तथैव स्वजाग्रदपि स्वातिरेकेण नास्ति तेन अद्वितीयात्मानुभवः सम्यग्भूयादिति भ० २७

वासनाक्षयमनोनाशाभ्यां निर्वासने वृत्तिशून्ये चित्ते संशयविपर्ययदोषद्वयाऽभावेन प्रतिबंधाभावादुत्पन्नं ज्ञानमबाधेन सुरक्षितं भूयादिति भवंतो महांतो० २८

पंचम्यादिभूमित्रयरूपायां जीवन्मुक्तौ संपाद्यमानायां द्वैतभासा-

भावेन संशयविपर्ययप्रसंगाभावादुत्पन्नं तत्वज्ञानमबाधेन सुरक्षितं भूयादिति भवंतो महांतो० २९

स्वप्ने स्थूलशरीराभाने सुप्तौ लिंगशरीराभाने समाधौ कारणाभाने च जाग्रदाद्यवस्थाचतुष्टये यश्चिद्रूपात्मा मणिषु सूत्रमिवानुस्यूततया निरंतरं भासते स चिद्रूपात्मैवाहमस्मीत्यन्वयव्यतिरेकाभ्यां शरीरत्रयस्य व्यावृत्तिं तत्साक्षिचैतन्यस्यानुवृत्तिं च पश्यतो मम शरीरत्रयव्यातिरिक्तात्मानुभवसिद्धिर्भूयादिति भवंतो महांतो० ३०

भगवन्तं परमेश्वरं प्रीतिपूर्वकं भजतो ममोपर्यनुकंपार्थं भगवान् वासुदेव आत्मभावस्थः सन् विवेकप्रत्ययरूपेण भक्तिप्रसादस्नेहाभिषिक्तेन मद्भावनाभिनिवेशवातेरितेन ब्रह्मचर्यादिसाधनसंस्कारवत्प्रज्ञावर्तिना विरक्तांतःकरणाधारेण विषयव्यावृत्तचित्तरागद्वेषाकलुषितनिवातापवरकस्थेन नित्यप्रवृत्तैकाग्र्यध्यानजनितसम्यग्दर्शनभास्वता ज्ञानदीपेनाज्ञानजमविवेकतो जातं मिथ्याप्रत्ययरूपं मोहांधकारतमो नाशयत्वित्याशीर्निरंतरं भूयादिति भवंतो म० ३१

परमेश्वरं प्रीतिपूर्वकं भजंतो ये भक्ता येन बुद्धियोगेन सम्यग्दर्शनलक्षणेनात्मभूतं परमेश्वरमात्मत्वेनोपयांति प्रतिपद्यंते तं बुद्धि योगं भगवान्वासुदेवो ददात्वित्याशीर्निरंतरं भूयादिति भवंतो. ३२

विकारमंतरेण स्वाध्यस्तं सर्वं साक्षादव्यवधानेन स्वरूपबोधेनेक्षते पश्यतीति साक्ष्यनुभवः सम्यग्भूयादिति भवंतो महांतो० ३३
देहेंद्रियादिसकलजडावभासकत्वेन चिद्रूप इति चिदनुभवः सम्यग्भूयादिति भवंतो० ३४

आत्मनि कदाचिदप्रियाभावेन परप्रेमास्पदत्वेन चात्मा परमानन्दरूप इत्यानन्दात्मानुभवः सम्यग्भूयादिति भवंतो महांतो० ३५

असज्जडदुःखात्मकाहंकारादिभ्यो विलक्षणतया प्रातिकूल्येन सत्य-ज्ञानानन्दरूपेण अंचति प्रकाशते इति प्रत्यगात्मानुभवः सम्यग्भूयादिति भवंतो महांतो० ३६

अभानरूपस्य विश्वस्य भासकसंनिधेर्विना कदाचिद्भानाभावाद्भानरूपात्मा सर्वगत इति सर्वगतात्मानुभवः सम्यग्भूयादिति भवंतो महांतो० ३७

पश्चाद्भासमानस्य जडस्य प्रथमतो भासमानं चैतन्यमेव वास्तवं स्वरूपमिति निश्चित्य जडमुपेक्ष्य चिन्मात्रमेव चित्तं निरन्तरं भूयादिति भवंतो महांतो० ३८

सर्वाण्येवैतानि प्रज्ञानस्य नामधेयानि भवंतीति वाक्येन देहेन्द्रियादिसाक्षिरूपं यत्प्रज्ञानं त्वंपदार्थरूपं निर्णीतं तदेवैष ब्रह्मेत्यादिवाक्येन जगत्कारणतया निर्णीतं परं ब्रह्म न चानयोरीषदपि भेदोऽस्तीत्यैतरेयमहावाक्यज्ञानसिद्धिर्निरंतरं भूयादिति भवन्तो महांतोऽनु० ३९

यतः सर्वत्रावस्थितं परं ब्रह्मातो मय्यवस्थितं प्रज्ञानं ब्रह्मैव आत्मज्ञानत्वाविशेषादित्यैतरेयमहावाक्योक्तजीवब्रह्मैक्यज्ञानसिद्धिः सम्यग्भूयादिति भवंतो० ४०

आत्मसन्निधौ विद्यमानत्वेन जडरूपस्यापि देहेंद्रियादेर्भासमानत्वादात्मा चिद्रूप इति चिदात्मानुभवसिद्धिः सम्यग्भूयादिति भवंतो महांतो० ४१

आत्मसहितत्वेन दुःखात्मकस्य देहादेरपि प्रियतमत्वादात्मा परमानन्दरूप इत्यानन्दानुभवसिद्धिः सम्यग्भूयादिति भवंतो० ४२

देशतः कालतो वस्तुतः परिच्छेदरहिताद्वितीयब्रह्मानुभवसिद्धिर्भूयादिति भवंतो महांतो० ४३

पूर्वापरपरामर्शमंतरेण सहसोत्पद्यमानस्य क्रोधादिवृत्तिविशेषस्य

हेतोश्चित्तगतसंस्कारस्य विवेकजन्यायां क्षांतिवासनायां दृढायां सत्यां बाह्यनिमित्तेन क्रोधाद्यनुत्पत्तिः सम्यग्भूयादिति भवंतो महांतो० ४४

यस्य प्रसादादहमेव विष्णुर्मय्येव सर्वं परिकल्पितं चेतीत्थमात्म-रूपं विजानामि तस्य पादारविंदयोरचंचला भक्तिर्निरंतरं सम्यग्भूयादिति भवंतो० ४५

अचिद्रूपस्य जगतश्चित्सन्निधेर्विद्यमानत्वाच्चिद्रूप आत्मा सर्वगत इति सर्वगतात्मानुभवः सम्यग्भूयादिति भवंतो० ४६

सर्वार्थसाधकत्वहेतुना सर्वसंबंधेन च आत्मा परिपूर्ण इति परि-पूर्णानुभवः सम्यग्भूयादिति भवंतो० ४७

देशकालाव्यवहितत्वेन पारोक्ष्यहेतोरभावात् साधनांतरनिरपेक्ष-तया स्वयंप्रकाशमानश्चिदात्मा सर्वदा स्वतःसिद्धापरोक्षरूप इत्यपरोक्षानुभवः सम्यग्भूयादिति० ४८

यत्र यद्वस्त्वीक्ष्यते तेन वस्तुनाऽन्यत्राननन्वागतत्वेन आत्मा असंग इत्यसंगात्मानुभवः सम्यग्भूयादिति भवंतो० ४९

निरवयवत्वेनासंगत्वेन चात्मनः केनापि संबंधाभावादात्मा नित्यमुक्त इति नित्यमुक्तस्वरूपानुभवः सम्यग्भूयादिति० ५०

अवेद्यत्वे सत्यपरोक्षव्यवहारयोग्यत्वादात्मा स्वयंप्रकाश इति स्वयंप्रकाशात्माऽनुभवः सम्यग्भूयादिति भवंतो० ५१

साधनांतरनिरपेक्षतया स्वयमेव भासमानत्वादात्मा स्वयंप्रकाश इति स्वयंप्रकाशात्माऽनुभवः सम्यग्भूयादिति भवंतो० ५२

इति प्रार्थनाद्विपंचाशत्कं समाप्तं ॥

---

॥ श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः ॥

# माणगांव येथील उत्सववृत्तांत

श्रींच्या जयंतीचा शताब्दिक उत्साहाचा कार्यक्रम—ता. १३-८-५४ शुक्रवारीं सकाळीं सात वाजतां नामभजनसप्ताहाला सुरुवात होऊन ता. २० रोजीं सकाळीं समाप्ति. त्याचप्रमाणें गुरुचरित्रसप्ताह, ऋग्वेदसंहितापारायण, महारुद्र, नित्य रात्रौ आरती, मंत्रजागर मंदिरांत व श्रींच्या जन्मघरांत सात दिवस झाले. पवमानस्वाहाकार श्रींच्या जन्मघरांत बुधवार व गुरुवार दोन दिवसांत झाला. गुरुवार जन्मदिवशीं महानैवेद्य; ब्राह्मण व इतरहि मंडळी भोजनाला होती. संध्याकाळीं तीन वाजतां पुराणाला सुरुवात होऊन कीर्तन, जन्म, पाळण्यांत घालणें, आरती, मंत्रपुष्प, भजन, संकटहरस्तोत्र, जयलाभयशस्तोत्र, इत्यादि झाल्यावर श्रीमंत सौ. इंदिराबाई होळकर राणीसाहेब इंदूर यांनी पाठविलेला शुभसंदेश सर्व मंडळींना वाचून दाखविला. नंतर भस्म, तीर्थ-प्रसाद सर्व मंडळींना वांटण्यांत आला. रात्रौ पुन्हां सावंतवाडीहून आलेल्या ब्राह्मणांचा आरती, मंत्रपुष्प व इतरहि मंडळींचें भजन झालें. शुक्रवारीं सकाळीं कित्येक मंडळींचे अभिषेक होते ते झाले. दुपारीं महानैवेद्य व भंडारा झाला. दोन्ही दिवशीं साळगांव, आकेळी, सावंतवाडी व थोडी लांबचीहि मंडळी हजर होती. माणगांवची होतीच. एकंदर पात्र दोन्ही दिवशींचे मिळून २०० होईल. एकंदरींत कार्यक्रम उत्तम प्रकारें झाला.

---

॥ श्रीदत्त प्रसन्न ॥

## श्रीदत्तसंस्था, गरुडेश्वर (व्हाया राजपिपळा जि. भडोच)

# शताब्दि-महोत्सव

श्री. रा. रा. दत्तात्रेय कवीश्वर यांसी नरहर केशव कोराने याचा कृ. सि. सा. नमस्कार वि. वि. आपलें पत्र पावलें मजकूर समजला. आपण ठरविलेला विचार स्तुत्य आहे व त्याप्रमाणें इकडील महोत्सवाची साद्यंत हकीकत आपणास कळविली आहे.

इकडील उत्सव फारच थाटांत झाला. श्रीमत् रंग अवधूत महाराजांचे सान्निध्यानें व प्रेरणेनें फार लोक आले होते. एकंदर तिन्ही दिवस मिळून २०००० वर लोक जेवून गेले. आमचे पहाण्यांत एवढे लोक गरुडेश्वरासारख्या जंगलांत कधींहि आले नव्हते. पवमानस्वाहाकार, महारुद्रस्वाहाकार, १०८ गुरुचरित्र पारायण, २१ गुरुलीलामृतपारायण, चारी वेदांचीं पारायणें, महाराजांच्या सर्व पुस्तकांचें पारायण, अखंड नामस्मरण, मुंबईतील गंधर्व भजनमंडळाचें सुश्राव्य भजन–कोल्हापुरांतील सौ. गुणवंतीबाई यांचें प्रेमळ भजन, वीणावादन, बंसीवादन, श्रीगुरूंचें गान, गायनाचार्य मधुसूदन जोशी व श्री. पंचाक्षरी प्रोफेसर इंडियन म्युझिक कॉलेज बडोदा, भजनाचार्य भाऊसाहेब दिंडोरकर व सुमनलाल मास्तर यांचीं सुश्राव्य भजनें, अखंड नामधून, श्रीदत्तबावनीपारायण वगैरे अहोरात्र चालू होते. एकंदर स्वाहाकाराकडे ५५ ब्राह्मण, वेदांच्या पारायणासाठीं ५, १०८ श्रीगुरुचरित्र व २१ श्रीगुरुलीलामृत मिळून २०० ब्राह्मणांची उपस्थिति होती. २५ मंडप बांधण्यांत आले होते. केळीचे खांब, आंबो पाळव, ध्वजा तोरणें लावलीं. ठिकठिकाणीं दत्तनामाचे बोर्ड टांगण्यांत आले होते. जन्मदिवशीं प्रातःकाळीं मोठी घंटा बांधून १०० आवाज करण्यांत आले. सायंकाळीं हिंदुस्थानचा नकाशा काढून त्यावर श्रीमहाराजांनीं चातुर्मास जितके ठिकाणीं केले त्या त्या जागा दर्शवून दीपज्योति १०० प्रकटविण्यांत आल्या. प्रभातफेरी, भूपाळ्यागान, सनईवादन वगैरे सर्व होतच होतें. थोडक्यांत सर्व लिहिलें आहे. इंदूर, देवास, उज्जैन, ग्वालियर, कोल्हापुर, नरसोबावाडी, निसरपुर, अमदाबाद, मुंबई, पुणें, नाशिक, खानदेश वगैरे लांबच्या ठिकाणांहून भक्तमंडळी आलीच होती. परंतु आजूबाजूचे लोकांनीं आपापलीं गांवें ओस ठेवून बायकापोरांसुद्धां हा महोत्सव पहाण्यासाठीं धांव घेतली होती.

एकंदर २०० स्वयंसेवक व ५० स्वयंसेविका–बीळ, झणोर, सारोद, बडोदे, पारदा या गांवांहून आले होते. राजपिपळ्याहून खास ५० होमगार्ड व २५ पोलिस पण व्यवस्थेसाठीं आले होते. सॅनिटरी डिपार्टमेन्टची ५० मंडळी स्वच्छता ठेवीत होती. इलेक्ट्रिक लाइटची सोय

मल्हेश्वरकर बडोद्यांतील प्रधानबंधु, जोशी, कोल्हापुरकर, थोरात, निंबाळकर, पंचभाई यांनीं व राजपिपळयांतील कांतिलाल यांनीं केली होती. पाण्याचा पंप चोवीस तास यात्रेकरूंना पाणी यथेच्छ पाजीत होता. सारखा वेदघोष व नामस्मरण चाललें होतें.

नरहर केशवराव कोरान्ने

---

श्रीगणेशदत्तगुरुभ्यो नमः

## श्री. म. प. प. वासुदेवानंद सरस्वती ( टेंबे ) स्वामी महाराज

यांचा

# शतसांवत्सरिकजयन्तीमहोत्सव

(‘ सदाचार ’ बरकतपुरा, हैद्राबाद दक्षिण )

श्रीमत्सद्गुरु श्रीवासुदेवानन्दसरस्वतीमहाराजांचा जन्म शके १७७६ श्रावण कृष्णपंचमीस सावंतवाडी संस्थानांपैकीं माणगांव या ठिकाणीं झाला. आज शके १८७६ श्रावण कृष्ण पंचमीस श्रीमहाराजांचे जन्मास शंभर वर्षे पूर्ण होत असल्यामुळें हा उत्सव हैद्राबाद येथील गुरुभक्त मंडळींनीं करण्याचें ठरवून सद्गुरुकृपेनें तो उत्सव अत्यंत उत्साहानें पार पाडला. त्याचें इतिवृत्तनिवेदन संक्षेपानें पुढीलप्रमाणें करीत आहे:—

शके १८७० आषाढमासीं श्रीमहाराजांचा वृद्धशिक्षा हा अप्रकाशित सटीक ग्रंथ भाषांतरासहित प्रकाशित करावा या उद्देशानें आम्हीं श्रीमंत महाराणीसाहेब सौ. इंदिराबाई होळकर यांचेकडे पत्रानें सर्व अभिप्राय कळविला. श्रीमंत सौ. राणीसाहेबांचेवर श्रीमहाराजांची पूर्ण कृपादृष्टि आहे. त्यामुळें हें नवीनच आवश्यक असें सद्गुरूंचें ग्रंथप्रकाशनरूप कार्य उपस्थित झालेलें पाहून त्यांना अत्यंत संतोष झाला व त्यांनीं त्या वेळीं अशी सूचना केली कीं ‘हें श्रीगुरूंचें कार्य एखादें मंडळ स्थापून सुरू करावें म्हणजे या कार्यास व्यवस्थित स्वरूप येईल.’ याप्रमाणें श्रीमंत सौ. राणीसाहेबांनीं या सूचनेच्या रूपानें आपली संमति या सत्कार्याबद्दल अभिव्यक्त केलेली पाहून आम्हाला आनंद वाटला. पुढें दोन वर्षांनीं श्रीमंत सौ.

राणीसाहेबांचा सत्यसंकल्प पूर्ण करण्याकरितां श्रीगुरुमहाराजांचे कृपेनें शके १८७२ विजयादशमीच्या मुहूर्तावर पुणें येथें श्रीवासुदेवानंदसरस्वतीग्रंथ-प्रकाशनमंडळ स्थापन होऊन या मंडळातर्फे श्रीमहाराजांच्या सपूर्ण वाङ्-मयाचें प्रकाशनकार्य सुरू करण्यांत आलें. या मंडळातर्फे अर्धे अधिक कार्य समाधानकारक झालेलें पाहून गतवर्षी आषाढमासांत या सद्‌गुरु-कार्याकरितां तीन हजार एक (३००१) रुपयांची देणगी देण्याचा आपला शुद्ध सात्विक संकल्प श्रीमंत सौ. राणीसाहेबांनीं कळवून मंडळांस उपकृत केलें. ग्रंथप्रकाशनकार्य आटोपत आलेलें पाहून हैद्राबाद येथील मंडळींनीं श्रीमहाराजांचा शतसांवत्सरिकजयंतीमहोत्सव हैद्राबाद येथें व्हावा व त्या समयीं द्वादशपुष्पात्मक श्रीमहाराजांच्या प्रकाशित वाङ्मयाचें समर्पण श्रीचरणीं व्हावें अशी आपली मनीषा व्यक्त केली. ती आम्ही श्रीमंत सौ. राणीसाहेबांना निवेदन करून या समारंभाचें अध्यक्षस्थान मंडित करण्या-करितां उत्सवसमयीं हैद्राबादला उपस्थित राहण्याबद्दल विनंति केली. ती त्यांनीं अत्यंत आनंदानें त्या वेळीं मान्य केली.

याप्रमाणें अध्यक्षांची योजना निश्चित झाल्यावर गेल्या आषाढ मासांतील संकष्टीचे दिवशीं हैद्राबाद येथील सन्मान्य मंडळींनीं श्री. शंकरराव आजेगांवकर यांचे घरीं एकत्र जमून विचारविनिमय केला व त्याच दिवशीं एक उत्सवकार्यकारीमंडळ स्थापन करून उत्सवाची सामग्री तयार करण्याचें कार्य सुरू केलें. एक दोन दिवसांतच कार्यक्रमपत्रिका छापून सर्व सद्भक्तांचेकडे रवाना झाल्या. श्रावणकृष्ण प्रतिपदेपासून सात दिवस उत्सव करण्याचें ठरलें. त्याप्रमाणें श्रावणकृष्णप्रतिपदा रविवार दि. १५।८।५४ रोजीं सकाळीं ७ वाजतां श्रीगणेशपूजन पुण्याहवाचन होऊन उत्सवकार्यास आरंभ झाला. प्रथम दिवशीं 'दिगंबरा दिगंबरा श्रीपादवल्लभ दिगंबरा' या मंत्राचे अहोरात्र अखंड भजनास आरंभ झाला. तसेंच श्रीमहाराजांचे मुद्रित झालेले सर्व ग्रंथ, श्रीशांकरभाष्य, श्री-मद्‌भागवत, श्रीगुरुचरित्र, श्रीमदध्यात्मरामायण इत्यादि ग्रंथांच्या पारा-यणासही प्रारंभ झाला. दुसरे दिवशीं श्रावणकृष्ण द्वितीया सोमवारीं सकाळीं ऋवसंहितास्वाहाकारास व महारुद्राभिषेकास आरंभ झाला. दुपारीं

एक वाजेपर्यंत हा कार्यक्रम चालत असे; नंतर भोजन आटोपल्यावर ३ ते ५ पर्यंत स्त्रियांचा भजनाचा कार्यक्रम होत असे. त्यानंतर परगांवांहून आलेल्या व स्थानिक पंडितांचें प्रवचन सुरू होई तें सात वाजेपर्यंत चालत असे. नंतर श्रींची आरती, मंत्रपुष्प व वैदिकमंडळींचें मंत्रपठण हें कार्य होत होतें. रोज रात्रौ ९ ते १० पं. आत्मारामशास्त्री जेरे, प्राध्यापक तत्त्वज्ञान-मंदिर अमळनेर यांचें सुश्राव्य प्रवचन होत असे. नंतर १० ते १२ भजन, गायन, कीर्तन असा यथासंभव नित्य कार्यक्रम होत असे.

दि. १९ गुरुवार हा श्रीमहाराजांचा जयंतीचा दिवस. या दिवशीं उत्सवाकरितां तयार केलेल्या विस्तीर्ण मंडपांत दुपारीं एक वाजल्या-पासूनच स्त्रीपुरुषांची गर्दी होऊं लागली. भगिनीवर्गाचें भजन नित्या-प्रमाणें चालू होतें. सुमारें चार वाजेपर्यंत स्त्रीपुरुषांची इतकी गर्दी झाली कीं, मंडपांत पाय ठेवण्यास सुद्धां जागा उरली नाहीं. ४॥ ते ५ चे दरम्यान श्रीमहाराजांचा जन्मकाल सर्व भक्तांनीं, फुलें गुलाल उधळून नामाचा गजर करून साजरा केला. पं. आत्मारामशास्त्रीजींनीं जन्माख्यान सांगितलें. आरती, मंत्रपुष्प होऊन सभेच्या कार्यास सुमारें ५। वाजतां आरंभ झाला. प्रारंभीं श्री. शंकररावजी आजेगांवकर यांनीं नियोजित अध्यक्ष कांहीं कारणानें येऊं न शकल्यामुळें पं. आत्मारामशास्त्रीजी जेरे यांना अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल विनंति केली. नंतर उत्सवमंडळांतील एक धर्मनिष्ठ उत्साही कार्यकर्ते श्रीमान् गोपीनाथराव चौधरी धामणगांव-कर यांनीं श्रद्धापूर्ण भाषण करून अनुमोदन दिल्यावर अध्यक्ष स्थानापन्न झाले. त्यांचें प्रास्ताविक भाषण झाल्यावर श्री. भाऊसाहेब क्षीरसागर यांनीं प्रथम श्रीमंत सौ. राणीसाहेबांचा आलेला शुभसंदेश वाचून दाखवून इतरहि अनेक ठिकाणचे संदेश वाचून दाखविले. यांमध्यें संकेश्वर, करवीर, द्वारका, इत्यादि जगद्गुरु पीठांतील आचार्यांचे व श्रीरंग अवधूत महाराज, करपात्री महाराज प्रभृति व श्री. बाळासाहेब खेर प्रभृति अनेक माननीय सज्जनांचे शुभसंदेश होते.

संदेशवाचन झाल्यावर अध्यक्षांचे अनुज्ञेनें पं. दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर यांनीं ग्रंथप्रकाशन मंडळाची सर्व हकीकत संक्षेपानें सांगितली. श्रीगुरुम-

हाराजांची असीम कृपा, धर्मप्रवण श्रीमान् मंडळीचें उदार द्रव्यसहाय्य व अनेक मोठमोठ्या पंडितांचें झालेलें निर्हेतुक बुद्धिसाहाय्य यामुळेंच हें प्रकाशनकार्य पार पडलें असें सांगून यापुढें या ग्रंथांचा कृतिपर्यवसायी प्रसार होण्याकरितां धनिकांचे व पंडितवर्गाचें असेंच उत्तरोत्तर साहाय्य लाभावें याबद्दल त्यांनीं प्रार्थना करून आपलें भाषण संपविलें. नंतर अध्यक्षांचे हस्तें श्रीस ग्रंथसमर्पण केलें. मुंबईचे धर्मशील गृहस्थ श्री. के. एम्. वर्तक यांनीं पाठविलेला १००१ चा चेक श्रीस समर्पण केला व जमलेल्या विद्वज्जनांचीं श्रीमहाराजांच्या वाङ्मयाचें महत्त्वद्योतक अशीं भाषणें झालीं.

नंतर अध्यक्षांचे समारोपात्मक भाषण झालें. भगवद्गीतोक्त त्रिविध तपाचा आदर्श असणाऱ्या अध्यक्षमहाशयांनीं स्वतःकडे बालभाव धारण करूनच बोलण्यास आरंभ केला. सद्गुरुमहाराजांचें व त्यांच्या वाङ्मयाचें महत्त्व आपल्या रसाळ वाणीनें पटवून देऊन सर्वहि जिज्ञासूंनीं या ग्रंथरूप सद्गुरूंची स्थापना आपल्या वास्तूमध्यें करून यथासंभव त्याच्या मननानें आत्मकल्याण संपादन करावें अशी कळकळीची सूचना करून त्यांनीं आपलें भाषण संपविलें. शेवटीं अध्यक्षांना पुष्पहार समर्पण करून श्री. भाऊसाहेब क्षीरसागर यांनीं सर्वांचें आभारप्रदर्शन केल्यावर हा जवळजवळ तीन तास चालू असलेला मधुर समारंभ समाप्त झाला व इतका वेळपर्यंत तन्मयतेनें बसलेली सर्वहि मंडळी प्रसाद घेऊन आपापल्या घरीं गेली.

कु. धोंडूबाई कुलकर्णी यांचें उत्तम गायन जयंतीदिवशीं झालें. शुक्रवार व शनिवार या दोन दिवशीं वऱ्हाडप्रांतांतील सुविख्यात कीर्तनकार श्री. ह. भ. प. नानाबुवा जहागीरदार शिंदखेडकर यांनीं सर्वांगसुंदर अशा आपल्या सुश्राव्य कीर्तनानें उत्सवांतील एक न्यूनता भरून काढली. शनिवारीं सकाळीं दहा वाजतां रुद्रस्वाहाकार श्रीमंत भाऊसाहेब धामणगांवकर यांचे हस्तें झाला. नंतर सुमारे बारा वाजतां ऋक्संहितास्वाहाकाराचे यजमान श्री. बाबूराव देशमुख व रुद्रस्वाहाकाराचे यजमान श्री. भाऊसाहेब धामणगांवकर यांच्या हातून झालेल्या कर्मांच्या

पूर्णाहुतीचा मोठा समारंभ झाला. नंतर त्या दिवशीं रात्रीं दहा वाजेपर्यंत भोजनाच्या पंक्तीवर पंक्ति उठत होत्या. एकंदर त्या दिवशीं दोन हजारांचे वर पान झालें असावें. उत्सवाकरितां नरसोबावाडी, कुरुंदवाड, वाई, पुणें, अमळनेर, सोलापुर, गोकर्ण, बार्शी, बिझवाडा, नांदेड, पवनी, परळी इत्यादि ठिकाणची उत्तम वैदिक, विद्वान मंडळी आलेली होती. असा हा समारंभ सर्व हैद्राबादकर मंडळींच्या श्रद्धाबलानें व सद्गुरुमहाराजांच्या कृपाप्रसादानें उत्तम रीतीनें पार पडला. उत्सव संपल्यावर दुसरे दिवशी रविवारीं श्री. भाऊसाहेब वामणगांवकर यांनीं आपल्या सुप्रसिद्ध गोकुळ प्रासादांत, उत्सवानिमित्त जमलेल्या सर्वही विद्वज्जनांना बोलावून श्रीसत्यदत्तपूजेचा व भोजनाचा मोठा समारंभ केला व सर्व विद्वज्जनांचे कार्यक्रम ठेवून सर्वांचा उत्तम सत्कार केला. त्यांनीं एक दिवसांत छोटासा शतसांवत्सरिकजयंतीमहोत्सवच केल्याचें श्रेय संपादन केलें असें त्या दिवशीं सर्व लोकांचे मुखांतून अंतःकरणपूर्वक उद्गार निघाले. उत्सव-मंडळांतील सर्वच मंडळी याप्रमाणें आपली सद्धर्मनिष्ठा व्यक्त करून 'धन्यो गृहस्थाश्रमः' ही उक्ति सार्थ करणारी असल्यामुळेंच श्रीमहाराजांनीं या भाग्यनगरांत हा उत्सव घडवून आणून सर्वांनाच सात्विक समाधान दिलें. अशीच श्रीगुरुमहाराजांची पूर्ण कृपा सर्व सद्भक्तांचेवर अविरत राहून सर्वांचे हातून श्रद्धापूर्वक श्रीगुरुसेवा नित्य चालू राहावी हीच श्रीमहाराजांचे चरणीं प्रार्थना आहे.

श्रावणकृष्ण ११<br>भौमवार १८७६<br>दि. २४-८-५४

वामन दत्तात्रेय गुळवणी,<br>दिगंबर शंकर देशमुख,<br>एम्. एस्‌सी.<br>हैद्राबाद दक्षिण

## उत्सव मंडळ

| नांव | देणगी |
|---|---|
| १. श्री. धुंडिराजमहाराज दीक्षित | १२५ रु. |
| २. ,, गोपीनाथराव चौधरी धामणगांवकर | १०१ रु. रोख<br>२ पोर्ती धान्य |
| ३. ,, राजा धुंडिराज बहादूर | २५० रु. |
| ४. ,, श्रीपादराव नेवासेकर | १०१ रु. |
| ५. ,, गणपतराव कौलासकर | ५१ रु. |
| ६. ,, कांतराव अंबडकर | ७५ रु. |
| ७. ,, शंकरराव आजेगांवकर | ५५१ रु. |
| ८. ,, हणमंतराव ( बापूसाहेब ) मोहरीकर | ११६ रु. |
| ९. ,, दत्तोपंत टाकळकर | १०१ रु. |

## इतर देणगीदारांचीं नांवें

| नांव | रु. |
|---|---|
| श्री. शंकराचार्य गुरुस्वामी पुणें | ११ |
| ,, रंग अवधूत महाराज | १०१ |
| ,, वामनराव गुळवणी | २२१ |
| सौ. मधुव्रताबाई हार्डीकर | २०१<br>व २ पोर्ती धान्य |
| श्री. भुजंगराव भालेराव | १०१ |
| ,, नीलकंठराव देवधर | १०१ |
| ,, माणीकराव मोरखंडीकर | १०१ |
| ,, ल. ना. अभ्यंकर | १०१ |
| श्री. गं. भा. मुक्ताबाई नाईक | १०१ |
| श्री. लक्ष्मीकांतराव मोहोळकर सोलापूर | १०१ |
| श्री. किशनराव हैद्राबाद | १०१ |
| ,, विश्वनाथराव जोगाईकर | ७६ |
| ,, ब. ल. देशमुख | ५५ |
| ,, नाथराव भोसीकर | ५५ |
| ,, माधवराव उर्फ आबूशास्त्री | ५१ |
| ,, र. बा. उर्फ काकासाहेब क्षीरसागर | ५१ |
| ,, लक्ष्मणराव बकडकर | ५१ |
| ,, अरब शिवराज | ५१ |
| ,, भाऊसाहेब टिळक | ५१ |
| ,, अनंतराव परांजपे | ५१ |
| ,, वासुदेवराव नाईक | ५१ |
| ,, वासुदेवराव गांवसूदकर | ५१ |

| नांव | रु. | नांव | रु. |
|---|---|---|---|
| श्री. विश्वनाथराव वकील | ५१ | सौ. इंदुताई जोशी | २० |
| ,, गोविंदराव विडोळीकर | ५१ | श्री. नीळकंठराव आडगांवकर | १७ |
| ,, यशवंतराव कोळगांवकर | ५० | ,, दादासाहेब बोराळकर | १५ |
| ,, डॉ. हुमणाबादकर | ५० | व धान्य पावपल्ला | |
| ,, गोपाळराव अंबडकर | ४५ | ,, गंगाधरराव पत्की | १४ |
| ,, सीतारामपंत पाठक | ४३ | ,, रतिलाल शहा | १३ |
| श्रीमती चंद्रभागाबाई | ३६ | ,, गोविंदराव गंगाखेडकर | १२ |
| श्री. पंडीतराव पडगांवकर | ३६ | ,, धुंडिराज महाराज कविश्वर | ११ |
| ,, सीताराम स्वामी | ३० | सौ. सरस्वतीबाई ,, | ११ |
| ,, नरसींगराज बहादूर | ३० | श्रीमती तुंगाबाई हणमसागर | ११ |
| ,, भुजंगराव देशमुख रोहरकर | २५ | श्री. भाऊसाहेब नखाते | ११ |
| ,, दत्तोपंत देशमुख | २५ | ,, राजारामपंत आकुत | ११ |
| श्रीमती इन्दुताई नाईक | २५ | ,, गो. बा. सहस्त्रबुद्धे | ११ |
| श्री. हणमंतराव विद्वांस | २५ | ,, कृ. गो. कुबडे | ११ |
| ,, नानासाहेब विश्वामित्रे | २५ | ,, गंगाधर गोविंद | ११ |
| ,, प्रभाकरराव बडाळे | २५ | ,, भाऊराव देशपांडे | ११ |
| ,, बालमुकुंद मंत्री | २५ | ,, अण्णासाहेब कुलकर्णी | ११ |
| ,, सरदार हेबळीकर | २५ | ,, मेघश्यामराव वकील | ११ |
| ,, काशीबाई देशपांडे | २५ | ,, हस्ते बापुसाहेब कुबडे | ११ |
| ,, मणेरीकर महाराज | २४ | सौ. गंगूताई कविश्वर | ११ |
| ,, आपटे मास्तर पुणें | २१ | श्री. अप्पासाहेब महाराज | ११ |
| ,, पंडितराव जड | २१ | ,, सखारामपंत कोयाळकर | ११ |
| ,, गोविंदराव देशपांडे | २१ | सौ. लक्ष्मीबाई नखाते | ११ |
| ,, बाबुराव लातूरकर | २१ | श्री. वैद्य मास्तर | ११ |
| ,, किसनराव साखरेकर | | सौ. सुमतीबाई वैद्य | ११ |
| देशपांडे | २१ | श्री. गंगाधर वैद्य | ११ |
| ,, कुलकर्णीसाहेब इंजिनीयर | २० | ,, वैद्य इदुरकर | ११ |
| ,, डॉ. मेलकोटे | २० | ,, प. भ. अफझलपुरकर | ११ |

| नांव | रु. | नांव | रु. |
|---|---|---|---|
| श्री. माधवराव नांदेडकर | ११ | श्री. ल. गा. येवलेकर | १० |
| ,, किशन केशरमल | ११ | ,, गुलाब पहेलवान | १० |
| ,, जगय्या शिंपी | १० | ,, माण्डके | १० |
| श्रीमती गंगूबाई शिंदेफळकर | १० | ,, एन्. माधवराव | १० |
| श्री. केशवराव गंगाखेडकर | १० | श्रीमती आनंदीबाई हार्डीकर | १० |
| ,, य. कृ. भेडसगांवकर | १० | गं. भा. भागीरथीबाई आजेगांवकर | १० |
| ,, गंगाधरराव औंढेकर | १० | श्री. प्रभाकरराव वसमतकर देशमुख | ९ |
| ,, द. भि. रबडे | १० | ,, पंडीतराव पेडगांवकर | ९ |
| ,, माणीकराव मांडाखळीकर | १० | ,, नानासाहेब गोगटे | ९॥ |
| ,, भगवंतराव उपाध्ये | १० | ,, नारायणराव जोशी | ८॥। |
| ,, ढवळे नर्सीकर | १० | ,, एस्. व्ही. कालकुन्द्रीकर | ५ |
| ,, अनन्तशास्त्री फडके | १० | ,, नरहरदेव | ५ |
| ,, दासोपंत तळणीकर | १० | ,, काळेले | ५ |
| ,, श. कृ. पळशीकर | १० | ,, किसनराव भुमकर | ५ |
| ,, श्रीपतराव पंपाड | १० | ,, वा. शे. भिर्डीकर | ५ |
| ,, सदाशिवराव अंबडकर | १० | ,, गोगे भटजी | ५ |
| ,, पं. आत्मारामशास्त्री | १० | श्रीमती सौ. शैलजा जोशी | ५ |
| ,, बाळकृष्णपंत बेंद्रे | १० | श्री. सदाशिवराव परांडे | ५ |
| ,, भास्करराव भागवत | १० | ,, गंगाधर खंडेराव | ५ |
| ,, डॉ. प्राणी | १० | ,, रा. ना. पुजारी जेरे | ५ |
| ,, केशवराव गोखले | १० | ,, अनन्तराव मोघे | ५ |
| ,, नारायणराव मोघे | १० | ,, सीतारामपंत फडणीस | ५ |
| ,, हस्ते कुर्डूकर | १०। | ,, नारायणराव जमलगीकर | ५ |
| ,, रामराव वरुडकर वकील | १० | ,, दत्तोबा आडके | ५ |
| ,, विनायकराव नेमीवंत | १० | ,, किशनराव प्रोफेसर | ५ |
| ,, य. वा. नंदे | १० | | |
| श्रीमती गंगुताई दामले | १० | | |

| नांव | रु. | नांव | रु. |
|---|---|---|---|
| श्री. गुण्डोपंत धर्माधिकारी | ५ | श्री. दिगंबरगुरु आजेगांवकर | ५ |
| ,, यशवन्तराव पारगांवकर | ५ | ,, लक्ष्मणराव पवार | ५। |
| ,, डॉ. गद्रे | ५ | ,, भीमराव मामा | ५ |
| ,, श्रीपादशास्त्री तापस | ५ | ,, डॉ. देशपांडे | ६ |
| श्रीमती रमाबाई धुमाळे | ५ | कु. शिरीष मोवे | ४ |
| श्री. अग्निहोत्री | ५ | गं. भा. माई अंबडकर | ३ |
| ,, अण्णा भगवंत राहेरकर | ५ | श्री. जाधव | ३ |
| ,, दिगंबरराव परळीकर | ५ | डॉ. वि. पा. दांडेकर | २ |
| ,, काशीनाथराव जोशी | ५ | श्री. दत्तात्रेय दामोदर | २ |
| ,, अंबादासराव धुमाळ | ५ | ,, वा. आत्माराम जेरे | २ |
| ,, सखाराम पारगांवकर | ५ | ,, विनायक पांडुरंग | २ |
| ,, सीताराम स्वामी | ५ | ,, नागराजराव तंजावरकर | २ |
| श्रीमती दुर्गाबाई चिटगोपेकर | ५ | ,, मुकुंदराव केळूसकर | २ |
| सौ. अंबूताई | ५ | ,, चौबळ | १। |
| ,, सुमनबाई | ५ | ,, पुरंदरे | १ |
| ,, पंडित | ५ | ,, वर्तक शास्त्री | १ |
| ,, प्रभावतीबाई पानगांवकर | ५ | ,, रत्नपारखी | १ |
| श्री. दत्तात्रेय आत्माराम | ५ | ,, गणेशराव परळीकर | १ |
| ,, दि. ह. कडेकर | ५ | श्रीमती हार्डीकर भागिनी | १ |
| श्री. डॉ. स. ल. विणेकर | ५ | श्री. बाळकृष्ण रामचंद्र | १ |
| सौ. शालिनीबाई गुर्जर | ५ | स्थानिक मंडळीकडून | |
| श्री. चद्रमणी आदमाणे | ५ | यज्ञापुढें पेटींत आलेली | |
| ,, शामराव बोराळकर | ५ | रक्कम | ८२५ |
| ,, पांडुरंगशास्त्री दिवाण | ५ | | —— |
| ,, व्यंकटगुरु आजेगांवकर | ५ | एकदर जमा | ५७८३ |

———

## खर्च

| | |
|---|---|
| याज्ञिकखर्च, देवस्थानांना देणगी व ब्राह्मणाची दाक्षिणा | ३००० |
| भोजन खर्च, दूध चहा इत्यादि | २००० |
| किराणा माल | ३०० |
| मांडव खर्च | ७६ |
| लाईट, लाउडस्पीकर, मजुरी, स्वैपाकी व किरकोळ इत्यादि | २०५ |
| एकूण खर्च | ५५८१ |

शिल्लक राहिलेली रक्कम ग्रंथप्रकाशनमंडळास दिली.

## बढवाई येथील उत्सववृत्तांत

गुरुवारीं काकड आरतीनन्तर "दिगंबरा दिगंबरा" भजन झालें. श्रींची पवमान-रुद्राभिषेकपूर्वक महापूजा बारा वाजेपर्यंत झाली. नंतर पवमानस्वाहाकार तीन वाजेपर्यन्त झाला. इंदूराहून विद्वान् वैदिक मंडळी आली होती. नंतर ४॥ वाजेपर्यन्त वे. शुकदेव शास्त्री यांचें कीर्तन होऊन आरती झाली व तदुपरान्त ब्राह्मणभोजन–महाप्रसाद ( २०० पात्र ) झालें. रात्रीं वसंतपूजा व भजन असा कार्यक्रम झाला. उत्सवास साधु, संत, संन्याशी व भक्त मंडळी इंदूर, बढवाय व मोरटक्का येथून आली होती. श्रीक्षेत्र गरुडेश्वर येथून एक ब्रह्मचारी आदलेच दिवशीं तेथें येऊन उपस्थित झाला व उत्सव सपतांच गुरुवारीं रात्रीं श्रीक्षेत्र ओंकारेश्वरीं जातों असें सांगून पसार झाला. उत्सव इतक्या थाटानें साजरा होईल ही स्वप्नीं पण कल्पना नव्हती. अर्थात् श्रीगुरुमाऊलींनींच आपला उत्सव साजरा करून घेतला असें वाटतें.

निवेदकः— **रामचंद्रशास्त्री टिल्लू**, इंदूर

नरसोबावाडी या ठिकाणीं श्रीमहाराजांच्या ग्रंथांचीं परायणें, श्रीपादुकांस रुद्राभिषेक, भजन, कीर्तन इत्यादि कार्यक्रम जन्मदिवशीं झाले.

अमरापूर ( औरवाड ) येथील '**श्रीवासुदेवानन्दसरस्वतीपीठ**' या संस्थेतर्फेंही श्रीगुरुमहाराजांचा शताब्दिमहोत्सव, नामसंकीर्तन कीर्तन, पुराण इत्यादि रूपानें पार पडला.